माझ्या सुरवातीच्या
प्रचार कार्यास व ग्रंथनिर्मितीस
स्वतःचे दागिने विकून
सहाय्य केलं

क्षयाने आजारी असताना व
बाळदौलतला दुसरा आधार नसताना
जिनं तुरुंगांत पाऊल टाकण्यास
धैर्यानं खुषीनं व निग्रहानं
संमती दिली
व
प्रपंच नेटका चालवला
त्या

**सौ. रमाबाई बागल**

या माझ्या पत्नीस
कृतज्ञतापूर्वक
**अर्पण**



२६-१-५४ —माधवराव बागल.



सौ. रमाबाई (उर्फ हौशाबाई) माधवराव बागल

# अनुक्रमणिका

## भाग १



## भाग २

—※—

# चित्रांची अनुक्रमणिका

# सुरवातीचे चार शब्द

## हे आत्मचरित्र कां लिहलं ?



हे पुस्तक हातीं धरल्यानंतर सहजीच एखादा प्रश्न विचारील, हें आत्मचरित्र कां लिहलं ? याला मी एवढंच उत्तर देईन 'मला लिहावसं वाटलं म्हणून मी लिहलं.' मला त्यांत आनंद वाटूं लागला, लिहिताना मी आनंद भोगूं शकलो, म्हणून मी लिहिलं आणि म्हणूनच मी लिहूं शकलो. धंदेवाईक साहित्यिक पोटासाठीं लिहितो. मी पोटासाठीं लिहलं नाहीं. किंवा मला कोणी सक्ती केली नाहीं.

कवि, साहित्यिक, किंवा चित्रकार हें आपआपल्या कृति कां निर्माण करतात ? त्यांना तशी ओढ लागते म्हणून.

* त्यांत कांहीं उदात्त हेतू असतो काय ?

असला तर तो कलावंत श्रेष्ठ ठरतो. पण हेतू हा असतोच.

माझा हेतू निव्वळ आनंद भोगावा हा नव्हता. त्या आनंदांत माझ्या हातून कांहीं जनसेवा घडावी हा होताच होता.

* आत्मचरित्र लिहिण्यानें जनसेवा कशी घडते ?

अनुभवांतून जग शहाणं होत चाललं आहे. मग माझे अनुभव तरी फुकट कां जातील? प्रत्येकांचे अनुभव कांहीं निराळे असतातच. ते मनोरंजक असतात तसें उद्बोधकही असू शकतात. माझ्या जीवनांत तसे आढळलें. त्याचे साथीदार मी इतरांना कां करूं नये? सुखाला तसे दुःखाला वांटेकरी मिळाल्याने सुख दुणावते दुःख कमी होते असा प्रत्येकाचा अनुभव नाहीं काय?

* यात प्रसिद्धीचा हेतू नाहीं काय?

असेल! आणि आहे ही. पुस्तक प्रसिद्ध करणारा प्रसिद्धीसाठींच लिहितो. मग प्रसिद्धीचा हेतू नाहीं असं म्हणता तरी कसं येईल! सत्ता आणि संपत्तीच्या वेडाहून हे वेड पुष्कळ बरं! 'ज्ञानप्रकाश'कार कै. पूज्य काकासाहेब लिमये यांनीं ते ओळखून त्या वेडाला चालना दिली. पण त्यामुळें माझ्या हातून वाईट गोष्टी घडण्यापेक्षां चांगल्याच पुष्कळ घडल्या. त्यांतून प्रचाराचं वेड लागलं. आणि कोल्हापूर जागं केलं! महाराष्ट्रांतही पुष्कळ जागृति करूं शकलो. पण आत्मचरित्र लिहिण्याच्या या कालीं ते वेड कमी झालं आहे. अन् मारलंही आहे.

* पण हे तुम्ही प्रामाणिकपणें लिहलं आहे काय? आणि सर्व सत्य गोष्टी लिहल्या आहेत काय?

हो. मी प्रामाणिकपणें लिहलं आहे आणि सत्य तेच लिहलं आहे. असत्य लिहिल्याची बोंचणी माझ्या मनाला होईल असं मी कांहीं लिहलं नाहीं. मला प्रामाणिकपणें वाटतं तेच लिहलं आहे.

* सत्य जे घडलं तेच लिहलं आहे? पण किती?

जरूर तेवढं! सकाळपासून संध्याकाळपर्यंत अनेक गोष्टी घडत असतात त्या काय मी लिहीत बसलो नाहीं. सांगाव्याश्या वाटल्या त्याच लिहिल्या. त्या सत्य लिहिल्या. प्रामाणिकपणें लिहिल्या. पण माझ्या दृष्टिकोनांतून लिहिल्या. त्यामुळें माझे निष्कर्ष बरोबर असतीलच असें मी कसे म्हणूं? आत्मसमर्थनाची वृत्ती डोकावणें अगदी अशक्य असें म्हणता येणार नाहीं. तथापि आत्मपरीक्षण आणि आत्मटीका ही टाळण्याचाही मीं प्रयत्न केलेला नाहीं.

मी निर्भेळ सत्यच सांगतो हा टेंभा मिरवण्याकरता मिस् मेयो प्रमाणें जीवनांतील सारी गटारें उपसूनही उगाच वाचकापुढें मांडली नाहींत. पण मनाचं व देहाचं अधःपतन कां झालं, कसं झालं हे दाखवताना ती दडवली नाहींत.

* सारा अहंभाव मारून हे लिहलं काय ?

निःपक्षपाती दृष्टी ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. पण अहंभाव सर्वस्वी मेलाच असेल असं नाहीं. तो मेला आहे असं म्हणण्यातही तो जिवंत राहतोच. पण मार्क्सवादाचं थोडसं वाचनं झाल्यानंतर आणि पक्ष टाकल्यानंतर तो फार कमी झाला आहे. व त्रयस्थाची भूमिका घेणं पूर्वीहून फार सोपं झालं आहे.

आत्मचरित्र लिहितांना साहजिकच आत्मपरीक्षण करता आलं.

ज्यांच्यामुळें माझ्यावर आघात झाले, मी संकटांत पडलो, त्यांच्या परिस्थितीचा मी विचार टाळला नाहीं. माझ्यावर झालेले आघात जाणून बुजून सद्बुद्धिनें त्यांनी केले नसतील पण माझ्यावर होणाऱ्या अनिष्ट परिणामाचा त्यांनी आपल्या स्वार्थापुढें विचार केला नाहीं यांत मला शंका वाटत नाहीं. कांहींच्या हालचाली तर पूर्वयोजित होत्या असा अनुभव आला तो मी लिहिला आहे.

माझ्या या आत्मचरित्राला वि. स. खांडेकर यांनीं 'जीवन प्रवाह' हे नांव सुचवले. ते अगदी समर्पक वाटले. या जीवन प्रवाहांत मी प्रवाह-पतिताप्रमाणे वागलो नाहीं. आलेले अडथळे बाजूस सारण्याचा व केव्हां ओलांडण्याचा व बगल देण्याचा मी प्रयत्न केलाच आहे. हार, माघार, आणि यश, या तीन्ही अवस्थांतून गेलो आहे.

सरंजामदारी थाटाच्या अंमलदारी जिण्यांतून कलेकडे कां झुकलो, ती कमी करून समाजसेवेकडे कां लागलो, त्यांतून साहित्याकडे कां वळलो, आणि राजकारणांत कसा पडलो, मला मित्र कोण कोण लाभले, कोण टिकले, कोण गळले, आणि कोण शत्रू झाले, या कारण परंपरेची सांखळी जोडताना मार्क्सवादाचा मला पुष्कळ उपयोग झाला आहे. राजशाहीच्या वातावरणांतून निसटून मी राजशाहीचा विरोधक कसा झालो, कॉंग्रेसमधून निघून शेतकरी कामगार पक्षांत कां गेलो आणि त्यानंतर कम्युनिस्ट

विचारसरणीचा राहून पक्षातीत कां झालो हा इतिहास कार्यकर्त्यांना विचार, करायला लावल्याशिवाय राहणार नाहीं. आत्मचरित्रानें एवढे काम केले तरी पुरे आहे.

माझ्या या आत्मचरित्राचा कोल्हापुरचा इतिहास लिहिणाऱ्यांना पुष्कळ उपयोगी होईल. पण या लिखाणास इतिहासाचे स्वरुप नाहीं म्हणून स्वामी, वारके, इंगळे सारख्या हुतात्म्यांचा उल्लेख यांत आला नाहीं, तसा अनेकांचा आला नाहीं. केवळ माझ्याशी ज्यांचा विशेष संबंध आला व जे माझ्या जीवनावर चांगला वाईट परिणाम करूं शकले त्यांचाच उल्लेख आला आहे. याचमुळें जगाला सामान्य वाटणारी माणसें मला महत्वाची वाटली व प्रसिद्धी पावलेली कांहीं, मानवतेच्या कसोटीला लावताच सामान्याहून खालची वाटली.

आठवणी मी आताच लिहिल्या असे नाहीं. मला ही बऱ्याच वर्षांपासूनची सवय आहे. महाराष्ट्राला ओळख होण्यापूर्वीची आहे. पूर्वीं लिहिलेल्या त्या आठवणीपैकीं कांहीं आचार्य अत्रे यांनीं आपल्या नवयुग साप्ताहिकांत छापल्या होत्या. प्रो. य. गो. नाईक यांच्या कृपेनें टिकेकर यांनी चालवलेल्या 'महाराष्ट्र शारदा' या मासिकांतून कांहीं आल्या होत्या. वडिलांनीं चालवलेल्या 'हंटर' साप्ताहिकांतून व मी चालवलेल्या 'अखंड भारत' साप्ताहिकांतून कांहीं आल्या होत्या. पण त्या आल्या तशाच या आत्मचरित्रांत घेतलेल्या नाहींत. त्या सर्व पुन: आतापर्यंतच्या आलेल्या अनुभवाला धरून पुन: लिहून काढल्या. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व वि. स. खांडेकर यांनींही तशा लिहून काढण्याबद्दल सुचवलें म्हणून त्या आजच्या स्वरुपांत बाहेर पडत आहेत.

आर्थिकदृष्ट्या खर्चाची हीं जबाबदारी अंगावर घेण्याला सर्वस्वी असमर्थ असता मी हे धाडस करीत आहे. खरोखरी हे धाडस आहे. जाणून बुजून मी हे आर्थिक संकट ओढवून घेतले आहे. पण या संकटांतून मी बचावून निघेन असा मला विश्वास वाटतो म्हणूनच मी हे अंगावर घेऊं शकलो. आतापर्यंत अनेक संकटांतन मी पार पडलो आहे. यांतूनही पार पडेन.

पुस्तकास मुंबईच्या दरांत कागद आणून देण्याचं काम 'पुढारी' कार गणपतराव जाधव यांनीं केलें. श्री सिद्धेश्वर छापखान्याचे मालक बाळकृष्ण नारायण ठकार यांनीं माफक दर दिला. ब्लॉक मेकर डी. डी. बराले यांनीं ब्लॉक, मीच ठरवलेल्या दरांत दिले; व कव्हरचा फोटो बी. पी. पाटील यांनीं, त्यांचे पेन अ‍ॅण्ड इंक आर्टिस्ट ग. ना. जाधव (किर्लोस्करवाडी) यांनी मोफतच दिले. आंतील बऱ्याच ब्लॉकचे फोटो नामवंत फोटो आर्टिस्ट शुक्ल यांनीं मित्र नात्यानें काढलेल्या फोटोंचे, घालता आले.

ज्या या आत्मचरित्राला तर्कतीर्थांनीं आत्मियतेनें प्रस्तावना, खांडेकरांनीं परीक्षणाचे ' दोन शब्द ' व तीर्थरुप केशवरावजी टाकरे यांनीं समालोचन केलें त्यांचें मी कोणत्या शब्दानें आभार मानूं ?

—माधवराव बागल.

———

# प्रस्तावना





तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

माझे मित्र माधवराव बागल यांचे हे आत्मचरित्र आहे. हे आत्मचरित्र म्हणजे राजर्षि श्री. शाहू महाराजांच्या नंतर घडलेला स्वातंत्र्योत्तर कालापर्यंतचा कोल्हापूरचा राजकीय इतिहासच होय. निदान त्या इतिहासाचे व्यक्तिजीवनाच्या आरशांत धरलेले प्रतिबिंबच होय. हा आरसा बिलोरी असल्यामुळें निर्मलता, पाणिदारपणा व शुभ्र रत्नाची चमक यांनी ओतप्रोत भरला आहे. आरशाप्रमाणेंच परिस्थितीबद्दल संवेदनक्षम असे बागलांचे मन आहे. त्यामुळें या आत्मचरित्रांतून कोल्हापूरच्या राजकीय परिवर्तनाच्या राजकीय इतिहासाची महत्वपूर्ण परिवर्तनें ओवलेली आढळतील. हा इतिहास व्यक्तिजीवनांत गोंवला गेल्यामुळें कादंबरीची सरसता त्याला आली आहे. ही व्यक्ति रसिक व कलावंत असल्यामुळें उत्साह, सुखसंवेदना, यातना, क्षोभ, शांति इत्यादि भावनांचे रम्य रंग उठावदारपणें त्यांत उतरले आहेत. हा नुसता राजकीय इतिहास नाहीं. तर त्यांत महाराष्ट्रांतील एक मूलगामी, गंभीर, उदात्त व भीषण अशा सामाजिक

सत्यशोधकी चळवळीचा व जातीय विग्रहाचा ऐतिहासिक संदर्भहि स्पष्टपणें सांपडतो, जिजीला निर्वासित झालेल्या परंतु भविष्यांतील उत्कर्षाची आशा न सोडलेल्या राजारामाच्या मनःस्थितींत माधवराव आज आहेत. त्यांनी या क्षणापर्यंत आपला चरित्र चित्रपट विणला आहे. त्यांत जीवनाची आसक्ति भरपूर आहे. हेवेदावे, मत्सर, द्वेष इत्यादि विकारहि व्यक्त झाले आहेत. परंतु तोल कोठेही सुटला नाहीं. सूचक, मार्मिक आणि अचूक प्रहार आहेत परंतु ते प्रहार धीरोदात्त वीराचे आहेत. प्रसन्न व सुलभ भाषेत लिहिण्याची कला लेखकाला अत्यंत वश आहे. त्यामुळें सामान्य वाचकहि त्यांत रमून जाईल. पुरोगामी समाजवादी क्रांतिकारक विचारसरणीची, राष्ट्रवाद विचारसरणीशी व भावनांशी असलेली विसंगत गुंतागुंत हा आपल्या राष्ट्रीय जीवनाचा महत्वाचा भाग आहे. या गुंतागुंतीचे उदाहरणहि या व्यक्तिचरित्रांत सांपडते; विश्वबंधुत्वावर अधिष्ठित असलेल्या समाजवादी ध्येयवादाला राष्ट्रीय परिस्थितीचे आणि संकुचित सामाजिक जीवनाचे बंधन कसे प्राप्त होते, याचे उदाहरण या व्यक्तिचरित्रांत सांपडते. महाराष्ट्राच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय जीवनाचा झगडा संग्रामपूर्ण स्वरुपांत व्यक्त करूं इच्छिणाऱ्या प्रतिभाशाली कादंबरी-काराला बागलांचे व्यक्तित्व स्फूर्तिदायक व क्षोभकारक वाटेल. हे चरित्र म्हणजे महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासांतले एक महत्वपूर्ण प्रकरण आहे. या प्रकरणाचा पूर्वरंग राजर्षि शाहूमहाराज व लोकमान्य टिळक यांच्या चरित्रांत सांपडेल. इतिहासाची अनपेक्षित दिशेनें परिणति कशी होते, आणि इतिहास घडविणाऱ्या व्यक्तीची निराशा कशी होते, याचे उदाहरण या चरित्रांत आढळेल.

कोल्हापूर–राज्यांतून एक छोटेखानी लोकसत्ताक राज्य निर्माण करूं पाहणारा कारागीर म्हणजे माधवराव बागल होत. त्यांना या लोकसत्ताकांत समाजवादाची प्राणप्रतिष्ठा करावयाची होती. ते जवळ जवळ बारा वर्षें कोल्हापूर राज्यांतील प्रजेचे एकमेव पूजास्थान बनलेले नेते होते; हें नेतृत्व देशव्यापी असलेल्या प्रबळ राज्यशक्तीनें हरण करून नेले, आणि समाज-वादी कोल्हापूर–राज्याचे भव्य व भावुक रम्य स्वप्न खलास झाले. रात्रीचे

नाटक संपल्यानंतरच्या धीरोदात्त नायक नट जसा दिसावा, तसे बागल दिसूं लागले आहेत. आतां त्यांना कम्युनिझमच्या विश्वक्रांतीच्या खेळांत सामील होण्याची आतुरता उत्पन्न झाली आहे. असे हे या चरित्राचे साररुप मूल्यमापन आहे.

माधवरावांची व माझी पहिली भेट १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळींत वाळवे तालुक्यांत प्रथम झाली. मराठा खानदानमध्यें वाढ झालेले, सरळ मनाचे परंतु अभिमानी, दिलदार परंतु सडेतोड, पाणीदार डोळ्याचे हे गृहस्थ माझ्या मनावर छाप टाकल्याशिवाय राहिले नाहींत. कोल्हापूर येथे यांच्या घरीं मी पुष्कळ वेळां उतरलो आहे. त्यामुळें त्यांना जवळून पाहण्याचा योग आला. हे राजारामपुरींत लहानशा टुमदार घरांत भाडेकरू म्हणून पुष्कळ वर्षे राहात आहेत. ते त्यांचे स्वतःचेंच घर असावे, असा भास त्यांतील टापटिपीवरून व सजावटीवरून होतो. ते निसर्गाचे चित्रकार आहेत, ती चित्रें तेथें ओळीने टांगलेली आहेत, ते ध्येयवादी व पुरोगामी अद्ययावत विचाराचे आहेत, याची खूण तेथील कपाटांत भरलेल्या पुस्तकावरून येते. हे लहानसे घर पुस्तकांनी व तसबिरींनी गच्च भरलेले आहे. विचारसुखाची आणि सांसारिक सुखाची आवड व आसक्ति असलेला हा गृहस्थ आहे, असे जरी सकृत्दर्शनीं दिसले तरी त्यांच्या चेहऱ्यावरील चिंता, यानें कांहींहि संग्रह केला नाहीं. असे सूचित करून विपण्ण करते. सध्यां पूर्ण वैफल्याच्या भावनेनें ही व्यक्ति उदास झालेली दिसते. परंतु या उदासीनतेच्या आवरणाखाली उदात्त ध्येयवादानें जतन करून ठेवलेल्या खोल आशावादाचा सुगावा लागतो. त्यांना मित्र पुष्कळ आहेत, कोल्हापूरच्या सामान्य जनतेची त्यांच्यावर खूप श्रद्धा व भक्ति आहे. आणखी असे कीं, हे मित्रांचे प्रेम व जनतेची भक्ति संपूर्ण वजा केली तरी एक फार मोठा अध्यात्मिकतेचा ठेवा माधवरावांच्यापाशीं आहे. ही अध्यात्मिकता म्हणजे गूढवाद नव्हे तर ते विशाल व अनंत अशा निसर्गावरील प्रेम होय. ईश्वराच्या सगुण व साकार मूर्तीच्या साक्षात्कारानें भगवत्‌भक्ताला जशी धन्यता व समाधान लाभते, तशी धन्यता व समाधान निसर्गाच्या सौंदर्य लहरींनीं माधवरावांना

दिले आहे. सह्याद्रीचे व विशेषतः पन्हाळगडचे विशाल सौंदर्य-वैभव माधवरावांच्या मालकीचे झाले आहे. उषःकालाच्या दिव्य अनुभूतींत ते ऋग्वेदांतील ऋषीप्रमाणें ध्यानस्थ होतात आणि संध्याकाळच्या संध्येंत समाधि पावतात. त्यांनी रंगविलेली चित्रें याची साक्ष देतात. आकाशाचे व पृथ्वीचे रंग त्यांच्या चित्ताला चैतन्याचा पुरवठा करीत असतात म्हणून ते आपल्या हृदयांत क्रांतीचा अथांग आशावाद बाळगीत आहेत.

ते वीर आहेत, पण मुत्सद्दी नाहीत; याचे कारण तें उघड्या मनाचे आहेत. त्यांना डावपेंच समजत नाहींत. अहंभाव नसता तर ते संत बनले असते. तें सर्वांगीण भावनेनें भरलेले व्यक्तित्व असल्यामुळें तेथें मुत्सद्दी बुद्धीला वावच नाहीं. निसर्गाच्या भव्य विस्तारांत प्रकट होणाऱ्या रंगांत ते रंगून जातात, त्यामुळें त्यांच्या मनाचे रंगहि सहजगत्या प्रकट होतात. म्हणून राजकारणांतील इरसाल मुरब्बी व्यक्ति त्यांचे मनोगत सहज ओळखूं शकतात. मराठा जमात ही मुत्सद्दी माणसांची खाण आहे. कारण मराठ्यांचें मन खोल आहे. परंतु अशा खोल मनाच्या मराठ्यांत बागलांची गणना करतां येत नाहीं. तसें मन त्यांच्या-पाशीं असतें तर महाराष्ट्राचे अद्वितीय-नेतृत्व त्यांच्याकडे आलें असते. मराठ्यांचें शौर्य तेवढे त्यांच्यांत उतरले आहे. मराठ्यांचें शौर्य व मुत्सद्दीपणा यास इंग्रजी काळांत ग्रहण लागले, ते ग्रहण आतां संपले आहे. मराठ्यांच्या ध्येयवादी शौर्याला आवाहन देण्याचे कार्य बागल जन्मभर करीत राहातील अशी आशा बाळगण्यास पुष्कळ जागा आहे. बागलांनी जे विपुल लेखन केलेले आहे, त्यावरून अशी आशा बाळगतां येतें. बागलांनी आपल्या लेखनाने सत्यशोधक चळवळीला नव्या ध्येयवादाचा पुरवठा केलेला आहे. याबाबतीत त्यांची कामगिरी अनन्यसामान्य आहे. त्यांनीं सत्यशोधकांस दिलेला इशारा वाया जाणार नाहीं.

सत्यशोधक चळवळीच्या मुळांशी असलेली तात्विक विचारसरणी विश्वबंधुत्वाची होती. जीर्ण झालेल्या धर्मसंस्थेला उलथून टाकणें हें तिचे ऐतिहासिक कार्य अव्वल दर्जाचे आहे. परंतु त्या चळवळीचा आविष्कार ज्यांनी केला त्यांच्यांत कांहीं सुसंस्कृत माणसें सोडल्यास ओबड-धोबडपणा फार होता. मूलभूत विचारांचा पल्ला फार मोठा होता परंतु

अविष्करण कित्येकवेळां असंस्कृतपणाचे होते. मराठे हे महाराष्ट्राचे वसाहतकार. त्यांच्यांतील समाजधुरंधरांची, सेनापतीची व राज्यधुरंधरांची परंपरा हजारों वर्षांची सांपडते. महाराष्ट्रांतील विशाल स्थापत्य त्यांच्या नेतृत्वाखालीं निर्माण झाले; महान् संस्कृत पंडित व मराठी कवि यांचे ते आश्रयदाते होते; महाराष्ट्र सभ्यतेचा आदर्श त्यांनीं निर्माण केला. या सर्व पूर्व-इतिहासाचा संदर्भ सत्यशोधकी चळवळींत लुप्त झालेला दिसला. तेच हे लोक, अशी ओळख पटेनाशी झाली याचे कारण इंग्रजी राज्य होय. इंग्रजी राज्यानें केवळ ब्राह्मण वर्गासच भरभराट आली. नव्या पाश्चात्य संस्कृतीने नवे तेज या वर्गाला लाभले. परंतु मराठा इत्यादि मोठा सामाजिक भाग मागे पडला. त्यामुळें ब्राह्मण इत्यादि पांढरपेशी जमात विलग झाली. त्यामुळें भावना विलग झाल्या, हजारों वर्षांचे ममत्व लुप्त झाले, परकेपणा आला. तो परकेपणा भयंकर, याची यत्किंचितहि संवेदना या शहाण्यांना आली नाहीं. ही एक प्रकारची बुद्धिजीवी वर्गाची दिवाळखोरीच होय. मराठा इत्यादि महत्वाच्या जमातींचा प्रचंड सामाजिक वर्ग पराभूत मनोवृत्तीनें व न्यूनगंडानें पछाडलेला तयार झाला. ब्राह्मणादि पांढरपेशीवर्ग मोठ्या समाजापासून अलग पडल्यामुळें सामाजिकतेपासून भ्रष्ट झाला आहे. जातिभेद याचा अर्थ सामाजिकतेचा भंग असा नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतहि जातिभेद आहे. परंतु येथें ब्राह्मणादि पांढरपेशे वर्गाची सामाजिकता नष्ट झाली नाहीं. यापुढें दक्षिण हिंदुस्थानांत व विशेषतः महाराष्ट्रात खरीखुरी लोकशाही वाढीस लागल्यास आणि आर्थिक व शैक्षणिक दृष्टीनें मागे पडलेला बहुजनसमाज नवजीवनाचा लाभ होऊन उन्नत झाल्यास ही विनिष्ट झालेली सामाजिकता ब्राह्मणांना लाभेल. परंतु अशावेळीं जातिभेदावर आधारलेली जुनी संस्कृति नष्ट झालेली असेल; त्यामुळें ब्राह्मणत्व व तन्मूलक अहंकार यानांहि विराम मिळालेला असेल. अशा सामाजिक क्रांतीची वैचारिक पार्श्वभूमि निर्माण करण्यांत बागल हे आघाडीवर आहेत.

बागल हे स्वभावानें समन्वयवादी आहेत. याचे कारण त्यांच्या भावनामय स्वभावांत आहे. भावना ह्या भूतकालांतील इतिहासानें बनविलेल्या असतात. बागल यांचा पोशाखच समन्वयवादाचा सूचक

आहे. त्यांच्या अस्मितशाली, उमद्या तनूवर खादीचा पोषाक डौलदारपणाने चढविलेला दिसतो. त्यांच्या अंगावर खादी आहे, हे प्रथमदर्शनी ओळखूंसुद्धा येत नाहीं, ही त्यांच्या समन्वयवादाची खुबी आहे. तसे म्हटले तर, खादीचा पोषाक सैल, गबाळ व ओबडधोबड दिसतो. आटपशीरपणाचा गुण त्यांत नाहींच. पायघोळ संतांना तो चांगलाच सजवितो, घामटपणा आणि सैलपणा असल्याशिवाय संत शोभत नाहीं. सुशिक्षितांनी खादीचा हा दोष घालविला आहे. परीट घडी व शुभ्रता खादीला असली म्हणजे ती खर्चिक असूनहि साधी दिसते व आदरणीय वाटते. बागलांनी तिला ऐटदारपणा आणला आहे. बागल भावनाप्रधान असल्यामुळें मूर्तिपूजक आहेत. मात्र त्या मूर्ति वाटेल त्या नसतात; तर त्या कलाकाराच्या दृष्टीनें निवडलेल्या दिसतात. जुन्नरच्या शिवनेरी किल्ल्यांत गेल्याबरोबर शिवदर्शन झालेल्या शिवभक्ताप्रमाणें शिवाजीच्या स्मरणानें ते रोमांचित व सद्‌गदित होऊन अश्रूंनी गंहिवरतात. महात्मा गांधीचा पुतळा त्यांनं उभारला आहे. आणि उभारण्याकरितां स्थलाची मार्मिक रीतीनें निवड केलेली आहे. त्यांनी शहराचा विस्तृत चतुष्पथ न निवडता ज्या ठिकाणीं त्या मूर्तीच्या चिंतनांत मन गढेल, असे वरुणतीर्थ निवडले आहे. महात्मा जोतिबा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याहि मूर्ति त्यांनी उभारल्या आहेत. ते मूर्तिभंजक दिसत असूनहि ते मूर्तिपूजक आहेत. समन्वय हा त्यांच्या चरित्राचे सार आहे, भावना हा गाभा आहे, विचार हे त्यांचे वलय आहे. त्यांच्या चरित्राचे हे रहस्य सांगून त्यांचा प्रेमाचा निरोप घेतो.

२–५–१९५३

लक्ष्मणशास्त्री जोशी.

# माधवराव खंडेराव बागल

## जन्म २८ मे १८९६

**कला.**— जे. जे. स्कूल ऑफ् आर्ट १९१४. **पेंटिंग**, ४ वर्षें सतत पहिली स्कॉलरशिप. **मॉडेलिंग**, ४ वर्षांचा कोर्स २ वर्षांत, स्कॉलर **म्यूरल डेकोरेशन** १ वर्ष. स्कॉलर, मुंबई गव्हमेंट हौसमध्ये तीन वॉल डेकोरेशन्स, : वॉटर कलर अल्बम्, लेडी आयर्विन यांना छ. राजाराम महाराजांचे हस्तें. १९२८ : व्हा. प्रेसिडेंट कोल्हापूर आर्ट सोसायटी १९३५ : अध्यक्ष महाराष्ट्र चित्रकार संमेलन, कोल्हापूर पुणें १९३६ : स्वागताध्यक्ष महाराष्ट्र चित्रकार संमेलन, कोल्हापूर : नगरपालिकेस छ. शाहू महाराजांच्या ब्स्टची देणगी, पुतळा शाहू उद्यान गंगावेसमध्यें, : पेंटिंगचा संग्रह ताराराणी विद्यामंदिरास, बागल आर्ट गॅलरी उद्घाटन् सरसेनापति करिअप्पा :

**धार्मिक चळवळ.**— १९३२, अध्यक्षतेखालीं अस्पृश्यासमवेत जगदंबा मंदिर प्रवेश; वाडीनृसिंह पादुकास्पर्श व तेथे सहभोजन; दुतोंडी मारुती देवालय खुले; आंतर जातीय लग्नें अध्यक्षतेखालीं—आत्माराम पाटील, मराठा व ब्राह्मण; हर्वीरे लिंगायत-महार, डिग्रजकर इनामदार, मराठा व अस्पृश्य वन्यजात : म्यु. पा. सिव्हिक बोर्ड अध्यक्ष नात्यानें, सोनवणे हरिजन यांना नगराध्यक्षपद दिले : अध्यक्ष अखिल मुंबई इलाखा हरिजन विद्यार्थी परिषद :

**मजूर चळवळ स्थापना व अध्यक्षपद १९४१.**— शाहूमिल मजूर संघ, सिने-थिएटर कामगार संघ, शिंपी कामगार संघ, औषधी नोकर, प्रेस कामगार, व्यापारी नोकर संघ, शाहूपुरी हमाल संघ, राष्ट्रीय विडी कामगार संघ, मेकॅनिक्स, सर्व संस्थांचे पुनः एकीकरण करून, **कोल्हापूर सं. राष्ट्रीय कामगार संघ** स्थापना व अध्यक्ष : म्युनिसिपल कामगार

संघ, मेडिकल मीनियल स्टाफ युनियन : **संस्थानाबाहेर** उगार शुगर मिल संघ, विडी कामगार संघ, मिरज : माधवनगर गिरणी मजूर संघ, **अध्यक्ष–दक्षिण संस्थान कामगार समिति.**

**कोल्हापूर संस्थान लोकशाही चळवळ.**—भाषण स्वातंत्र्यापासून ते जबाबदार राज्यपद्धतीपर्यंत. हंटर साप्ताहिक १९२५ ते १९३०. पत्रांतून भाषण लेखन संघटना व जबाबदार राज्यपद्धतीची मागणी. पार्कें, वेठबिगार, सारावाढ तक्रारी. झेंडा मिरवणुकीस प्रोत्साहन. यामुळें पत्राकडून पांच हजाराची जामिनकी. पत्र बंद: परदेशी कपड्यांच्या होळ्या - **हद्दपारी:** अध्यक्ष, करवीर इलाखा खादी संघ १९३१ स्थापना : अध्यक्षतेः खाली **कॉंग्रेस कमेटी** १९३२ : अध्यक्ष, करवीर व्याख्यानमाला १९३२ : राजद्रोहाची नोटीस १८–८–१९३८ : पहिला शेतकरी मोर्चा २५-१२-३८ : ताबडतोब **अटक** : कोल्हापूर सं. प्रजा परिषदेची स्थापना, कार्याध्यक्षपद व **अटक** ६–२–१९३९ : **शिक्षा सक्तमजूरी** २ वर्षें **एक** हजार रु. दंड पायांत बेड्या २७-३-३९ : बागवे मंत्रिमंडळाचें वेळीं अटक व लगेच सुटका : पेरी मंत्रिमंडळाचें वेळीं पन्हाळ्यावर स्थानबद्ध १९४२ : स्थानिक स्वराज्यसंघ व सिव्हिकबोर्ड अध्यक्ष नगरपालिका ताब्यांत १९४१ : कोल्हापूर सं. राष्ट्रसेवादल स्थापना १९४२ : प्रजा-परिषदेचे सिव्हिक बोर्ड अध्यक्ष १९४५ : जबाबादार राज्यपद्धती व कार्याध्यक्ष नात्यानें मन्त्र्यांची निवड १५–११–१९४७ : अॅडमिनिस्ट्रेटर नंजाप्पा कडून **स्थानबद्ध** : धान्य भाववाढ विरोध कायदेभंगाबद्दल शिक्षा.

**इतर संस्थानी चळवळी.**—**अध्यक्ष** भोर सं. प्रजापरिषद १९४१ : मिरज सं. प्रजापरिषद १९४२ : सांगली सं. प्रजापरिषद १९४४ : पार्लमेंटरी बोर्ड अध्यक्ष नात्यानें कोरे मंत्रिमडळाची निवड : सावंतवाडी सं. प्रजा-परिषद १९४५ : उद्घाटक, कुरुंदवाड सं. प्र. प. १९४६ : अध्यक्ष, जत सं. प्र. प. १४–९–१९४६ : अक्कलकोट सं. प्र. प. २८-११-१९४६ : **अध्यक्ष, दक्षिणी संस्थानें महाराष्ट्र व कर्नाटक विभाग** ८-९-४६.

**शेतकरी परिषदा.**— स्वागताध्यक्ष वाळवे तालुका शेतकरी परिषद १९३१ : अध्यक्ष कराड ता. शेतकरी परिषद, इंदोली १९४२ :

भगूर ता. शे. प. नाशिक १९४५ : धामणगांव शे. प. सोलापूर १९४५ : शे. प. कोचरे, रत्नागिरी : शिरोडा, रत्नागिरी; शे. प. लोणी. जि. पुणें १९४६ : दापोली जि. पुणें : मणेराजुरी—इचलकरंजी : पुरंदर. ता. शे. प. वाल्हे १९४६ : धामोड. शे. प. ता. राधानगरी—कोल्हापूर : कासेगांव : तासगांव १९५१ : अष्टे : वगैरे. जावली. ता. शे. परिषद महाबळेश्वर १९५१ :

**इतर परिषदा.**— स्वागताध्यक्ष, ग्रंथ प्रदर्शन शाखा, महाराष्ट्र साहित्य संमेलन १९३२ : अध्यक्ष, वाळवे ता. राजकीय परिषद, येल्लूर १९३७ : उद्‌घाटक, दक्षिणी. सं. कॉंग्रेसनिष्ठ युवक परिषद १९४१ : सोलापूर जिल्हा विद्यार्थी परिषद १९४४ : खटाव, ता. कॉंग्रेस युवक परिषद १९४५ : अहमदनगर जि. कॉंग्रेसनिष्ठ युवक परिषद उद्‌घाटक १९४६ : प्राथमिक शिक्षक परिषद जि. पुणे १९४६ : अध्यक्ष, आझाद हिंद—फौज रिलीफ कमेटी १९४६ : उद्‌घाटक, कोल्हापूर सं. क्लार्क्स ॲण्ड लोअर ग्रेड गव्हर्मेंट सर्व्हंट्स युनियन १९४६.

अध्यक्ष, मध्यप्रदेश संयुक्त महाराष्ट्र परिषद जून, १९५१.

**पुतळे.**— अध्यक्ष, म. फुले स्मारक समिती : आंबेडकर पुतळा-समिती : महात्मा गांधी पुतळा पाया भरणी हस्ते. १४—२—४८ : येडशी जनता विद्यालय पायाभरणी. ४-१२-५२ : शाहू छत्रपतीचा बस्ट देणगी नगरपालिकेस—शाहू उद्यानांत :

**वाङ्मय.**— १ नव्या पिढीचे राजकारण. २ बेकारी व तीवर उपाय : ३ समाजसत्ता कीं भांडवलशाही : ४ स्वराज्याचा शत्रू : ५ लग्न बंधन कीं तुरुंगवास : ६ महात्माजींची कामधेनू : ७ संस्थानिक, सं. प्रजा व फेडरेशन : ( कथा संग्रह )— ८ जिव्हाळा ९ संसार १० जुलूम ११ कला आणि कलावंत भाग १ : १२—कला आणि कलावंत भाग २ : १३ बंधनांत : १४ मी व प्रजापरिषद : १५ खेड्यावरचा प्रचारक : १६ म. फुले आजही मार्गदर्शक आहेत : १७ छ. शाहू महाराजांच्या आठवणी १८ मार्क्सवाद म्हणजे काय ? १९ सोशियालिझम व कम्युनिझम २० लेनिन—स्टॅलिन २१ मानवी संहार बंद करा २२ सुलभ समाजवाद भाग १, २३ भाग २ संपादक हंटर १९२५, अखंड भारत १९३०, संपादक, सत्यशोधक हीरक महोत्सव ग्रंथ :

# माझे वाङ्मय

| | | | |
|---|---|---|---|
| १ | बेकारी व तीवर उपाय | ... | १—०—० |
| २ | नव्या पिढीचे राजकारण | ... | ०—६—० |
| ३ | समाजसत्ता कीं भांडवलशाही | ... | ०—६—० |
| ४ | स्वराज्याचा शत्रू | ... | ०—६—० |
| ५ | लग्न बंधन कीं तुरुंगवास | ... | ०—६—० |
| ६ | खेड्यावरचा प्रचारक | ... | ०—६—० |
| ७ | संस्थानिक, सं. प्रजा व फेडरेशन | ... | ०—२—० |
| ८ | महात्माजींची कामधेनू | ... | ०—२—० |
| ९ | मार्क्सवाद | ... | ०—१—० |
| १० | सोशियालिझम व कम्युनिझम | ... | ०—१—० |
| ११ | मानवी संहार बंद करा | ... | ०—१—० |
| १२ | लेनिन—स्टॅलिन | ... | ०—१—६ |
| १३ | सुलभ समाजवाद ( भाग १ ) | ... | ०—२—० |
| १४ | सुलभ समाजवाद ( भाग २ ) | ... | ०—२—० |
| १५ | महात्मा फुले | ... | ०—८—० |
| १६ | शाहुमहाराजांच्या आठवणी | ... | २-१२-० |
| १७ | कला आणि कलावंत ( भाग १ ) | ... | ३—८—० |
| १८ | कला आणि कलावंत ( भाग २ ) | ... | ३—०—० |
| १९ | जिव्हाळा—कथासंग्रह | ... | ३—०—० |
| २० | संसार ,, | ... | ३—०—० |
| २१ | जुलूम ,, | ... | ०-१२-० |
| २२ | जीवन प्रवाह ( आत्मचरित्र ) | ... | |

—०—



बाळ दौलत, सौ. रमाबाई व माधवराव

# जीवन-प्रवाह

माझा जन्म १८९६ सालीं झाला असला तरी त्या दिवसाची आठवण मला कशी असेल ? ती जाणीव उत्पन्न व्हायलाही कांहीं काल जावाच लागतो. पण आईबाप म्हणत माझा जन्म १८९६ सालीं मे महिन्यांत झाला. तो श्रावण सोमवार म्हणून तुझं नांव माधव ठेवलं. वडील त्यावेळीं वकीली करीत होते. त्याच दिवशीं त्यांचे खुनाचे कांहीं आरोपी सुटले म्हणून यशवंत असंही एक नांव चिकटलं ! आणि पहिला आणि लाडका म्हणून, बाबू, बाबू, आणि पुढं बाबुराव म्हणत. पण या कांहीं माझ्या आठवणी नव्हेत. या माझ्याबद्दल दुसऱ्यांनीं सांगितलेल्या गोष्टीं.

**मी अंमलदाराचा.—** मी वकीलाचा मुलगा होतो याची मला आठवण नाहीं. मी अंमलदाराचा मुलगा होतो ही मात्र चांगली आठवण आहे. कारण यावेळीं पांगुळपणा आणि पांगुळगाडा सुटून माझ्या हातीं पायीं दप्तर आलं होतं. श्रीगणेशा काढता काढता आणि बे दोन्ही चार हे लक्षांत ठेवतां ठेवतां इतर गोष्टींही आपोआप ध्यानांत रहात. मास्तरांच्या छप्पीनें त्या डोक्यांत जबरीने कोंबल्या नसल्यामुळें सहजी ध्यानांत रहात.

मास्तरांची छप्पी म्हटलं खरं, पण तिचा प्रत्यक्ष अनुभव मला फारसा मिळाला नाहीं. अनुभव दुसऱ्याला मिळालेला पाहण्याचाच. शाळेतल्या इतर मुलांत कांहीं माझी गणना होत नसे. तालुक्यांतल्या मोठ्यांतल्या मोठ्या अधिकाऱ्याचा मुलगा मी !

शाळेला निघालो तर, मी कांहीं दप्तर घेत नसे. सरकारी पट्टेवाला दप्तर घेऊन माझ्यापुढें असे. तो किंवा दुसरे नोकर मला माझ्या नांवानें हांक मारीत नसत. 'बाबा' किंवा 'साहेब' म्हणून बोलावत.

अभ्यासांत पहिला नंबर नसला तरी वर्गांत माझी जागा पहिली असे. इतर पोरें बांकावर बसली तर माझ्या जागेवर मऊ बसकुर असे. मास्तर इतरांना अरे तुरे म्हणत, पण मला अहो जाहो म्हणत. मार तर क्वचितच मिळे. मास्तरही मला वचकून असत.

कारण त्या मास्तरांना खासगी शिकवणीसाठीं वडिलांच्याकडून कांहीं पगार मिळत असे. शाळेंत माझा पहिला नंबर रहावा म्हणून शाळेंत घातली जाणारी उदाहरणें तो अगोदरच करवून घेई. त्यामुळें माझी पाटी सर्वांअगोदर पडायची. घरींच उदाहरण सोडवलें असल्यामुळें तें शाळेंत बरोबर यायचें. या माझ्या हुशारीमुळें पोरें मात्र आश्चर्यचकित होऊन जात. पण आमच्या हुषारीचं कारण त्यांना कुठं माहीत होतं !

मास्तर शिकवायला घरीं येत. पण त्यांना आमचीच मर्जी सांभाळावी लागे. पाठ माझ्या आठवणींत रहावे म्हणून त्यांनाच घोकत बसावे लागे. माझ्यावर मास्तराची हुकमत आहे असं मला क्वचितच वाटे.

**माझी आजारी आई.—** घरीं आलो तरी माझ्यावर जरब बसवणारं असं कोणी नव्हतं. आई नेहमी आजारी असायची. आईचं नांव कमळाबाई. अंथरुणाला सतत खिळलेली ! पण तिला स्वतःच्या चिंतेपेक्षां माझीच चिंता अधिक ! नेहमी म्हणायची ' माझ्यामागं तुमचं काय होणार रे ? ' आम्ही चौघे भाऊ. मी सर्वांत वडील. वडिलांनी दुसरं लग्न केल्यावर सावत्र आई आम्हाला छळेल या कल्पनेनं ती नेहमी अस्वस्थ होत असे. तिनं रागावल्याचं किंवा मला मारल्याचं मला कांहीं आठवत नाहीं. आमच्या अंगावर हात टाकायला तिचा हात तरी कुठं उचलत होता ! ती आम्हाला



**कै० सौ० कमळाबाई वागल**

जवळ बोलवून प्रेमानं कुरवाळल्याची मात्र अद्याप आठवण आहे. ‘ बाबू मोठा हो. चांगलं शिक बरं बाळ ! त्यांचं नांव राख ’ हे शब्द अद्यापहि आठवतात. यामुळें आयुष्याला कांहीं वळण लागलं असेल असं कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण ते शब्द मात्र हृदयांत कोरले गेले. तीच तिची आठवण !

या परिस्थितीमुळं आईचा धाक असा कांहीं माझ्यावर नव्हता ! तिच्या कुरवाळण्यानं व प्रेमळ शब्दानें मी नेहमी गहिंवरून येई.



कै. खंडेराव गोपाळराव बागल
बी. ए., एल्. एल्. बी.
कोल्हापूर संस्थानचे पहिले वकील.

**माझे वडील.**— वडिलांचा प्रत्यक्ष संबंध फारसा येत नसे. ते ऑफिसांत जात. ते मामलेदार होते. मला माराहाण करण्याला त्यांना फारशी फुरसतच मिळत नसे. नव्या संस्कृतीचा परिणाम असेल कदाचित. कारण ते एल्. एल्. बी. होते, किंवा माझ्यावरच्या प्रेमामुळें असेल, मीच पहिला असल्यामुळें त्यांचा लाडका होतो. त्यामुळें त्यांचीही माझ्यावर तशी करडी नजर नव्हती. आई आणि आबा हीच घरांतली वडील माणसें. आई आजारी, बाप आपल्या कामांत, त्यामुळें मला बरंच स्वातंत्र्य भोगता येत होतं. अंमलदाराच्या मुलाला खूप करण्याचाच नोकर प्रयत्न करणार ! यामुळें माझ्यावर दुसऱ्याची जरब असण्याऐवजीं माझीच हुकमत घरीं चालत असे. घरीं त्यावेळीं सातआठ पट्टेवाले असत. मी वडिलांना त्यांच्याबद्दल चांगलं बोलावं म्हणून ते मलाच खूप करण्याचा प्रयत्न करणार. कामासाठीं आलेले खेडचे लोक, मी मामलेदारसाहेबांचा मुलगा म्हणून मला नमस्कार

करणार. नोकरांचा मुजरा, बाहेरच्यांचा मुजरा, यामुळें लहानपणीही मी मोठा आहे, अशा प्रकारची भावना माझ्यांत निर्माण होऊं लागली होती. एकाद्या परक्या माणसानें मला मुजरा किंवा नमस्कार केला नाहीं कीं मला माझा अपमान झाल्यासारखें वाटें. यामुळें माझ्या अंगी नम्रता व आज्ञाधारकपणा येऊं शकला नाहीं. न कळत एक प्रकारचा मोठे-पणाचा ताठा आणि हुकमशाहीवृत्तीच अंगी आली. नम्रता व लाघवीपणा आला नाहीं. संवगड्यांच्या बरोबर वागतानां सुद्धां बरोबरच्या नात्यानं वागत नसें. खेळांतही माझीच हुकमत गाजवी.

**शाहूमहाराजांना पाया पडलो नाहीं.**— मी यावेळीं असेन ९।१० वर्षं वयाचा. वडील शिरोळ पेठ्याचे मामलेदार होते. त्यावेळीं शाहुमहाराज मोळयांत डुकराच्या शिकारीस आले होते. त्यांचा कँप पडला होता. मामलेदारांना महाराजांची व कँपची व्यवस्था ठेवावी लागे. महा-राजांच्या भेटीला जाताना वडिलांनीं मला बरोबर घेतले. पण तिथं मला निराळा अनुभव आला. माझी कल्पना, माझ्या वडिलांहून कोणी मोठं असूं शकेल अशी कधीच नव्हतीं. कारण जो तो त्यांना नमस्कार करी, मुजरा करी, कांहीं लोक तर त्यांच्या पायावर डोकं ठेवीत. पण ज्यावेळीं वडिलांनीच शाहूमहाराजांच्या पायाला हात लावून नमस्कार केला, त्यावेळीं मात्र मी अगदीं आश्चर्य चकित झालो. मला वडिलांचाही राग आला. त्यांनी असं दुसऱ्याच्या पाया कां पडावं ? मला वडिलांचाच नव्हें तर त्या दुसऱ्या व्यक्तीचाही राग आला. इतक्या लोकांसमक्ष वडिलांनी पतकरलेला हा कमीपणा मला सहन झाला नाहीं. मीही तसेच पाया पडावे म्हणून मला वडिलांनीं खुणावले; पण मी कांहीं महाराजांच्या पाया पडलो नाहीं. महाराज ही काय चीज आहे याची त्यावेळेपर्यंत मला कांहींच कल्पना नव्हती. राजा म्हणजे काय, त्याची सत्ता म्हणजे काय, याविषयीं मी पूर्ण अज्ञानी होतो.

तथापि नमस्कार केला नाहीं म्हणून महाराज कांहीं रागावल्याचें दिसले नाहीं. ' हा तुमचा मुलगा काय हो ? ' म्हणून त्यांनीं वडिलांना विचारलं. ते समजल्यानंतर त्यांनीं मला कडीवर घेऊन विचारलं, ' काय रे तुला घोडं पाहिजे काय ? घोड्यावर बसायला शिकणार तूं.' ' हो शिकणार "

म्हणून मीं उत्तर दिलं. आणि खरोखरीच महाराज परत गेल्यानंतर आमच्यासाठीं त्यांनीं एक मोठा अरबी घोडा पाठवून दिला.

**महाराजांनीं घोडा दिला.**— मी एवढासा. घोडा एवढा मोठा. पण तो माझ्यासाठींच पाठवून दिला ही माझी समजूत. त्यामुळें हा माझा घोडा, मला महाराजांनीं दिला म्हणून मी सगळ्यांना सांगत सुटलो. वडीलही हा आमच्या चिरंजिवांचा घोडा म्हणून लोकांना सांगत त्यामुळें मीही शेफारून गेलो. याचमुळं मला भीती टाकून त्या घोड्यावर बसणं भाग पडलं. त्यासाठीं वडिलांनीं आमच्या तैनातीस दोन माणसें दिली होती. एकानें मला घोड्यावर बसल्यावर तोल जाऊं नये म्हणून धरायचे, दुसऱ्यानें घोड्याला आंवरण्याकरता दोरीनें धरायचे. थोडी भीती गेल्यानंतर, घोड्यानें माणसाच्या चालीबरोबर हळू गेलेले मला आवडेना म्हणून त्यांना पळायला लावी. व पळाले नाहीत म्हणजे घोड्याचा चाबूक त्यांच्या अंगावर उडे ! घोड्याला चाबूक मारला तर दुगाण्या मारण्याची भीती ! शिपायाला मारल्यानें ती आपत्ती येणारी नव्हती. या घोड्याच्या रोजच्या रैपेटीचाही स्वभावावर परिणाम झाला. गांवांतून आमची स्वारी निघाली की लोक बड्या अंमलदाराचा मुलगा म्हणून वांकून नमस्कार करीत. यामुळें आमची उंची आणखी वाढली. चाबूक घोड्यालाही मारता येतो तसा माणसाला ही मारता येतो. आणि माणसें तर मुकाट्यानें मार खातात. मी घोड्यावर बसत असलो तरी, घोड्यावर बसता येत होतं असा त्याचा अर्थ नव्हे. माणूस बरोबर नसला आणि त्यानें धरलं नाहीं कीं आमची ऐट संपली.

**घोडे बुजले, आम्ही पटाईत ठरलोः**— आम्ही फिरतीवर होतो. शिरोळ पेट्यांतील उदगांवच्या धर्मशाळेंत आमचा मुक्काम पडला होता. सकाळची वेळ. शेत पाहणीस वडील निघाले होते. घोड्यावर जुन्या पद्धतीचे रेशमी खोगीर घालून घोडे तयार ठेवले होते. दरम्यानच्या कालांत आम्हाला शिपायानें खोगीरावर बसवले होते. शिपायानें दोरी धरली होती. वडील घोड्यावर बसणार इतक्यांत कारकुनानें सहीसाठीं कागद आणला.

बहुधा कारकुनाचे हिताहित कामांत गुंतलेले असले म्हणजे धांदलीच्या वेळीं काम पुढे करून सही घेणे हे कारकुनी धंद्याचे एक विशेष असते.

कामावर सही करण्याकरता वडिलांनी 'अरे दऊत आण' म्हणताच-प्रसंगावधान न राहून माझ्या घोड्याची दोरी धरून ठेवलेल्या नोकरानें झटकन दोरी टाकून दिली आणि दऊत-टाक आणण्यासाठीं तो आंत धांवत गेला. दोरी सुटलेली पाहतांत आमच्या वारूनें एकदम रस्ता धरला. आणि हां हां म्हणता मुख्य ठाण्याची वाट धरली. शाहूमहाराजांनी दिलेला मोठा अरबी घोडा. त्याच घोड्यावर आता आमची शंभर वर्षें भरणार. तथापि जिवाच्या आशेनें आम्हीं खोगीर अगदी घट्ट पकडून ठेवले होते. लगाम अजिबात सोडून दिले होते. वाटेतल्या लोकांनी घोड्याला आंवरून धरावे म्हणून मी ओरडत होतो. पण वाऱ्याप्रमाणें सुटलेल्या घोड्यासमोर उभे कोण राहणार? उगाच हात पुढे करीत व घोडे जवळ येताच मागे येत. मागाहून कांहीं घोडीं मला धरण्यासाठीं सोडली होती. पण त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. घोडे मिनीट दीड मिनीटाला मैल या वेगानें चालले होते. इतक्यांत मधल्या एका वाटेनें एक मोटर येऊन पुढे चालू लागली. तिलाही घोड्यानें मागे टाकले. पोर मेलं मेलं म्हणून ते ओरडले! मी चिकटून बसलोंच होतो. अखेर घोड्यानें ठाणें गांठले आणि स्वारी तबेल्यांत येऊन उभी राहिली. मागची मोटरही थोडक्यात वेळांत येऊन दाखल झाली. गाडींत श्रीमंत बापुसाहेब महाराज होते. त्यांनीं मला बोलवून पाठीवर थाप मारली. व म्हणाले, 'अरे वाः काय छान बसतोस तूं.'

आपले पोर जगले आणि श्रीमंतांनी त्याचे कौतुक केले हे समजतांच वडिलांना फार आनंद झाला व मोठ्या प्रेमानें त्यांनी मला जवळ घेतले. धैर्य नसताना धैर्याचे सर्टिफिकेट मिळाले.

या प्रसंगामुळें माझी भीति मात्र गेली आणि मी पुढे शिपायाच्या मदतीशिवाय घोडे फिरवायला नेऊं लागलो. माझ्यांत आत्मविश्वास उत्पन्न झाला.

**घोड्यावर प्रेम बसले.**— माझेही घोड्यावर प्रेम बसले व त्याला चांगले खायला मिळावे म्हणून मी मुद्दाम त्याला शेतांतून नेई. त्यामुळें ताजी जोंधळ्याची व मक्याची कणसें, हरबऱ्याचे डहाळें त्याला खायला मिळत. शेतांतून गेल्यामुळें खाण्यापेक्षां मातेरेच अधिक होई.

पण अंमलदाराचा मुलगा म्हणून मला कोणी कांहींच बोलत नसत. उलट ' आणखी चार कणसें नेता काय साहेब ? ' म्हणून पाठी लागत. नासधुसीचे मला तर कांहींच वाटत नसें.

इतरांच्या दुःखाचा विचार करण्याची दृष्टीच मला नव्हती. तथापि मी घोड्यावर मात्र प्रेम करूं लागलो. त्याला रोट्या व मलिदा घालीत असें. ऊंस, हरभरा घरीं आले म्हणजे त्याला चारल्याशिवाय मी खात नसें. त्याचेही पण माझ्यावर प्रेम होते. मला पाहिलं कीं कान टवकारून फुरफुरूं लागे. एकदा तो ठेंचळल्यामुळें मी पडलो, तर तो मला टाकून कांहीं गेला नाहीं. मी उठून वर चढेपर्यंत तो शांत होता—

घोड्याची भीति गेल्यामुळें दुसरे घोडे आले तरीही मी बसण्यास भीत नसें. गांवांतून घोडे हळू चालवावे पण लोकांना त्याचे महत्व कसें वाटणार म्हणून गांवांतूनही भरधांव सोडायचा. ते घोडेच चांगले म्हणून बसण्याची खरी कसोटीच लागली नाहीं.

**देवानें विश्वासघात केला.**— आईचा आजार वाढूं लागला होता. जगांतल्या प्रेमाचं ते एकच स्थान. आईला अंथरुणावर बसणंही अशक्य झालं. खोकल्यानं जीव बेजार होई. ताप कमी होत नसे. हातापायाच्या काड्या झाल्या होत्या. कांकणं ढोपरापर्यंत जात होती. अन्नाचं शीतही पोटांत जात नव्हतं. ठसका आला कीं कासावीस होई. ' देवा ने रे मला ' असं अगदी कळवळयानं म्हणे. बहुतेकांनीं आशा सोडली होती. डॉक्टर निराश झाले होते. पण शिपाई लोक बोलत, देवाची इच्छा झाली तर देव यांतूनही वांचवील. या आशेनं देव, देवऋषी, अंगारा हे प्रकार चाललेच होते.

देव हांकेला ओ देतो ही इतराप्रमाणें माझीही समजूत. वडीलही मूर्तिपूजक. साहजिकच माझाही देवावर विश्वास. अनन्यभावें शरण गेलं कीं देव भक्ताच्या हांकेला प्रसन्न होतो असं वडील म्हणत. आईही केव्हां केव्हां माझ्याकडून बालरामायण वाचून घेत असे. म्हणून राम हा माझ्या विशेष परिचयाचा झालेला. एकदा तर पुष्पक विमानाचं खूर पकडून मी आकाशांत परिभ्रमण केलं होतं. पण माझा हात निसटला आणि मी पृथ्वीवर आदळलो. आदळतांच मी मोठ्यानं किंचाळलो. आईनं जागं

कल्यावर मी माझ्या गादीवरच असल्याचं आढळून आलं! पण अंगाला सुटलेला घाम मला पुसावाच लागला.

मी आईसाठीं देवाची प्रार्थना करण्याचं ठरवलं! रामकृष्णाची मूर्ती देव्हाऱ्यांत होती. त्या मूर्तीला मनोभावें शरण जाई. रात्रीं सामसूम झाल्यानंतर ती मूर्ती आठवून तिला आळवीत असे. ‘देवा माझ्या आईला वांचव, तुला नारळ देईन, कापूर ठेवीन, वडिलांनीं मला दिलेली आणेली तुला वाहीन’ पण माझ्या आईला वांचव! प्रार्थना करतांना माझ्या डोळ्यांतून अश्रू वहात. मी खरोखरीच तन्मय होत असें. शाळेला जाताना दिसतील त्या कोन्याकोपऱ्यावरच्या देवांना पाया पडे. हो कोणी रागावायला नको, पै पैसा मिळेल तो त्यांचेपुढे ठेवी.

आईचं फारच जास्त झालं! तिची तळमळ, तिचे हाल, तिच्या यातना मला पहावेनात. ते पाहून मला हुंदका आंवरत नसें. आणि कुठंतरी कोपऱ्यांत जाऊन मनसोक्त अश्रू गाळीत असें. वेळ मिळेल त्यावेळीं देवाची प्रार्थना करीत असें. मला नेहमी खेळायला नेणाऱ्या पट्टेवाल्याला मी म्हणालो, ‘धामण्या माझी आई जगेल कां रे’ ‘देवाच्या मनांत आलं तर कसल्याही संकटांतून वांचवल, साहेब, तुम्ही काळजी नका करूं.’ या आश्वासनामुळें मी प्रार्थनेवर आणखी जोर दिला. आणि देवाला म्हणालो, ‘मला वाटलं तर ने, पण माझ्या आईला जगव’

मी रड रडून डोळें सुजवून घेतले! आईचं जास्त होईल तसं मी ईश्वराला अधिकाधिक आळवूं लागलो. आणेलीच्या ठिकाणीं रुपाया देण्याचं आश्वसन दिलं? अर्थात हे मनांतल्या मनांतच. कारण त्यावेळीं माझ्या जवळ रुपाया कोण ठेवणार? आई बरी होतांच या वचनांची पूर्तता मी करण्याचं ठरवलं होतं.

पण ही आळवणी, चिंतनं आणि सारी प्रार्थना व्यर्थ गेली! पै पैसा आणि टाकलेल्या आणेलीचा कांहीं उपयोग झाला नाहीं, लांच घेऊन देव कृतघ्न झाला. जीव कासावीस होत होत अखेर त्याच खोकल्याच्या झटक्यांत तिचा अंत झाला!

देवानं विश्वासघात केला! मला त्याचा फार राग आला. देव प्रार्थनेला पावतो ही कल्पना खोटी ठरली. माझ्या देवावरच्या विश्वासाला

जबर धक्का बसला. अनन्य भक्ती कमी झाली. देव्हाऱ्यांतला देव दिसला कीं चीड येऊ लागली. आईला मारणाऱ्या या देवाची आबा कां पूजा करतात म्हणून त्यांचाही राग येऊ लागला! देवाचं उच्चाटन अजिबात झालं असं नाहीं. पण त्याचं आसन डळमळीत झालं! पाया भुसभुशीत झाला.

× × ×

**वडील माझ्याकडे लक्ष देऊ लागले.**— आई आम्हां सर्वांना सोडून गेल्यानंतर वडील माझ्याकडं विशेष लक्ष देऊ लागले. माझ्यावर पूर्वीहून अधिक प्रेम करूं लागले. केव्हां केव्हां मला जवळ घेऊन डोळ्यांतून टिपें टाकीत. आई नसलेलं मूल म्हणून ते माझ्याकडं पाहूं लागले. माझे कोड अधिक पुरवूं लागले. राजधानींत गेले म्हणजे परत येतांना कांहीं तरी खेळणीं किंवा एखादे गोष्टीचें पुस्तक घेऊन येऊं लागले. रामायण, महाभारत. थोरांची चरित्रें, कादंबऱ्या माझ्या हातीं पडूं लागल्या. कांहीं कांहीं चांगली पुस्तकें ही त्यावेळीं माझ्या हाती पडली गोष्टीतून शिवचरित्राची गोडी लागली. वडीलही शिवाजीमहाराजांच्या विषयींच्या गोष्टीं केव्हां केव्हां सांगत. हरि नारायणांची पुस्तकें जाडीजुडी असली तरी समजायला फार सोपी. त्यामुळें हातांत पडली कीं ती पुरी होतं.

वडील फिरतीला गेले म्हणजे पूर्वी मला बरोबर घेऊन जात नसत. आतां घरीं आई नसल्यामुळें ते बऱ्याच वेळां बरोबर घेऊन जात. अभ्यासही करवून घेत. कंटाळा आल्याचें दिसले कीं लगेच मोकळे करीत. यामुळें शाळेतल्या शिक्षणापेक्षां वडिलांच्याजवळ माझा अभ्यास अधिक झाला. त्यांत एकप्रकारची गोडी निर्माण झाली. छडी घेऊन शिकवण्याचा प्रयोग कधी झाल्याचे आठवत नाहीं. अजिबात कधीं थपडा दिल्याच नसतील असें नाहीं. पण असें प्रसंग फार क्वचित येत.

**वडिलांची गरिबी.**— मला शिक्षणाची गोडी लागावी, त्याचे महत्व पटावे, म्हणून ते आपलं पूर्व चरित्र सांगत, 'मी जर शिकलो नसतो तर आजची स्थिती आपल्याला प्राप्त झाली नसती. दारिद्र्य म्हणजे काय हे तुला माहित नाहीं. पण मला दोनवेळां जेवायला मिळणंही अवघड होतं. अंगावर धड कपडे मिळायचे नाहींत. फीला पैसे मिळायचे नाहींत. त्यासाठीं दुसऱ्याकडं तोंड पसरावं लागे. ज्या घरीं रहात होतो

त्या घरची बाई शिळें तुकडें घालतांना सुद्धां नवऱ्याला चोरून घाली. रात्रीं अभ्यास करूं लागलो म्हणजे 'तुला कुठलं तेल खर्चावं' म्हणून त्या बाईचा नवरा धांवून येऊन रॉकेलची चिमणीही विझवत असें. कांहीं दिवस हे घर मिळेपर्यंत कागलहून कोल्हापुरपर्यंत रोज १०।१२ मैल पायीं प्रवास करावा लागे. रात्री अभ्यास केला तर चिमणीच्या तेलासाठीं शिव्या खाव्या लागत. म्हणून रस्त्यावरच्या दिव्याखालीं मला अभ्यास करावा लागला. असं करत करत, दुसऱ्याच्या मदतीवर, मिळालेल्या स्कॉलरशिपवर व श्रीमंतांच्या मुलांच्या शिकवण्या पतकरून बी. ए. झालो. कोल्हापूर संस्थानांतला पहिला बी. ए. मीच असेन. बी. ए. झाल्यावर तुझ्या आईशीं माझं लग्न झालं. त्यानंतर पैशाचा प्रश्न कायमचा सुटला. संस्थानांतला मीच पहिला एल्‌एल्. बी. असल्यामुळं महाराजांनीं मला बोलावून घेऊन नोकरी दिली. शिकलो नसतो तर हमालीच करावी लागली असती. म्हणून तूं शिक, शहाणा हो, मोठा हो. आणि आपण गरीब आहोत हे विसरूं नकोस.

**गरिबाशी वागणूक.**— आपल्या गांवचा कोणी शेतकरी आला म्हणजे ते त्याला आपल्या जवळ बसवून घेत. त्यांचे दोस्त म्हणजे अगदी शेतकरी, कोणी कोष्टी, कोणी पिंजारी, कोणी त्यांच्याबरोबर नेहमीं कुस्ती खेळणारा असा असायचा. अगदीं जाडे भरडे कपडे अंगावर, पण आबा त्यांना अगदी बरोबरच्या नात्यानं आणि मोठ्या प्रेमानं वागवीत. जेवायला पंक्तीला बसवीत. नेहमी जेवायला ठेवून घेत. घरच्या गोष्टी विचारून घेत. त्यांच्या आप्तापैकीं वडील माणसें फाटक्या तुटक्या कपड्यांत असली तरी आबा पायाला हात लावून नमस्कार करीत व त्यांच्याशी प्रेमानें व अदबीनें वागत! वडील पूर्वी कुस्ती खेळत. एक दोन कुस्त्या मैदानांत झाल्या होत्या. तमाशाचेही हे चालक असत. यामुळें खालच्या थरांत यांचे संबंध होते.

वडिलांच्या या वागणुकीचा व स्वभावाचा परिणाम माझ्यावर इष्ट झाल्याखेरीज राहिला नाहीं. गरीब दिसला कीं मी पूर्वी ताठ्यानें वागत असें. तसे वागतांना आतां लाज वाटूं लागलीं. त्यांच्यांत जाऊन बसायला व त्यांच्याशी बोलत बसायला पूर्वीसारखा कमीपणा वाटेना. कारण

आपले पाहुणेपैही गरीबांतलेच आहेत. शेतकरी व अडाणी वर्गातलेच आहेत हे पुढे पुढे अनुभवास आले. त्यांच्या प्रेमळ वागणुकीनं त्यांच्याविषयीं वाटणारा तुसडेपणा पुष्कळ कमी झाला ! सर्वच स्वभाव बदलून गेला असे नाहीं, पण मी त्यांना जो आतापर्यंत क्षुद्र लेखत होतो ती आपलीच माणसें आहेत असें समजल्यानंतर वागणुकींत साहजिकच बदल झाला ! मी नम्र झालो असंही नाहीं. मात्र गरीबांपासून फटकून राहण्याची ताठरपणानें वागण्याची वृत्ती कमी झाली.

पण अंमलदारी ताठा आणि हुकमीवृत्ती यांतूनही केव्हां केव्हां उसळून येतच असे. हाताखालीं नोकर होतेच. त्यांच्यावर हुकूम गाजवत होतोच. ते हांजी हांजी करीत होतेच !

वडिलांचे सद्विचार आणि सभोंवतालचे अंमलदारी वातावरण यांतून माझा स्वभाव बनत होता.

* * *

**आम्हा पोरांची मुलखगिरी.—** शिमग्याचा सण आला होता. शाळेला सुट्टी होती. त्यावेळीं या सणाला चांगलं महत्व होतं. गल्लोगल्लीं सार्वजनिक होळ्या पेटवल्या जात होत्या. आमच्या खेळगड्यांनीं वाड्यासमोर मोठी होळी पेटवण्याचे ठरवले. शेणी जमविण्यात मी पुढारीपण पतकरलं. पोतं घेऊन शिपायाला बरोबर घेतलं. घरोघरीं हुडव्यासाठीं शेणी मागूं लागलो. मामलेदारांचे चिरंजीव ! बरोबर शिपाई. नाहीं कोण म्हणणार ! शेणी खूप जमल्या. सर्व गांवांत आमची होळी मोठी झाली पाहिजे ही महत्त्वाकांक्षा. जेथे शेणींचा ढीग रचला होता तेथेच एका घराच्या परड्यांत मालकानें स्वतःसाठीं खूप मोठा हुडवा रचलेला होता. दाराच्या खालून आंत जाता येण्याजोगं होतं. तो सर्वच हुडवा मालकाच्या परवानगीशिवाय उपटायचा आम्ही घाट घातला. दोन पोरें आंत गेली. ती आंतून शेणी बाहेर टाकत. व बाहेरची पोरें ती लगेच हुडव्यांत टाकीत. अशा प्रकारें आम्ही तो सर्व हुडवा खलास केला !

होळी झाल्यावर मालकाला सर्व प्रकार समजला पण मामलेदारांचेच चिरंजीव, चोरींत सामील असल्यामुळें मालकाला स्वस्थ बसणें भाग पडलें. वडिलांच्याकडे तक्रार न्यायची त्यांची छाती झाली नाहीं. तो आम्हापुढे

येऊन म्हणाला, ' विचारून घेतलं असतं तर मी काय नको म्हणत होतो. पण साहेब हे कांहीं बरं केलं नाहीं ' तो चिडून बोलला असता तरी मी कांहीं तरी उर्मटपणानं बोललो असतो. पण हा एक धार्मिक विधीच असल्यामुळें आम्हा कुणाला या कृत्याबद्दल पश्चाताप असा वाटलाच नाहीं.

यानंतर धुळवड खेळून आम्ही नदीवर आंघोळीला गेलो. स्नानानंतर परत येताना शेतांतला हरबरा साऱ्या पोरांनीं उपटून घेतला. बरीच मुलें बरोबर होती. हे पाहून शेताचा मालक हातांत काठीं घेऊन शिव्या देतच आम्हां सर्वांच्या मागं लागला. तो मागें आम्हीं सारी पुढे अशी धांवपळ चालू झाली. त्यांत आम्ही मामलेदारांचे चिरंजीव आहोत याची त्याला कल्पना नव्हती. आमच्या मागोमाग आमची उद्धरणी करीत तो वाड्यापर्यंत आला. चांगल्या वेचक शिव्यांची उजळणी झाली. पण मी त्यांच्या अगोदर पोचलो होतो. वाडा गांठतांच मी शिपायांना ' शेतकरी शिव्या देत मारायला धांवत आला आहे ' म्हणून सांगताच त्या चार पांच जणांनीं त्यालाच धरून चांगला बेदम मार दिला व आम्ही कुणाचे चिरंजीव ते समजावून दिले. त्यावर त्याचा सारा पारा उतरला आणि तोच माझ्या पाया पडूं लागला !

कसा कोण जाणे पण हा सारा प्रकार वडिलांच्या कानावर गेला. वडिलांचे कांहीं वकील दोस्त होते. त्यांनीं आमचा प्रताप कानावर घातला असावा.

अगदी आश्चर्याची गोष्ट ! कदाचित आईच्या मृत्यूचा हा परिणाम असेल. त्यांनीं मला खोलींत बोलवून घेतले व प्रेमानेच माझी चांगली कानउघाडणी केली. माझ्या गुन्ह्याचें स्वरुप मला शांतपणें पटवून दिले. मारापेक्षांही ही शिक्षा मला अधिक वाटली. पश्चातापानें मी रडूं लागलो ! वडिलांच्या या वागणुकीचा माझ्या मनावर फार मोठा परिणाम झाला. मारानें माझ्या गुन्ह्याचें स्वरुप मला इतके पटले नसते. या वागणुकीमुळें माझे वडील मला फार आवडूं लागले. पूज्य वाटूं लागले. शिक्षा करण्याची ही तऱ्हा अधिक परिणामकारक ठरली.

**आमचा देशाभिमान—** या सुमारास आमच्या वर्गांत एक नवीन मास्तर आले होते. ते इतर मास्तराहून निराळे होते. शाळेच्या

वेळेखेरीज ते आमच्या वर्गातील कांहीं मुलांना घरीं बोलवून शिकवत. शाळेबाहेरील जगाचीही माहिती देत. शिवाजी महाराज, लोकमान्य टिळक यांच्या विषयीं माहिती देत. त्यावेळीं स्वदेशीची चळवळ चालू असावी. पण चरखा, खादी वगैरेंच प्रस्थ नव्हतं. परदेशीमालावर बहिष्कार घालणं, स्वदेशी कपडे वापरणं, याबद्दल हे नवे मास्तर प्रोत्साहन देत. देशासाठीं शिवाजीमहाराज लढले, त्यांनीं मुसलमानांपासून स्वातंत्र्य मिळवलं तसं आपण ही कांहीं करायला पाहिजे असं आम्हालाही वाटायचं.

आम्हीही परदेशी कपडे वापरायचे नाहींत. परदेशी साखरेचे लाडू खायचे नाहींत. परदेशी खेळणी वापरायची नाहींत असं ठरवून वडिलांनाही मी तसं बोललो. वडिलांनीं आमच्या या उत्साहावरती कांहीं विरजण घातलं नाहीं. उलट कौतुकच केलं. उलट आमचा मुलगा ‘परदेशी साखर खात नाहीं’ म्हणून ते चारचौघांत कौतुकानंच सांगत.

त्यावेळीं आबांच्या वकील मित्रमंडळींत कांहींतरी राजकीय चर्चा चालत असे. सदाशिव खंडो आळतेकर, राशिंगकर, देशिंगकर, खांडेकर, काळे, अशा कांहीं वकील मित्रांचीं नांवें मला आठवतात. कारण ते रावसाहेबांचे चिरंजीव म्हणून मलाहि जवळ घेत.

निव्वळ परदेशी साखर, साखरेचे लाडू व कपडे टाकून आमचं समाधान झालं नाहीं. प्रत्यक्ष कांहीं तरी करण्याची इच्छा आवरेना. काय करावं हे समजेना. तेव्हां आम्हीं गांवांतल्या लोकांना आमचे अस्तित्व दाखवण्याकरतां चार पोरें जमून ‘शिवाजीमहाराज कीं जय’ असं ओरडून आपलं अस्तित्व दाखवत असूं. गांवाबाहेर गेलो म्हणजे स्टेशन-वरून उतारूंचे टांगें येत. ते शत्रू आहेत असं समजून, त्या टांग्याचे पुढे उभा राहून खूप मोठ्यानें शिवाजी महाराज कीं जय अशी आरोळी ठोकत असूं. यामुळें आपण कांहींतरी मोठे धैर्याचे कृत्य केले असं आम्हांला वाटे! आणि त्यावेळीं खरोखरीच शिवाजींच्या जयजयकाराला अनुकूलता नव्हती. हे चळवळे लोक आहेत असें समजलं जात होतं. पण आम्हीं अमंलदाराचें चिरंजीव. तालुक्याचे युवराज. आमचं कोण काय करणार. आणि याच सुमारास कांहीं वकीलांना पकडल्याचीही अफवा उठली होती. बहुधा आळतेकराचं नांव त्यांत असावं. विजापुरकर हेही त्यावेळीं पकडले गेले असावेत.

विजापुरकर, आळतेकर, समर्थ, ही नांवें पुढे परिचयाची झाली. समर्थांनी कसलीशी शाळाही चालवली होती म्हणतात.

पण आमच्या देशभक्तीची मजल देशी साखरेचे लाडू खाणे व ' शिवाजी महाराज कीं जय ' ही घोषणा करण्यापलीकडे गेली नाहीं.

* * *

**जनता संपर्क.**— शाळेच्या ठराविक घोकंपट्टीच्या शिक्षणा-बाहेरचे ज्ञान मात्र मला वडिलांच्या संगतींत फिरतीवर असतांना झाले. मुख्य ठाण्याचे ऑफिस सोडून दर महिन्यांतून बरेच दिवस त्यांना खेड्यावर हिंडावें लागे. सरकारी कामें, कज्जे, जमीनीच्या भानगडी तें खेड्यावर असताना पहात. मला बहुधा बरोबर घेत. कज्जे चालू असतांना मला पाहता येत असें. कांहींना वकील देण्याची शक्ती नसें. ते आपलं गाऱ्हाणं मोठ्या कळवळयानं केव्हां केव्हां तर अगदी अश्रू ढाळत सांगत. सावकारानें कसें बुडवले, खोटे कागद कसें करून घेतले, खंड कां थकला, फाळा कां जड झाला, कांहींजण तर वडीलांच्या सांगीनें अन्याय दूर व्हावा म्हणून आपल्या घरच्या गोष्टी, नवऱ्याचा छळ, नांदवून न घेणे या आत्मकथा सांगत. त्या गोष्टीं मनोरंजक, हृदयद्रावक, चीड आणणाऱ्या अशा असल्यानें त्या ऐकत बसावेंसें वाटे. लहान मुलें अगोदरच कोंवळया मनाची, त्यांतही मी विशेष हळव्या स्वभावाचा. कांही कांहीं वेळां मी त्यांची बाजू घेऊन वडिलांना घळ घाली.

शेताचे बांध पाहतांना वडिलांना प्रत्यक्ष शेतावर जावे लागे. केव्हां पायी जात, केव्हां घोड्यावरून जात. फिरणं होई म्हणून मलाही घेत. दमलो म्हणजे मी कुठल्यातरी झोपडींत बसें. तिथं बसल्यावर केव्हां शेंगा गूळ, मलई, हुरडा, कलिंगड, अशा जिनसा शेतकरी मोठ्या अगत्यानें देत. वडिलांच्या कानावर जावं म्हणून मी मोठा नसतानाही आपलं रडगाणं माझ्यासमोर गात. यामुळें मी गरीब नसतानाही व अंमलदाराचा मुलगा असतानाही खालच्या शेतकरी लोकांशी माझा संबंध इतराहून अधिक आला. श्रीमंतीमुळें त्या खेडच्या लोकांपासून दूर जाण्याऐवजीं मी वडिलांच्या या नोकरीमुळें जवळच गेलो. सहवासानें त्यांच्याविषयीं एकप्रकारची आपुलकी निर्माण होत गेली. पण स्वतः अंमलदाराचा मुलगा

असल्यामुळें व हुकमतीची संवय असल्यामुळें त्या खेडुतांच्यांतली लाचारी, नम्रता व गुलामवृत्ती माझ्यांत चिकटली नाहीं. माझी मान दुसऱ्यासमोर लवण्याचा प्रसंगच येत नसे. उलट दुसरेच माझ्यापुढें नमत. यामुळें स्वभावांत गर्विष्ठपणा आणि ताठा आला असावा. अन् तो आला ही. वरच्यांना मुजरा करणे मला सहजासहजी व्हावयाचे नाहीं. आर्जवी मिट्ठा स्वभाव माझ्यांत आला नाहीं. यामुळं पुढील वयांत मी बरेच शत्रु केले! टाकून बोलण्याच्या खोडीनें मी बरीच माणसें दुखवली. भीतीनें दचकून व अदबीनें बोलण्याचा प्रसंग येत असे. त्यामुळें मनांत येतील ते विचार मांडण्यांची व बोलण्याची मला लहानपणापासूनच संवय लागली. पण राजकीय मुत्सद्देगिरींत या गुणांचा समावेश करता येत नाहीं. मनांतले विचार उघड न करणं, कोणाला न दुखवणं, विचार आणि उक्ती याच्यांत साम्य न राखणं यालाच राजकीय मुत्सद्देगिरी म्हणून समजलं जातं. याचा माझ्यांत संपूर्ण अभाव असल्यामुळें मी फार जणांना दुखवलं. यावेळीं जवळचा सहवास नोकर लोकांचा. त्यांची भीती कसली वाटणार? फक्त हुकमतच करायची त्यांच्यावर! मी सांगायचे किंवा आज्ञा करायची आणि त्यांनीं ऐकायचे! वडिलांचा करडा अंमल नसल्यामुळें तें बहुधा उपदेश करीत. मारानं, सक्तीनं फारसं कांहीं करून घेत नसत! मला उलट बोललेलं खपायचं नाहीं. माझ्यावर हुकमत अशी त्यावेळीं तरी कोणी गाजवत नव्हते. सर्व साधारण मुलांच्या व माझ्या परिस्थितींत हा फरक होता.

**ब्राह्मण्याचा अनुभव.—** वडील फिरतीवर असतांना अगदीच एक निराळया प्रकारचा अनुभव आला. एका गांवच्या कुलकर्ण्यानें वडिलांना—वडिलांच्याबरोबर मी असल्यानें त्या आमंत्रणांत साहजिकच माझा समावेश झाला—आमंत्रण बऱ्याच अगत्यानें दिल्यामुळें वडिलांनी ते स्वीकारले. त्या घरीं गेलो. हातपाय धुवून पाटावर बसणार तो येथें अगदीच निराळा प्रकार दिसून आला. ब्राह्मण मंडळींना आंत वाढलं होतं व आम्हा दोघांचे पाट बाहेरच्या बाजूला घातले होते. वडील पाटावर बसण्यापूर्वीच त्यांनीं कुलकर्ण्याला विचारले, ‘ आमची ताटें अशी बाहेर कां घातलीत ? ’ त्यावर तो म्हणाला ‘ आंत ब्राह्मणांची पंगत आहे.

यावर वडील त्याच्यावर भयंकर संतापले. ‘ तुम्हाला हा प्रकार करायचा होता तर मला अगोदर कां कळवलं नाहीं ? इथं आणून कां अपमान केलात. ’ वडील रागाच्या भरांत त्याला अपशब्द बोलले. पाट लाथेनं ढकलून दिला आणि न जेवतां तडक निघून आले !

शाळेतही अस्पृश्यांच्या मुलांना अगदी दूर बसवत. ते मी रोज पहात होतो. पण आमचीच गणना अस्पृश्यांत केल्याचा हा मला प्रथमच अनुभव आला ! वडिलांचा स्वाभिमान दुखवला तसा माझाही दुखवला. या प्रसंगानें माझ्या दृष्टींत बदल झाला ! एखादा पांढरपेशा दिसला कीं ‘ हा ब्राह्मण जातीचा काय ’ म्हणून मी वडिलांना विचारूं लागलो. नरसिंहवाडीला घाटावरही ‘ शिवाल शिवालचा प्रकार ’ विशेष दिसून आला ! इथं तर नेहमी जाण्याचा प्रसंग येई.

**पुजाऱ्यांची ढोंगबाजी:—** गुरुवारचाच दिवस असावा, आम्हाला सुद्धां घाटापासून बऱ्याच दूरवर पायांतले काढावे लागे. हातपाय धुवून देवाचं दर्शन घ्यावं म्हणून आम्ही निघालो. थोडी गर्दीच होती. जातांना फरशीवर एका खांबाला एका बाईला बांधून घातलं होतं. ती बाई कुरवाड्याचीच होती. ती सारखी किंचाळत होती. एक पुजारी तिच्या अंगावर तांदळाचा मारा करीत होता. तिच्यावर गुलाल व हळदही फेंकीत होता ‘ जातो जातो, जातो ’ असं ती सारखं ओरडत होती. विचारतानं कळून आलं कीं तिच्या अंगांत भूत संचारलं होतं. आणि त्या मंतरलेल्या तांदळाच्या माऱ्यानं तो पुजारी ते भूत काढीत होता. व जातो जातो म्हणून ते भूत ओरडत होतं.

माझ्याच समक्ष वडिलांनीं एका शिपायाला जरा बाजूस बोलावून घेतले व त्याला त्या बाईवर पाळत ठेवण्यास व भूत गेल्यानंतर तिला बोलावून घेऊन येण्यास सांगितले. यानंतर एका ओळखीच्या व वडिलांच्या विश्वासांतल्या टांगेवाल्यास त्यांनी बोलावून विचारलें, ‘ कायरे हा भुताचा प्रकार काय आहे, तुला माहीत आहे काय ?’

त्याचं आणि पुजाऱ्याचं चांगलं नसावं. तो चिडूनच म्हणाला, ‘ काय सांगावं साहेब, खरं वाटायचं नाहीं आपल्याला, देव आणि हे भूत म्हणजे पुजाऱ्यांच्या मिळकतीची मोठी बाब आहे. देवाला मिळालेल्या

गाद्या, गिरद्या, दागिनें, अन् देणग्या कुठं जातात माहीत आहे रावसाहेब? यांच्या रखेल्यांच्या घरीं पोचत असतं सारं! आणि भुताचं म्हणाल तर शंभर खोटं आणि खरं एखादं असलं तर कोणास ठाऊक?'

'बरं तूं जा' म्हणून वडिलांनीं त्याला घालवलं. रात्रीं जेवण झाल्या-नंतर त्या शिपायानं त्या बाईला घेऊन आल्याची वर्दी पोचवली. ती आल्यावर वडिलांनीं तिच्यावर खूप रागावल्याचा बहाणा केला. ती समोर येतांच शिपायाला विचारलं, 'काय रे त्या बेड्या तयार ठेवल्या आहेस कां? पोलीसालाही बोलवून घेऊन ये—

'काय ग? काय ठकबाजी चालवली आहे तुम्ही? ही फसवा-फसवी थांबली नाहीं तर कातडी सोलून काढीन समजलीस. खरं काय ते सांग नाहींतर आतांच तुरुंगांत पाठवतो तुला'...

वडिलांच्या या दमबाजीनं ती अगदीं गर्भगळीत झाली. तिला घाम फुटला. ती कांपत कांपतच म्हणाली,

'साहेब पोटासाटीं करावं लागतं! दया करा. मला यांत तसं काय मिळत बी नाहीं. पुजारी सगळं घेतो आणि माझ्या हातावर दोनचार आणे, ते बी जिकीरीनं ठेवतो. पोटासाठीं हे ढोंग करावं लागतं.'

* * *

**गुरुद्वादशीला** वाडीस फार मोठे जेवण घातले जाई. हजारों ब्राह्मण जेवून जात. सरकारी उत्पन्नांतूनच हा खर्च होत असावा. जेवण ब्राह्मणांना मिळावे आणि इतरांना मिळूं नये असे त्या हुकमांत नसावे. पण पंक्ती फक्त ब्राह्मणांच्या पडत. अन् मग उरलेलं अन्न ब्राह्मणेतरांना, संख्या पाहून थोडं थोडं प्रसाद म्हणून दिलं जाई. वडिलांनीं हा पंक्तिप्रपंच बंद केला. अन्नाच्या मानानें एकाचवेळीं ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्या भोजनाची व्यवस्था करण्यात आली. यामुळें ब्राह्मणवर्गांत ते बरेच अप्रिय झाले. तथापि वडिलांचे स्नेही मात्र ब्राह्मणवर्गांतच जास्त होते.

* * *

**कोल्हापूर शहरांत.**— प्राथमिक शिक्षण पुरें झाल्यावर वडिलांनी मला राजधानींत पाठवले. तेथें आत्यांच्या घरीच व्यवस्था केली. तिसऱ्या मजल्यावर हवेशीर ठिकाणीं माझी अभ्यासाची जागा होती.

राजधानीतील लोकांची वागणूक खेड्याच्या लोकांहून फार निराळी आढळली. येथे मला मिळणारे मुजरे सर्व कमी झाले. मला कोणीच ओळखत नसल्यामुळें माझा प्रतिष्ठितपणा आपोआप नाहीसा झाला. मी एक महत्त्वाची व्यक्ती अशी जी एक कल्पना होती, तिला चांगलाच धक्का बसला.

शाळेंतील मास्तरही माझी कांहीं विशेष काळजी घेत नसत. इतर मुलांप्रमाणेच वागवत. कांहीं इनामदारांची व वाड्यावरची मुलें असत, त्यांचीच ते विशेष चौकशी करत. माझ्याबरोबर इतर मुलांची वागणूक कांहींची बरोबरीची तर कांहींची उर्मटपणाची असें, तर कांहीं उगाच चिडवीत. यामुळें मला त्यांच्यांत मिळून मिसळून वागता येईना. माझ्या चढेल स्वभावाला बरोबरीचे नाते सहन होईना. मी त्यांच्या खेळांतही फारसा सामील होत नसें. खेळाची ग्राऊंडही घरापासून लांब होती. त्यामुळें परत येऊन पुनः खेळायसाठीं दूर जाणे होईना. यामुळें एकलकोंडा बनत चाललो. मुलांच्या संगतीनें उत्पन्न होणारी खेळाडूवृत्ती कमी झाली.

वडिलांनीं मला मामांच्या—बापुराव सावंत—यांच्या घरीं कोल्हापुरास शुक्रवार पेठेंत ठेवलें होते. त्यावेळीं हे घराणं चांगल्या श्रीमंतातच गणलं जात होतं. दोघे चुलत आजे वकीली करीत होते, मामांना सतारीचा नाद होता, कांहीं चित्रकार त्यांचे स्नेही होते. रामनाथ हे नांव मला आठवतें. मामांनीं तिसरा मजला त्या चित्रकाराकडून रंगवून घेतला. तो मोठा हुषार चित्रकार होता. भिंतीवरच त्यानें रविवर्म्यांची व धुरंधरांची चित्रें काढली होती. तो काम करीत असतांना मला पाहतां आलं; फारच जलदी काम करीत असे.

त्या पेठेंत सर्वांत मोठा वाडा तोच, मी मामांच्या जवळ तिसऱ्या मजल्यावर रहात होतो; खिडकींतून बराच दूरवरचा भाग दिसे. शाळेंपासून घर दूर होतं, आणि मुलांच्या खेळायच्या जागेपासून तर बरंच दूर. शाळा सुटल्यानंतर घरीं येऊन परत खासबाग मैदानावर जायचा कंटाळा येई. मात्र तेथून पंचगंगा घाट फारच जवळ होता. रंकाळा तलावही तसा दूर नव्हता. तेव्हां फिरायला बाहेर पडायचं म्हणजे घाटावर किंवा रंकाळ्यावरच जावं लागे. चार पांच मिनिटावरच घाट; त्यामुळें विशेष असा घाटावर जाई.

**पंचगंगा घाट.**— नेहमी नेहमीच्या जाण्यामुळं त्या जागेविषयीं साहजिकच आपुलकी निर्माण झाली. केव्हांही जा तिथं आराम वाटे. भर दुपारीं गेलं तरी झाडाची गर्द सांवली असायची. आड जागीं निवांत बसायचं झाल्यास तिथं अभ्यासाला बसलं तरी कोणाचा त्रास होणार नाहीं. अगदी एकांत मिळे व जागाही स्वच्छ असें. ज्या दिशेकडें पहावं तिकडं सुंदर देखावा! देवालयें, त्यांची शिखरें, दीपमाला, तुटलेला मोटा कडा, पूल, पुलापलीकडे वळणें घेत जाणाऱ्या नदीचा ओघ. हिरवीगार शेतें. तुटलेल्या कड्याचें 'पुलाचें' देवळाचें आणि नदीवर धुण्यास येणाऱ्या लोकांचें प्रतिबिंब. पुस्तकांतून डोकं वर काढताच आराम वाटे. सारा शीण निघून जाई.

दुसरी बाजू तर काय विचारूं नका. संध्याकाळ झाली रे झाली कीं सृष्टि सारं रत्नभांडार खुलं करून टाकी. ते ऐश्वर्य वाटेल त्यांनीं मनसोक्त लुटावं. आकाशांत उधळलेल्या साऱ्या मोहरा आणि विविध रत्नें, पाण्यावरून तरंगत तुमच्या पायाजवळ येऊन पडत! ती घाटाच्या पायऱ्यावर आदळली कीं खळकन् त्यांचा आवाज होई. पण हुलकावणी दाखवून ती सारी रत्नें पुनः जलाशयांत विरून जात. पण हृदयाला गुंगवणार आणि झुलवणारं गाणं मात्र थांबत नसें. तबल्याच्या ठेक्या-प्रमाणं तो जलप्रवाह घाटाच्या पायऱ्यावर थाप मारत असें.

जवळच शंभर दोनशें पाऊलावर ब्रम्हपुरी टेकडी. तेथें बसले कीं लकाकणाऱ्या सापाप्रमाणें वळसा घेत घेत अदृश्य होणारी पंचगंगा क्षितिजावर शांतपणें झोंपीं गेलेली टेकड्याची रांक व त्यांनीं आपल्या अंगावर पांघरलेली हिरवी निळी शाल पहात बसण्यांत मला कोण आनंद वाटे. त्या टेकडीवरच्या हिरव्यागार पटारावर अंग टाकून ढगांच्या चाललेल्या शर्यती व घटकोंघटकीं बदलणारी त्यांची अनंत स्वरुपें पाहण्यांत मला घरचाही विसर पडे. चांदण्यांत रात्रीं आठ आठ, नऊ नऊ वाजेंपर्यंत तेथेंच पडून राहीं. तेथेंच एकदोन वेळां डुलकी लागल्यामुळें मला घरीं जायला कितीतरी वेळ लागला. पण मामा राग भरण्याऐवजीं एवढंच म्हणाले. 'हिरवळींत साप असण्याचा संभव असतो म्हणून लवकर येत जावें. आम्ही मामलेदारांचे चिरंजीव ना? मला मामासुद्धां 'अहो जावो'च बोलत.

इथंही मला कोणी मारीत नसें. दोन्ही आजे वकील. त्यांचे वडीलांच्याकडे वकील म्हणून ही काम असायचं. गरजू लोक पाहुणेपणा पाहून त्यांच्याकडे केसीस देणार. या संबंधामुळं ते माझे आणखी जास्तीच कोडकौतुक करत.

**कादंबऱ्या हातांत पडल्या.**— मामांना वाचनाचा नाद होता. ते कुठें नोकरीवरही नव्हते. पोटापुरतं भरपूर होतं ! रिकामा वेळ भरपूर मिळायचा. वाचन, वादन आणि कला याचे व्यासंगी. कादंबऱ्या वाचण्यात त्यांचा बराच वेळ जाई. त्यांच्या आजाची सारी लायब्ररी त्यांच्याच वांटणीला आली असावी. कादंबऱ्या तरी यांच्याचकडे होत्या. मराठी होत्या, इंग्रजी होत्या. त्यांतली चांगली केव्हां केव्हां माझ्या हातीही पडूं लागली. लायब्ररींतही माझे नांव होतेच. यामुळें शाळेंत वाचायला मिळायचे नाहीं तें घरीं वाचायला मिळूं लागलें.

हळूंहळू आमची गती वाढत गेली ! अभ्यासापेक्षां कादंबऱ्याचे वाचनच वाढलें. कादंबरी एकदा हातांत पडली कीं कड लागेपर्यंत ती दूर व्हायची नाहीं. अभ्यासांतला रुक्षपणा या वाचनांत नव्हता. न आवडणाऱ्या विषयासारखं हे कंटाळवाणं वाटायचं नाहीं. केव्हां केव्हां तर सारखा आठदहा तास वाचत बसत असें. कादंबरी वाचनाचं मला पुढं पुढं व्यसनच लागलं. शाळेंत असलो तरी अभ्यासाच्या पुस्तकाच्या आंत कादंबरी ठेवून वाचत बसयाचा ! शाळेच्या दप्तरांतही कादंबरी असायचीच. पंचगंगा नदीमुळें निसर्गाचं वेड लागलंच होतं. कादंबरींत निसर्गाचं वर्णन आलं कीं तेवढचं मी उतरून ठेवूं लागलो. त्यासाठीं एक खास नोटबुक तयार केलं होतं ! पुस्तकांतली चित्रेंही कागदावर रेखाटूं लागलो. इतिहासाच्या पुस्तकांतली चित्रें रेखाटण्यातही बराच वेळ जाई. ड्रॉइंगमध्ये साहजिकच प्रगती होत गेली. वर्गातल्या ड्रॉइंग मास्तर देव यांनी माझी ड्रॉइंगच्या परिक्षेंत बसणाऱ्यात निवड केली. माझी प्रगती पाहून त्यांचे माझ्यावर प्रेमही बसले व मी कांहीं बक्षीसेंही मिळवली !

मी मॅट्रिक पर्यंत गेलो. रद्दड मुलांत माझी गणना होत नव्हती हें खरें. पण कोणत्या विषयांत मी चांगला होतो हे मला विचारलें तर सांगता येणार नाहीं. कादंबरी वाचनांत आणि चित्रांनीं कागद घाण करण्यांत

मात्र मी बरीच मजल मारली होती. कादंबऱ्यांचे वेड! कादंबऱ्या शेंकड्यांनीं वाचल्या. मराठी वाचल्या तशा पुढे इंग्रजीही बऱ्याच वाचल्या. माझ्या इतकं इंग्रजी वाचन माझ्या वर्गांत कुणाचं झालं असेल असं मला वाटत नाहीं. कारण आमच्या हांतून मोठा उद्योग तो हाच झाला !

मराठींतल्या इतक्या कादंबऱ्या वाचल्या खऱ्या पण ध्यानांत राहिल्या फार थोड्या ! 'गड आला पण सिंह गेला' 'रुपनगरची राजकन्या,' 'उषःकाल' 'सूर्योदय,' 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबऱ्यांनीं मनावर बसवलेली पकड मात्र विलक्षण ! कादंबऱ्या मोठ्या पण भाषा किती म्हणून सोपी. पाण्याच्या ओघांत पडल्याप्रमाणं त्या प्रवाहाबरोबर विनासायास वहात जावं ! त्या डोहांतून बाहेर पडावं असं वाटायचं नाहीं. कंटाळा यायचा नाहीं. वेळ कसा गेला ते समजायचं नाहीं. रेनॉल्डच्या रहस्यमय कादंबऱ्यांहीं विलक्षण चटक लावीत. पण त्यानंतर फारसं आठवणींत राहणार नाहीं. शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालं तरी वाचनाचा पसारा त्या मानानें बराच मोठा झाला होता.

**कादंबरींतून जीवनाकडे.**— वाचनामुळं जीवनही थोडं काव्यमय होत चाललं होतं ! माझं यावेळेपावेतो बरंच वाचन झालं होतं खरं पण ते कांही अध्यात्मवादाचं आणि जग माया आहे हे पटवून देण्याचं झालं नव्हतं. त्यांत स्त्री-पुरुष संबंध वर्ज्य नसल्यामुळें व प्रेमकथांनाही स्थान असल्यामुळें वैषयिक विचाराला मला कांहीं फांटा देता आला नाहीं.

पोर वयच होतं ते. पण स्त्री आकर्षक न वाटण्याइतका लहान नव्हतो. कादंबऱ्या वाचून वाचून प्रेमाची जाणीव आली होती. रस्त्यानें जाता जाता एखादी मुलगी अपघातांत सांपडावी, चटकून पुढे होऊन आपण तिला वांचवावी व मग तिनें म्हणावे, 'आपण मला वांचवलंत,' 'छे, छे, मी कर्तव्य केलं असं मी म्हणावं. मग आमचं प्रेम जमावं' अशी स्वप्नें पडत. याच अवस्थेंत समोर राहणाऱ्या मुलीवर आमचं प्रेम बसलं. त्याला प्रेम म्हणा किंवा नैसर्गिक आकर्षण म्हणा. आमच्या घरीं नेहमी येणारी जाणारीच होती ती. त्यामुळें आमची काव्यसृष्टी जडसृष्टीवर उतरली. ही या वेळची प्रेमाची कोणची अवस्था होती मला कांहीं सांगता येणार नाहीं. कांहीं वाचकांनासुद्धां या अवस्थेंतून जावे

लागले असेल. पण प्रेम हाच शब्द रुढ असल्यामुळें, मी प्रेमाच्या झपाट्यांत सांपडलो असंच म्हणणं इष्ट होईल. या भावनेंत पोरकटपणा होताच. मुलानं एखाद्या खेळण्याचा हट्ट धरावा ना तसं मागचा पुढचा कांहीं एक विचार न करता मी आमच्या आत्येला जाऊन सांगितलं, कारण आत्याच म्हणत होती कीं लग्न करून टाकलं पाहिजे तुझं म्हणून. म्हणूनच मला धीर आला. मी तिला अगदी निश्चयानं सांगितलं. भीष्म प्रतिज्ञाच म्हणाना ती.

'आत्या या मुलीशी माझं लग्न कर. मी लग्नच करणार नाहीं कधीं नाहीतर आजन्म अविवाहित राहीन' या आमच्या भीष्म प्रतिज्ञेची आत्याला बरोबर जाणीव असल्यामुळें व आजन्म घोषणेचीही काल मर्यादा तिला अजमावता आल्यामुळें तिनं आमच्या वडिलांची संमतीसुद्धा न घेता त्याच क्षणीं मला सांगून टाकलं.

'बरं हं बाबुराव करून टाकू बरं! तूं कांहीं चिंता करूं नकोस. तूं परीक्षा पास हो म्हणजे झालं' आत्येचा एवढा आधार मिळाल्यामुळं त्या मुलीला आत्येने वचन दिल्याचे कळवून टाकले. इतर मुलेंमुलींसुद्धां आम्हाला नवरा नवरी म्हणून चिडवूं लागली. आम्ही रागावल्याचं व रुसल्याचं सोंग करीत होतो. पण आम्हाला खरोखरी आनंदाच्या गुदगुल्या व्हायच्या. आम्हां दोघां भाबड्या जिवांना खरोखरींच वाटे कीं आम्हीं विवाहबद्ध झाल्या सारखेच आहोत. या समजूतीनें आम्ही एकमेकांकडे त्या दृष्टीनेच पाहूं लागलो. ती माझी बायको या दृष्टीनें पाहताना मला मोठा अभिमान वाटे. इतरांना जी गोष्ट मिळवता आली नाहीं, ती आपल्याला मिळाली या कल्पनेनें मी फुगून गेलो होतो. ती पण मला आदरानें वागवी. चार मंडळींत लाजून मान खाली घाली. आम्हीं पण काय मग शेफारून जाणार!

पण वडिलांनी ज्यावेळीं माझं लग्न दुसऱ्याच एका मुलीशी ठरवलं त्यावेळीं आम्हा दोघांनाही रडूं आलं! एकमेकांकडं आम्हीं भरल्या डोळ्यांनीं पहात असूं! आई ( सावत्र ), वडील आमचे शत्रू असं वाटूं लागलं. पण त्यांना प्रतिकार करण्याची व त्यांच्या निर्णयाविरुद्ध बंड

करण्याची शक्ती मात्र आम्हां दोघांतही नव्हती. माझ्यांत नव्हती मग स्त्री जातीत कशी असणार !

अखेर माझं लग्न झालं ! लग्न झाल्यानंतर मात्र मला संन्याशाची भूमिका कांहीं राखता आली नाहीं. माझ्या बायकोला पाहिल्यावर तिचा मला कांहीं राग आला नाहीं. पहिलीच्या आठवणीनें मी कांहीं घायाळ झालो नाहीं. उलट तिच्याकडे चोरून चोरून पाहण्यांत मला आनंद वाटे. तिचा सहवासही कटु वाटला नाहीं. अगदीं थोडक्यांच कालांत मी पहिलीच्या मोहांतून मुक्त झालों. विरहानें मी कांहीं दग्ध झालो नाहीं. गेला पैसा हाताला लागत नाहीं तशी कांहीं माझ्या प्रेमाची गोष्ट झाली नाहीं. माझ्या प्रेमाच्या बँकेचे एकदम दिवाळें निघाले नाहीं. मी बायकोवरही तितकंच काय पण थोडं जास्तच प्रेम करूं शकलो. परगांवीं गेलो तर केव्हां परतीन असं व्हायचं. आणि राहिलोच तर रोज पत्र पाठवायचा.

**शाहूमहाराजांचा आहेर.**— माझ्या लग्नाच्यावेळीं एक गोष्ट मात्र कायमच्या आठवणींत राहणारी अशी झाली. ती म्हणजे छत्रपति शाहूमहाराजांच्या थोरवी संबंधानें !

माझं लग्न ठरलं. लग्नाला आमंत्रण देण्याकरितां वडील शाहू-महाराजांच्याकडं गेले ! महाराजांनीं आमंत्रण स्वीकारून लग्नाला येणं म्हणजे कांहीं साधी गोष्ट नव्हे. त्यांना आहेर द्यावा लागे. त्यांच्याबरोबर येणाऱ्या लवाजम्यासाठीं खर्च करावा लागे ! चार पांचशेंहें रुपयांच्या खर्चाची बाब ! पण वडील वरच्या दर्जाचें नोकर असल्यामुळं शिष्टाचार म्हणून तरी त्यांना आमंत्रण देणं भाग होतं. नाहींतर बागलांनीं मुलाच्या लग्नाला महाराजांना बोलावलंसुद्धां नाहीं असं म्हणण्याला हितशत्रंना संधी मिळाली असती. यामुळें वडिलांना जाणं टाळतां आलं नाहीं.

पण वडिलांना महाराजांनीच सांगितलं ‘मला कांहीं जमणार नाहीं.’ खरं म्हटलं म्हणजे हा नकार फायदेशीरच होता. वडिलांना उलट अड-चणींतून सुटल्यासारखंच वाटलं ! इतर आमंत्रित मंडळी आली. लग्नाला दोनचार मिनिटं असतील. इतक्यांत वाड्यावरून हत्ती घोडे फर्स्टक्लास लवाजमा आणि लगेच शाहूमहाराजही आले. वडिलांनीं त्यांच्या सत्काराच्या आहेराची कांहींच तयारी केली नव्हती. कारण महाराजांनीं



## सर जे. जे. स्कूल ऑफ् आर्टकडे

**थप्पड मारून स्कॉलरशिप.—** वडील म्हणाले जाण्यापूर्वी शाहू महाराजांची भेट घेऊन जा.

महाराजांची भेट राजवाड्यांत घेण्यापेक्षां वाड्याबाहेरच चांगली पडायची. तिथं कोणाला आडकाठी असायची नाहीं. म्हणून मी बाहेर घ्यायची ठरवले. आठ नऊच्या सुमारास ते टेक्निकल स्कूलच्या इमारतींत यायचे. त्यावेळीं त्यांच्याबरोबर पेंडसे नांवाचे दिवाणजी होते. इतर कांहींच्या बरोबर बोलणं चाललं होतं. माझ्याकडं पाहिल्यानंतर मी पायाला हात लावून नमस्कार केला. तसाच रिवाज होता. ‘ कां रे. कां आलास,

म्हणून त्यांनी साहजिकच विचारलं. ' मी मुंबईला आर्ट स्कूलचा कोर्स पुरा करण्याकरतां जातो आहे, त्यापूर्वी आपलं दर्शन घ्यावं म्हणून आलो. ' किती रे भाऊ तुम्ही ' ' आम्ही चौघे आहोत महाराज ' ' मग बापाला ' भीक लावायला निघालास वाटतं ! मूर्ख कुठला ! ' असं म्हणून महाराजांनी त्या सर्व मंडळींत आमच्या श्रीमुखांत भडकावली ! आणि लागलीच पेंडसे दिवाणजींना महाराज म्हणाले ' खुळं पोर आहे हे. म्हणे आर्ट स्कूलला जातंय, याला स्कॉलरशिप सुरू करा ' आणि माझ्याकडं वळून म्हणाले, ' हे पहा मुंबईत जागा मिळत नाहीं. मिळाली तर फार महाग. तूं माझ्या बंगल्यांत बालीहौसमध्यें रहा. ' अशाप्रकारें थोबाडींत मारून स्कॉलरशिप चालू केली व रहायला जागा दिली.

* * *

**मुंबईच्या वाटेवरः—** आतापर्यंत कोल्हापूर संस्थानाबाहेर जाण्याचा प्रसंगच आला नव्हता त्यामुळें इतक्या दूरवर जातांना सासरीं जाणाऱ्या मुलीप्रमाणं माझी अवस्था झाली. जवळ असतांना घरच्या मंडळींच्या प्रेमाची तितकी कल्पना येत नाहीं पण त्यांना सोडून जातांना त्यांचे बारिक सारिक गूण, एवढ्या तेवढ्या गोष्टींत दाखवलेले प्रेम, आपली घेतलेली काळजी, आठवूं लागते. आगगाडींत बसल्यानंतर कितीतरी गोष्टी आठवूं लागल्या, पण पुरुषासारखा पुरुष बायकासारखा डोळयांतनं पाणी गाळतो हें जवळच्या पॅसेंजरना दिसूं नये, म्हणून मी खिडकीच्या बाहेर तोंड काढले.

जातांना माझ्याबरोबर पठाण नांवाचे फोटोग्राफर होते. प्रवासांत भूक लागल्यावर खाण्यासाठीं आम्ही दोघांनीही डब्यांतून कांहीं घेतले होते. भूक लागतांच डबे उघडून जिनसा खाल्ल्या. त्यांना तळेगांवला कांहीं कामाकरता उतरायचे होते. त्यांची तेथें पाहुणे मंडळी होती. तेथें पुनः जेवण करावे लागले. या आलेल्या विशिष्ट परिस्थितीमुळें, शेंकडों व्याख्यानांनीं आणि उपदेशांनीं जो बदल घडवून आणता आला नसता तो नकळत घडवून आणला. ही रोटीबंदी अशी मोडल्यानंतर पुनः टिकवण्याचा प्रयत्न झाला नाहीं. आणि मुंबईसारख्या ठिकाणीं तो प्रयत्न करूनही टिकणें शक्य नव्हते.

**ढोंगी ब्राह्मण.—** मुंबईस सखुबाईच्या खानावळींत नांव घातले. १०।१२ रुपयांच्या आंतच दर होता. ती हिंदूची खानावळ होती, त्यामुळें दाढीवाला मुसलमान दिसायचा नाहीं. पण हिंदूंतील पोटभेदाची कांहीं चौकशी होत नव्हती.

आमच्या शाळेजवळ ब्राह्मणाचे फराळाचे दुकान नव्हते. होती ती इराणी रेस्टॉरंट्स होती. तेथें चहा-पाव-लोणी, अंडी-आमलेट् मिळे. या हॉटेलमध्यें सर्वच जातीचे लोक येत. अशाच एका इराणी हॉटेलांत मी चहा—पाव आणि मटन—पॅटिस खात बसलो होतो. एका स्पेशल कंपार्टमेंट मध्येंच मी बसलो होतो. पण त्या पार्टिशनमधून पाहिलं म्हणजे पलिकडचंही दिसत होतं. सहजी पाहिलं तों कोल्हापूरचे एक वयोवृद्ध ब्राह्मण जातीचे गृहस्थ श्री. काळे, मटन—चॉप बडवत असल्याचे दिसले. मी स्वस्थ बसलो, पुढं झालो नाहीं. व मी पाहिल्याची त्यांना जाणीव दिली नाहीं. ते बाहेर पडल्यानंतरच मी बाहेर पडलो.

आश्चर्याची गोष्ट मी नेहमीप्रमाणें सखुबाईच्या खानावळींत गेलो. दोन्ही पंक्तीच्यामध्यें, अलग असा एक पाट टाकला होता. मी पंक्तीच्या पहिल्या नंबरला बसलो होतो. माझ्या डाव्या बाजूला दार होते तेथून वाडपी येत. मध्ये भिंतीला सोंवळयांचे ताट टाकले होते. वाढप सुरू होण्यावेळीं ‘ शिवाल शिवाल ’ करीत. सोंवळयानें, उघडेबंब, गळयांत जानवे, असे एक गृहस्थ येऊन त्या पाटावर बसले. मी निरखून पाहिले. कारण हा नमुना थोडा अपवादात्मकच होता. पण ही सोंवळी व्यक्ती म्हणजे दुसरे कोणी नसून इराणी हॉटेलमध्यें पलीकडच्या पार्टिशनमध्ये मटनचॉप बडवत बसलेली ‘ काळे ’ ही होय! इराणी हॉटेलमध्ये मटन पचवून खानावळींत मात्र सोंवळयानं बसली होती! मी मुद्दाम चावटपणा केला. जेवण सुरू होऊ दिले. मध्ये पंचपात्रांतील थोडे पाणी प्यालो आणि धक्का लागल्याचं सोंग करून ते पाणी लवंडले व तो पाण्याचा पाट बरोबर श्री. काळयांच्या ताटापर्यंत जाऊन पोहोचला.

× × ×

**स्कूल ऑफ आर्टचा पहिला दिवस.—** चित्रशाळेंत पहिल्याच दिवशीं माझा व एका पारशी विद्यार्थिनीचा खटका उडाला. मी बऱ्याच

लवकर येऊन एक चांगली जागा पाहून त्यावर माझे सामान ठेवले होते. शेजारी आमच्याच गांवचा विद्यार्थी उद्धवराव मुजुमदार बसला होता. अद्याप वेळ होती म्हणून मी बाहेर गेलो. थोड्या वेळानें परत येऊन पाहतो तो माझे सामान त्या जागेवरचे, लांब दुसऱ्या स्टुलावर आहे ! मी त्याला विचारतांच तो म्हणाला, ' ते तुमचे सामान पारशीणीनें उचलून तिकडे ठेवले आहे व त्या जागेवर तिनें आपले आणून ठेवले आहे. '

' मग तूं रे येथे कशाला होतास ? ' मी रागानें बोललो.

' मला छाती नाही झाली बोवा तिचे सामान उचलायची किंवा तिला ठेवू नको म्हणून सांगायची. '

' लुगडं नेसून बस तर ' असं म्हणून मी ते सामान उचलून दुसरीकडे ठेवले व पूर्वीच्या माझ्या स्टुलावर जाऊन बसलो.

ती आली, मी मुंबईचा नाहीं, नवखा आहे, असे तिला वाटले असावे. तिनें मलाच दरडावले. व सामान कां उचलले म्हणून दम दिला. पण मीही लहानपणीं हुकमत गाजवलेली. दुसऱ्याला भ्यायची मला संवय नव्हती. मीही तितक्याच जोरानें उलट बोललो. व ' आणखी ठेवलं तर पुनः फेकून देईन ' म्हणून खडसून बोलतांच ती गप्प बसली.

त्या वेळेपासून तिचे माझे बोलणे बंद झाले ते वर्षअखेर. पण ज्यावेळीं माझा नंबर पहिला आला आणि मला स्कॉलरशिप मिळाली त्यावेळीं मग तिनेच बोलणे सुरू केले व पुढे आमची मैत्री जमली.

याच मुलीबरोबर पुढें कांहीं कारणामुळें सर्व मुलांचे व तिचे एकदम बिनसले. तिनें सर्वांचा अपमान केला अशी त्यांनीं समजूत करून घेतली. त्यासाठीं त्यांनीं तिच्याशी नॉन-कोऑपरेशन पुकारले. मलाही त्यांत सामील होण्याबद्दल त्यांनी निक्षून सांगितले. पण मी ऐकले नाहीं. कारण माझा अबोला होता, त्यावेळीं सर्व बोलत होते. यामुळें त्यांनीही मग माझ्याशी बोलणे सोडून दिले. मग आम्ही दोघेच बोलत असूं. यामुळें आम्ही, मुलांच्या चेष्टेचा विषय होऊन बसलो होतो. तिलाही त्यांची कल्पना आली होती. पण आश्चर्याची गोष्ट, त्यामुळें भिऊन तिनें वागणुकींत कांहींही बदल केला नाहीं. ती पूर्ण बेपर्वाईनें वागत असे. पण आम्हामध्ये तसा कांहीं प्रकार घडला नाहीं. याचे कारण माझी

सात्विकता अशी प्रौढी मला मुळीच मारता येणार नाहीं. तिच्याकडून तसा प्रयत्न झाला असता तर मी जरूर पुढे पाऊन टाकले असते. ते विचार येत नव्हते असे नाहीं. नव्हे मी बेचैन होतही होतो. पण माझा भित्रेपणा मला नडला. तिलाही संकोच वाटला असावा. माझा अव्हेर तिनें केलाच असता असेही नाहीं. कांहीं न घडता मुलें तशी टीका करीतही होती. त्यामुळें वाईट कांहीं वाटत नसे.

चित्रशाळेंत मी हुषार मुलांत मोडूं लागलो. माझे काम बरेच चांगले असें. त्यामुळें मुलें व मुलीसुद्धां आपल्या चुका दाखवण्याकरता व सुधारण्याकरता मला बोलावून नेत.

चौथ्या वर्षापर्यंत मी नेहमीं पहिलाच असें. मला पहिली स्कॉलरशिप सतत मिळत गेली. स्कॉलर नाहीं असें वर्ष नव्हतेच म्हटले तरी चालेल.

**वडिलांचे समाधान.—** पैसे मिळवण्याच्या धंद्यांत पडलो नाहीं म्हणून वडिलांना जे वाईट वाटत होते ते कमी झाले. त्यांना माझा अभिमान वाटूं लागला. त्यांचे तसें पत्र आले. त्यामुळें माझ्यांतही उत्साह वाढला. ते पत्रांत लिहितात—

‘ आर्ट कोर्समध्ये मी तुला घातला आणि त्या कलेंत माझ्या मुलानें प्राविण्य मिळवले याबद्दल समाधान वाटते. पैशाचा प्रश्न दैवाधीन आहे. परंतु हातीं घेतलेले कर्तव्य माझा मुलगा उत्तम रीतीनें कडेला नेत आहे, याबद्दल आनंद वाटतो. तूं गुणवान व सद्‌गुणी आहेस, स्वार्थत्यागी आहेस. आपले सुख बाजूस सारून इतरांच्या सुखासाठीं झीज सोसणारा आहेस. या कल्पनेनें मला सार्थकता वाटते. तूं स्कॉलर आलास हे मला कळले नव्हते. शंकरकडून कळले. ’

वडीलांनीं लिहल्याप्रमाणें मी निस्वार्थी होतो असे मला वाटत नाहीं. माझ्या स्वतःचा कपड्याचा शोक कमी करून, त्यांत काटकसर करून दुसऱ्यासाठीं कांहीं करीत नव्हतो. केवळ थोडे जादा असले तर कोणाला कांहीं तरी देत होतो. पण त्यांत औदार्यापेक्षां मोठेपणाची **आढ्यताच जास्त होती. दुसऱ्यांनीं दिलदार म्हणावे ही इच्छा. अंतरीची तळमळ कमी !**

**कपड्याचा शोक.**— वडील पैसेही भरपूर पाठवून देत. गव्हर्मेंट स्कॉलरशिपही होतीच. रहायला महाराजांचा बंगला होता. त्यामुळें उरलेली सर्व रक्कम कपड्यांत घालायची. कपड्याचा त्यावेळीं तरी मी फार शोकीन. अगदी बड्या जहागिरदाराला शोभेल असे कपडे असायचे. कॉटनचा कपडा मी क्वचितच वापरीत असें. पायांतला मोजासुद्धां रेशमी. रेशमी वापरण्याची हौस इतकी कीं बुटाच्यावर दिसणारा मोज्यांचा भाग धड असला म्हणजे झाले. मग आंत सगळा पाय मोकळा कां असेना. सिल्क, सर्ज आणि वूल यांचे कपडे आणि वर भरजरी फेटा. फेटेही पुष्कळ होते. हा सगळा नूर पाहून मुलें–मुली आम्हाला ‘ राजेसाहेब ’ म्हणत. शिपाई लोकसुद्धां आमच्यावर फार खूष. दर महिन्याला एखादा तरी कपडा त्यांतल्या कोणाला तरी मिळायचा. रोज कोणी तरी शिपाई बरोबर चहाला असायचा. आमची स्वारी चहाला एकटी कधीं जायची नाहीं. मित्रमंडळी चारपांच असायचीच बरोबर. आम्ही सिनेमालासुद्धां एकटे जात नसूं. एका दोघांना बरोबर न्यायचे व त्यांचे तिकीट आपणच काढायचे. बाकी हा मनाच्या दिलदारपणापेक्षां मी मोठा आहे श्रीमान आहे, हे लोकांना भासवण्याकरतांच खर्च व्हायचा ! मनांतून मात्र इतकी उधळपट्टी करण्याची इच्छा नसे. कारण हा खर्च करतांना मी तो प्रमाणाबाहेर करीत आहे ही जाणीव असायची. या खर्चामुळें महिना अखेर चांगलीच ओढाताण व्हायची. एखादेवेळीं तर ट्रॅम वर्ज करावी लागे. मग कांहीं दिवस आपले कपडे आपण धुवायचे. कपड्यांना इस्त्री आपणच करायची. केव्हां चहा तर केव्हां जेवण चुकवायचे. पण बाहेर मात्र ऐट दांडगी.

शाळेत कांही वेळां मोटारनें यायचें. केवळ रुबाब दाखवण्यासाठीं, गरज मुळीच नसायची. यामुळें मास्तर लोकांहूनही शिपाई आम्हाला अधिक मान देत. येताच खडी ताजीम होई. मग आमची स्वारी खूष ! संक्रातीला, मी श्रीमंत आहे याचा भास निर्माण करण्याकरता मास्तर लोकांना तिळगूळ चांदीच्या वाट्यांतून द्यायचे. प्रत्येकासाठीं वाटी खरेदी करायची.

त्यावेळीं माझ्याइतका रुबाबात राहणारा विद्यार्थी वर्गात तरी नव्हताच पण शाळेंतही कोणी मला दिसला नाहीं. फैत्यामुळें तर मी विशेष डोळयांपुढे येत असे.

**शाहूमहाराजांचा कटाक्ष.**— मी रहात होतों शाहू महाराजांच्या बंगल्यांत. त्यांना फॅशनचा व बुटासुटाचा फार तिटकारा होता. पण मला त्याचे तितकेंच वेड. माझ्या टाईजच इतक्या होत्या कीं टर्मला त्यांतल्या एकेकाची पाळी यायची.

महाराज माझ्याकडे मुद्दाम निरखून पाहत. पण त्याचा माझ्यावर कांहीं परिणाम झाला नाहीं. मग माझ्यासमोर ते दुसऱ्याला त्याच्या फॅशनबद्दल पुष्कळ बोलूं लागले. तरीही मी कपड्यांत बदल केला नाहीं. आलाच प्रसंग तर बंगला सोडायची माझी तयारी होती. पण माझा मुर्दाडपणा पाहून त्यांनी मला प्रत्यक्ष बोलण्याचा प्रसंग कधी आणला नाहीं. पण त्यांनीं सूट घालायचा नाहीं अशी ताकीद केली असती तर मी मोडूं शकलो असतो कीं नाहीं हे सांगणे कठीण. पोरवय म्हणून त्यांनी माझ्याकडे दुर्लक्ष केले हेच खरे.

मनुष्य स्वभाव जाणण्यात शाहूमहाराजांच्या इतकी कुशल व्यक्ति मिळायची नाहीं. मला हलके काम करायला फार कमीपणाचे वाटे. हे जाणूनच कीं काय त्यांनी बंगल्यांतील दारावर, आपल्या व खाद्या स्वाऱ्यांच्या खोल्यांवर त्यांची नांवे घालण्यास मला बोलावून सांगितलें. तोंडावर तर नाहीं म्हणणे शक्यच नव्हते मला. ‘ होय नाहीं ’ कांहीं न बोलतां मी मुकाट्यानें स्तब्ध बसलो. पण तेथल्या सर्व लोकांसमक्ष पाट्या रंगवणाऱ्याप्रमाणे दारावर नांव घालीत उभा राहणे फार अपमानाचे वाटले मला. व काय होईल ते होवो हे चुकवावयाचे असें ठरवले. त्याला संधीही अनकुल मिळाली. नुकतीच शाळेला सुटी मिळाली होती. महाराज बाहेर गेलेले पाहून मी व्हिक्टोरिया बोलावली आणि सरळ घरची वाट धरली.

पण महाराज वस्ताद. मला वाटले मी गांवी गेलों त्या दरम्यान कोणाकडून तरी नांवे घालून घेतली असतील. कदाचित् ते विसरलेही असतील!

मी सुटी संपल्यावर परत गेलों. त्यानंतर कांहीं दिवसांनी महाराज आले. मला पाहताच ते म्हणाले ‘ अरे, ती नांवे घालायला विसरलास

वाटतं. तेवढी घालून टाक पाहूं.' आतां चुकवणें शक्य नव्हते. मी तर अगदी रडकुंडीला आलो. व एका दारावर कसेबसे वांकडेतिकडे नांव घालून टाकले. त्यांनी, मी अखेर एका दारावर तरी नांव घातलें हे पाहून 'राहूं दे आतां' म्हणून थांबवलें. आणि काम ऐकल्याबद्दल म्हणून मला लागलीच दीडशें रुपयाचा कॅमेरा विकत घेण्यासाठीं पैसे दिले.

× × ×

एकदा मी एकटाच त्यांच्या जवळ उभा होतो. तेव्हां 'तुला भाऊ किती आहेत, ते काय शिकतात? मग तूंच बरे इकडे हे शिकायला आलास?' असें विचारलें.

'दुर्बुद्धि सुचली मला आणि मी आलो झाले इकडे' असें मी आपला बोललो, झाले! त्यांना ते ऐकून वाईट वाटले. ते म्हणाले 'असें कां म्हणतोस? असें निरुत्साह व्हायचें कारण काय? अरे, विलायतेंत एक एका चित्राला किती भारी किंमत येते! लाख रुपयाची चित्रें मी डोळ्यानें पाहिली आहेत. आम्हां लोकांस समजत नाहीं, म्हणून तुमची कां योग्यता कमी आहे?"

या प्रसंगानंतर महाराज माझी चित्रें मुद्दाम केव्हां केव्हां विकत घेऊन मला कांहीं तरी पैसे देत.

शाहू महाराजांचे व माझ्या वडिलांचेही संबंध चांगले होते. ते वडिलांना मानत. घरीही येत. त्यामुळें महाराजांची भीति वाटण्यापेक्षा त्यांच्याबद्दल आपलेपणाच वाटे.

**मुंबई मतें आणि स्वकीयाबद्दलच्या भावना.**— मुंबई शहरांत राहण्यानें माझ्या मनावर नकळत विलक्षण परिणाम झाला. ज्या गोष्टी उपदेशानें, वाचनानें व व्याख्यानानें झाल्या नसत्या त्या सहजासहजी झाल्या —

पहिली गोष्ट म्हणजे इतक्या दूरवर रहाण्यानें माझ्या गांवाबद्दल माझ्या आप्त मंडळीबद्दल व स्वकीयांच्या बद्दल माझ्यांत विशेष प्रेम उत्पन्न झाले. कोल्हापुरचा फेटा दिसला कीं ओळख नसली तरी सुद्धा त्याच्या-बद्दल एक प्रकारचा आपलेपणा वाटे. व माझीही ते लोक बोलाचाली नसली तरी पुढे होऊन विचारपूस करीत.

मी मे महिन्याच्या सुटींत ज्या वेळीं घरीं परत जायला निघालो, त्यावेळीं वाटणारी मनाची घाई आणि आपल्या मंडळींना पाहण्याची उत्सुकता वर्णन करता येणे शक्य नाहीं.

गाडी शहराजवळ येऊं लागताच आसपासच्या टेकड्या, ती नदी पाहताना जणुं काय ती आप्तापैकींच आहे असें वाटे व माझ्या आवडत्या जागीं मी केव्हां जाऊन बसेन आणि त्या देखाव्यांना डोळांभर पाहून घेईन असें व्हायचे मला. जणुं नदी, तलाव, टेकड्या, ती झाडें ही माझी मित्र मंडळीच !

मुंबईत मी सखुबाईच्या खाणावळीत जेवीत असें. तेथे ब्राह्मण, मराठे, पांढरपेशे, ब्राह्मणेतर एकाच पंक्तीला बसत असलेले पाहून रोटीभेदाची कल्पना नाहींशी झाली. चहा तर आम्ही इराणी हॉटेल मध्येंच घेत असूं. कारण दुसरें चहागृह नव्हतेच शाळेजवळ. आणि इराणी हॉटेलच्या चहाची गोडीच कांही और होती.

**स्वभाव बदलला.**— मुंबईतील राहणीचा मनावर दुसरा एक परिणाम झाला. मी जो एकलकोंडा व मिडस्त होतो तो बराच मोकळा बोलका आणि मंडळींत मिसळणारा झालो. आपले असे जवळ कोणीच नसल्यामुळें परक्यांना जवळ करण्याची बुद्धी साहजिकच उत्पन्न झाली. व यावेळीं जोडलेले मित्र मला आयुष्यांत माझ्या संकट प्रसंगी सुद्धा पुढें उपयोगी पडले.

**शंकरराव पारकर** यांनी तर मी आजारी पडलो असतां भावा-प्रमाणें माझी सेवा केली व किती तरी दिवस मला बरें वाटावे म्हणून घरची ताटं आणून स्वतः पोचती करीत. मैत्रीत शंकररावांचे स्थान अढळ आहे. त्यांच्या आईसुद्धा मला, मुलाप्रमाणें वागवीत या पुढेही ते माझ्या संकटकालीं उपयोगी पडले. कोणी थारा दिला नाहीं त्यावेळीं माझी केवढी बडदास्त ठेवली. कित्येक वर्षे झाली त्यांची गांठ पडून पण त्यांचे उपकार मी विसरूं शकत नाहीं. त्यांच्या आईनीं प्रेमानें चारलेल्या घांसाची गोडी अद्याप गेलेली नाहीं ! या कालांत एक दोन जन्माचे सोबती जोडले मी.

वर्गांतही मी बराच आवडता होतो. मी सर्वांशी मिळून मिसळून वागे. चहाला तर बरोबर चारपांच स्नेही असतच, त्यात मी विद्यार्थीही

चांगलाच होतो. आमचा श्रीमंतीचा रुबाब. खर्चिक स्वभाव व कामांतील हुषारी यामुळें मास्तरांचे माझ्यावर प्रेम होते व कांहींवर वजनही होते. कारण हा फार श्रीमान् असावा ही सर्वांचीच समजूत. मी ज्या रुबाबानें रहात होतो व खर्च करीत होतो तेवढा मात्र श्रीमान नव्हतों. ते राहणे माझ्या ऐपती बाहेरचे होते.

*　　　*　　　*

## स्कूल ऑफ आर्टचे मास्तर

धुरंधर—हे त्यावेळीं हेडमास्तर होते. ते मूळचे आमच्याच गांवचे असल्यामुळे त्यांचे माझ्याकडे विशेष लक्ष असे. प्रेमही असे. पण त्यांचा तो उग्र चेहरा, तो स्थूल देह, तो चष्मा व डोक्यावरची रेशमी पगडी, काळा कोट, हा वेष एखाद्या जज्जाला शोभण्यासारखा असल्यामुळें त्यांची मला भीतीच वाटे. त्यांच्या विषयींची भीति जायला बराच काल जावा लागला.

बाकी त्यांच्या हाताखालीं काम करता आलं ही एक मोठी अभिमानाची गोष्ट होय. मास्तरांच्या सारखा प्रतिभासंपन्न चित्रकार हिंदुस्थानांत मिळणे दुर्मिळ. ते चित्रकार म्हणण्यापेक्षां एक मोठे चित्रलेखक होते. मनांत कल्पना आली की ती पेन्सिलीतून सरसर बाहेर पडे. मात्र चित्रें एका सांचाची व चेहऱ्याची. मास्तर स्वभावानें सनातनी. आम्ही दिल्लीला गेलो. पार्टीबरोबर मास्तर होते. सर एडविन लच्छ गव्हर्मेंट आर्किटेक्टनें जेवायला बोलवले तर मास्तरांनीं काळया सूटशिवाय जाता येणार नाहीं म्हणून ताकीत दिली. ती आम्ही पाळूं शकलो नाहीं. प्रिन्सिपाल सालोमन हाच म्हणाला, ‘ मुलांना काय कपड्यासाठीं बोलावलं आहे ? येऊ देत असतील त्या कपड्यानें.’

दिल्ली नाचबैठकींत प्रसिद्ध. पोरांनीं ठरवलं रात्रीं नाच पहायला जायचं. यांत वाईट हेतू नव्हता. नाचाचं चित्र काढायचं तर नाच नको कां पहायला ? पण दुसरें दिवशीं मास्तरनीं त्याला भलतंच स्वरुप दिलं ! त्यांना ही गोष्ट अनैतिक वाटली.

सांस्कृतिक दृष्ट्या धुरंधर मास्तरांचा दर्जा सर्वांहून श्रेष्ठ ठरेल. विशाल बुद्धिमत्ता, अचाट कल्पना आणि अविश्रांत काम करण्याची

लावून घेतलेली संवय, पवित्र आचरण व निव्वळ कलेला वाहून घेतलेले जीवित असे लाखांतही मिळणे कठीण. पण दोष म्हणजे त्यांची सर्व कामें एका ठराविक सांचाचीच निघत. त्यांत नाविन्य दिसत नसे. पोर्ट्रेट असो, डिझाईन असो, लँड्स्केप असो, हा दोष त्या सर्वांत दिसून येई.

**आगासकर.**— मास्तर केव्हां केव्हां चिडत. पण ते कोंवळया आणि खुल्या मनाचे असल्यानें त्यांची भीति तशी वाटायची नाहीं. एकदां ते माझ्यावर उगाच रागावले. पण दुसरे दिवशीं वर्गात आल्यावर त्यांनीच रागावल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. आगासकरांच पोर्टेट पेंटिंग फार उच्च दर्जाचे. जगांतल्या मोठ्या चित्रकारांत त्यांची गणना करावी लागेल. काम करीत असतांना पहावं. स्वतःचं भान राहणार नाहीं. काम चालू होतं आम्ही मुलें मागे उभे राहून काम पहात होतो. मास्तर कामांत तल्लीन झाले होते. ब्रश पडला कीं वाटावं तेवढा कातडीचा तुकडाच कॅनव्हसवर पडला आहे. घाम पुसूं लागले. हातांत रूमाल होता. त्या कामाच्या तंद्रींत त्याच रूमालानें ऑइलचा ब्रश पुसला व त्यानेंच आपले तोंड पुसले आणि सारे तोंड रंगानें माखून घेतले !

मास्तरनीं बर्न्स प्रिन्सिपॉलचे पेंटिंग तयार केले. जिन्याच्या टोंकास इजलवर ठेवले. क्लास सुरूं होण्याची घंटा झाली. आम्हीं लगबगीनें जिना वर चढूं लागलो तो प्रिन्सिपॉल समोर. एकदम दचकलो. पण ते प्रिन्सिपॉल नसून मास्तरनीं केलेलं त्यांच पेंटिंग होतं !

मास्तर स्वभावानं राजासारखे. हृदयानं मुलासारखे. उघड्या मनाचे. मी विद्यार्थी पण आपल्या दुःखाच्या कहाण्या सांगून अश्रू गाळीत.

आगासकरांच्यांत बुद्धिमता व यांत्रिक श्रम कमी. लहरी विशेष. पण हाती घेतलेले काम ते उत्कृष्ट करतील. पोर्ट्रेटमध्ये तर त्यांचा हात धरणारा मी अद्याप कोणी पाहिला नाहीं. अगदी जिवंत माणूस उभा करीत. त्यांचे ब्रशिंग उत्कृष्ट. नामांकित इंग्लिश पेंटरलाही अभ्यास करण्याजोगे होते.

**तासकर.**— त्यांना पाहिले तर त्यांना कोणी चित्रकार म्हणणार नाहीं. त्यांची कपड्यांतील टापटीप, काळया अल्पाक लॉंग कोटावर सदा परिटघडीचे व्यवस्थित ठेवून दिलेले उपरणे. खास शाळेंत वापरण्यासाठीं चकचकीत केलेला काळा बूट. आणि मोजून पाऊल टाकण्याची ती

चाल. सदा गंभीर चेहरा. यामुळें त्यांच्याशी सलगी होऊं शकली नाहीं. पण शिकवायला फार चांगले. पद्धत बरोबर घालून देणारे. वॉटर कलरमध्यें प्रविण. अनेक पदकें मिळविली.

पहिल्या वर्षी या मास्तर लोकांच्या अंगच्या गुणापेक्षां वरच्या पेहरावानेच आमचें लक्ष वेधून घेतलेले होते. त्यांच्या कलेचें वैशिष्ठ्य समजण्याची पात्रता त्यावेळीं आमच्या अंगांत नव्हती.

तिसऱ्या चौथ्या वर्षांत त्यांची खरी योग्यता समजूं लागली. व तेही पुढें ' मास्तर ' असें न वागता स्नेह्याप्रमाणें बरोबरीच्या नात्यानें वागूं लागले. धुरंदर मास्तरांचा बराच घरोबा जमला. त्यांचे चिरंजीव गणपतराव तर माझे चांगलेच स्नेही झाले. त्यांच्या घरीं जेवायचेंही प्रसंग आले.

आगासकर मास्तर जवळ जवळ स्नेहीच झाले. त्यांच्याही घरीं मी नेहमी जात असें. पण त्यांची एकंदर स्थिती पाहून मला त्यांची कींव येई. व्यसनामुळें त्यांचा पगार त्यांना अपुरा पडे. त्यांचे व्यसन त्यांच्या सर्व घराला लागलें आणि घराण्याची वाताहत झाली! लोकांची पत्करलेली कामें पुरीं होत नसत. घरच्या खर्चाची तोंडमिळवणी होत नसे. कोणाकडून तरी उसनवार घेतल्याखेरीज महिना जायचा नाहीं. घरीं अस्ताव्यस्तपणा; चित्रावर व पॅलेटवर धूळ बसलेली. अंगांत कपड्यांची उणीव. व्यसनामुळें हे अमोलिक कला–रत्न मातीमोल होत चाललें होते.

**त्रिंदाड.**— यांचा माझा घरोबा जमला नाहीं. ते रहातही होते मुंबई बाहेर. पण फार मोठ्या जोडींतले. पोर्टेट मध्यें लाइकनेस राखून गोडवा आणावा त्यांनीच. त्यांचे पेंटिंग म्हणजे लय लागलेलं गाणंच !

आमच्या वेळचे सारे शिक्षक खरोखरीच फार मोठ्या योग्यतेचे होते. त्यांचा सहवास मला लाभला याबद्दल मला अद्याप अभिमान वाटतो.

माझ्या वर्गांतही चांगली नांवलौकिक काढणारी मुलें निघाली. डी. रामराव नांवाचा एक विद्यार्थी कांपोझिशनमध्यें इतका सरस असें कीं मास्तर लोकांनीं सुद्धा हेवा करावा. फर्नांडिज हे पुढे प्रिन्सिपाल झाले. भोसले, नगरकर यांनीं नांव कमावले. तेथेच मोठ्या जागेवर गेले. पुरम आधकरांच्याकडे होते.

**हिंदी चित्रकारांत ठराविक वैगुण्य.**— मात्र विद्यार्थ्यांमध्यें एकंदरीत सर्वसाधारण एक महत्त्वाचें वैगुण्य मला दिसून आलें. बुद्धि-विकासाकडे पूर्ण दुर्लक्ष. प्राचीन संस्कृतीची, धर्मग्रंथाची, पुराणांची त्यांना फारशी माहिती नसते. तशीच नव्या युगांतील नवविचारांचीही त्यांनीं ओळख करून घेतलेली नसते. वाचनाचा शोकी असा चित्रकार मला माझ्या वर्गांत तरी कोणी आढळला नाहीं. ललितवाङ्मयाची गोडी आढळली नाहीं. कलेला याची काय आवश्यकता अशी त्यांची समजूत. धुरंधर वगळले तर इतर मास्तरांचीही गत तीच. उच्च ध्येय असल्याखेरीज उच्चविचाराची ध्येयपूर्ण अशी चित्रें निघणार कशी? उच्चध्येयाला बुद्धि विकासाची आवश्यकता आहे. वाचन आणि मननाखेरीज हा विकास कसा होणार? ज्यांच्या कौशल्याबद्दल मला पूर्ण आदर आहे अशा व्यक्तीमध्यें सुद्धा मला हाच अभाव दिसून आला!

मी इतर विषयांत वाईट नव्हतो पण लहानपणापासून माझ्यांत सृष्टिसौंदर्याविषयींच्या आवडीमुळें माझी या विषयांत सर्वांहून अधिक गती चालू लागली. लँडस्केप हा विषय शाळेंत शिकवला जात नसे. पण सुटीच्या वेळीं आम्ही रंगीत चित्रें करून आणली म्हणजे मास्तर लोक त्यांच्या गुणदोषाची चिकित्सा करीत.

दळवी नांवाचे कोल्हापूरचेच एक विद्यार्थी त्यावेळीं पुढच्या वर्गांत होते. त्यांच्याबरोबर मी केव्हां केव्हां लँडस्केपला जात असें. सुरवातीला त्याचा मला फायदा झाला. पण पुढे मी स्वतःवरच विसंबून राहूं लागलो.

**मॉडेलिंग कोर्स.** – पेंटिंग झाल्यावर शाहूमहाराजांनी मला मॉडेलिंगचा कोर्स घेण्याची आज्ञा केली. तें म्हणाले 'माझ्या संस्थानचे लाखों रुपयें पुतळयासाठीं बाहेर जातात. ती कला तूं शिक म्हणजे सारें पैसें तुला मिळतील.' हा चार वर्षांचा कोर्स मी दोन वर्षांत पुरा केला व येथेही स्कॉलरशिप मिळवली. आमचे अखिल भारतीय कीर्तीचे गुरुवर्य गणपतराव म्हात्रे हे माझ्या कामावर खूष असत. ते पत्रांत म्हणतात, '**Mr. M. K. Bagal is one of the most capable student I have had in the modelling of the Sir J J. School of Art.**'

पेंटिंग मॉडेलिंग व म्यूरल डेकोरेशन या कोर्समध्यें मी सुरवातीपासून अखेरपर्यंत स्कॉलर होतो व बक्षीसेंही मिळवली.

यानंतर दिल्लीसरकारचे आर्किटेक्ट सर एडविन ल्यूटन यांच्या आमंत्रणावरून प्रिन्सिपॉल ग्लॅडस्टन सालोमनसकट आमचा स्टाफ दिल्लीस गेला. नवी दिल्ली अद्याप तयार व्हावयाची होती. त्यांतील व्हाइसरॉय लॉजमध्यें हॉल डेकोरेशनचं काम आम्हाला मिळालं होतं. त्याची कल्पना देण्याकरतां सर एडवर्ड्सनें बोलावले होते. त्या कालांत आम्ही दिल्ली व आग्र्यांतील स्केचीस केली. '**जसमिन महाल**' जेथें शहाजहाननें ताजमहालकडे पहात प्राण टाकला ती जागा, कलेच्या दृष्टीनें मला आवडली. तेथून जमुना वहात असलेली दिसते. विशेषतः चांदण्यांतलं सौंदर्य रम्य रोमांचकारी आणि इतिहासामुळें हृदयद्रावक वाटतं. तोंच इतिहास मला रात्रभर आठवूं लागला. बिचारी जहानआरा, त्याची मुलगीच तेवढी अंतकालापर्यंत त्याच्याशी एकनिष्ठ होती. मी त्या जागेचे पेंटिंग काढून त्यांत मागाहून मृत्युशय्येवरचा शहाजहान व जवळ उभी असलेली जहानआरा आणि चांदण्यांत दिसणारा ताज हे चित्र काढले. त्याखालीं गुरुदेव टागोर यांची ताजबद्दलची 'हे शहाजहान! तूं प्रेमाचा अश्रू बिंदू चिरंजीव केलास' ही ओळ खालीं टाकली. हे चित्र प्रदर्शनांत पाठवले. त्याची क्रॉनिकल पत्रानें फार शिफारस केली होती. फत्तेपूर शिक्रीचीं वॉटर कलर्स काढत असतानांच खपली. प्रवासातच दीड दोनशेहे रुपये मिळाले. दोन चायना सिल्कचे सूट करता आले.

दिल्ली रसीन्याचे कमिशन मलाही मिळालं होतं. पण मुंबईत-७।८ वर्षे काढली व घर सोडून इंग्रजी शिक्षणासाठीं पांच वर्षें, व ही ६।७ यामुळें आतां मुंबई सोडाविशी वाटूं लागली.

**मिश्रशिक्षण.** — वरच्या वर्गात फार थोडे विद्यार्थी होते. मुलीही आमच्या बरोबर अभ्यास करायला असत. मुलींना निराळी अशी जागा नसे, तसा भेदभाव दाखवला जात नव्हता. वर्गांत मुली असल्यामुळें आम्हां सर्व मुलांवर एक प्रकारचा दाब असे. कोणीही पाचकळपणानें बोलत नसे. मुलामुलांत सुटणारी सभ्यता आणि बोलण्यांतील अश्लीलता मुली जवळ असल्यामुळें बंद पडली होती. गलिच्छ व गबाळ दिसूं नये म्हणून टापटीपही साहजिकच येत होती. स्वभावांत सौजन्य आणि नम्रता आणावी लागे. आमची दाढी फार वाढत नसे. कपड्यांत स्वच्छता राखली जाई. मिश्र शिक्षणामुळें मुलावर हे इष्ट परिणाम आपोआप घडत.

मॉडेलिंग कोर्स संपवून मी म्यूरल डेकोरेशनसाठीं एक वर्ष काढले. त्या कालांत बॉंबे गव्हमेंट हौसमधील तीन मोठी पॅनेल्स केली. कार्पेटसेलर्स, इंडियन इंडस्ट्री व हंटिंग अशी तीन मोठीं खणाखणाची चित्रें काढून ती दरबार हॉलमध्यें लावली. त्यावेळचे प्रख्यात प्रिन्सिपाल ग्लॅडस्टन सालोनन व रावबहादुर धुरंधर यांना ती फार आवडली. त्याबद्दल त्यांनीं माझी व चित्रांची प्रशंसा केली. व तसें दोघांनीं मला लेखीं प्रशंसापत्रही दिले.

**रावबहादुर धुरंधर म्हणतात** (१९२२) **'The design and the execution of panels for The Mural paintings that Bagal did for the Darbar Hall, Govt. House Bombay were highly admired and on account of these he distinguished himself as one of the most capable students in the school of art'**



कारपेट सेलर्स.



खेड्यावरचा दिनक्रम. चित्रकार—माधवराव

अशा प्रकारें आठ वर्षें कलेच्या शिक्षणासाठीं घालवलीं. कोर्स पुरा झाल्यावर १००।१२५ चीं एक नोकरीं आली. पण मग माझ्या मना-प्रमाणें काम करता येणार नाहीं म्हणून मी तीं धरली नाहीं. शाळेंतहीं मला नोकरी मिळणें शक्य होतें. माझ्या बरोबरीची मुलें आता तेथे हुद्याच्या जागेवर आहेतही.

पेंटिंग व मॉडेलिंगच्या वर्गांत आम्हा समोर ( Nude study ) विवस्त्र स्त्री सर्व दिवसभर अभ्यासाकरता पुढें उभी केलेली असे. तीं पूर्ण विवस्त्र असे.

**अश्लीलता व नग्नता.—** ऑलेतीसारख्या चित्राला अश्लील समजणाऱ्या सोंवळ्या मनाच्या लोकांना ही कल्पना भयंकर वाटेल व ते आपली मुलें अशा शाळेंत केव्हांही पाठवणार नाहीत. पण नग्नतेची कल्पना जितकी चमत्कारिक आणि भयंकर वाटते तशी वस्तुतः मात्र नाहीं. या वर्गांत आमच्याबरोबर काम करण्यास मुलीही असत.

अगदी सुरवातीला पहिल्या दिवशीं कांही वेळ नाविन्य व कुतूहल म्हणून आम्हाला चमत्कारिक वाटलें. पण कॅनव्हसवर त्या बाईचें चित्र रेखाटूं लागतांच त्या स्त्रीकडे पाहण्याची दृष्टी आपोआप बदलली. व रेषा, रंग याकडेच आमचे लक्ष वेधून असें. इतर मनोविकार उत्पन्न होत नसत. त्याचा अगदी विसर पडे. डॉक्टर लोकांची रोगी तपासतांना जी एक वृत्ती बनते तशीच चित्रकाराची बनते. प्रत्यक्ष अनुभव घेतल्याखेरीज या गोष्टीची सत्यता पटणार नाहीं. पूर्णनग्नता कामोद्दीपक नसून त्या नग्नतेचा आभास मात्र कामोद्दीपक होऊं शकतो. पेंटिंग करतांना मॉडेलच्या जवळ जाण्याचे फारसे प्रसंग येत नसत. पण मॉडेलिंग करतांना मात्र जवळ जाऊन अवयव निरखूनही पहावे लागे. पण मांसल आकार हीच कल्पना आमच्यासमोर त्यावेळीं असें. नग्नतेबद्दल जें नेहमी काहूर उठते तें वाचून मात्र मला हसूं येतें.

× × ×

**एक गलिच्छ प्रकार.—** राजवटींतले कांहीं बडे सरदार **माझे स्नेही होते. चुकलों, स्नेही कसले ! हे लोक आपले स्नेही म्हणणं मूर्खपणाचं आहे. पण एवढं खरं, खूप सलगी होती त्यांची माझी.**

हे आमचे बडे स्नेही मुंबईला आले होते. मला बरोबर घेतल्याखेरीज ते बाहेर जायचे नाहींत. पैशाची खातर नव्हती. मोटारचें भाडें तीन रुपये झालें व यांचेकडे पांचांची नोट असली, तर त्याची मोड परत मागायची नाहीं. मजेखातर चाळीसपन्नास रुपये उडवणें त्यांना कांहींच वाटत नसे. सहज कुठल्यातरी युरोपियन हॉटेलमध्यें गेले तरी चहाचें बिलच १०–१५ रुपये व्हायचं.

संध्याकाळ झाली होती. मीही पण मोकळा होतों. त्यांनीं मला आग्रहानें बोलावून गाडींत घेतलें. पुष्कळ चकरा मारून झाल्यावर एका वस्तींत गाडी उभी केली. गाडी उभी करतांच रस्त्यावर उभे असलेले एकदोघे इसम मोटारच्या दाराला बिलगले.

—चला साहेब, बघा तरी. अगदीं नवा माल आहे. गेल्या खेपेपेक्षां सरस आहे.

पूर्वीची ओळखदेख सांगितल्यामुळें त्यांनीं त्याला आपली संमति दर्शविली. दुसऱ्या माणसाला रजा दिली. यांचा कसला सौदा चालला होता याची मला अचूक कल्पना नव्हती. पण नेहमीच्या वृत्तीमुळें अंदाज करतां आला. बायकांची कसली तरी भानगड असायची ! करूं देत कांहींही. तोंपर्यंत, आपण वेळ काढूं मोटारमध्यें या विचारांत मी होतों, पण श्रीमंतांनी माझ्या दंडाला धरून, ‘ चल माझ्या बरोबर, तुला दाखवतों गंमत, ’ म्हणून पुढें घालून ढकलीतच नेलें मला. माझा नाइलाज झाला.

तो माणूस पुढें व आम्ही मागें असें चाललो होतों. बोळांतली वाट होती. जिना चढून वर गेलों. एका साधारणशा हॉलमध्यें त्या माणसानें आम्हाला बसवलें. हॉलच्या मध्यभागीं इलेक्ट्रिक झुंबराचे दिवे लागले होते. कोच व खुर्च्या भिंतीला टेंकून होत्या. मध्यें गालिचा अंथरला होता. टेबल वगैरे कांहीं नव्हतें.

आम्हांला बसवून तो आंत गेला. थोडक्याच वेळांत तेथे चार स्त्रिया आल्या. त्यांच्या धंद्याची छाप त्यांच्या प्रत्येक हालचालीवर, आवरणावर व शृंगारावर स्पष्ट दिसत होती. मुसलमान दिसत होत्या. पंजाबकडील असाव्यात. अंगांत रेशमी हिरवेंगार सॅटिनचें जाकीट, त्याचे खालीं मनगटापर्यंत पातळ रेशमी सदरा, वर पातळ तांबडें कापड व त्यावर पिंवळें

ठिपके. हातोपे बटनाचे होते. हातांत आंगठ्या बऱ्याच दिसत होत्या, मनगटही दागिन्यांनीं भरलें होतें. विजारी रेशमी. पठाणी तऱ्हेच्या, अगदी तांबड्या भडक होत्या व पायांत जरीचे चढाव. त्यांवर चांदीच्या छल्या. चालतांना आवाज करीत. कानांत इअररिंग्ज हालत होते. तोंड पानानें भरपूर रंगलें होतें. वर्ण गोरा, पंजाबी उंची व नाकडोळे. भाषा मराठी येत नव्हती. कपड्याला अत्तराचा वास येत होता. देखण्या होत्या, पण त्या देखणेपणांत गोडवा नव्हता. मोहकपणा नव्हता.

मध्यें गालिचावर बसून त्यांनीं आम्हाला विडा करून दिला. श्रीमंतांनी दहादहा रुपयांच्या दोन नोटा तबकांत ठेवल्या. मला वाटलं गाणं किंवा नाच ऐकायला कांहीं हरकत नाहीं. असं काय नुकसान होणार आहे त्यांत ? श्रीमंत म्हणाले, ‘ लेका नाच तरी बघ. ठिकाणावर बसणार नाहींस. ’

गाणं आणि नाच आवडत नाहीं कुणाला ? मी कांहीं संन्यासी किंवा साधुपुरुष नव्हतों. सर्वसाधारण मनुष्यांत ज्या भावना असायच्या त्या माझ्यांत होत्याच. पण यांच्यासारखा मुरलेला तज्ञ नव्हतों. जात्याच भित्रा होतों मी. याचमुळें यांच्याबरोबर हिंडायला मी चुकवाचुकव करीत असें. म्हणून तर ते मुद्दाम माझा पिच्छा पुरवीत. आतां धरूनच आणल्यावर काय चुकवणार ? त्यांतही जिज्ञासा होतीच. एकीकडे नको म्हणत असलों तरी दुसरं मन म्हणायचं, फुकट गंमत पहायला मिळते, बिघडलं काय ? मनांत आलं तरी आपली कांहीं पैसे खर्च करण्याची ताकत नव्हती. श्रीमंत लोकांची चीड मला मत्सरानें तर येत नसेल ? द्राक्षं आंबट वाटण्याचाही प्रकार असेल कदाचित्. माझ्या मनाची छाननी मी कांहीं बरोबर केली नव्हती.

गाण्याच्या तयारीला त्या आंत गेल्या. पंधरा मिनिटें होऊन गेलीं. नाचाचे खास निराळे कपडे करीत असतील असं मला वाटलं. थोडक्यांच वेळांत तो माणूस श्रीमंतांचे जवळ जाऊन म्हणाला, ‘ साहेब, होऊं दे का सुरवात ? तो माणूस आंत गेल्यावर श्रीमंत मला म्हणाले, ‘ सरळ बस ना जरा आंवरून. अखडून नीट बैस चांगला. ’

मी जरा ताठ बसलों व म्हणालों, ‘ साहेब, आपल्याला दहाच्या शोला जायचं आहे तें विसराल. लवकर आटपायला पाहिजे. ’

—‘ नाच सुरू झाला म्हणजे म्हणशील राहू दे सिनेमा, आज इथंच राहू या. ’

इतक्यांत त्यांच्या पायांतल्या छल्यांचा आवाज कानावर पडला. त्या येऊं लागल्या असाव्यात. उत्कंठा साहजिकच उत्पन्न झाली होती. त्यांत श्रीमंतांच्या स्तुतीनें भर पडली.

त्या आल्या, पण कशा ? आमची कल्पनाशक्ति उलथी पालथी झाली. मी तर सर्दच झालो. गारठून गेलों ! हें दृश्य पाहण्याची मनाची तयारी नव्हती. आश्चर्याच्या धक्क्यामुळेंच कीं काय, मी भावनारहित झालों. मी कांहीं स्त्रीद्वेष्टा नव्हतों वा आदर्श संयमी नव्हतों. सुंदर स्त्रीला पाहिल्यावर वरकरणी मनाची अस्वस्थता दिसूं दिली नाहीं, तरी ती मनावर परिणाम केल्याखेरीज रहात नाहीं.

इच्छा नसणं ही संन्यासवृत्ति, आवरणं हा फक्त धूर्तपणा. हा धूर्तपणा सामाजिक बंधनांमुळें व लौकिकाच्या कल्पनेमुळें प्रतिष्ठितांना वरकरणी स्वीकारावा लागतो. पण उल्लू माणसाची व धूर्त प्रतिष्ठितांची कृति दाराआड एकच असते. आम्ही दाराआडच होतों, समाजाची दृष्टि येथें पोंचत नव्हती. अनिर्बंध चाळयांना पूर्ण मुभा होती.

मी त्या स्त्रियांच्याकडे धांदरटासारखा पाहूं लागलों. त्यांच्या प्रथमदर्शनाचा परिणाम कांही मोहक नव्हता. मी डोळे मिटून घेतले नव्हते, पण सर्व भावना जणूं स्थिर झाल्या होत्या.

स्त्रीजातीचा स्वाभाविक विनय, लाजाळूपणा, तिला शोभा देतो. झरोक्यांतून डोकावणारा चेहरा अधिक कुतूहल निर्माण करतो, पण समोरचा प्रकार विनयाची विटंबना होती. या स्त्रिया आपली सर्व लाजलज्जा टाकूनच पूर्ण विवस्त्र अशा स्थितींत आमच्यासमोर उभ्या राहिल्या होत्या. त्यांनी एकमेकींच्या हातांत हात घालून नाच सुरू केला.

“ मला स्त्रियांचा तिटकारा होता म्हणून नव्हे, माझ्या अंगीं साधुवृत्ति होती म्हणून नव्हे, किंवा मोहापासून दूर राहण्याचा संयम होता म्हणून नव्हे, पण त्यांच्या या अपवित्र, निर्लज्ज, व्यापारी नग्नतेचा

तिटकारा आला मला. नग्नतेंतही पावित्र्य असतं. व्हीनसच्या विवस्त्र पुतळ्यानें उच्च भावनाच जाग्या होतात. पण हा मला हिडिसपणाच वाटला. त्या कुरुप नव्हत्या, बेढब नव्हत्या. पण त्या नग्नतेमागें हीन, गलिच्छ व्यापारी वृत्ति होती.

मला त्यांचें भयच वाटूं लागलें. इतक्यांत श्रीमंतांनी खूण केली म्हणूनच असेल, त्यांतली एक नाचणारी बया जागा नसतांनाही माझ्याच खुर्चीवर लगटून बसली. सराव असलेल्या माणसानें या गोष्टीचें स्वागतच केलें असतें, पण माझ्या डोळ्यांसमोर भीषण चित्रपट दिसूं लागले. भयंकर आपत्तींत सांपडणार असं मला वाटूं लागलं. माझ्या अंगावर शहारे आले. मी ताडकन उठलों आणि सरळ चालूं लागलों. मोटर गांठली आणि आंत कोपऱ्यांत स्वस्थ बसलों.

माझ्या मागोमाग श्रीमंतही आले. त्यांनी माझी वाटेल तशीं कुचेष्टा केली व माझ्या वागणुकींतून नाहीं नाहीं तो अर्थ काढला. अन् खिजवलें मी जरा रागावून म्हणालों, तें काय वाटेल तें म्हणा, पण असल्या या भानगडींत आपल्याला पाडूं नका. मला तर शिसारी आली त्या बयेची.

'—बरं बाबा, राहिलं. तुझी आजपासून असली चेष्टा करायची नाहीं, मग तर झालं. पण तुला नग्नता गलिच्छ कां वाटते ? मला नव्हती कल्पना तुला इतका तिटकारा वाटत असेल या गोष्टीचा म्हणून.'

—तसं मुळीच नाहीं. नग्नतेचा तिटकारा नाहीं, पण ती नग्नता अशी विक्रीला मांडल्यामुळं म्हणा किंवा तिला गलिच्छ वासनेचं स्वरूप दिलं म्हणून म्हणा, पण त्या नग्नतेने माझ्या वासना नष्टच झाल्या. तो सगळाच प्रकार किळसवाणा वाटूं लागला.

विवस्त्रता कामोत्तेजक आहे म्हणून विवस्त्र चित्रावर गहजब उडालेला मी वाचला आहे. पण मला स्वतःला तरी अनुभव उलटाच आला. वस्त्राने झांकलेलें सौंदर्यच अधिक मोहक वाटतें. तें कल्पनेला अधिक चालना देतें. या स्त्रियांनी जिज्ञासेला एकदम मारून टाकल्यामुळें वासना नष्ट झाल्या, इतकेंच नव्हे तर तिटकारा उत्पन्न झाला.

मुंबईला मी एकंदर आठ वर्षें होतो. जवळ पैसा होता. माझ्या वागण्यावर कोणाचें नियंत्रण नव्हते. तथापि मी वाईट मार्गाला लागलो

नाहीं व माझा पाय घसरला नाहीं. कारण सात्विक वृत्ती नसून भीती हेच होय.

**दिव्यसौंदर्य.**— मी दिल्लीला निघालो होतो. कुठल्यातरी एका स्टेशनवर गाडी थांबली. गाडी पकडण्याकरता लगबगीनें एक स्त्री चालूं लागली. मुसलमानी पेहेराव होता. तांबड्या साटीनची घळघळीत, खाली चिंचोळी विजार त्याला जरीची किनारी. वर तसंच हिरवंगार मखमलीं पोलकं, त्यावर जरीची वेलपत्ती. डोक्यावरून झिरझिरीत पांढरी मलमल त्यावर जरीचे टिपके. पांढऱ्या ढगांतून पौर्णिमाच्या चंद्रानें डोकावे त्याप्रमाणें त्या पांढऱ्या ओढणीतून चेहरा डोकावला ! क्षणभरच !

पण वीज चमकून जावी आणि जिवाला हदरा बसावा त्याप्रमाणें झाले ! अंग थरारलं ! हीन वासना मरून गेल्या. त्यांत गुलाब फुलाची मोहिनी नव्हती. त्यांत सौदामिनेची धमक आणि प्रखरता होती. त्या दिव्य आणि प्रखर तेजाकडे मी दरिद्र्यासारखा ऑऽवासून पहातच राहिलो.

एक क्षणच ! पण साऱ्या आयुष्यभर आठवावा ! आजही आठवतो. जणु ' ते वारे, आले गेले ! जन्माचे सार्थक झाले '

गंगालहरीवर प्रकाशाची चमक पळभर स्थिरावून नाहींशी व्हावी तसा भास झाला. हे दिव्य सौंदर्य कोणीकडे आणि ती भेसूर अन् अश्लील नग्नता कुणीकडे.

**डॅमेज्ड् गुड्स.**— सुरवातीलाच ' डॅमेज्ड् गुड्स ' ही फिल्म मुंबईस लागली होती. त्यांतील तीं भयंकर दृश्यें पाहून मनावर चांगलीच धडकी बसली व वारयोषिता म्हटलें कीं अंगावर कांटा येई. आणि तशी वाईट संगतीही नव्हती मला. यानें असें केलें त्यानें तसें केलें अशा गप्पा नेहमी चालत. पण प्रत्यक्ष वाईट मार्गाला लागलेला विद्यार्थी माझे जवळ कोणी नव्हता. एक विशेष चैनी होते. पण त्यांची आमची चढाओढ फक्त कपड्यापुरतीच असे.

एका स्नेह्यांनी मला एके दिवशीं आपल्याबरोबर फिरावयास नेलें. दोघे तिघे होतो आम्ही त्यावेळीं गाडींत. बऱ्याच स्त्रियांचीं घरें पाहून त्यांनीं आपआपली निवड केली, व माझ्यासाठीं मलाच निवड करण्यास सांगितले आणि मी निवड केली. पण निवड करण्याची माझी दृष्टी

फार निराळी होती. ‘ डॅमेज्ड गुड्स ’ या नाटकाच्या वाचनामुळें अशा स्त्रियांच्या सहवासापासून उत्पन्न होणाऱ्या भयानक रोगाची कल्पना होती. म्हणून सुरवातीपासून सावधपणानें वागण्याचा निश्चय केला होता. पण तिचा चेहरा मी जिच्यावर प्रेम करीत होतो तिच्यासारखा होता. म्हणून केवळ आठवण म्हणून मला बोलत बसावसं वाटलं. वागण्यांत बोलण्यांत कांहीं साम्य आहे काय हे समजून घेण्याच्या जिज्ञासेमुळेच मी गेलो. माझी भूमिका कुतुहलापलीकडची नव्हती. ती दिसायला आकर्षक होती. तिच्यांत एकारची मोहकता होती. मन धांव घेत होते पण ‘ डॅमेज्ड गुड्स ’ने मला वांचवलें. त्या भयंकर रोगाचे देखावे माझ्या डोळयांसमोर उभे राहिले व माझा अध:पात झाला नाहीं. पानपट्टी खाण्यापलीकडे आमची मजल गेली नाहीं व तिचे अपमानास्पद बोलणें ऐकून आम्हाला बाहेर पडावें लागलें.

बाकी यावरून माझ्या आयुष्यांत कांहींच प्रमाद घडले नाहींत असें नाहीं. पण लोकनिंदेची भीति म्हणून म्हणा किंवा भित्रा स्वभाव म्हणून म्हणा, या मोहांत मी गुरफटून गेलो नाहीं. व्यसनाचा केव्हांही गुलाम झालो नाहीं.

मी विषयाचा वेडा नव्हतो, पण कांहीं झालें तरी मी संन्यासी नव्हतो. लग्नापासूनचा बहुतेक सर्व काळ बायकोच्या दुखण्यांत. महिने नि महिनें आणि कांहीं वेळां तर वर्षें स्त्रीसुखाशिवाय मी काढली. देहावर मी ताबा ठेवला तरी मन स्वैर धांवूं लागे. विचारानें डोकें बिघडूं लागे, यामुळें कांहीं वेळा प्रमाद घडले. पण हे निव्वळ प्रमाद होते. बायकोविषयी वाटणारी काळजी हेही त्याचे एक कारण होते. माझ्या सुखासाठीं मी बायकोचा उपयोग केला तर तिच्या प्रकृतीवर परिणाम होईल. तिचा बळी घेतल्या सारखे होईल म्हणून लग्नाच्या स्त्रीपासून डॉक्टराच्या आज्ञेमुळे दूर रहावे लागले. पण सर्व साधारण मनुष्यापैकींच एक मनुष्य म्हणून कांहीं वेळां नैसर्गिक गरजेच्या आहारी जावे लागले.

**प्रेमाच्या भोवऱ्यांत.—** पण यावरून प्रेमाच्या भोवऱ्यांत मी कधी सांपडलो नाहीं असें मात्र नाहीं.

माझे आयुष्य कांहीं अगदीं निष्प्रेम नव्हते. तरुण भावनाप्रधान मनुष्य जितका वेडा होईल तितका मी वेडा झालो होतो. मी कांहीं दिवस प्रेमवेड्या जीविताचा चांगलाच अनुभव घेतला आहे. प्रेमवेड्याची वाचलेली सर्व लक्षणें मला जुळण्याजोगी होती. नामजपन करणें, रात्रीचा दिवस व दिवसाची रात्र करणे, ही प्रेमी मुनींची लक्षणें मला लागू होती. ज्या घरीं ती होती त्या घरावर, जेथून ती पाही त्या खिडकीवर, तिनें दिलेल्या रुमालावर, प्रेम केले आहे मी. गडकऱ्यांच्या दृष्टीनें तरी माझे हे आयुष्य व्यर्थ गेले असें म्हणतां येणार नाहीं. तिला दुरून पाहतांच माझं हृदय फुलून जाई. तिच्या पदराच्या वाऱ्यानं सर्व अंगभर रोमांच उभे रहात. काम करीत असता ओझरता स्पर्श झाला तरी देहावर लहरी उठत. तिला पहाणं, तिच्याशी बोलणं, तिच्या सहवासांत राहणं. यांतच जणुं सर्व सुख सांठवलं होतं. कायावाचामनें यापैकीं वाचामनें आम्ही एकरूप झालो होतो. पण मनानं घेतलं होतं कीं या प्रेमाला कसलाही दुसरा डाग लावायचा नाहीं. हे शुद्ध ठेवायचं. हे ही एक वेडच होतं! अस्वाभाविक होतं. पण त्याची जपणूक झाली खरी. खालच्या पातळींत येणं मुळीच अवघड नव्हतं. कारण माझं अंतःकरण मी उघड केलं होतं. तिनंही त्या प्रेमाला मान्यता दिली होती.

एकच गोष्ट माझ्या हातून घडली. शेकहँड करताना तिचा अतिसुंदर आणि मोहक हात मला सोडवेना. मी तसाच तो हातांत धरून ठेवला. पण त्या तेवढ्या स्पर्शाची आठवण आजन्म मी विसरूं शकत नाहीं. इतर गोष्टींनी मी अधिक सुखी झालो असतो असं मला अद्यापही वाटत नाहीं. त्या स्पर्शासाठीं मात्र मी वेडा होत असें. ती मग म्हणे, ‘ तूं घेऊन जा तो हात तुझ्या घरीं. ’

पण यापलिकडे ज्याला समाज प्रमाद किंवा अधःपतन म्हणतो ती गोष्ट माझ्या हातून झाली नाहीं. हिच्याबाबत शक्य असूनही ती मी केली नाहीं. इतकंच नव्हे तर ७।८ वर्षांच्या काळांत तशी एकही गोष्ट माझ्या हातून होऊ शकली नाहीं. कांहीं प्रसंगीं ‘डॅमेज्ड गुड्स’ वाचल्याचा परिणामुळें, कांहीं प्रसंगीं धैर्य नसल्यामुळें, आणि जिच्यावर खरोखर प्रेम केलें तिच्याबाबत प्रेमाचं पावित्र्य राखण्याच्या काव्यमय कल्पनेनें, मी अलिप्त राहिलो.

काव्यें करतां आली नाहींत, तरी विरहाचीं काव्यें वाचण्यांत आनंद वाटे. यावेळीं उमर खय्याम, गार्डनर, गटेचे सारोज ऑफ वर्दर असें वाङ्मय वाचतांना अगदीं तल्लीन होत असें मी. यावेळीं माझ्या मित्रांना पाठविलेल्या माझ्या पत्रांत वाङ्मयदृष्ट्यासुद्धां कांहीं किंमत देतां येईल असें आतां वाटतें मला.

मात्र हें माझें प्रेम पूर्ण प्लॅटॉनिक होतें. यावेळीं शेलेचा मी भक्त झालो होतो. त्याच्या कित्येक कविता मला मुखोद्गत होत्या. शेले कवीची छाप मनावर फार. त्याची एक ओळ मी नेहमी गुणगुणत असे. माझें प्रेम कसं आहे ' My love is like a moth for the star ' दुरून एखाद्या ताऱ्यावर प्रेम करावं ना तसं माझं प्रेम आहे. म्हणूनच कीं काय कोण जाणे मी त्याला वास्तवांत आणीत नव्हतों. पण हें आमचे प्रेम पुढें तसेच प्लॅटॉनिक राहिलें असतें कीं नाहीं हें मला नाहीं सांगता येणार. मनानें नसलों तरी देहानें आम्ही दोघेही निर्मल राहिलों. तासान् तास आम्ही एकांती एकमेकांशी बोलत असूं. पण पापी स्पर्शानें भ्रष्ट करण्याची छाती मला व्हायची नाहीं. मी माझी मर्यादा सोडली नाहीं. या काव्यमय कल्पनेनेच मी त्यावेळीं इतका भारला होतो कीं त्या माझ्या पवित्र देवतेला भ्रष्ट करणें पाप वाटे मला.

माझें लग्न झालें होतें यावेळीं. माझें लग्न म्हणजे प्रेमविवाह नव्हता. किंवा तें माझ्या इच्छेविरुद्ध झालें होतें असेंही नाहीं. लग्नाची जबाबदारी काय आहे तें समजण्याअगोदरच माझें लग्न झालें होतें. दुसरें लग्न करण्याची हिंदु समाजानें परवानगी दिलीच होती व एक स्त्री हयात असता दुसरें लग्न केलेलीं उदाहरणें डोळ्यांसमोर होतीच. दुसऱ्या कुमारिकेवर प्रेम करणें मला कांहीं पाप वाटलें नाहीं व ती परक्या धर्माची असून सुद्धा मी तिच्या बरोबर लग्न करायला उत्सुक होतो. म्हणून मी तिला विचारलेंही. पण या लग्नाचे परिणाम काय काय होतील याचा विचार करण्याचें माझें वय नव्हतेंच. मनांत आलें बोलून टाकलें. व्यवहारज्ञानाचा पूर्ण अभाव. पण तीच होती शहाणी. धूर्त आणि व्यवहारी. ती म्हणाली— ' लग्नामुळें आपल्याला त्रास होईल. तुझें तसें, माझे आईबाप घरांतून हांकलून देतील व मग दोघांनाही पोटाची वानवा पडेल. '

तथापि मी तरुण, हूड आणि अविचारी. मला तिचा फार राग आला. स्वार्थी म्हणून शिव्या देऊं लागलो. पण त्यामुळें तिच्याशी अबोला धरण्याइतका दृढनिश्चयी नव्हतो. तिनें लग्नाला कबुली दिली असती तर तिला पोसण्याची ताकत मुळींच नव्हती माझ्यांत. आणि आम्हा दोघांचे ' कुत्रे हाल ' झाले असते. ती कांहीं लाखाचीं मालकीण होती. लवकरच तिचें लग्न झालेही. तसे पत्र आलें. ' मी दुसऱ्याची झाले तरी मनानें तुझी आहे ' असें समजूत घालायचे पत्र होते तें. त्यामुळें मी कित्येक आठवडे बेचैन झालो. कशाकडेहि लक्ष लागेना. या वेडाचा अर्थ असा नव्हे कीं मी माझ्या पत्नीवर प्रेम करीत नव्हतो. याचवेळीं जर पत्र आले असते कीं बायको आजारी आहे निघून या म्हणून तर मी हे सर्व टाकून तिच्याकडे धांव घेतली असती. हिच्यासाठीं वेडा झाला होतो म्हणजे बायकोला टाकण्याची इच्छा किंवा तयारी होती असें मुळींच नव्हे. आणि तसा प्रसंगही आला. ती क्षयानें आजारी पडतांच मी माझे सारे व्यवसाय टाकून तिची, तनमन धनें, प्रामाणिकपणें कांहीं वर्षे सेवा केली. सारखा तिच्या उशापायथ्याशी होतो व तिच्या आईनें जी कामे करावीत ती सर्व घाण कामे मी केली.

काल सर्व गोष्टींवर पांघरूण घालू शकती. माझे दुःख, माझा राग आपोआप कमी झाला. दुःखानें माझी छाती फुटली नाहीं कीं मी झुरणीला लागून अंथरूण धरलें नाहीं. आयुष्यांतल्या या एका अंकावर पडदा पडला. दुसरी पात्रें, दुसरे विषय येऊन मन तिकडे वेधले.

× × ×

**परदेशी कपड्यांची होळी:—** मुंबई सोडण्यापूर्वी दुसऱ्या एका प्रसंगामुळें माझ्या पेहेरावावर विलक्षण परिणाम झाला. वडिलांना माझी फॅशन आवडत नव्हती. शाहू महाराजांना नापसंत होती. तथापि मी ती सोडली नाहीं. पण परदेशी कपडे जाळण्याची लाट फार जोराने उसळली होती. तिनें मुंबईला मोठा धक्का दिला. महात्माजींच्या देखरेखीखालीं मुंबईत प्रचंड होळी करण्यांत आली. हजारों रुपयांचे उंची उंची कपडे, शाली, दुपटे, मंदील त्या होळींत माझ्या डोळयांदेखत पडत होते.

**नानाचा त्याग.**— यावेळी माझ्या बरोबर माझे स्नेही नानासाहेब हेही पाहण्याकरता आले होते. त्यांचें माझे कपडे नेहमीं सारखे असत. यावेळीं त्याने चायनासिल्कचा सूट अंगांत घातला होता. आगीचा भडका उडल्यावर नाना म्हणाला ‘ बाब्या मला आता हे कपडे विषासारखे वाटतात. हा कोट मी टाकून येतो थांब ’ मी त्या कोटाकडे जरा जास्त निरखून पाहू लागलो. तो कोट माझाच होता. आणि ही स्वारी माझ्या कोटाच्या त्यागाला तयार झाली होती. हे दिसतांच मी त्याला ओढून खालीं बसवले. पण पुढे मी तेच केले. तेथे परदेशी टोप्यांचा तर वर्षाव चालला होता. त्याचा मनावर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. आणि लगेच देशी कपडे करायला टाकून, ते तयार होताच परदेशी सर्व सूट बांधून ट्रंकेंत टाकले. ते कायमचेच. त्याची मग होळी केली. जवळ जवळ हजार रुपयांचे कपडे मी जाळून इसलामपूरच्या सभेत खादी सूट वापरूं लागलो. पण नानाने मात्र खादी कधीच घातली नाहीं.

**आमचे त्यावेळचे मित्रमंडळ.**— महाराजांच्या पन्हाळा लॉजमध्ये आम्ही मोठे मजेंत दिवस काढले. नानासाहेब देव, राजे भोसले, बाळासाहेब मोरे, मुजुमदार, डफळे अशी मंडळी तेथे रहात होतो. पण नानासाहेब देव व मी, ही आमची जोडी सर्वांहून फॅशनबल, आणि जिगरदोस्त. प्रेमांत आणि लाथाळींत आम्ही प्रसिद्ध! त्यात विनायकराव घोरपडे ‘ वासंतीचे ’ वडील हे एक या पैकींच, अरे तुरे नेहमीं बोलणारे.

मोठे मजेंत दिवस काढले आम्ही! आठवणी आल्या आणि एकटा असलो तरी हसूं येते. चौपाटीला व्हियलिनी म्हणून इटालियन रेस्टॉरंट होतं. असेल अद्याप. तेथे जाऊन आम्ही ‘ हॅप सँडविचीज ’ मोप बडवत असूं. याच स्वारीवर आम्ही तीघे नाना विन्या आणि आम्ही. आम्हाला ते बाब्या म्हणत. असें निघालो. प्लेटीवर प्लेटी मागवून मारे सपाटा चालवला. कोणी म्हणून हात आवरता घेईना. नैसर्गिकदृष्ट्या खाणे अशक्य झाल्यानंतर तोंड बंद झालं. याबाबत बिल ५।६ रुपयाचे झाले असेल! बिल पाहतांच जो तो दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. प्रत्येक अपल्याकडे पैसे नाहीत म्हणू लागला. व आपण खरोखरीच प्रामाणिकपणें बोलत आहोत हे सिद्ध करण्याकरतां पाकीट

झाडूं लागला व खिसें दाखवूं लागला. आपल्या जवळ पैसे नाहीत या खात्रीमुळेंच दुसऱ्याला गंडा घालण्याकरतां सँडविचीसवर प्रत्येकाने ताव मारला होता. अखेर प्रत्येकानें आपआपली पाकीटें पुढें टाकली. आणि कारवा वर केल्या ! आतां मोठा पेचप्रसंग पडला. पैसें भागवायचे कसें ? मॅनेजरची तशी कांहीं ओळख नव्हती. म्हणून उद्याचा हवाला कांहीं देणें शक्य नव्हते. अखेर आमच्यांत तहनामे होऊन. आमच्यापैकीं दोघें ओलीस राहिले व एकानें जाऊन बंगल्यांतून पैसे आणले व अशारीतीने अब्रू बचावली !



**राजे भोसले.**— व आम्ही म्हणजे देव व मी. आमच्या स्वभावांत व पेहेरावांत साम्य तितकाच राजांच्यात विरोध ! आम्ही अस्सल इंग्रजी भारी किंमतीच्या बुटा मुटांत. राजे अगदी साधे. गबाळ म्हटले तरी चालेल. स्वदेशीचे भक्त. यंग इंडियाचे वाचक. आम्ही थोडे रंगेल, व चैनी. राजे हिशेबी काटकसरी. गांवांहून बदामाची रास्वुडी आणायची ती प्रमाणांत पूर्व योजनेप्रमाणेंच खर्चली पाहिजे म्हणून आठवड्याच्या सात पुड्या करून त्यांतली रोज एक वापरायची. आम्ही भारी किंमतीचें पारकरपेन वापरणार तर ते त्याविरुद्ध व्याख्यान देणार. तेवढ्या रकमेच्या व्याजांत आपण टाकाचा व शाईचा खर्च कायमचा चालवूं असं म्हणणार. आणि शाईची एक छोटी फाऊनटन साइझच्या आकाराची बाटली खिशांत ठेवून तेथेच नऊनंबरचे टोंक अंगाला लागूं नये म्हणून त्याला कापडानें गुंडाळून खिशांत ठेवणार. स्वदेशीचे दांडगे भक्त. पण डोक्यावरची काळी टोपी तेवढी परदेशी होती. म्हणून

आम्ही टीका करीत असू. त्यावेळीं म्हणत, पाटली म्हणजे मग पुनः परदेशी घेणार नाहीं.

तेव्हां या त्यांच्या घोषणेची मुदत जवळ आणावी म्हणून तें स्नानाला गेले असतांना आम्ही ती टोपी उलटी केली. त्यांत वर्तमान पत्राचे तुकडे टाकले आणि काडी पेटवून तिचे अस्तित्व नाहीसें केले.

राजे भोसले मात्र स्वभावानें सचोटीचे. प्रामाणिक. मैत्रीला फार चांगले. संपूर्ण विश्वास टाकावा. यामुळें नानापेक्षां तें मला जवळचे वाटत. चेष्टेखोर नव्हे. गंभीर, करारी, अपमान सहन करून घेणार नाहींत. यंग इंडियाचे नियमित वाचक. त्यांच्यामुळें तें मीही सुरु केले. त्यांतली सोपी सुबोध भाषा. व गहन विषय अत्यंत सोपा करून मांडण्याची शैली असामान्य असल्यामुळें अहिंसातत्वाचा माझ्यावर पगडा बसूं लागला. मी ही ते बंद होईपर्यंत त्याचा वर्गणीदार होतो. माझ्या राजकीय मताची पार्श्वभूमी राजांच्यामुळें बनली म्हटले तरी चालेल. पुढे ते कोल्हापुरास मोठे अंमलदार झाले पण त्यांचा साधेपणा गेला नाहीं. आमची मैत्रीही अद्याप टिकली आहे. मुंबई गव्हर्मेंट हौसमधे मोठी पॅनेल्स करण्याचे कमीशन मिळाले असतांना त्या हॉलमध्यें हिंदी उद्योगधंदा हा विषय चित्रित करून त्यांत चरखा घातला तो राजे भोसले यांच्याच सहवासामुळें म्हटले तरी चालेल."

**गानसम्राट अल्लादियाखां.**— याचवेळीं याच बंगल्यांत आमच्या मंडळी बरोबरच महाराष्ट्रांतील गान सम्राट अल्लादियाखां यांच्या सहवासाचाही लाभ झाला. आमच्या खोली जवळ यांची खोली होती. रोज गांठी भेटी पडायच्या. आम्ही केव्हां केव्हां खोलींत जाऊन बसायचे. विशेषतः त्यांची आमची गांठ स्नानाचे वेळीं पडायची. ते आपले कपडे आपणच धूत. मलमलीचा सदरा, पातळ उंची धोतर आणि लंगोटी. पण एवढे धुवायला कमीत कमी तासभर लागायचा. आदर्श स्वच्छता. त्यांनी दोरीवर लंगोटी टाकली तर मोगरीचा हार जणु दोरीवर आहे असें वाटायाचें. अन् त्यांचा तो गुलाबी फेटा. आर घातलेला! बहुधा काळा कोट आणि चांदीच्या मुठीची कांठी. भाषा ब्राह्मणाहून शुद्ध मराठी. उच्चार पण अगदी शुद्ध! दाढीमुळेंच मुसलमान वाटावेत.

पण ते मूळ ब्राह्मण घराण्यांतले म्हणे. मग ते घराणं मुसलमान झालेलं असावं. दोन वर्षे एका ठिकाणीं राहिलो. पण अत्यंत आश्चर्याची गोष्ट खांसाहेबांच्या तोंडून चुकूनही एखादी गाण्याची लकेर ऐकायला मिळाली नाहीं. किंवा गाण्याचा विषयही कधी निघायचा नाहीं. एकदांच त्या विषयावर बोलण्याचा प्रसंग आला. मी कपडे करून ट्रॅम गांठायला जाते वेळीं. एका भिकारी आंधळ्याबरोबर त्यांची मुलगी असायची. तिच्याच हातीं थाळी असायची. ती एकच पद गायाची. पण त्यांतील ताण इतकी करुण असायची कीं मी त्यावेळीं जवळ असलो कीं खिशांतली सारी नाणी तिच्या थाळींत टाकून मोकळा होई व आणेलीसाठीं पुनः बंगल्यांत येत असें. हा प्रकार मी खा साहेबांच्या कानावर घातला. ती मुलगी येतांच त्यांना बाहेर आणले. तो स्वर कानीं पडतांच ते पण डुलूं लागले. ' वाहवा वाहवा ' असें फक्त त्यावेळीं तेवढे त्यांच्या तोंडून शब्द बाहेर पडले. ते म्हणाले ' बागल साहेब या बाईची ही करुणरसाची तान इतक्या पूर्णतेला पोंचली आहे कीं ती आम्हां सारख्यांनाही घेता येत नाहीं त्याचमुळें तुमच्या अंतःकरणांतल्या तारा छेडल्या जातात ? ' खांसाहेबांची आठवण ती एवढीच ! आणि आमचं गाण्यांतलं ज्ञानही पण एवढंच.

**शाहू महाराजांचे निधन.**— मॉडेलिंग क्लास पुरा झाल्यावेळीं आम्हां सर्वांवर एक मोठी आपत्ति कोसळली. ती म्हणजे शाहू महाराजांचे आकस्मिक निधन, तो मला चांगलाच धक्का बसला. कारण त्यांनींच मला मॉडेलिंग शिकण्यास पाठवलेले व संस्थानांतील कामें देण्याचे आश्वासन दिलेले.

त्यांचा पुतळा मी लागलाच तयार करण्यास घेतला. तो सर्वांना आवडलाही. त्यांत भक्ति होती व पुढचे स्मारकाचे काम मिळण्याची आशाही होती. सर सबनीस, भास्करराव जाधव, धुरंदर मास्तर वगैरेंनीं प्रशस्तीपत्रें दिली होती.

रा. ब. नवले–व आमदार बाळासाहेब मोरे हे त्यावेळीं तेथेच विद्यार्थी होते. त्यांनीं सभा भरवून ते काम मला मिळावे म्हणून ठराव पास केले. पत्रांतून त्यांना प्रसिद्धी मिळाली. तथापि ते काम मला मिळूं शकले नाहीं. माझा फार निरुत्साह झाला. त्यानंतर मी मॉडेलिंगचे काम पुनः

केले नाहीं. बाकी आता वाटते कीं झाले तेच योग्य झाले. मला ऑर्डर मिळाली असती तर ती मनाजोगी पार पाडणे झाले नसते.

**परत करविरी.**—यानंतर मुंबई सोडून मी पुनः वडिलांच्या आश्रयाला घरीं आलो— माझ्यांत आता किती तरी बद्दल झाला होता— !

माझा एकलाकोंडा स्वभाव कमी झाला होता, दृष्टी बरीच व्यापक झाली होती. जाति व रोटीभेदाच्या कल्पना फार कमी झाल्या होत्या. वाचन माझे तेथेही चालू होतेच. त्यामुळे पदवीधर नसलो तरी माझे वाचन बरेच झाले होते. दर महिन्याला एकदोन तरी नवी पुस्तकें घेतच असें. खादी वापरूं लागलो होतो यंग इंडिया पत्राचा वर्गणीदार झालो होतोच.

**रंगीत स्केचिसचें वेड.**— कोल्हापुरांत आल्यावेळीं डिझाइनचा अभ्यास वाढवणें जमेना. कारण त्याला मॉडेलची जरूरी असते व ती मिळणें कठीण. त्यामुळें सोपे म्हणून आणि मनाचा कल म्हणून पुनः Landscape painting ला सुरवात केली. पंचगंगा नदी पांच मिनिटांच्या वाटेवर. सकाळ संध्याकाळ दोन प्रहर तेथे जाऊन देखावे काढीत बसत असे. केवळ घाटाचीच शेंकडों चित्रे काढली असतील. वॉटर कलर बॉक्स व सामान न्यायला सोईचे असल्यामुळें सर्व देखावे वॉटर कलरमध्येच करीत असे. जागा चांगली असो वाईट असो,–समोर चांगला देखावा दिसला कीं उकिरड्यावरसुद्धां पुष्कळ वेळां बसलो आहे. जेवणापुरता घरी व बहुतेक वेळ बाहेर काढी. पन्हाळयाला कांही दिवस जात असे. तेव्हां तर भाकरी बांधून पाण्याचे भांडे बगलेस अडकवायचे व मग दिवसभर रानांत भटकून जेवढी चित्रें काढतां येतील तेवढी काढायची, कोल्हापूर शहराच्या आसपासच्या बहुतेक जागा माझ्या चित्रसंग्रहांत आल्या होत्या. हजारों काढली. पुढें मोजदाद करण्याचे सोडून दिले.

**तो देखावा म्हणजे एक मूर्तिमंत काव्य होते—.** न विसरण्याजोगा प्रसंग ! भल्या पहाटे उठून रंकाळयावर वाशीनाक्याजवळील चिंचेच्या झाडाखालीं पेटी उघडून बसलो. थंडी होतीं राम-पाऱ्याची, अंगाला गुदगुल्या करणारी गोड गोड थंडी होती ती. किंचित

धुकंही होतं. पण तो देखावा दृष्टीआड करण्याइतकं नव्हतं. गाण्यांत लय लागावी, सुरांतला खरखरीतपणा नाहींसा व्हावा त्याप्रमाणं त्या धुक्यानं झाडांचा, डोंगरांचा, दगडांचा खरखरीतपणा अजिबात काढून डोळयाला त्रास देणाऱ्या सर्व कडा, कोने कोंपरे मारून फुलार निळया रंगाचा हात मारला होता. बारीक पिंजराचे तुषार हवेंत तरंगत आहेत असा भास होई. रविवारचाच दिवस होता तो. कोंकणच्या लांकडांच्या गाड्या झाडाखालीं सोडल्या होत्या. झोंपेचे झांपड अद्याप त्यांची निघाली नव्हती. गाडी जोडण्यापूर्वी अंगांत ऊब यावी म्हणून त्यांनीं बैलापुढचा पाचोळा पेटवून आयाबाया आणि गाडीवान शेकोटींभोंवती आले. त्यांतल्या एकानें दुसऱ्याला सुचविलें ‘अरे तुक्याचा अभंग एखादा म्हणरे’ गोड, प्रेमळ भक्तिभावानें त्यानें गळा काढला. इतरानें त्यांत अस्ते अस्ते सूर मिळविला. माझं हृदय भरून येऊं लागलं. समोरचा चंद्रमा सूर्यनारायणाची पाऊलें पाहतांच आपलं काम संपलं असं समजून टेकडीखालीं दडूं लागला. पण जलाशयानें त्याला आपल्या हृदयाशी कवटाळून ठेवलं होतं. तो देखावा म्हणजे एक मूर्तिमंत काव्य होतं! मी पेटी टाकून दिली आणि आनंदानें अश्रू गाळूं लागलो. हे अद्वितीय काव्य कागदावर आणायला मी असमर्थ होतो!!!

**बाबुराव पेंटर.**— यांची अद्याप ओळख झाली नव्हती—महाराष्ट्र कंपनींत त्यांची—कामें पाहण्यास गेलो. त्यांनी स्कूल ऑफ आर्टस्‌मधील शास्त्रीय शिक्षण न घेतल्यामुळें मनांत त्यांच्याबद्दल फारसा आदर नव्हता. पण त्यांची कामें आणि स्वभावांतील नम्रता पाहून मी जवळ जवळ त्यांचा भक्तच झालो. त्यांचे आऊटलाइन व पोर्ट्रेटमधील प्राविण्य असामान्य होते. पेंटिंगमध्यें बिनचूक ओळख येणार.

पण बाबुरावांच्यांत मला एक मोठं वैगुण्य दिसलं ते हे कीं त्यांना चित्र केव्हां पुरें करावे हे समजत नसे. चित्र पुरे करण्याची त्यांची कल्पना चुकीची असे. म्हणून अपुरे कामांत जी गोडी येत असें ती पुरे केल्यावर नाहीशीं व्हायचीं. फोटोग्राफच्या धर्तीवर ते जात. अद्यापही त्यांचा तो घोटाळा होताच.

सिनेमा व पेंटिंग या दोन्ही कलेचे तंत्र विशारद. अत्यंत श्रम करणारे पण प्रतिभेचा विलास कमी. भावनेचा पगडा फार कमी ! बौद्धिक उंची कमी. त्यामुळें त्यांची अपेक्षेप्रमाणें वाढ होऊं शकली नाहीं. पण आयुष्य सतत कलेच्या व्यासंगांत ! तांत्रिक प्रगती वाखाणण्याजोगीं. चांगलें कारागीरी चित्रकार, शिल्पकार, फोटोग्राफर व यंत्रज्ञ डायरेक्टर.

**महर्षि अबालाल रहिमान.—** बाबुराव नेहमी आबालाल मास्तरांची स्तुति गात म्हणून त्यांची भेट घेतली व त्यांचीं कामें आणि अभ्यासूवृत्ति पाहून पूर्ण गर्वपरिहार झाला. व हे अमोलिक रत्न पैदा झाल्याबद्दल मला धन्य वाटूं लागले. आबालालचेही पुढे माझ्यावर प्रेम बसले. ते माझ्याशी फार प्रेमानें वागत. प्रमाणाबाहेर मला मान देत. आबालालांची गणना सत्पुरुषांत करावी लागेल. संपत्तीचा हव्यास नाहीं, कीर्तीचा हव्यास नाहीं. खासगी जीवन नाहीं. संध्याकाळच्या जेवणाची तरतूद आहे कीं नाहीं याचा विचार नाहीं. लग्न बंधन नाहीं. कलेशीच विवाहबद्ध झालेले ! आमरण हातांतून ब्रश टाकला नाहीं. अखेरपर्यंत विद्यार्थ्यांची ज्ञान पिपासा. माझं चांगलं चित्र दिसतांच. त्यांचीही त्यांनी कॉपी करावी ! काया वाचा मनें निसर्गाची सेवा केली. त्यांची अनंतरुपें पकडून संग्रही ठेवली. हजारों तऱ्हा करून पाहिल्या. रेषेवर असामान्य प्रभुत्व. चित्र उत्कृष्ट वठले कीं आनंदानें डुलणार. जणुं विश्व मुठींत आलं ! हिरकणीच्या मोलाचा हा महात्मा अठराविश्वे दारिद्र्यांत मेला ! शाहू महाराजांनी त्यांना कांहीं काल जगवलं. त्यांच्या पश्चात जनतेनें त्यांची मरेपर्यंत विचारपूस केली नाहीं. मेल्यानंतर स्मशानांत पोंचवायला जातवाले आले नाहींत. मेल्यानंतर मात्र पुतळा उभारला गेला !

माझी इतकी लॅंडस्केस झाली कीं त्यांची मी मोजदाद करण्याचेही टाकून दिले. शेकड्यावर नव्हे तर हजारांवर माझा आंकडा गेला होता.

**परोपजीवी थोरांच्या संगतीत.—**लॅंडस्केप पेंटिंग करून कंटाळलो कीं वेळ घालवण्याकरता मुंबईस मैत्री जुळलेल्या येथील स्नेह्याकडे जाऊ लागलो. इनामदार व अंमलदार याच वर्गांत माझे स्नेही होते. कारण त्यावेळचे विद्यार्थी आतां अधिकाराच्या जागावर होते. त्या स्नेही मंडळीकडे मी बराच वेळ घालवूं लागलो. एका इनामदारांचे माझ्यावर

विशेष प्रेम होतें. स्वभाव निगर्वी, दिलदार, खर्चिक व निर्व्यसनी. त्याच्यामुळें आणखी ओळखी झाल्या. पण त्यांच्या त्या आयुष्याची आता मला कींव येते.

भल्या पहाटें सकाळीं नऊ दहा वाजता अंथरुणावर उठून बसायचे, व तेथेच चहा घ्यायचा. सकाळचे विधी वगैरे आटपून दहा साडें दहाचे सुमारास झोंपायच्या खोलीतून बाहेरच्या दिवाणखान्यांत येऊन बसायचे. तोपर्यंत मित्रमंडळीं बाहेर येऊन बसलेली असायची. मग चहाला सुरवात व्हायची. चहा प्रत्येकाला मिळायचा. दिवसांतून सिगरेटचे एक टिन तरी खलास व्हायचेच. साडेबारा एकपर्यंत या गप्पा चालायच्या. गप्पा शिकारीच्या, वाड्यावरच्या—कोणावरती तरी टीका. कधीही एखाद्या उपयुक्त किंवा गंभीर विषयाची चर्चा व्हायची नाहीं. उगाच घ्यायची म्हणून पुस्तकें घेऊन टेवलेली. ती बहुधा धूळ खातच पडलेली असायची. दीड दोनला 'ताटा'ला उठायचे. ताटाला एकदोन स्नेही असायचे. जेवल्यानंतर थोड्याच वेळांत स्वारी सुख पावायची. ती उठायची सुमारें चार वाजता. मग पुनः चहा गप्पा सुरू. संध्याकाळीं मोटारीतून ड्राइव्ह, किंवा टेनिसच्या कोर्टावर ब्रिझिक. अकरा बारा वाजता निजून पुनः सकाळीं दहा वाजता उठायचे. हा ठराविक दिनक्रम. याखेरीज आयुष्याला ध्येय नाहीं. कंटाळा आला म्हणजे शिकार !

बाकी माझ्या या वर्गांतील स्नेहीमंडळींत तसें दुर्गुणी, दुर्व्यसनी, उठाठेवी खेकटेखोर असें कोणी नव्हते. सर्वांच्यांत सौजन्य बहुधा आढळून येत असें. मॅनर्स चांगल्या, आपण जन्मतःच इतर लोकांहून श्रेष्ठ आहोत ही कल्पना हाडीमासी खिळलेली. बाकी मनमोकळेपणा व आल्या गेल्याचे आदरातिथ्य हा गुण मला यांच्यांत विशेष आढळला. मात्र मी हे माझे मित्र आहेत या कल्पनेनें जो जात होतो ती माझी चूक होती. हजीर तो वजीर. डोळ्याआड झाला तो मेला, अशी त्यांची वागणूक मला आढळली.

**निष्क्रीय जीवन.** - माझा बहुतेक सर्व वेळ या लोकांच्याकडे जाण्यात व तेथेंच पडून राहण्यात जाऊ लागला. ज्या आयुष्यक्रमावर मी पुढें टीका केली, ज्या ध्येयशून्य आयुष्याची मला आज किळस येते,

तेच तसेच आयुष्य माझें त्यावेळीं चालले होते. आजची दृष्टि त्यावेळीं माझ्यांत नव्हती.

थोरांचे उंबरठे उगाच झिजविणाऱ्या माझ्यासारख्या आणखी दोनतीन व्यक्ति होत्या. त्यांत मी मोडूं लागलो. सकाळीं बाहेर पडायचें व रात्रीं परत यायचें हा माझा उद्योग. जणुं कुठल्यातरी एका मोठ्या कामांतच गढून गेलो होतो मी. या जिण्याची मला लाजही वाटत नव्हती. एखादा भाविक भक्त गांवांतल्या शेंदूर फांसलेल्या सर्व दगडांचीं भक्तिभावानें जशी पूजा करील तशीच मी यांची करीत होतो म्हटलें तरी चालेल. कांहीं अधिकारी पूर्वी गरीबींतून वाढलेले असल्यामुळें व अद्याप अधिकाराची धुंदी त्यांच्यावर चढली नसल्यामुळें त्यांतले बरेच आमच्या घरीं येत. डॉ० धनवडे, बॅ० सावंत, राजे भोसले हे नेहमीं येणाऱ्या-पैकीं होत.

हे माझें चाललेलें आयुष्य पाहून वडीलही माझेवर रागावूं लागले. सावत्र आई, तीही बोलूं लागली. पण माझा हा दिनक्रम बदलला तो निराळया कारणानें.

**एका अधिकाऱ्याच्या वाक्यानें कलाटणी.—** मी एका बड्या अधिकाऱ्यांकडे विशेष जात असें. मी जरी असा जात होतो तरी आश्रिताप्रमाणें कधीही गेलो नाहीं. बरोबरीचा दर्जा कधींही सोडला नाहीं. ते माझ्या बरोबरचेच आहेत, ही भावना कधीही टाकली नव्हती. कधीही त्यांचे लांगुलचालन केलें नाहीं. आर्थिकदृष्ट्या मला कोणापासूनही मदत मिळण्याची अपेक्षा मी केली नाहीं. माझा स्वाभिमान कधीही दुखवूं दिला नाहीं.

माझे स्नेही डॉ. धनवडे, त्यावेळचे दरबार सर्जन, यांचेकडे मी नेहमी जात होतो. त्यांचे स्नेही रा. ब. आचरेकर तसेच बडे अधिकारी होते. फायनान्स व होममिनिस्टर असावेत. त्यांची फटकळ म्हणून फार ख्याति होती. निष्कारण शत्रू उत्पन्न करण्याची त्यांची शैली विलक्षण होती. स्वभावानें निष्कपटी अंतःकरणानें निर्मळ तितकेच तोंडानें वाईट. ते मला 'व्हॅगॅब्रांड' म्हणवून चिडवीत. ते जरी थट्टेनें बोलत तरी त्याचा

माझ्या मनावर परिणाम झाला. अपमान सहन करण्याची मला सवय नव्हती. मला ते बोलणें असह्य होई. रागानें गुदमरून गेल्यासारखे होई. त्या अपमानामुळें मला रात्रीं झोंपही लागत नसे.

एकदा त्यांचा माझा बराच खटका उडाला. माझे वडील अत्यवस्थ होते म्हणून मी डॉक्टरना बोलावण्यासाठीं गेलो होतो. तेव्हां हे आचरेकर तेथेच होते. ते म्हणाले ' अहो आता वयच झालंय त्यांचं—उगाच कां गडबड.' वेळ दुसरी असती तर कदाचित् मला राग आला नसता. पण वडिलांची स्थिती खरोखरीच काळजी करण्यासारखी असल्यानें मला हे शब्द असह्य झाले. ते फार मोठे ऑफिसर आहेत याचा विचार न करता मी म्हणालो, ' माझ्या वडिलांच्या ऐवजी तुमच्यासाखे शेंकडों ऑफिसर मेले तर समाजाचे कांहीं नुकसान होणार नाहीं. माझा बाप तुमच्या हजार पटीनें श्रेष्ठ आहे.'

इतक्या बेमुर्वतपणें आपल्याला जाब मिळेल याची त्यांना कल्पना नव्हती. ते पण चिडून म्हणाले—कोण जाणे थट्टेनेही असेल— ' काय समजलात तुम्ही ? कोणाला बोलता आहात? बेड्या ठोकीन. पोलिसच्या ताब्यांत देईन.' मी तितक्याच जोरानें उत्तर दिले. ' पोलिसच्या ताब्यांत देईपर्यंत तुम्ही माझेसमोर आहांत. तो धांवून येईपर्यंत तुमची माझी गांठ आहे.' असें म्हणून मीही अस्तन्या सारून उभा राहिलो. पण ते प्रकरण इतरांच्यामुळें म्हणा किंवा सर्वच एक थट्टेचा प्रकार म्हणून म्हणा तेथेंच मिटले.

**समाजसेवेकडे.**— पण या प्रसंगानें माझ्या चाललेल्या ध्येयशून्य जीवितावर चांगलाच आघात केला. या दृष्टीने त्यांचे मजवर फार उपकारच झाले. आपण विनाकारण दुसऱ्याचें घरीं जातो. निष्कारण हिंडतो. आपली किंमत कमी करून घेतो. म्हणूनच आपला असा अपमान होतो, असे मला आतां वाटूं लागले. माझे डोळें उघडूं लागले. मी आत्मपरीक्षण करूं लागलो.

माझ्या जिण्याची मला खरोखरीच लाज वाटूं लागली. श्रीमंताचा स्नेही म्हणून मिरवणे हे काय माझे ध्येय होते ! यानें काय माझा दर्जा

वाढणार होता ? तसा सामाजिक दर्जा माझा होताच. कित्येक इनामदारांनी हेवा करावा अशी त्यावेळची आमची स्थिती. वडील अगदी पहिल्या प्रतीचे वकील होते. संस्थानांतील पहिले मराठा एल्‌एल्‌. बी. तेच. जाडे विद्वान, वक्ते, नामांकित वकील. शाहूमहाराजांची त्यांच्यावर अखेर अखेर तर केवढी कृपा ! मोठमोठ्या महत्त्वाच्या, अखेर–निकालाच्या कामांत ते त्यांची सल्ला घेत. शाहूमहाराजावर त्यांच्या शत्रूंनी घातलेल्या खटल्यावेळीं वडिलांनी बहुमोल मदत केलेली. या दृष्टीनें त्यांचा मुलगा ही कमी मान्यता नव्हती मला. आणि आतां तर त्यांनी आपल्या सार्वजनिक आयुष्याला सुरवात केली होती. हंटर पत्र सुरू केले होते. सत्यसमाजाच ते एक आधारस्तंभ होते. मराठा समाजांतील एकमेव निःस्वार्थी, निर्भीड, विद्वान असे संस्थानांतले ते समाजसेवक होते. त्यांच्या समाजसेवेंत भाग घेण्याची प्रवृत्ती माझ्यांत या प्रसंगानें वाढली.

मी बड्यांच्या घरीं जाण्याचे कमी करू लागलो. ते मला मित्र मानीत असतील काय अशी सबळ शंका मला येऊ लागली. त्यांचे माझेवर प्रेम असेल, ते मला बरोबरीचे मानत असतील तर तेही माझी गांठ घ्यायला येतील. पण माझा हा भ्रम लवकरच नाहींसा झाला. कोणी क्वचित्‌च येत असत. कांही अंमलदार मात्र येत. इनामदार घरीं गेलो म्हणजे ‘ कां बरेच दिवस आला नाहीत ? ’ असे म्हणण्यापलीकडे अगत्य दाखवत नसत.

**हंटर पत्र.**— यामुळें वडिलांच्या ‘ हंटर ’ पत्राकडे माझे मन धांवू लागले. मी घरीं राहून त्यांना करता येईल ती मदत करूं लागलो. प्रुफें तपासणें, वर्तमानसार काढणे, दुसऱ्या मॉडर्न रिव्ह्यूसारख्या मासिकांतील विचार मराठींत करून देणें व नोकर लोकांवर देखरेख करणे अशी किरकोळ कामें करूं लागलो. मला वाचनाचा तर पूर्वीपासूनच नाद होता. यंग इंडियाचा सुरवातीपासूनचा वर्गणीदार होतो. त्यामुळें स्फुटें लिहणे कांहीं अवघड वाटले नाहीं. यांतून मोकळा झालो म्हणजे संध्याकाळी लॅंड्स्केपसाठी जात असें. खिशांत राहण्याजोगी पेटी व कागद असल्यामुळें फिरणे व चित्रें काढणे दोन्हीही गोष्टी सहजासहजी होत. कलेची सेवा व निसर्गाची दोस्ती हा निर्मळ आनंद भोगू लागलो वर्तमानपत्रामुळें जनसेवेकडे ओढ लागली.

**मित्रांची उणीव कुत्र्यानें भरून काढली पण !.—** मित्रांची उणीव माझ्या कुत्र्यानें भागवली. मोठे प्रेमळ कुत्रे होते ते. त्यानें माझ्या चित्रकलेलाही मदत केली. सांगेल तसे बसत असे. अगदी एखाद्या मॉडेलसारखे न हलता समोर बसत असे. त्याची कांहीं ऑईल पेंटिंग्सही मी केली. त्याचे ऑईल पेंटिंग आता ताराराणी विद्यामंदिराच्या आर्ट गॅलरींत आहे. मला विसंबून ते पळभरही रहायचे नाहीं. मी तेथें कुत्रे व ते कुत्रे असेल तेथें मी असलोच पाहिजे. यामुळे आमची जोडी गांवांत बरीच प्रसिद्धीस आली होती. मी वाचत बसलो म्हणजे ते माझ्या खुर्चीखाली बसून असे. अद्यापही त्याची आठवण झाली म्हणजे मला भरून येते. बऱ्याच्या कटु अनुभवामुळें आम्हीं जिवश्च-कंठश्च झालो. ते इतके कीं बायको आजारी असता औषध आणण्याकरता म्हणून एकदां येथील एका वाटवे या प्रसिद्ध डॉक्टरकडे गेलो होतो. बरोबर कुत्रे होते. तें इकडेतिकडे जाऊं नये म्हणून दवाखान्यांत येण्यापूर्वी त्याला सांखळीही लावली होती. पण त्या डॉक्टरला दवाखान्यांत कुत्रे आलेले अगदीं खपले नाहीं. ते डॉक्टर फटकळ म्हणून प्रसिद्ध होतेच सर्व गांवभर. त्यांनी 'कुत्रे कशाला आणलेत' अगोदर खाली बांधून या त्याला आणि मग बोला, असें म्हटले. बोलण्यात तुसडेपणा होता. मला तो खपला नाहीं. 'ठीक आहे मला तुमचे औषध न्यायचेच नाहीं यापुढें' असे म्हणून मी बाहेर पडलो. त्यानंतर माझे स्नेही दरबार सर्जन डॉ. धनवडे यांचेकडे त्यांनी दिलगिरी प्रदर्शित केल्यावर तीन वर्षांनंतर त्यांना मी आईच्या दुखण्यासाठीं घरीं बोलावले.

पण त्या माझ्या जिवलग कुत्र्याचा सहवास मला फार दिवस लाभला नाहीं. त्याला थोडे बरें नव्हते. मी एका गांवी निघालो होतो. टांगा येताच ते माझ्यापुढें जाऊन टांग्यांत बसले. पण नेता येणे शक्य नसल्यामुळें त्याला दबावून घरीं बांधले. मी गेल्यावर त्यानें बराच आकांत केला; परत येईपर्यंत भाकरीला तोंड लावलें नाहीं. परत आलो. टांगा दारांत उभा राहताच बेटीला हांक मारली. बेटी धांवत उड्या मारत यायची. ती आली नाहीं. सामान न्यायला नोकर आला. बेटी आली नाहीं. 'कुठे आहे रे बेटी' म्हणून विचारतांच उत्तर मिळाले

नाहीं. सावत्र आईनें मात्र डोळ्याला पदर लावला होता. मला उत्तर मिळालें. जगांतील एका निर्मल प्रेमाला मी मुकलो. त्यांची आठवण देणारें पेंटिंग मात्र अद्याप आहे. यानंतर मी पुनः कुत्रे म्हणून बाळगले नाहीं. बाहेर फिरायला गेलो म्हणजे ते नसलेले पाहून मला करमेनासे होई.

**म. गांधीच्या वाक्याचा परिणाम.**— हंटर पत्राकडे विशेष लक्ष देऊं लागलो तसा लँडस्केपचा नाद कमी होत चालला. हौसेखातर मी केव्हां तरी जात असे. कारण निसर्गाकडे माझा नैसर्गिक ओढा होता. पण त्याला उत्तेजन मिळण्याजोगी परिस्थिती मात्र नव्हती. पैसा तर मिळतच नव्हता.

चित्रकलेपासून परावृत्त व्हायला आणखी एक गोष्ट विशेष कारणीभूत झाली. महात्मा गांधींनी कोल्हापुरास भेट दिली, त्यावेळीं वडिलांनी बराच पुढाकार घेतला होता. गांवांत हिंडून फंड जमा केला होता. सत्यशोधक समाजातर्फे त्यांनीच मानपत्र दिलें. त्यावेळीं महात्माजींच्या मोटारींत शेजारी बसण्याचा मला प्रसंग लाभला. त्यांनी सहजीच माझी विचारपूस केली व चित्रकार म्हणून मी माझी ओळख करून दिली. ते म्हणाले 'चित्रकार आहांत तर चित्रें अशी काढा कीं त्यामुळें जनसेवा घडेल' अशाच अर्थाचें वाक्य होते ते.

त्यावर विचार करूं लागलो मी. हा प्रश्न आतांपर्यंत कधीच उद्भवला नव्हता माझ्यासमोर. मी माझी चित्रें मनरंजनाकरिताच काढीत होतो. जनतेने बोध घेण्याजोगे, त्यांना मार्ग दाखविणारे, कांहीं तरी विशेष सांगणारे, असे कांहींच नव्हते त्यात.

विशिष्ट मतप्रसार करणारी चित्रें काढावीत तर माझा मनुष्य कृतीचा अभ्यास तसा चांगला नव्हता आणि निव्वळ सृष्टिसौंदर्याच्या देखाव्यामुळें मतजागृती कशी होणार ? जनसेवा कशी करणार ? मनरंजन होईल पण तेही वरच्या वर्गाचे. खालच्या वर्गापुढे जेथे जगणे कीं मरणे हा प्रश्न उभा आहे तेथे मनरंजनाचा काय उपयोग? यामुळेही चित्रकलेकडे दुर्लक्ष होऊं लागले.



धीजींच्या जवळ उभे कै. खंडेराव बागल २५-३-२७ कोल्हापूर.

**खादी व फॅशन.**— मी खादी तर वापरूं लागलेच होतो. प्रथम भावनेमुळेच वापरूं लागलो. त्यानंतर इष्टानिष्टतेचा विचार केला. यंग इंडियाच्या वाचनामुळें, व गांधीजींच्या ऐकलेल्या उपदेशामुळें खादीकडे विशेष लक्ष देऊं लागलो. वडीलही खादी वापरूं लागले. आमचे घरांत आम्ही दोघे खादीभक्त बनलो. मी चरखा व टकळी चालवीत असे. सावत्र आईनें व बायकोनेही सूत काढून दिले व वडिलांच्या उपरण्यापुरतें कापड त्यांतून तयार झालें. येथें धर्माधिकारी वकील यांचा मुलगा भाऊसाहेब धर्माधिकारी व मेथे मास्तर यांनी खादी संघ काढला होता. त्या संस्थेचा सभासद झालो. खादी विषयीं हंटर पत्रांतही मी स्फुटें लिहूं लागलो.

मी जरी खादी वापरीत होतो तरी गबाळयासारखा रहात नव्हतो. माझी फॅशन कांहीं मी सोडली नव्हती. टाकटीकीची आवड म्हणा किंवा कलावृत्ति म्हणा पंचा व लांडा सदरा घालून हिंडणें मला झालें नाहीं व अद्यापही होत नाहीं. खादी कपडा घेतला म्हणजे झाले. पण त्याचे कपडे ठराविक सांचाचे करणे मला पसंत नव्हते. प्रत्येकाच्या आवडी निरनिराळया, कलावृत्ति ( æsthetic sense ) निराळी. ती वृत्ती मारून एक सांच्याचे ( लष्करी ) पोशाख घालणे मला स्वतःला कांहीं पसंत नव्हते. इतकेच नव्हे तर अशी सक्ती करणे कलाविकासास हानिकारक आहे अशी माझी तरी समजूत आहे. म्हणून मजवर बरेच लोक टीका करीत असूनही मी इच्छेप्रमाणेच कपडे वापरत आलो आहे. दाढी, मळके कपडे, अर्धनग्न लुंगी, अन् सदऱ्याविना शरीर याचा मला तिटकारा येतो. पण स्वदेशावर प्रेम करणाऱ्यानें त्यावेळीं खादी वापरलीच पाहिजे, असें माझें मत बनलें होतें. या धंद्याचे राष्ट्रीयकरण होईपर्यंत या धंद्याला शक्य तितके उत्तेजन दिलें पाहिजे असें माझे मत होतें. राजकीय सत्ता हाती आली नाहीं तोपर्यंत परदेशी व देशी भांडवलवाल्याडे जाणारा पैशाचा ओघ थांबवण्याला आज दुसरा मार्ग नव्हता.

या मताचा मी पत्रांतून जोरानें पुरस्कार करूं लागलो.

हळूं हळूं विचाराची दिशा जनसेवेकडे अधिकाधिक झुकूं लागली. पत्रासाठीं मी जवळ जवळ स्वतःला वाहून घेतलें. सारा वेळ तिकडे खर्च करूं लागलो. जर एकाद्या वेळीं ट्रेडलचा माणूस आला नाहीं तर रात्री

दोन दोन वाजेपर्यंत मी पाय मारीत असें, घरची सर्व मंडळीही राबत. कागद फाडणें, पत्रें चिकटवणें ही कामेंसुद्धां वडील करीत.

एकदा एखाद्या नादाला लागलो म्हणजे दुसरे कांहीं सुचायचे नाहीं हा माझा स्वभावच. त्याचा मग अतिरेक व्हायचा. खाण्यापिण्याकडे सुद्धा लक्ष असायचे नाहीं. माझे फिरणेसुद्धां कमी होऊं लागले. बहुतेक सर्व बोजा मी एकट्यानेच उचलला. वडील फक्त अग्रलेख लिहीत. बाकी सर्व मी पाही. केव्हां केव्हां वडील आजारी पडले म्हणजे अग्रलेखही लिहिणें माझेवर पडे. पण मला कंटाळा कसला तो नव्हता.

**वर्तमानपत्री लिखाणाचा परिणाम.**— दर आठवड्याला नियमितपणें स्फुटें लिहावीं लागत असल्यामुळें लिहिण्याची संवय लागली. समाजाकडे पाहण्याची नवी दृष्टी आली. त्रयस्थपणानें पाहण्याची मनोवृत्ती कमी झाली. मनांतले विचार लिहिता येऊ लागले. व स्फुटांना थोडीच जागा आंखून घेतल्यासारखी असल्यामुळें, पाल्हाळ न लावता मोजक्या वाक्यांत लिहण्याची संवय झाली. वाचनाचा नाद लहानपणापासून होताच. त्याचा यावेळीं फायदा झाला.

वडील अभ्यासी व प्रगमनशील विचाराचे होते. भगवद्गीता मुखोद्गत. वेदाचा अभ्यास. त्यावर अनेक लेख लिहले. भागवत धर्माची चांगली माहिती. दांडगे वाचक. चिकित्सक, वादविवाद पटु, पण मूर्तिपूजक! पण त्यांनी मूर्तिपूजेची सक्ती आमच्यावर केली नाहीं. घरांत नेहमी या विषयावरची भाषणें चालत. नेहमी व्याख्यानें देत. घरांत सनातन वृत्तीला व स्वतंत्र वृत्तीला मारक असें वातावरण नव्हते. वडील सत्य-शोधक होते, पण तसे ब्रह्मद्वेष्टे नव्हते. 'दासराम' म्हणजे रामचंद्र बाबाजी जाधव, बाबुराव यादव, कदम वकील, हरिभाऊ चव्हाण 'लट्ठे–डोंगरे–जाधवराव' ही त्यावेळची सत्यशोधक समाजांतील पुढारी मंडळी.—

**बाबुराव यादव.**— विशेष असें शिकलेले नव्हते. शिपाईगडी. पण दांडगा वक्ता. त्यांना मुलुख मैदान तोफ म्हणत. राजकारणांतील नाना पाटलांचे वक्तृत्व आणि ब्राह्मणावर तुटून पडणाऱ्या यादवांच्या वक्तृत्वांत फार साम्य. दांडगी समयसूचकता. माझे वडील जाडे विद्वान. भास्करराव जाधवांच्या खालोखाल. पण वक्तृत्वशैली बाबुरावांची मोठी.

वडील मूर्तिपूजक, बाबुराव जवळ जवळ मूर्तिभंजक. मला याबाबत बाबुरावांचेच विचार आवडायचे. दासराम, हरिभाऊ चव्हाण, कदम मंडळी आली म्हणजे हा वाद सारखा चालायचा. ब्राह्मणापैकीं तात्या आपटे, आळतेकर, खांडेकर, श्रीखंडे, धर्माधिकारी त्यांचे दोस्त. कोणी घरीं आले कीं कडाक्याचा वाद चालायचा. डॉ. बाळकृष्ण यांची व वडिलांची सभेंत नेहमी लढत असायची. आहिताग्नी राजवाडे व वडील यांची एकदा खूपच जुंपली होती. पंडित सातवळेकर वडिलांच्या विद्वत्तेला नेहमी मान देत. पण त्यांची उत्तरें प्रत्युत्तरें चालायची. या वादविवादाचा माझ्यावर पुष्कळच परिणाम झाला. माझी चिकित्सिक बुद्धी वाढत गेली. न वाचता पुष्कळ गोष्टी समजूं लागल्या. त्याचा परिणाम न कळत माझ्या लिखाणावर होत होता. मुंबईच्या राहणीनें माझी जात्यंध दृष्टि कमी झाली होती. या बाबतींत मी घरच्या सर्व मंडळीच्या बराच पुढें गेलो होतो.

**घरांतील अस्पृश्य.—** आमच्या घरीं एक वाघमारे नांवाचा अस्पृश्य विद्यार्थी जेवायला येत असें. त्याचे ताट आमच्या पंक्तीला आई कधी घालीत नसें. 'त्यांचें पान पंक्तीलाच वाढ' म्हणून मी सांगून पाहिलें. पण तिनें कांहीं ऐकले नाहीं. तशी शिवाशीव चालत होती. पण जेवायच्या वेळीं भेदभाव टाकणे झाले नव्हते. तेव्हां सगळ्यांची ताटें वाढल्यावर मीच माझे भरलेले ताट घेऊन त्या अस्पृश्याजवळ बाहेरच्या बाजूला जाऊन बसलो. असें एक दोन वेळ केल्यावर मग आईनेही ती बाब सोडून दिली आणि त्याला आमचे पंक्तीस वाढायला सुरवात केली. पुढें मग महार, मांग, चांभार, मुसलमान आमचे घरीं पंक्तीस बसूं लागले. वडिलांनी आम्हासाठी करवून आणलेल्या चांदीच्या ताटांत त्या लोकांना मुद्दाम बोलवून जेवूं घातले. त्या ताटांत आजचे आमदार डी. एस. पवार ( चांभार ) आकीवाटे मुसलमान, गोविंदा मांग आणि गंगाराम कांबळे महार मंडळी ही होती. त्यानंतर त्या ताटांत घरच्या मंडळींनी जेवायला सुरवात केली.

मला व्याख्यान द्यायला येत नसें. त्यामुळें वर्तमानपत्रद्वारां जेवढी जनसेवा होईल, न बोलतां ( बोलतां येत नव्हतें म्हणून ) जेवढें करतां

येईल, तेवढें करीत असें. एकदां एका प्रसंगीं चांभारवाड्यांतही जाऊन जेवलों. खादी, सहभोजन व वर्तमानपत्र एवढ्याच मर्यादेंत मी घुटमळत होतों. लिहीत असें ते मात्र प्रामाणिकपणें लिहीत असें. कुणाला खूष करण्याकरितां लिहिलें नाहीं. यामुळें माझी स्फुटेंहीं बऱ्याच जणांना आवडूं लागलीं. कित्येक वेळां त्यांचे उतारेही इतर कांहीं पत्रांतून येत. यामुळें लिहिण्याबद्दल एक प्रकारचा आत्मविश्वास उत्पन्न झाला. सहसंपादक म्हणून काम करण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. पण वडिलांनीं घाई नको म्हणून माझा थोडा हिरमोड केला.



कै. सौ. चंद्राबाई बागल

**सावत्र आई.**—क्षयानें वारल्या. त्या विशेष अशा शिकलेल्या नव्हत्या. पण वडिलांच्या समाज-कार्यास घरीं बसून मदत करीत. वर्तमानपत्रांच्या घड्या घालणं, तिकीटें चिकटवणं, कागद फाडणं हे काम गल्लीतल्या मैत्रिणी घेऊन पुऱ्या करीत. आज ताराराणी मंदिरांत असलेले मास्तर अनंतराव भुरके यांची बहिण. त्यांची जिवश्चकंठश्च. ती दिवसभर कामाला लागे? तसंच सत्यसमाजांत ठरलेल्या सहभोजनाचे काम या दोघी पुढाकारानें पार पाडीत. त्यांनीही पुढे शिवाशिवीची कल्पना टाकून दिली. सावत्र आई. पण तसा आम्हा कोणालाही त्यांचा त्रास झाला नाहीं. सावत्रपणाचीं कल्पनाही शिवू दिली नाहीं. वडिलांच्या उतारवयांत त्यांच्यावर ही आपत्ती कोसळल्यामुळें त्यांच्या मनावर बराच परिणाम झाला. त्यांची प्रकृतीही ढासळूं लागली. डोक्याला फार ताण सहन होईना. यामुळें पत्राची बहुतेक सर्व जबाबदारी मजवर पडूं लागली. केव्हां केव्हां अग्रलेखही मीच लिहूं लागलों.

**हंटर पत्राचे धोरण.**— एकंदर पत्राचें धोरण काँग्रेसला अनुकूल असेंच होतें. वडील दरबारवर निर्भीडपणें टीका करीत. त्यामुळें पत्राचा बोज वाढला होता. बाहेरही पत्राचा खप वाढत चालला होता. प्रजेची सहानुभूति आणि प्रेम मिळूं लागलें होतें. गांवच्या लोकांकडून बरींच मदतही मिळाली होती.

संस्थानांत राहून संस्थानी कारभारावर टीका करणारे व काँग्रेसला अनुकूल असे आमचेच पत्र होते. नाहीं तर संस्थानी पत्रांत बहुधा राजाची व त्यांच्या विशेष मर्जीतील अधिकाऱ्यांची स्तुति, त्यांचे फोटो व चरित्रें, ही असायचीच. अधिकारी झाला कीं त्याला लोकप्रिय हे विशेषणही पत्रांनीच चिकटवायचे. काँग्रेस राजवट आली तरी ही वृत्ती कांहीं गेलेली नाहीं. पूजास्थान बदलेले एवढेच. जे सरकार असेल त्याला विरोध करणारा समाजसेवक हा बहुधा गैरमर्जीत असायचा. त्याची किंवा त्याच्या कामाची वाहवा पत्रांत येणे जवळ जवळ अशक्य गोष्ट. मनांत आदर असला तरी तो पत्रांतून प्रकट व्हायचा नाहीं. कारण त्यामुळें पत्राच्या अस्तित्वाला धोका येण्याचा संभव. म्हणून तारेवर कसरत करणारा जो असेल त्याचा उदो उदो होणार. तो ही धनिक असेल तर त्याचा विशेष गौरव व्हायचा ! एखादा चांगला अधिकारी गैरमर्जीत गेला कीं त्यांने चांगले काम केले असलें, तरी त्याचा नामनिर्देश व्हायचा नाहीं. ज्या प्रजेच्या वर्गणीवर पत्र जगायचे, तिची गाऱ्हाणी कधी वर्तमानपत्रांतून पुढे यायची नाहींत. महाराजांच्या स्तुतिपाठाचा दर वाढदिवशीं जादा अंक काढून यायचा. ब्राह्मणेतरांचे पत्र असेल तर ब्राह्मणावर तोंडसुख घ्यावें. पण आपल्या जातभाईंच्या दोषाबद्दल तोंडाला खीळ घालावी.

आम्ही हा मार्ग पत्करला नाहीं म्हणून आम्हाला जड गेले. गिरणीचे मॅनेजर हे माझे स्नेहीच होते. खालसा मुलखांतील गिरण्यापेक्षां तुमचे कामाचे तास जास्त आहेत, ते कमी करा किंवा किती असतील ते जाहीर करा अशा अर्थाचे मी त्यांना बोललो. 'टीका करून तरी पहा म्हणजे काय ते समजेल' म्हणून त्यांनी धमकी दिली. मी जाणूनच होतो कीं टीका केली तर छापखान्यास मिळणारे गिरणीचें सहासातशेचे काम बुडेल.

मी जाणूनबुजून स्फुट लिहिले व त्यांनी थोडक्याच वेळांत काम बंद केले. प्रामाणिक टीका जड जाते याचा प्रत्यक्ष अनुभव आला. आर्थिक हित-विरोध आला कीं खासगी प्रेमसंबंध टिकत नाहींत.

**मुखदुर्बळाला वाचा फुटली.**— संस्थानजवळील खालसा मुलखांतील एका जिल्ह्यांत ब्राह्मणेतर परिषद भरली होती. त्या परिषदेचे स्वागताध्यक्ष कोल्हापुरचे बडे अधिकारी रा. ब. आचरेकर हे होते. त्यांनी आपल्या भाषणांत दुसरे ब्राह्मणेतर पुढारी भास्करराव जाधव, मुंबईचे त्यावेळचे मंत्री, यांच्यावर--

'आपसांतील यादवी आणि कर्तबगार पुढाऱ्यांमधील व्यक्तिद्वेष यांनी समाजाचे भयंकर नुकसान केलें आहे. दुसऱ्यांनी 'हे केले नाहीं असें म्हणण्यापेक्षां स्वत: काम करावे. दुसऱ्याचे दोष काढण्यात कालक्षेप करूं नये. तुम्हीही संस्थानच्या रुपेरी बेडीचा बंदिवास पत्करलाच आहे...' असा लेख हंटर पत्रांत लिहिला. या लेखानें शहरांत बरीच खळबळ उडाली. अधिकारी संतप्त झाले. खुषमस्करे व स्नेही म्हणवून घेणारे चिडले. त्यांनी जाहीर पत्रिका काढून पत्राच्या निषेधासाठीं सभा बोलावली.

एवढ्या मोठ्या अधिकारावर असलेल्या एका संस्थानी पत्रानें आणि संस्थानांत ज्याची इस्टेट आहे अशा माणसानें टीका करणे म्हणजे काय साधीसुधी गोष्ट? त्या ऑफिसर साहेबांना खूष करण्याकरता आश्रितांची, स्नेह्यांची आशाळभूतांची अहमहमिका सुरू झाली.

सभा भरणार तेथे आपला निषेध होणार! उलट बोलण्याची कोणाची छाती नाहीं! मी तर वाचादुर्बल! अनुमोदन देण्यापुरतीं वाक्यें सुद्धां जन्मांत कधी उच्चारलेली नव्हती. आपल्याला कधी काळीं बोलता येईल ही कल्पनाही शिवलेली नव्हती. बोलण्याचा प्रयत्नही केला नव्हता. अशक्य बाब म्हणून ती गाळलेलीच होती आयुष्यांतून. मग मी काय बोलणार? माझी बाजू कशी मांडणार? तोंड दाबून बुक्याचा मार सहन करणे भागच होते मला. तथापि निदान ऐकायला तरी जावे म्हणून मी जाऊन बसलों. माझ्या हजर राहण्यानें मात्र बऱ्याच लोकांना अचंबा वाटला.

तेथील एक प्रख्यात नाणावलेले ' मुलुख मैदान ' म्हणून समजलेले माझा निषेध करण्याकरता उठले. प्रसिद्ध वक्ते बाबुराव यादव त्यांची अजस्र मैदानी तोफ माझ्यावर सुरू झाली. मी बसल्या जागीच गर्भगळित झालो. तोंड चिमणीएवढे झाले. समोर बसलेल्या लोकांच्या नजेरला नजर लावण्याची छाती होईना. ते मी दोषी होतो म्हणून नव्हे, तर मला उत्तर देण्याची शक्ती नव्हती म्हणून. मी मुख-दुर्बल होतो म्हणून. पुढच्याच खुर्चीच्या रांगेला बसल्यामुळें पळ काढणेही शक्य नव्हते. सर्वांसमक्ष स्वस्थ ऐकत बसण्याचे ठरवले. सभेचे अध्यक्ष दाभोळकर वकील हे होते. मराठा बोर्डिंगचे सुपरिंटेंडेंट प्रो. शिरोडकर यांनी बोर्डिंगची पोरें पुढे घालून आणली होती.

माझ्या निषेधाचा ठराव पास करण्याकरता पुढे मांडला गेला त्यांच्या बोलण्याची लोकांवर छाप पडली होती. ते वक्ते चांगलेच होते. ठराव पास होणार हे ठरल्यासारखेच होते, पण मला कशी बुद्धि सुचली कोण जाणे, मी कसाबसा सरळ उभा राहून त्यांना म्हटले, ' ठराव पास करण्या-पूर्वी लोकांनी तो लेख वाचला आहे कां नाहीं हे तरी विचारून पहा. ' एवढे बोलायला केवढे धैर्य लागले मला. एवढे व्याख्यान देऊन मी खुर्चीवर आदळलो. इकडे तिकडे चोरट्या नजेरनं पाहिले. मला कोणी हंसत नव्हते. कोणी हेटाळणीहि केली नाहीं. एवढ्यानें मनांतल्या मनांत केवढा आनंद झाला मला. कारण सभेत यापूर्वी केव्हांच तोंड उघडलेले नव्हते. ते यादव तोऱ्यानें म्हणाले, ' आहे माहीत सर्व लोकांना. ' पण तेथें बरेच विद्यार्थी आले होते. कसे झाले तरी तरुण विद्यार्थ्यांच्या मनांत स्वातंत्र्याचे रक्त वहात असतेच. त्यांना कोणाची हुजेरगिरी करायची नव्हती. थोरांचा मुत्सद्दीपणा म्हणजे नादानपणा त्यांच्यांत आलेला नव्हता. ते ओरडून म्हणाले, ' नाहीं वाचला आम्ही.' यादवांचा नाइलाज झाला. पण तो लेख त्यांनीं न वाचता मलाच वाचायला सांगितलें. माझी फजिती उडणार ही त्यांना खात्री होतीच.

मी पत्राचा संपादक आणि वाचायला सुद्धा येत नाहीं असें लोक म्हणणार म्हणून मला उठणे भाग पडले. नाहीं तर लोक छीः थूः करणार.

पत्राचा बोज जाणार. काय व्हायचे ते होईल म्हणून व्यासपीठावर चढलो. चढतांना तोल जात होता. पाय लटपटत होते. बोलण्यापूर्वीच जीभ कोरडी पडली. पुढचा समुदाय पाहून छाती धडधडूं लागली. अंगाला घाम सुटला. घेरी येते कीं काय असे वाटूं लागले.

मन घट्ट करून पत्र हातांत धरले. तथापि हात कांपत होता. खांकरून सुरवात केली. त्यांत मला अनुकूल अशी एक गोष्ट होती. ती म्हणजे मला नुसते वाचायचेच होतो. बोलायचे नव्हते. त्यामुळें अडखळण्याचे कारण नव्हते. कचरूं नये म्हणून मोठा आवाज काढून वाचूं लागलो. कांही थोडे वाचल्यानंतर लोकांकडे दृष्टि गेली. लोक अगदी शांत होते. कोणी कांहीं गडबड केली नाहीं. वातावरण विरोधी दिसले नाहीं. तेव्हां आम्हालाही जोर चढला. पहिली भीति गेली व सर्व लख छान परिणामकारक वाचला. नंतर स्वतंत्रपणें चार शब्दही बोललो.

यानंतर सभेचा झोक सर्वच पालटला. विद्यार्थी माझ्या बाजूला झाले. माझ्याबद्दल त्यांना सहानुभूति वाटूं लागली. बोर्डिंगमधील पारखे नांवाचे विद्यार्थी उठून म्हणाले कीं, ‘ आजची सभा निषेधाची नसून बागलांच्या अभिनंदनाची होणार आहे.’ त्यांच्यामागून आणखी एक एक विद्यार्थी माझ्यातर्फे उठूं लागले. हा प्रकार पाहून मी तर आश्चर्यचकित झालो. कारण मी मोठ्या धैर्यानें ऐकण्यापुरताच आलो होतो.

वातावरण व सभेंत होणारी बाचाबाची पाहून ठराव पुढें मांडणाऱ्या वकीलांनीं तो मागे घेत असल्याचे सांगितले. अध्यक्षही दाभोळकर वकीलच. त्यांनीं ठराव मागे घेतो म्हणणाऱ्यांचे बोलणे मान्य केले. पण इतक्यांत प्रो. शिरोडकर म्हणाले, ‘ ठराव पाठीमागें घेता येत नाहीं. तसे करणे अन्कॉन्स्टिट्यूशनल आहे. ’ त्यांना वाटलें मुलांवर आपले वजन पडेल. पण त्याचा स्वीकार करणे म्हणजें राजरोस फजिती होण्यासारखें असल्यानें अध्यक्षांनीं तो ठराव परत घेतला. अशा रीतीनें अधिकाऱ्याला खूष करण्याकरता केलेली एवढी उठाठेव व्यर्थ गेली.

त्यावेळीं तेथे एक पुण्यांतील ' ज्ञानप्रकाश ' या वजनदार पत्राचे बातमीदार श्री. गणपतराव पाध्ये हजर होते. त्यांच्यावर बऱ्याच जणांचे वजन पडले असावे. घरीं मोटारीं खेपा घालूं लागल्या आणि आचरेकरांच्या बाजूला अनुकूल अशी बातमी त्या पत्रांत छापून आली.

मी झालेली सर्व हकीकत आमच्या पत्रांत झाली तशी दिली. व त्या पत्रावर कांहींच टीका केली नाहीं. ' बातमी खरी कोणती व खोटी कोणती हे उत्तराप्रत्युत्तरानें सिद्ध होणार नाहीं. खरी-खोटी गोष्ट कोणती ती लोकांनी पाहिलीच आहे.' असें लिहून अंक छापला व त्याच्या पांचशें जादा प्रति काढून गांवांत फुकट वाटल्या. मी स्वतः ज्ञानप्रकाशकडे झालेली बातमी पाठवली. संपादकांनी तिलाही जागा दिली. यामुळें ज्ञानप्रकाशचे संपादक काकासाहेब लिमये यांचा निःपक्षपातीपणा प्रत्ययाला आला. या प्रसंगानंतर त्यांनी रिपोर्टरना कांहीं कळवले असावे. कारण त्यानंतर गणपतराव पाध्ये यांचे सर्व धोरण बदलेले दिसले व लोकांची बाजू ज्ञानप्रकाशमध्यें निर्भयतेनें येऊ लागली.

वकील.— यांत एक दिसून आले, ( आणि पुढेही तोच अनुभव आला. ) कीं ही सर्व उठाठेव करण्यांत भाग घेणाऱ्यांपैकीं तीन चार वकीलच होते. ठराव मांडणारे वकील, दुसरे एक बोलणारे वकील व अध्यक्ष वकील, एक नोकरीस असलेले प्रोफेसर व दुसरे वाड्यावर नेहमीं जाणारे येणारे वक्ते, विरुद्ध विद्यार्थी वर्ग. यावरून वकीलांची मनोरचना कशी असते तें समजून येण्यासारखें आहे. संस्थानांत किती तरी पदवीधर होते, तसे हुषार वकील आहेत. पण जनसेवा करण्याची मनापासूनची इच्छा मला तरी कोणांत दिसून आली नाही. शुद्ध खादी वापरणारे सुद्धां जे पूर्वीपासून तीनचार होते त्या संख्येंत कांहीं भर पडली नाहीं. ब्राह्मण पदवीधरांची संख्या केवढी मोठी, पण तरुणपणांत पुढील आयुष्य पुढें असल्यामुळें नुकसान होण्याचा संभव व पुढे वय झालें म्हणून सार्वजनिक सेवेपासून दूर रहायचे. ब्राह्मणेतरांना नोकरीची व वरच्याच्या मर्जीची आशा! अशा प्रकारें खरा लायख आणि राजकारण हातीं घ्यायला योग्य असा वर्ग जाणून बुजून स्वार्थामुळें अस्पृश्य बनला.

वजनदार पदवीधर वकीलांपैकीं एक माझे वडीलच कांहीं तरी राजकीय विषयावर बोलत, लिहीत व निर्भीडपणें टीका करीत. पण त्यांच्या या कृत्यामुळें त्यांच्या वकीलीवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. शाहू महाराजांच्या अमदानींत श्री. सदाशिव खंडो आळतेकर यांनी थोडी राजकीय चळवळ केली व त्याबद्दल त्यांना कोल्हापुर सोडावे लागले. पण यामुळें कोणीही हातपाय हालवूं नयेत ही खरोखरी लाजिरवाणी गोष्ट आहे. ब्राह्मणवर्गानें तर बहुतेक सर्व चळवळीतून अंग काढून घेतले. एखाद्या ब्राह्मणेतर पदवीधरानें किंवा वकीलानें एखादी संस्था काढली तर तिचा उद्दिष्ट हेतू जनसेवा करण्यापेक्षां त्या निमित्तानें चार अधिकाऱ्यांना सभेचे अध्यक्ष करून त्यांची ओळख करून घ्यावी व त्यांच्या मर्जीत जावें. नोकरी लागायची असेल तर त्याच हेतूनें एखादी संस्था गांठायची.

खरी कळकळ असलेले व समाजकार्य करूं इच्छिणारे लोक अगदी खालच्या वर्गांत होते. माने, हवेरी, माधव भोसले व गायकवाड असे कांहीं होते. पण ते अशिक्षित, आर्थिक दृष्ट्या कांहींच दर्जा नसलेले, यामुळें त्यांचे वजन पडायचे नाहीं.

**लोकांच्या नजरेंत आलो** — या सभेनंतर मी एकदम लोकांच्या डोळ्यासमोर आलो. माझ्या आयुष्याला एक निराळी दिशा लागली. जनसेवेचे एक निराळे साधन अचानक हातीं आले. मला चांगले बोलता येईल हा आत्मविश्वास माझ्यामध्यें उत्पन्न झाला.

व्याख्यानाला आवश्यक जें वाचन व विषयाची तयारी ती माझी होतीच.

यावेळीं विख्यात ब्राह्मणेतर लेखक व व्याख्याते प्रबोधनकार ठाकरे यांचे बंधु आमचे घरीं आले होते. त्यांनीं हा सभेचा प्रकार डोळयांनीं पाहिला होता. त्यांनीं माझ्या त्या पहिल्या भाषणाची फारच प्रशंसा केली व तुम्ही निस्संशय चांगले वक्ते व पुढारी व्हाल असा आशीर्वाद देऊन प्रेमानें पाठीवर थाप मारली. पण मला त्यानें केवढा हुरुप आला.

वडील चांगल्यापैकीं वक्ते होतेच. आपणही बोलण्याचे प्रसंग चुकवायचे नाहींत असें या पुढें मी ठरवले. खादी, ग्रामपंचायत, स्वदेशी—

अस्पृश्यता–निवारण अशा विषयावर व्याख्यानें देऊन मतजागृति करण्याचें मनानें घेतले. वडील एका गांवीं व्याख्यानासाठीं म्हणून निघाले होते. मला ही आयतीच संधी मिळाली. खेड्यांच्या लोकासमोर व्याख्यान द्यायचे. ते सर्व अडाणी. त्यांचे मानानें मी विद्वान्. टर उडण्याची व हंसे करून घेण्याची भीती नाहीं. उलट कोण बोलणार नाहीं. सर्वदृष्ट्या व्याख्यानाचे प्रयोग करून पहायलाही भूमिका पूर्ण अनुकूल होती. तिचा मी फायदा घेतला.

**व्याख्यानाचा दौरा.**— पहिले व्याख्यान माझे एका खेड्यांत झाले. त्यासाठीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडून अर्जानें परवानगी मागितली होती. खादी हाच विषय दिल्यामुळें व वडीलही त्यांत व्याख्याते असल्यामुळें त्याना परवानगी मिळूं शकली. खादी व ग्रामपंचायत या विषयावरच मी बोललो. खालच्या वर्गाला, आपण इतराहून हलके नाहीं ही जाणीव करून देण्याकरतां मी एका शेतकऱ्यालाच अध्यक्ष केले. मी हे पूर्ण सद्धेतूनें केले. पण तेथल्या प्रतिष्ठिताला तो मोठा अपमान वाटला. त्यावेळीं त्याला मुकाट्यानें बसणेंच भाग पडलें. माझ्या व्याख्यानाचा परिणाम बरा झाला. त्याच सभेंत बऱ्याच रुपयांची खादी खपली व ग्रामपंचायत स्थापण्यालाही लोक कबूल झाले, मात्र तेथील प्रमुख आणि उठाठेवी खेकटेखोर म्हणून प्रमुख असलेली चिमासाहेब नांवाची व्यक्तीच अध्यक्ष म्हणून निवडून आली. ज्याच्या नांवाने लोक मागे जळफळाट करीत व मनांतून ज्याचेबद्दल काडीचाही आदर नव्हता, तो लोकनियुक्त म्हणून निवडून येऊ शकला. संस्थानी प्रजेची ही मनोवृत्ति खेड्यावर तशीच मोठ्या शहरांतही पण अशीच दिसून आली.

**लोकशिक्षण व भाषण बंदी.**— म्हणून लोकांना जबाबदार अशा संस्था स्वतंत्र बाण्यानें चालायला लोकशिक्षणाची जरूरी आहे. त्यांच्या हक्काची जाणीव त्यांना करून दिली पाहिजे. निःस्वार्थी पुढाऱ्यांनी स्वातंत्र्याचे बीजारोपण त्यांच्या मनांत केले पाहिजे. याला भाषणस्वातंत्र्याची जरूरी आहे. नुसत्या क्रमिक शिक्षणानें हे लवकर साध्य होणार नाहीं. अशी माझी खात्री झाली. भाषण स्वातंत्र्य नसल्यामुळें संस्थानी प्रजा निर्बुद्ध आणि गुलामवृत्तीची झाली होती.

ग्रामपंचायतीचा स्तुत्य हेतु, तो अध्यक्ष निवडून आल्यानें साध्य झाला नाहीं. उलट लोककल्याणाची सबब पुढे करून बहुमताच्या जोरावर त्याला स्वतःचेच हित साधून घेता आले. लोकांना पूर्वीचीच स्थिति बरी असें वाटूं लागले.

यानंतर लगेच दुसऱ्या गांवीं गेलों. तेथेही व्याख्यान दिले. तेथेही बरीच खादी खपली. कांहीं अंशी वडिलांच्या बरोबर संस्थानांतील गांवें केली. त्यामुळें खेडच्या लोकांपुढे तरी न भीता स्वतंत्र व्याख्यान देता येईल असा विश्वास वाटूं लागला. मोठ्या शहरांत स्वतंत्र व्याख्यान देण्याचे अद्याप धाडस झाले नव्हते. पण राजधानीत एका संस्थेनें माझे खादीवर व्याख्यान ठरवून ती ही भीती दूर केली. आतांपर्यंत वडिलांच्या बरोबर उपवक्ता म्हणून बोलत असें पण यापुढें स्वतंत्र दौरा काढण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली.

संस्थानांत सभाबंदीचा कायदा होता. त्यामुळें या दौऱ्याच्या कल्पनेला सभाबंदी आड येऊ लागली. प्रत्येक खेपेला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे अर्जाला आठ आण्याचे तिकीट लावून परवानगी मागणे त्रासाचे व अपमानाचे वाटूं लागले. व दौऱ्याची अशी एकदम परवानगी मिळेना म्हणून तो नाद सोडून द्यावा लागला.

महात्माजी दांडीला निघाले त्याच दिवशीं मीही व्याख्यानाला आमच्या हद्दीबाहेर जाण्याचे ठरवले. स्पेशल मोटारीनें मलकापूर जहागिरींत गेलो. तेथले महालकरी गोपाळराव खांडेकर हे आमचे वडिलांचे बालपणाचे स्नेही होते. त्यांनी आमची उत्कृष्ट व्यवस्था ठेवली व स्वतःही सभेस हजर राहिले. मी सहकुटुंब गेलो होतो. त्यांनी वडिलांना पत्र पाठवून माझ्या व्याख्यानाची बरीच स्तुती केली. त्यानें माझा उत्साह वाढला व व वडिलांना आनंद झाला.

**वाळवे तालुक्यांतला दौरा.**— मी जवळच्या वाळवे तालुक्यांत दौरा काढण्याचे ठरवले. संस्थानांत भाषणबंदी होती. पण येथे परवानगीची कांहीं भानगड नव्हती. वाटेल ते बोलावे. राजद्रोही व्याख्यान असल्यास केस होण्याची भीती. पण भाषणाला बंदी नव्हती. चार दिवस गांवीं, चार दिवस दौऱ्यावर असे सुरू केले.

कऱ्हाडांत व्याख्यान दिलें व नंतर तेथल्या बटाणे वगैरे कांहीं पुढाऱ्याबरोबर त्या तालुक्यांतली गांवें केली.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.**— दौऱ्यांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांची गांठ पडली. त्यांचे संबंध आणखी जवळ आले. त्यावेळीं त्यांच्या विद्वत्तेची मला कांहींच कल्पना नव्हती. एक साधारण कार्यकर्ताच समजलो. सोंवळा भटजीच वाटला मला. पण महाराष्ट्रातल्याच नव्हे तर हिंदुस्थानांतील विद्वान मंडळींत त्यांची गणना केली जाते. खरा विद्वान नम्र असतो. आपण विद्वान आहोत ही त्याला जाणीव नसते. निदान तो दुसऱ्यांना ही जाणीव करून देत नाहीं. हे त्यांच्या उदाहरणावरून पटून आले. त्यांच्यांत ब्राह्मण्य जराही नाहीं. जातिवाद दिसला नाहीं उलट बहुजनसमाजाचेच ते कैवारी आहेत. फुल्यांच्या विषयीं निबंध लिहण्यानें ते आणखी जवळ आले. याचमुळें अ. भा. सत्यशोधक परिषदेचे उद्घाटन त्यांचे हस्तें करण्यात आम्हास आनंद वाटला. मिश्र विवाहाचे ते पुरस्कर्ते आहेत. पाटील—पिंगळे या मराठा ब्राह्मण विवाहाचे अभिनंदन करण्यास ते करवीरी आले होते. रोटीबंदी त्यांनीं केव्हांच मोडून टाकली आहे. बहुजनसमाजाच्या आकांक्षा त्यांना इतराहून बरोबर कळूं शकतात. सर्वोदयी सोंवळेपणा व ढोंगी सात्विकता त्यांच्यांत नाहीं. चुका कबूल करण्याचा थोरपणा त्यांचे अंगी आहे. ते माझे घरीं उतरलें असता, त्यांच्या धोरणांत मला वाटलेली कांहीं विसंगती व मला वाटलेला त्यांचा चुकीचा दृष्टिकोन मी मोकळया मनानें त्यांच्यासमोर मांडला. त्यांनीं तो खोडून काढण्याचा प्रयत्न न करता कांहीं गोष्टी मान्य केल्या. मराठा परिषदेतील माझ्या दृष्टिकोनाला त्यांनी जातिवादी स्वरुप चिकटवले नाहीं. मराठा ही लोकसंग्राहक जात आहे हे त्यांनी मान्य केले व माझा हेतू व विचारसरणी कोरगांवकर ट्रस्ट संमेलनांत इतरांना समजावून दिली. कांहीं सर्वोदयवाल्यांत स्वतःच्या सात्विकतेचा आणि पावित्र्याचा जो एक टेंभा चढला आहे तो यांच्यांत नाहीं. मोजक बोलणं, आवरून लिहिणं ही राजकीय मुत्सद्देगिरी मला तरी आढळली नाहीं. माझ्याशी केलेल्या पत्र व्यवहारांत ते मला दिसून आले. आचार्य जावडेकरना आधुनिक भारत लिहितांना शाहू महाराजांची आठवण झाली नाहीं. पण तर्कतीर्थ त्यांची केव्हांही मुक्त

कंठानें स्तुती करतात. माझ्या मतें त्यांनी पक्षातीत रहायला हवं होतं. कॉंग्रेसच्या सभासदत्वामुळें त्यांच्या स्वतंत्र विचाराची कुचंबणा झाल्या खेरीज राहणार नाहीं.

मी अध्यक्ष व ते उद्घाटक अशा एका विद्यार्थ्यांच्या सभेप्रसंगीं मीं म्हणालो, ' तर्कतीर्थांनी मुलांच्या पासून मराठी लिहायला शिकलं तर ते आम्हाला अधिक जवळचे होतील. त्यावेळी ते म्हणाले. ' माधवराव अगदीं खरें बोलले. माझे एक मराठी पुस्तक वाचल्यानंतर माझे एक स्नेही मला म्हणाले ' तर्कतीर्थ तुमचं पुस्तक मला फार फार आवडलं पण ते मराठींत लिहलं असतं तर बरं झालं असतं.' आंत एक वागणूक अन् बाहेर हे त्यांच्यात नाहीं. कोरगांवकर ट्रस्ट संमेलनाप्रसंगी मी, शंकरराव देव, जावडेकर, भागवत व अप्पासाहेब पटवर्धन असे जेवायला बसलो होतो, त्यात कांहींचा जेवणाचा खास निराळा प्रकार—गाईचे दूध, गाईचे लोणी वगैरे पाहून ते म्हणाले, ' हा एक अस्पश्यतेचाच प्रकार आहे ' ही जेवणांतली विषमता सुद्धां गेली पाहिजे. जेथें जे मिळेल आणि जे दिले जाईल ते खाण्यांला आपण शिकले पाहिजे. या आमच्या वागणुकीमुळें आम्ही बहुजनसमाजाशी एकरुप होत नाहीं. मला एकाद्या मराठ्यानें त्यांचे ते खाद्या दिले तरी मी खातो. यावर एक म्हणाले 'असें उघड बोलूं नका.' त्यावर शास्त्रीबोवा म्हणाले, ' चोरुन एक व बाहेर एक हे मला साधत नाहीं.'

* * *

इसलामपुरांत माझ्या भाषणाचा चांगला परिणाम झाला व भाषणानंतर बऱ्याच परदेशी कपड्यांची होळी झाली. कांहींनी तर अंगावरचे सदरे होळींत टाकून उघडे झालें. सुरवातीला मी शाहू महाराजांनी दिलेला भरजरी १००।१२५ चा मंदिल आगींत टाकला. त्याचा लोकांवर फार परिणाम झाला व भराभर कपडें पडूं लागले.

वाळवे तालुक्यांतील बहुतेक सर्व खेडी मी माझ्या पदरच्या खर्चानें केली. प्रथम प्रथम मी बरोबर जेवणही बांधून घेत असें. पण ते कधीं सोडावें लागले नाहीं. कोणत्याही वेळीं गेलो तरी माझी जेवणाची

गैरसोय कधी झाली नाहीं. ज्या घरीं उतरावे त्या घरीं त्या माणसाच्या ऐपतीबाहेर तो जेवण करून घालीत असें. ब्राह्मणांच्या घरीं तर अगदी सणाप्रमाणें मेजवान्या मिळत तर मराठ्याच्यांत कोंबडी अंडी मिळायची. कांहीं ठिकाणीं अगदी चटणी कांदा भाकरी खावी लागली. पण बदल म्हणून ती सुद्धा चवदार वाटे.

**बायकोचे दागिने विकून दौरा.**— वडिलांना त्रास देऊ नये म्हणून खर्चासाठीं मी माझ्या बायकोचे दागिनें मोडलें. माझ्याबरोबर एक दोन माणसें असत. त्यांचा मोटर खर्च बहुधा मीच देई. मला पायीं फार चालण्याची संवय नव्हती. पण उत्साहामुळें सात आठ मैल चाललो तरी मी नाउमेद होत नसें. कांहीं गांवी आमची थाटानें मिरवणूक निघे. कोणी पुढच्या गांवीं जाण्यासाठीं गाडी देत. कोणी घोडे देई. वाटेनें जातांना पाण्याची ओहळ लागली तर बिचारे मला डोक्यावरून नेत. मी मोठा माणूस समजून माझे पायावर डोके ठेवीत. ही भक्ति व प्रेम पाहून मला गहिंवरून येई. यामुळें खेड्याचे लोक मला देवाप्रमाणें पूज्य मानू लागले. शिकलेल्या लोकांचा धूर्त व स्वार्थीपणा त्यांच्यांत नसें. जणुं मोठ्या वयाची निर्मल मुलेच ती, कोणी सांगतील तसे ऐकतील. त्यांचें थोर अंतःकरण आणि केल्या कामाची कृतज्ञता पाहून त्यांच्यासाठीं देह टाकावा असे वाटे. ते धैर्य माझ्या अंगी अद्याप आले नव्हते. सर्वस्वाचा त्याग करून देशाला वाहून घ्यावे ही मनाची इच्छा कृतीत आणण्याचा अंगांत त्राण नव्हता. तेवढी तळमळ नव्हती. बाकी तुरुंगांत जाण्यासाठीं जीव धडपडत होता. पण परिस्थिती मागे खेचत होती.

कित्येक पुढारी माझ्याच देखत माझ्याच सभेंत गिरफदार झालें होते. माझ्या व्याख्यानप्रसंगी कांही ठिकाणीं तर संबंध पोलिसपार्टी हजर असें. पण कायदेभंगाला प्रवृत्त करणारी माझी व्याख्यानें नसल्यामुळें मला अटक झाली नाही.

व्याख्यानामुळें त्या तालुक्यांत माझी बरीच प्रसिद्धी होऊ लागली. आगाऊ जाहीर झाल्यास माझ्या व्याख्यानास आजूबाजूच्या खेड्यांतली माणसें येत.

**नाना पाटील.**— त्यावेळीं फारसे प्रसिद्ध नव्हते. सामाजिक कार्य करीत. लग्नांतील खर्च कमी करण्याची खटपट करीत. ते जवळ जवळ सत्यशोधकच होते. ते अचानक रात्रीं आले. मला नेण्यासाठीं घोडं आणलं होतं. सभेची तयारी केली होती. येडे मच्छिंद्र गांवीं ती सभा झाली. त्यांनीं आणखी कांहीं प्रसंगीं मला नेले. यावेळीं साताऱ्याबाहेर त्यांची विशेष अशी प्रसिद्धी नव्हती. १९४२ च्या चळवळी नंतर मात्र ते महाराष्ट्राचे व बहुजनसमाजाचे पुढारी म्हणून चमकू लागले. शेतकरी–कामगारपक्षांत आम्हीं दोघे होतो त्यामुळें संबंध आणखी जवळ आले. ते कम्युनिस्ट पक्षांत आता गेले आहेत. मी पक्ष मुक्त झालो आहे. त्यावेळेपासून त्यांची पाऊले सारखी पुढें पडत आहेत. मार्क्सवादाच्या अभ्यासाशिवायच त्यांची पाऊलें त्या रोखानें पडत होती. आतां तर ते फार मोठ्या जोडींत गेले आहेत. पण स्वभावांतील नम्रता कमी झालेली नाहीं. कार्याने ते माझ्याहून थोर आहेत. पण मला आदरानेच वागवतात. खेडुतावर आपल्या भाषणाची पकड बसवणारा दुसरा पुढारी यावेळीं महाराष्ट्रांत दुसरा कोणीही नाहीं. रांगडी भाषा, समजून घेण्याची नम्र वृत्ती. समयसूचकता यामुळें तसं शिक्षण नसूनही ते शेतकऱ्याला जागं करू शकतात.

**माझा आवाज आणि आत्मविश्वास.**— हजारांना ऐकू जाईल असा माझा आवाज होता. पांच दहा हजारांच्या किती तरी सभांत मी बोललो आहे. मला लोकांच्या भावना जागृत करतां येऊ लागल्या. किती तरी सभांत मी लोकांना परदेशी कपडें जाळण्यास भाग पाडले. रोज तीन तीन चार चार व्याख्यानें अशी मी सारखी देत असें. आणि घसा बसला म्हणजे मग विश्रांती घेई. समाज केवढाही मोठा असला तरी मला त्याची भीती वाटेनाशी झाली. बेळगांव जिल्ह्यांतूनही आमंत्रणें येत. सांगलीतही बरीच व्याख्यानें दिली.

बहुतेक व्याख्यानाचे रिपोर्ट ज्ञानप्रकाश पत्रांतून येत. या प्रसिद्धीमुळें हुरूपही येई व बाहेरची आमंत्रणें याच प्रसिद्धीमुळें येऊ लागली. यावेळीं माझा उत्साहही दांडगा असल्यामुळें मी आमंत्रणाला कधी नाहीं म्हणत नसें.

राजकीय विषयाबाबतची व खादीसंबंधीची व्याख्यानें लोकांना आवडत. त्याचा परिणामही चांगला होई. अस्पृश्यतानिवारण हाही पण माझा आवडीचा विषय. पण लोकांना अस्पृश्यतेवर व्याख्यान देणें फारसे आवडायचे नाहीं. अस्पृश्यता निवारणाला लोक अनुकूल नसत. मी अस्पृश्यांची बाजू घेऊन वरच्या लोकांना पुष्कळ तुटून बोलत असें.

**अस्पृश्यतेवर बोलूं नका.**— एका गांवच्या पुढाऱ्यानें त्याबद्दल माझी सभेंतच कानउघाडणी केली. ते म्हणाले, 'आपण आमच्या तालुक्यांत दौरा काढीत आहात त्याबद्दल आम्हाला फार आनंद वाटतो. पण तुम्ही अस्पृश्यतेवर जर बोलूं लागला तर तुम्हाला पुढें काम करणेंच जड जाईल. लोक तुम्हाला गांवांत जागाही देणार नाहींत. तरी तूर्त तो विषय सोडून बोलावे अशी आमची विनंती आहे.' हे गृहस्थ सत्यशोधकच होते. अस्पृश्यतेविरुद्धच होते. सद्धेतूनेच त्यांनीं ते सांगितले. पण मी त्यांना साफ सांगितले, कीं 'गांवचे लोकांनीं टाकले तर मी महारवाड्यांतच उतरीन म्हणजे झाले. मग ते कांहींच बोलले नाहींत. त्यांनी माझ्यावर बहिष्कार घातला नाहीं.' उलट ते कांहीं गांवें माझ्या बरोबर हिंडायला येऊ लागले व त्यांनीं व मी बरीच खेर्डीं घेतलीं.

**बाहेरच्या चळवळीचे पडसाद.**-- आमच्या 'हंटर' पत्रानें आता कॉंग्रेसची बाजू उघड उघड उचलून धरली होती, कायदेभंगाच्या चळवळीनें संस्थानी प्रजेलाही धक्का दिला होता. प्रत्यक्ष कायदेभंग जरी होण्याचे दिसत नव्हते, तरी प्रभातफेरीची इच्छा तरुणांत दिसूं लागली व आम्हालाही त्या निरुपद्रवी चळवळीत कांहीं वाईट आहे असें वाटले नाहीं. भगव्या झेंड्याची मिरवणूक काढण्यास हरकत नाहीं असें मी पत्रांतून लिहिले.

'बळवंत माने' नांवाच्या तरुण उत्साही व धाडसी तरुणानें प्रभातफेरीला सुरवात केली. मिरवणुकींत प्रत्यक्ष असा मी भाग घेत नसें. दरबारनें मिरवणुकीच्या बंदीचा हुकूम काढला. तथापि कांहीं लोकांनी नक्की तारीख ठरवून मिरवणूक काढण्याचे योजिले व ही तारीख सांगली निपाणी व वाळवे तालुक्यांतील लोकांना कळवण्यात आली. चळवळीमुळें खालसा मुलुखाचे व संस्थानचे संबंध जवळ आले होते. संस्थानांतील लोक खालसा मुलखांत जाऊन कायदेभंग करून तुरुंगांत जाऊन आले होते. यामुळें

संस्थानच्या हांकेला त्यांनी लागलीच 'ओ' दिली. गांवांतही जो तो त्या दिवसाची वाट पहात होता. भगव्या झेंड्याची मिरवणूक पुढच्या रविवारी निघणार म्हणून आमच्या हंटर पत्रांतूनही लोकांना समजले होते. बाहेरच्या गांवची मंडळी येणार म्हणून पुष्कळ लोक त्यांना पहाण्याकरितां स्टेशनवर जाऊं लागले. सांगलीहून १००।१२५ लोक व ३।४ बायकाही स्टेशनवर येऊन उभ्या होत्या, हे गांवांत समजायला उशीर लागला नाहीं. गांवांतील लोकांच्या झुंडीच्या झुंडी स्टेशनवर येऊ लागल्या. कांहीं मजा पाहण्यास तर कांहीं भाग घेण्यास धांवून आले.

**भगव्या झेंड्याची मिरवणूक.**— शिवछत्रपतींचा, स्वातंत्र्याचा स्फूर्तिदायी भगवा झेंडा लोकांच्यांत विलक्षण जोम उत्साह आणि बेदरकारपणा आणीत होता. खालसा मुलखांतून येणाऱ्या प्रभात फेरींच्या व झेंडामिरवणूकीच्या बातम्यांनी लोकांची मनोभूमिका अगोदरच तयार करून ठेवली होती.

मिरवणुकीला परवानगी मिळेना. वेळ होत चालली तसा लोकांचा जमाव वाढत चालला. अगदी थोडक्या वेळांत तो चारपांच हजारवर गेला. तो सारखा फोफावतच चालला होता.

बहुतेक सर्व ऑफिसर, महाराज, रेसिडेंट लँग यांच्या फेऱ्या चालू होत्या. इन्फंट्री फायर करणार, अशी बोलवा उठलीच होती. मी ही आपत्ति टाळण्याकरता समुदायाला वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. चीफ पोलीस बाबासाहेब यांनीही मोठ्या समजुतीनें घेतले. देवीपर्यंत पोचवण्याकरता मोटर्स वगैरे पुरवतो म्हणून सांगितलें, आर्जवानें सांगितले. सांगलीकर कबूल झाले. पण गांवांतले लोक हटून बसले, कीं भगव्या झेंड्याची मिरवणूक निघायलाच पाहिजे व ती पायींच निघाली पाहिजे. अशा वेळीं त्यांना टाकून पळ काढणे मला शक्य नव्हते.

आज कदाचित् आपल्यावर कांही तरी प्रसंग येणार व आल्यास माघार घेता कामा नये, हे मी येतांना ठरवलेच होते. बायकोचा मी तसा निरोप घेऊन आलोच होतो. तिनेही माझी नाउमेद केली नाहीं. कदाचित् मला पकडतील म्हणून वडिलांना देण्यासाठीं तिच्याकडे एक पत्र देऊन ठेवले होते.

त्या वेळचा प्रसंगही असा होता की त्यानं अगदी भित्र्याला सुद्धां शूर बनविले असते. मी तुरुंगांत जायला कांहीं हपापलो नव्हतो. तो विचारही मी केला नव्हता. पूर्ण विचार करून पाऊल टाकण्याचा तो प्रसंगच नव्हता. तशात मी अत्यंत भावनाप्रधान.

भगव्या झेंड्याच्या मोहिनीने मी भारून गेलो होतो. ते कांहीं निव्वळ रंगीत फडके नव्हते. त्याच्या मागे महाराष्ट्राचा भाग्यशाली इतिहास उभा होता. वीर्यशाली मावळयांचा अतुल त्याग मागे होता. शिवछत्रपतींची जयश्री होती ती! मूर्तिमंत स्वातंत्र्य उभे होते! त्या झेंड्याच्या फडफडण्यानें सगळी गुलामवृत्ति झडून पडत होती. माझ्या जिवाचा मला जणु विसर पडला. अंग थरारू लागले. धमन्याधमन्यातून रक्त उसळया मारू लागले. जिवाचा धरबंद सुटला. अंगांत वारे संचारल्याप्रमाणे झाले. कैफ चढल्या-प्रमाणे जणु मी धुंद झालो. मदिरेशिवायच मस्त झालो. देहापासून विभक्त झालो. जणु त्या समाजाशी एकरूप झालो. अंगावर रोमांच उभे रहात होते. जगांतील केवढीही बलाढ्य शक्ति मला त्यावेळीं भीति दाखवू शकली नसती. त्यावेळीं मी तोफेच्या तोंडीं हंसत उभा राहिलो असतो.

सैन्यांतील वीरांना कसा उन्माद चढतो, ते हंसत मरणाच्या द्वारीं स्वखुषीनें कसें जातात याची यावेळीं मला कल्पना आली. अशा वेळीं मनुष्य निव्वळ भावनामय मांसाचा गोळा बनतो. मारणे आणि मरणे या दोनच गोष्टी त्याला दिसतात. त्याच्या कृत्याबद्दल तो जबाबदार राहूच शकत नाही. ती एक त्याची उन्माद अवस्था असते. दारूच्या धुंदीत होणाऱ्या गोष्टी जरी त्या माणसाच्या देहाकडून होत असल्या तरी त्याला तो जबाबदार नसतो. माझी मरणाची तयारी झाली होती. नव्हे त्या आघातासाठीं मी उत्सुक होतो.

त्या भाग्यशाली महाराष्ट्राचा भगवा झेंडा मी पुढें होऊन हाती धरला. ती कांटी निर्जीव नव्हती. जणु त्या कांटींतून मृतवीरांचे विद्युत् संदेश मला पोहचत होते. वीरमनाचे दुसरे दोन गृहस्थ असें माझ्या दोन्ही बाजूला होते. मार मिळाला तर तो प्रथम आम्हासच मिळावा म्हणून आम्ही सर्वांपुढे झालो. जवळच इन्फंट्री येऊन तयार होती. स्वार आले होते. पोलीसपार्टी लाठी घेऊन पुढे उभी होती.

भगवा झेंडा हातीं घेऊन मी मरणार ही कल्पनाच किती रम्य होती ! या कल्पनेमुळेच माझ्या डोळयांतुन झरझर अश्रु वाहुं लागले.

शांतता व शिस्त राखण्यासाठीं मी लोकांना सारखा उपदेश करीत होतो. लोक स्व–खुषीनें ऐकत होते.

पोलीस एकदम पुढे झाले. आतां कांहीं तरी भेसूर प्रकार दिसणार म्हणून क्षणभर भीषण शांतता पसरली. घोडेही आले. महाराजसाहेब व रेसिडेंट लॅंगही आले. व कांहीं अनिष्ट प्रकार न घडतां झेंड्याच्या मिरवणुकीस परवानगी मिळाली. झेंडाही पण हर्षभरानें नाचूं लागला. या आनंदोन्मदानें वेडावून लोकांनी शिवरायाच्या नामाचा प्रचंड जयजयकारानें आकाश फाडून टाकलें.

झेंडा उंच धरून आम्ही चालू लागलो. झटकन् त्या क्षणींच स्वयंसेवक निर्माण झाले. त्यांनीं झेंड्याभोंवती लकडकोट केला. मागे पुढे हजारो लोकांचा जमाव शिवछत्रपतींचा जयघोष करीत चालू लागला. जनतेच्या उत्साहाला महापूर येऊन लोक जिकडे तिकडे पसरले होते. ते भगवा झेंडा पुढें होताच शिस्तीनें चालू लागले. समुदायाच्या मध्यभागीं झेंडा डौलाने फडकत चालला होता. त्यावर शेंकडो टोप्यांचा, पटक्यांचा व परदेशी कपड्यांचा वर्षाव सुरू होता. नागरिकांच्या आतांपर्यंत दडपून राहिलेल्या राष्ट्रभक्तीला एकदम ऊत आला. जणु काय अशा एखाद्या प्रसंगाची ते वाटच पहात होते. राष्ट्रभक्तीची एवढी प्रचंड लाट यापूर्वी कधीं उसळलेली मी तरी पाहिली नव्हती. या दृष्टीने कोल्हापुरच्या इतिहासांत ही वेळ लोकदृष्ट्या चिरस्मरणीय ठरेल. शहरचा कोनाकोपरा हलून गेला होता. पुढे काळझोंप घ्यायची म्हणूनच कीं काय त्या दिवशीं शहरानें झोंप टाकून दिली होती !

**कपड्यांची होळी.—** कपड्यांचा वर्षाव होत होता व त्यांची लागलीच होळी होत होती. फर्लांगा फर्लांगावर होळया पेटत होत्या. खालसांतील मोठ्या शहरींसुद्धां एका दिवशी इतक्या होळया झाल्या नसतील. जनसमुदायाचा हा ओघ सारखा फोंफावत चालला होता. आम्हीं रिसाल्याजवळ येतांच ठराविक रूढीप्रमाणें लाल डगला रिसाल्याची भगव्या–झेंड्याला, चुकूनच कां असेना, सलामी मिळाली.

आम्हीं गांवांतील मध्यवस्तींत आलो. सगळया माडया फुलून गेल्या होत्या. वरून कपडे सारखे पडत होते. विल्सन पुलाजवळ पुन: दांडगी होळी झाली. रस्त्यावर चालणाऱ्या कोणाही इसमाच्या डोक्यावर परदेशी टोपी किंवा वस्त्र राहणे त्या दिवशीं अशक्य झाले. लोकांची शिस्त कोठे कोठे सुटत चालली होती. मिरवणुकीबरोबर आठदहा हजार लोक तरी निदान असतील. पण दंगा वगैरे कांही झाला नाहीं. सर्व मिरवणूक शांतपणें पार पडली. या प्रसंगामुळें मी सर्वतोमुखी झालो.

**संकटाची गुणगुण.—** माझ्यावर कांहीं तरी गदा येणार अशी गांवांत दाट अफवा उठली होती. 'हंटर' पत्र लवकरच बंद करण्यांत येईल अशी ती बातमी होती. कांहीं तरी शिजत होते खास. तसे पहायला गेले तर मी अशी कांहीं भयंकर गोष्ट केली नव्हती. पण जेथें स्मशानवत् शांतता तेथें एवढी चळवळ म्हणजे फारच झाली.

वडील स्वत: दरबारचे पेन्शनर होते. शाहू महाराजांचे भक्त होते. दरबारशीं पूर्ण स्वामिनिष्ठ होते. तथापि कर्तव्यनिष्ठ होते. कायद्याचे कक्षेबाहेर पत्राचे लिखाण केव्हांच गेले नव्हते. ते प्रसिद्ध वकील व पहिले मराठी पदवीधर होते. कायद्याच्या कक्षेंत राहून जेवढी कांहीं जनतेची सेवा करता येईल तेवढी अगदी निर्भीडपणें व रोष पतकरूनही करीत. भलती स्तुती करून त्यांनीं कोणा अधिकाऱ्याला व दरबारला खूष करण्याचा प्रयत्न केला नाहीं. राज्यकारभारावर, दारूच्या वाढीबद्दल त्यांनीं दरबारवर टीका केली आहे. व कित्येक वटहुकुमावर त्यांच्या इतके सडेतोड व मुद्देसूद लेख कोणत्याही एका, त्यावेळच्या संस्थानी पत्रांत आले नव्हते.

**पत्रावर गदा येणार.—** माझ्या अल्पमतीप्रमाणें मीही स्फुटे लिहीत होतों. स्फुटे व केव्हां केव्हां अग्रलेखही लिहीत होतो. मी पुढच्या आठवड्याला पत्र बंद पडणार असें समजून लेख लिहायला सुरवात केली होती. यामुळें पत्र वाचण्याची उत्सुकता लोकांत फार वाढली. मलाही अपौरुषेय जिणे काढण्यापेक्षां थोडी तरी कामगिरी करून मेलेले बरे वाटू लागले. कारण आमच्या पत्राला देणग्या, आश्रय, हा सर्व जनतेचाच

होता. ज्यांची वर्गणी घेतो त्यांची प्रामाणिकपणें सेवा करणे व जनतेची योग्य गाऱ्हाणीं दरबारच्या नजरेसमोर आणणे मला कर्तव्य वाटूं लागले. पुढचा अंक बंद होणार असे समजूनच लिहूं लागलो. वडिलांनीही मला नाउमेद केले नाहीं. माझ्या कृत्यामुळें त्यांना त्रास सोसावा लागणार ही त्यांना पूर्ण जाणीव होती. रोज एकाहून एक मोठी माणसें तुरुंगांत जात आहेत हे पाहून त्यांना स्वतःविषयी वाईट वाटे. देशसेवेसाठीं त्यांचाही अंतरात्मा तळमळत होता. पण आम्हा मुलांच्या भवितव्याचे काय होईल या भीतीनें त्यांचे पाऊल पुढें पडूं शकले नाहीं. आपली सर्व इस्टेट जप्त झाली तर मुलांचे काय, या कल्पनेने ते बेचैन होत. मनाची सारखी ओढाताण चाले. या कारणामुळें त्यांच्या मनाची आकांक्षा त्याना तृप्त करून घेता आली नाहीं. मी तरुण, अत्यंत भावना प्रधान व अविचारी होतों. पुढें काय होईल याचा मी फारसा विचार करीत नसें—

**गाऱ्हाणी.**— खेडच्या लोकांवर कांहीं जुलूम होत असल्याचे कानावर येत होते. कांहीं लोक भीत भीत बोलत होते. बाहेरच्या पत्रांतून त्याबद्दल सरकारवर टीका येत होती. ती खोटी होती असेहि नाहीं.

शिकारीसाठीं बरीच पार्कें सरकारनें राखून ठेवली होती. त्यांत हरणांचे कळप असत व ते सारखे वाढत. ती हरणें कुंपणाच्या बाहेर पडत व आसपासच्या ८–१० मैलाच्या टापूंतील पिकांची नासाडी करीत. त्यांना मारण्याचीही बंदी होती. यामुळें पार्काजवळच्या ८–१० मैलाच्या टापूंत तंबाखू खेरीज दुसरें पीक करणे अशक्य होऊन बसले होते. कापसाची कोंवळी बोंडे तीं लगेच फस्त करीत. शेतांत सर्व तंबाखूच केल्यामुळें वैरणीचा तुटवडा पडे. पोटाचे धान्य व जनावरांचा कडबा त्यांना दुसऱ्या-कडून विकत घ्यावा लागे.

डुकरांची ही अशीच मोठी पैदास होत होती. डुकरांना फार पिलें होतात. शेतकऱ्यांनी कितीहि मजबूत कुंपणें घातलीं तरी तीं त्यांना मोडता येतात. एक डुकर शिरलें कीं त्या वाटेनें सगळा कळप शेतांत जाऊ शकतो. तो गेला म्हणजे वर्षभर जपून ठेवलेलें उंसाचें पीक एका रात्रींत जमीनदोस्त होते. भुईमुगाच्या शेंगाचीही तीच स्थिति. त्यात मोठा डुक्कर अंगावर आला म्हणजे शंभर वर्षे भरल्यासारखे. राजरोस

अंगावर चालून येणार. त्याच्या मुसंडीत जर झाडाचा बुंधा आला तर तो उपटून निघणार. अशी मोठी ताकत त्याची. त्यांना मारण्याची बंदी होती.

वेठीबद्दलही टीका बाहेरच्या पत्रांतून येत होती. पण वेठीबद्दल राजरोस अंमलदारापर्यंत जाण्याची ताकत कोणाही संस्थानी शेतकऱ्यांत किंवा नागरिकांत नसल्यामुळें अधिकाऱ्याच्या समोर कोणी जाऊन तक्रार केल्याचें माहीत नव्हतें. बाहेरच्या पत्रांतून मात्र टीका येई. वरील कोणत्याही गोष्टीचा उल्लेख त्यावेळच्या एकाही संस्थानी पत्रांत आला नव्हता. तेव्हां एक रीतसर गाऱ्हाणें म्हणून व दरबारची बाहेर नाचक्की होत होती ती होऊं नये म्हणून, या गाऱ्हाण्यांना पत्रांत प्रसिद्धी देण्याचें ठरवलें. दारुच्या उत्पन्नाचीहि पूर्वीहून वाढ झाली होती. ही गोष्टही अभिनंदनीय नव्हती. म्हणून ही दरबारला विनंतीवजा मागण्या केल्या.

**वडिलांनीही पाऊल पुढे टाकले.—** १ ठराविक लोकांना ठराविक वेळीं फेरीची परवानगी द्यावी. २ कोल्हापुरांत लोकजागृति करण्याकरतां सभाबंदीचा हुकूम रद्द करावा. ३ दारूचें उत्पन्न जें वाढत्या प्रमाणावर आहे तें हळू हळू कमी करावें व दरसाल २५ दुकानें कमी करीत आणावींत. ( कमी होणारें उत्पन्न वाढवणारे दुसरे मार्ग वडिलांनीं दाखवून दिले होते. ) ४ वेठीच्या अफवा उठून दरबारवर बोल येतो तरी खऱ्या गोष्टींची चौकशी होण्याकरितां लोकपुढाऱ्यांची चौकशी कमेटी बसवावी. ५ पार्कांतलि हरणें बाहेर जाणार नाहींत अशी व्यवस्था करावी. ६ गिरणीचे तास जास्त आहेत तरी खालसा मुलखांतील नियम येथील गिरणीस लागू करावेत ( अद्यापही फॅक्टरी ॲक्ट लागू नव्हता ). ७ जबाबदार राज्यपद्धती सुरू करावी अशा मागण्या केल्या. ( या मागण्यानंतर कांहीं कालानें हरणें व डुकरें शेतांत आल्यास मारावींत असें सरकारी गॅझेट झालें. तसेंच वेठ बंद असल्याचेंही गॅझेट झालें. त्याबद्दल मग दुसऱ्या संस्थानीं पत्रांतून महाराजांचें अभिनंदन झालें. पण पूर्वी तक्रार मात्र केली नाहीं. )

१९३० ऑगस्ट सालांतली ही मागणी होती. त्यांतील जनावरें व वेठीविषयीचा वटहुकूम ५–६ वर्षांनीं झाला ! मात्र संस्थानांतील पत्रांनीं व लोकांनीं त्याबद्दल कसलीच चळवळ केली नाहीं.

या वरील मागण्या लिहून वडिलांना दाखवल्या. त्यांनीं त्या वाचून पाहिल्या. मला कांहींच उत्तर दिलें नाहीं. कांहीं वेळ अगदीं डोळे झांकून स्वस्थ पडले व मग मनाचा निश्चय करून म्हणाले. 'जा, दे छापायला. व्हायचें असेल तें होईल.' वडिलांच्या त्या बोलण्यात केवढा त्याग होता याची मला त्यावेळीं बरोबर कल्पना करता आली नाहीं.

अखेर त्या मागण्याचा अंक मी छापला. त्याच्या हजार एक प्रती अधिक काढल्या. वाटणाऱ्याला बरोबर घेऊन मी गांवांत त्या फुकट वाटल्या त्या अंकानें गांवांत फारच खळबळ उडाली. पत्राचें मरण जवळ जवळ ठरल्यासारखेंच होते.

माझ्या मागण्या केवळ एका व्यक्तींच्याच नाहींत हें दाखवण्याकरिता त्याच संध्याकाळीं रामाचे पारावर सभा भरवून त्याला जनतेची मान्यता मिळवली.

**मिरवणूक व लाठीमार.**— भगव्या झेंड्याच्या त्या पहिल्या मिरवणुकीमुळें लोकांत थोडी निर्भीडवृत्ती आली होती. याच सुमारास दिल्लीस वर्किंग कमेटीस पकडल्याची बातमी आली. त्याबरोबर शाळेंच्या मुलांनीं हरताळ पाडला. गुजरी, सराफकट्टा, शाहुपुरी, येथील बहुतेक सर्व दुकानें बंद पडलीं. बरेच लोक खासबाग मैदानांत जमले.

**मिरवणूकीवर घोडी घातली.**—वीर बळवंतराव माने यानें झेंडा मिरवणुकीस सुरवात केली. माने मात्र तुरुंगांत जाण्यासाठीं हपापलेला. शिक्षण, वाचन अगदी कमी. पण महत्वाकांक्षा व धैर्य दांडगे. त्याच्यावर कोणाचें वजन पडणेंही शक्य नव्हतें. माने यानें मिरवणुकीचा पुढाकार घेतला. त्याला पकडून ठेवलें. त्यामुळें लोक हट्टाला पेटलें. त्यानीं बैठक मारली. कांहीं लोक अंबाबाईचे देवळासमोर जमाव करून होते. बऱ्याच वेळानें लोकांना सोडताच जमाव एकत्र झाले. मिरवणूक शांतपणें गंगावेस मैदानांत आली. परवानगी मिळाल्यामुळें लोक निर्धास्त होते. इतक्यांत लोकांवर अचानक पोलिसानीं हल्ला केला. मागून घोडे अंगावर घातले. घोड्यांमुळें लोक सैरावैरा धावूं लागले. व त्या धावूं लागलेल्या लोकांवर पोलिसांनीं लाठ्या चालवल्या. बऱ्याच जणांना जखमा झाल्या. मार बसला. एकादोघांना मारामुळे डोक्यांतून रक्त वाहूं लागलें.

**मी पुढें झालो.**— यावेळीं मात्र मला मागें रहावलें नाहीं. मिरवणुकीत प्रामुख्यानें भाग घ्यायचा नाहीं असें मीं ठरवलें असूनही मी पुढें झालों. डि. मॅजिस्ट्रेट व चीफ पोलीस हे मोटारीतून जागेवर आले. त्यानांच मी विचारलें कीं हा लाठीमार तुमच्या हुकुमानें झाला काय? दोघांनीही तसा हुकूम दिला नसल्याचें सांगण्याकरितां त्यांच्याच मोटारच्या बॉनेटवर उभा राहून बोलूं लागलो. हुकुमानें लाठी चालवली नाहीं; तर झाल्या प्रमादाबद्दल पोलीसांना शिक्षा होणार की नाहीं? त्यावर शिक्षा होईलच म्हणूनही सांगितलें.

या लाठीमाराबद्दल हरताळ पाडण्याचें लोकांनीं ठरवलें—

अद्याप पोलीसांच्या शिक्षेबद्दल कांहींच समजले नव्हतें. लोकांचा राग कमी झाला नव्हता. दुसरे दिवशीं शनिवारीं राजवाड्यासमोर कॉलेजच्या आवारांत हजार दोन हजार विद्यार्थी व नागरीक जमले होते. जमावाजवळ जाण्यास पोलीसांनीं बंदी केली होती. सकाळची वेळ. महाराज जगदंबेच्या दर्शनास गेले होते. वाड्यांतून ते परत येणार म्हणून लोक मार्ग प्रतिक्षा करीत तटस्थ उभे होते. नगारखान्यांतून महाराज येतांच मी पुढें झालो व कालच्या लाठी अन्यायाबद्दल पोलीसांना शिक्षा व्हावी ही लोकांची मागणी कानावर घातली. महाराजांनी त्यांची चौकशी होईल म्हणून सांगितलें. आश्वासनाप्रमाणें लवकरच जाहिरनामा प्रसिद्ध झाला व तीन पोलीस व एक नाईक यांना काढून टाकल्याचे समजले.

**हंटर पत्रावर ५००० ची जामिनकी.**— तथापि यामुळें आमच्यावर दरबारचा राग विशेष झाला व १७–९–३० रोजीं डि. मॅजिस्ट्रेटनीं हुजूर हुकूमानें वर्तमानपत्राबद्दल साडेचार हजार रुपयांची जामिनकी भरण्याची नोटीस बजावली. पूर्वींची पांचशें रुपयांची अपुरी वाटल्यानें ती ५००० ची आवश्यक ठरवली. सदर जामिनकीची नोटीस बजावण्यापूर्वी कोणत्याही प्रसिद्ध झालेल्या लेखाबद्दल नापसंती किंवा इषारा दिलेला नव्हता.

तेव्हां एकंदर परिस्थितीचा विचार करून जामिनकी भरण्याचें रहित करून हंटर पत्र बंद ठेवण्याचें ठरवलें. पत्र बंद पडलें. पण निषेधाच्या सभेमुळें उघडलेले तोंड अद्याप बंद पडले नव्हते. व्याख्यानाचे प्रसंग

मी चुकवत नसें. बाहेर खालसा मुलखांत आमंत्रण आलें कीं जात असें. माझें असें बाहेर जाणें व व्याख्यान देणें रेसिडेंटना आवडलें नाहीं.

**रेसिडेंट लँग.**— निसर्ग चित्रकार या दृष्टीनें रेसिडेंट लँग यांचा माझ्यावर लोभ होता. मला भेटीसाठीं केव्हां केव्हां बोलावणें येई. भेट म्हणून त्यांना माझीं एक दोन चित्रेंही दिलीं होतीं. लॉर्ड आयर्विन यांना माझ्या लँड्स्केपचा एक अल्बम देण्यांत आला होता. त्याला सर्वस्वी तेच कारणीभूत होते. त्याबद्दल मला योग्य मोबदलाही देण्यांत आला. डबल कार्ड साइझ १२ चित्रांना ४५० रु. दिले. माझ्या खास चित्रांचें स्वतंत्र प्रदर्शन आयर्विन म्युझियमच्या एका हॉलमध्यें भरविण्यांत आलें होते यामुळें मी रेसिडेंटच्या वशिल्याचा माणूस समजून महाराजही केव्हां तरी रस्त्यांत भेटले तर बोलत. पण चळवळींत भाग घेतल्यामुळें सर्वच बदलले. तूं चित्रकार इकडे कशाला पडतोस म्हणून रेसिडेंटनीही उपदेश केला. पण तें वय व ती वेळ असा उपदेश ऐकण्याची नव्हती. यामुळें भेट म्हणून दिलेली पेंटिंग्स त्यांनी रागावून परत केलीं.

माझ्या एकाही भावाला माझी ही वागणूक आवडत नव्हती. माझ्या चळवळीमुळें आपलें नुकसान होणार अशी भीति त्यांना वाटत होती. संस्थानी प्रजेची एकंदर मनोरचना पाहिली म्हणजे त्यांची भीति त्या मनोरचनेला सुटून होती असें नाहीं.

**संस्थानी प्रजेची मनोवृत्ति.**— आपण कांहींही बोललों, दरबारकडे रास्त मागणी केली, राजकीय ‘ विनंतीवजा ’ चळवळींत जरी भाग घेतला, तरी दरबारला आवडणार नाहीं व आपले नुकसान होईल, अप्रत्यक्षच त्रास अधिक होईल, म्हणून प्रत्येकांच्या मनांत एक विलक्षण भीति बसून गेलेली ! कोणा एकाद्यावर होत असलेला अन्याय जर दुसऱ्या कोणी दरबारसमोर मांडला किंवा वर्तमानपत्रांतून प्रसिद्धी दिली, तर तोच उलट फिरून कानावर हात ठेवील. स्वतः नव्हे, तर स्वतःच्या भावानें केलेल्या राजकीय गुन्ह्याबद्दल आपल्यावर रोष होईल म्हणून बंधूच नव्हे तर आप्तेष्ट मित्र आणि ओळखीचे लोक सुद्धां भीत असत. अशा माणसाशीं संबंध ठेवणें त्यांना भीतीचे वाटे. याचमुळें पाहुणेपैनीं, अधिकारी स्नेह्यांनीं इतर मित्रांनीं गळ घातली, आग्रह, विनंती वगैरे सर्व प्रकार केले.

मीही तुरुंगांत जायला कांहीं हपापलेला नव्हतो. सर्वांना मान देण्याकरता म्हणून मग मी घर सोडले.

**हद्दपारी.—** माझ्यावर हद्दपारीचा हुकूम सुटला होता. तो बजावण्यापूर्वी मी बाहेर जावें म्हणून वडिलांनीं विनवणी केली. भावांनीं पाय धरले. अशाच वेळीं मी बाहेर गेल्यामुळें बऱ्याच लोकांचा समज मी भिऊन पळून गेलों असा झाला व तो दूर करता येणे मलाही त्यावेळीं तरी शक्य नव्हते.

तुरुंगांत जाण्यासाठीं मी आतुर नव्हतोही. ती गोष्ट फार भयंकर आहे असें मला वाटत नव्हते. कारण तुरुंगाची हवा पुष्कळांना मानवलेली मीं डोळयांनी पहात होतो. म्हणून कोल्हापूर सोडण्याचे, भीति हेच कारण नव्हते. विशेषतः वडिलांना या वयांत त्रास देऊ नये म्हणून मी बाहेर पडलो. त्यांच्यामुळेंच हुकुमाची अंमलबजावणी थांबली होती.

पुण्यास मी एका श्रीमान् पाहुण्याकडे उतरलो. माझी बायको मागाहून आली. मी कां आलो त्याचे बरोबर कारण अद्याप त्यांना समजले नव्हते. ते मी सरळ सांगितले. ते घराणे पूर्ण राजनिष्ठ. त्यांचे जवळचे आप्त सरकारी अधिकारी. मी किती दिवस राहणार हे नक्की असे कांहीं कळवले नव्हते. कुठेतरी कांहीं दिवस काढायचे हाच एक त्यावेळचा उद्देश होता.

**शनिवार वाड्यासमोरच्या सभेंत.—** याच सुमारास पुण्यास शनिवार वाड्यासमोर कॉंग्रेसतर्फे सभा भरली होती. ती निव्वळ पाहण्यासाठीं म्हणून मी गेलो होतो. दूर एका रस्त्यावरच्या दगडावर बसलो होतो. ती सभा पाहून मलाही बोलावेसे वाटूं लागले. मी माझे नांव एका चिठीवर लिहून बोलण्याची परवानगी मागतली. माझ्या नांवाची ओळख ज्ञानप्रकाशनें पुण्याच्या लोकांना करून दिलीच होती. माझी तोंडओळख नसली तरी नांवाची असल्यामुळें इतर व्याख्यात्यांचे भाषण पुढें ढकलून ताबडतोब मला बोलावले. उभे राहतांच मला टाळ्या मिळाल्या.

माझे भाषण लोकांना बरेच आवडले. त्या सभेंत त्यांनीं माझी स्तुति केली व त्यांनीं माझे दुसरे स्वतंत्र व्याख्यान रे मार्केटच्या आवारांत ठरविले.

ज्ञानप्रकाशनें माझे भाषण मला मोठा मथळा घालून समग्र छापलें. त्यामुळें पुण्यांत व्याख्यानासाठीं बरेच लोक मागे लागले.


कै. श्री. काकासाहेब लिमये.

**माझे राजकीय पिताजी— काकासाहेब लिमये.**— माझी कांहींही ओळख नसता माझे भाषण समग्र छापून मला प्रमाणाबाहेर महत्त्व दिल्याबद्दल आभार मानण्यासाठीं ज्ञानप्रकाशच्या संपादकांच्या भेटीला गेलों. तीच माझी त्यांची पहिली भेट. ते फार अगत्यपूर्वक माझ्याशी वागले. कळकळीचा उपदेश केला. व माझ्यावर वारंट सुटल्याची वदंता ऐकून त्यांनीं कोल्हापुरांत तूर्त जाऊं नका अशी सल्ला दिली. त्यांच्या निगर्वी, सरळ निष्कपटी स्वभावाची माझ्यावर फारच चांगली छाप पडली. त्यांच्याबद्दल माझ्या मनांत त्यावेळीं जी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली ती अखेरपर्यंत कायम राहिली. इतर कांहीं पुढाऱ्यांच्याबद्दल वाटणारा आदर पुढे टिकला नाहीं. अनुभव निराळे येत गेले. ब्राह्मणेतर ही कल्पनाही त्यांनी मला शिवू दिली नाहीं. ओळख होण्यापूर्वीच त्यांनी माझी भरपूर प्रसिद्धी केली होती. मोठेपणा आणून दिला होता. आणि तो पूर्ण निरपेक्षबुद्धीनें हे विशेष. ब्राह्मण लोक मराठ्यांना पुढें येऊं देत नाहींत, त्यांच्या चांगल्या गोष्टीना प्रसिद्धि देत नाहींत, ह्या त्यांच्यावरच्या आरोपाला मला तरी काकासाहेब लिमये हे अपवाद वाटले.

मी त्यांना माझी खादीविषयीं लिहून ठेवलेली एक लेखमाला दाखवली व ती त्यांनी न पहातांच छापण्याचें अभिवचन दिले. प्रचार-कार्य करणारा म्हणून त्यांनी मला पुढें आणलेच होते. पण लेखक म्हणूनही ज्ञानप्रकाशच्या असंख्य वर्गणीदारांस ओळख करून देण्याचें श्रेय पदरीं पाडून घेतले. यामुळे साहित्यक्षेत्रांतले पहिले पाउल लिमयांच्याचमुळें पडूं शकले.

काकासाहेबांनी मला प्रसिद्धी दिली नसती तर माझ्यांतला उत्साह खरोखरीच कमी झाला असता. प्रसिद्धीची हांव माझ्यांत फार होती. पैशाची मात्र नव्हती. त्यामुळें पुढील आयुष्यांत मला फार त्रास सहन करावा लागला. प्रसिद्धीमुळें कामास हुरूप येई म्हणून माझ्या सार्वजनिक आयुष्यांत मी लिमयांना मोठे स्थान देत आहे. पुणे म्हटले कीं लिमये प्रथम माझ्या दृष्टिसमोर उभे रहात. माझे राजकीय पिताजी असं मी त्यांना यावेळेपर्यंत मानत आलो आहे. काकासाहेब अंतकालपर्यंत मजवर प्रेमच करीत होते. ते माझं पूजास्थानच राहिलं.

**हद्दपारीतले अनुभव.—** पुण्यांत नेहमी उतरत असें त्या हक्काच्या घरीं गेलो. ते आप्तच होते. गेलो म्हणजे माझ्यासाठीं मोटार राखून ठेवीत, आदरानें वागवीत, गोडधड करून घालीत. वडिलाप्रमाणें मान देत. पण ज्या घरीं मी उतरलो होतो त्या मालकांच्या सरकारी अधिकारी आप्तांना व त्यांचे हित पाहणारे म्हणवून घेणाऱ्यांना माझे अशा स्थितीत त्या घरीं राहणे बरे वाटेना. मालकांच्या मनांत त्यावेळीं काय होते ते मला कळण्याजोगे नव्हते. तथापि त्या गृहस्थांनी माझे राहण्यानें मालकांना त्रास होण्याचा संभव आहे असें जवळ जवळ स्पष्ट भाषेंत बोलून दाखवले तेव्हां खुद्द मालकांच्याच तोंडून ते ऐकून घेण्यापेक्षां आपले निघावे म्हणून आवरते घेतले.

**कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे.—** मी व माझी बायको त्यांच्या प्रेमळ सहवासांत कांहीं दिवस राहिलो. पण माझे त्यांचे तितके जवळचे आणि सलगीचे संबंध नसल्यामुळें दिलेल्या सवलतीचा फार फायदा घेणे मनाला बरे वाटले नाहीं.

'दीनबंधू'कार नवले यांच्यात राहून सहजी भेटायला म्हणून महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांच्या भेटीस गेलो. त्यांना सारी हकीकत समजतांच फार वाईट वाटले. व त्यांनी आपल्या घरीं राहण्याचा फारच आग्रह केला. त्यांची स्वतःची स्थिती तशी चांगली नव्हती. त्यांतूनही ते वडील. मी एक तरुण कार्यकर्ता. रहायला संकोच वाटूं लागला. पण पुनः त्यांच्या भगिनी जनाबाईनी सौभाग्यवतीस घेऊन येण्याचा आग्रह धरला. तेव्हां कांहीं दिवस त्यांच्या घरीं राहिलो. या प्रसंगानें विठ्ठल रामजींचा पवित्र सहवास लाभला. त्यांच्या स्वभावांतील थोरपणा उदारपणा, त्याग, सात्विकता, निर्भयता, विद्वता, स्पष्टवक्तेपणा हे गूण प्रत्यक्ष कळून आले. त्यांचे विचार ऐकता आले. बहुजनसमाजाविषयींची आणि अस्पृश्या-विषयींची तळमळ अनुभवता आली. या प्रसंगामुळें त्यांचा माझ्यावर लोभ जडला. पुढें ते माझ्या घरीं येऊ लागले, उतरूं लागले. वाळवे ता. शेतकरी परिषदेचे मी आमंत्रण दिले ते त्यांनी स्वीकारले. मी स्वागताध्यक्ष होतो. त्यांचे भाषण त्यावेळीं समाजवादी विचारसरणीचे झाले. 'सत्य-शोधकांना इषारा' हे पुस्तक लिहले, त्याला त्यांनीं प्रस्तावना दिली. पुनः पुण्यास गेलो म्हणजे भेट घेई. अगदी शेवटच्या कालीं त्यांनी गंहिवरून मला आलिंगन दिले अन् आशिर्वाद दिला. अन्याय दिसला कीं ते जमदग्नीसारखे तुटून पडत. असा विद्वान, निष्कपटी, प्रभावी वक्ता व पुढारी मला मराठा समाजांत दुसरा भेटला नाहीं. अद्यापही त्यांची बरोबरी करणारा माणूस मला दिसत नाहीं. म्हणून पुण्यांत संकटकालीं त्यांनी दिलेल्या आसऱ्याचा मला कधीही विसर पडणे शक्य नाहीं.

**डॉ. गणपतराव धुरंधर.--** मी पुणें सोडून मुंबईस आलों. मी गणपतराव धुरंधर या माझ्या मित्राकडे जाण्याचे ठरवले. त्यांचा बरेच दिवसापासून आपल्याकडे येऊन राहण्याचा आग्रहही होता. पत्रेंही तशी आली होती. त्यांच्या वडिलांचे आणि माझे संबंधही प्रेमाचे होते. त्यानीं माझे अगत्यपूर्वक स्वागत केले. अत्यंत निर्मळ मनाचा व प्रेमळ माणूस. अद्यापही माझे त्यांचे संबंध प्रेमाचेच आहेत. पण त्यावेळीं वडील घरीं नव्हते. ते एक रावबहादुर आणि मान्यता पावलेले अधिकारी होते. त्यांनी

चांगले वागवले, मेजवानी दिली. पण बोलून दाखवले कीं, 'तुमच्यावरचे वादळ शांत होऊं द्या, मग खुशाल येऊन रहा वाटेल तितके दिवस. घर तुमचेच आहे.' गणपतरावांना यामुळें फार वाईट वाटले. त्यांनी तसें बोलूनही दाखवले. पण ते घरचे मालक नसल्यामुळें त्यांना मूग गिळून स्वस्थ बसणे भाग पडले. माझ्या राहण्यानें आपल्यावर कांहीं तरी संकट येईल, अशी प्रामाणिकच समजूत होती त्यांच्या वडिलांची. स्वभावानें ते जितके दिलदार आणि प्रेमळ होते तितकेच भित्रे होते. कारण हे वावटळ निघून गेल्यावर त्यांची वागणूक पूर्वीसारखीच अगत्याची आढळून आली. पण मला तेही घर सोडावे लागले.

नंतर दुसऱ्या एका गृहस्थांचे घरीं गेलो. तेही रावबहादुर होते. आमचे गुरुजी शिल्पकार म्हात्रे. त्यांचे हवापालटसाठीं येऊन रहा असें पूर्वी आमंत्रण आलेले होते. त्यांनी पहिले दोन दिवस जहागिरदाराप्रमाणें थाट ठेवला. संबंध फ्लॅट मोकळा करून दिला. पण मी सगळी हकीगत सांगतांच तेच स्वतः परगांवीं निघून गेले. आणि अशा प्रकारे ते ही घर मला सोडावे लागले. ही मंडळी दुष्ट होती असें मी केव्हांही म्हणणार नाहीं. आपल्या जीवाला भीत होते एवढेच. स्वतः अडचणींत पडून मित्राच्या उपयोगी पडण्याइतकं धैर्य आणि त्याग नव्हता. अन् तितका जिव्हाळयाचा मी होतो असंही म्हणता येणार नाहीं.

हा सर्व प्रकार पाहून मी निराश झालो. स्वकीयांचा नावडता, आप्तांनीं दूर केलेला, मित्रांनी त्यांचे वडील अधिकारी म्हणून नाइलाज होऊन तर कांहींनी स्वतः अधिकारी म्हणून, मला जवळ केले नाहीं. मी गुन्हेगार नव्हतो. कायदेभंगही केलेला नव्हता. शिक्षा भोगलेली नव्हती. तथापि लोकांची आणि त्यांतही खालसा मुलखांतील सरकारी संबंध असलेल्या लोकांची ही स्थिती. प्रत्यक्ष त्यांच्यावर कोणतेही संकट येण्याजोगे नव्हते. तथापि भीति दांडगी. मग खुद्द संस्थानांतले लोक माझ्यापासून कसे दूर जात होते, साप डसल्याप्रमाणे मला झाडून टाकीत होते, त्याची कल्पना येईल. यावेळची चळवळ म्हणजे सुळावरची पोळी होती.



सौ० शांता आवटी

**भगिनी शांता आवटी.**— आता यापुढें कोणाकडे रहायला म्हणून जायचे नाहीं. कुठे तरी भाड्यानें रहावे हा विचार केला. पण बरोबर बायको असल्यामुळें अडचण वाटूं लागली. पण कोठेतरी राहणे भागच होते. म्हणून मी सरदारगृहांत उतरलो. व उगीच भेटावे म्हणून शांता आवटी (पूर्वीचे आडनांव कमलाकर) या मानीव भगिनीकडे गेलो. कित्येक वर्षे तिचा माझा पत्रव्यवहार नव्हता. लग्न होऊन तिला तीन चार मुलेंही झाली होती. नवऱ्याला हजार बाराशेहे रुपये पगार होता.

मी सहकुटुंब आलो आहे व सरदारगृहांत उतरलो आहे असें सांगतांच ती माझ्यावर रागावली 'आमचे घर असता तुम्ही तिकडे कां उतरला ? जा घेऊन या वयनींना आणि मग बोलत बसा.' तिनें आग्रह धरला. त्यांत औपचारिकपणा किंवा ढोंगी शिष्टाचार नव्हता. तथापी रहायला यायचे आणि खरी गोष्ट समजली म्हणजे मग अवघड वाटायचे म्हणून प्रथमच सर्व कांहीं कळलेले बरे म्हणून इत्थंभूत हकीकत कळवली. तेव्हां ती म्हणाली 'सरकारी रोष झाला म्हणजे आप्तसंबंध कांहीं तुटत नसतात. माझ्याच मुलावर किंवा सख्या भावावर हा प्रसंग आला असता तर त्याला काय टाकून द्यायचे ? मी तुम्हाला भाऊच समजते ना ? जा उगाच कांहींतरी मनांत आणूं नका. घेऊन या वैनीना. वाटेल तितके दिवस रहा आमच्यात. अगदी कंटाळा येईपर्यंत रहा' मी म्हटलं 'ताई तूं उगाच तुझ्यावर संकट कां ओढवून घेतेस ? राजकोपांतला माणूस मी. वारंटाचा ससेमिरा माझ्या मागं लागलेला. तुझीही माणसं आमच्या संस्थानांत आहेत. त्यांच्यावर अवकृपा होईल महाराजांची ! मग गळ्यांतही घोरपड कां बांधून घेतेस ?'

' नको असं कांहीं तरी बोलूस ! वारंट आलं तर घेऊन जातील. पण तोपर्यंत माझ्या भावाला मी जागा देऊं नये काय ? तुझ्या राजकारणाचा व माझा कांहीं संबंध नाहीं व मला ते कांहीं समजत नाहीं. म्हणून माझें भावा बहिणीचे संबंध मी काय टाकून देऊं ?

ज्यांनीं त्यांनीं या ना त्या सबबी सांगून झिडकारलेल्या मला ताईचे शब्द अमृतवर्षावाप्रमाणें वाटल्यास नवल काय ? कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं. ' ताई किती ग चांगली आहेस तूं ? काय ओवाळून टाकू तुझ्यावरून ! जिवापेक्षां दुसरी कोणची गोष्ट मोलाची ! पण ती ओवाळतां येतें कुठं ? '

पण हे विचार तोंडावाटे नाहीं बाहेर पडू शकले. अश्रूंची भाषा मात्र नाहीं आवरता आली. तिचे पाय अश्रूंनी धुवून काढावेत असं झालं मला. ती मला मातेप्रमाणं पूज्य वाटू लागली. तिची आठवण काढून अश्रू गाळण्यात किती आनंद वाटतो मला. माझी बहीण ! तिच्या गोड आठवणीने या स्वार्थी जगाचा विसर पडतो ! तिची आठवण म्हणजे माझ्या आत्म्याची उन्नती ! माझ्या पावित्र्याचे स्थान ते, संकटाच्यावेळीं पावणेपैनीही थारा दिला नाहीं. ! पाण्याहून रक्त जड म्हणतात. पण तसा अनुभव मला आला नाहीं ! गणगोतांनी जवळ केलं नाहीं. निखारा अंगावर पडावा त्याप्रमाणं झाडून टाकलं ! सर्वांनी माझ्या बहिणीचा नवरा पण तसाच थोर मनाचा. कारण मी कांहीं रक्ताचा भाऊ नव्हतो. मानलेले संबंध. दुसऱ्या एखाद्या हलक्या डोक्याच्या माणसानं डोक्यांत राख घालून घेतली असती. भाऊ नसलेल्याच्या बंधुप्रेमावर विश्वास ठेवला नसता. पण त्या थोर हृदयाला कसलेच पापी विचार शिवले नाहींत. बहीण निर्मळ तसा तिचा नवराही निर्मळ ! किती उपकार त्यांचे माझ्यावर. दोघांनी आमची केवढी बडदास्त ठेवली. किती मेजवान्या दिल्या. एलेफंटा केव्हज दाखवायला नेलं. माझी ताई माझ्यासारख्याला नोकर ठेवण्याजोगी श्रीमंत, पण नोकरासारखं राबे.

* * *

ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम असेल ती व्यक्ती तर आपल्याला पूज्य असतेच. पण त्या व्यक्तीचे पाहुणेपैही आपले आणि जवळचे वाटतात.

तिचेच अगदी जवळचे नातलग आमच्या गांवीं रहात होते. वरील प्रसंगानंतर कांहीं दिवसांनी मी मुद्दाम त्यांच्या भेटीस गेलो. पदवीधर होते पण फारश्या मोठ्या हुद्यावर नव्हते. लोकांच्या दृष्टीनें त्यांच्या जागेला महत्व नव्हते. चांगलं वाईट करण्याचा अधिकार त्यांचेकडे नव्हता. त्यांचे बंगल्यावर गेलो. जुनी ओळखही होती. मला पाहतांच म्हणाले. 'काय बागल केव्हां आलात दौऱ्यावरून ? मीही यावं म्हणतो तुमच्या-बरोबर. एक प्रचारक म्हणून.' मी म्हटले 'ठीक आहे. जाऊ केव्हां तरी. पण ते आयुष्य नाहीं परवडणार तुम्हाला. आमच्यासारखी तुमची गत होईल. आहे तुमची तयारी वारी करायची ?'

'वारी ? आता नाहीं वारी येणार तुमच्यावर. अक्कल होती कां त्या शाहण्यांना ? खर्डेघाशीवरसुद्धा कोणी ठेवलं नसतं त्यांना भलत्या जागा मिळाल्या. जणु स्वर्गच हाती आला त्यांच्या. मग कां नाहीं डोळे फिरणार ? तुम्हाला तुरुंगांत टाकायची तरी जरुरी होती कां ? मागण्या तरी अशा काय भयंकर होत्या ! संपलं त्यांचं राज्य !' ते पुढे म्हणाले 'अधिकार ही एक दारु आहे. सत्तेचा मद चढला कीं माणुस-कीला जागा रहात नाही. मग कसा माणुसपणा राहणार त्यांच्यात ! आकाश ठेंगणं झालं होतं त्यांना ! ते करतील ती पूर्व दिशा. मग गांवचे लोक कुठल्या झाडाचा पाला ! आता कोण विचारत आहे त्यांना. आता आहेत कां ते तुरुंगांत घालायला ?' मी म्हणालो. 'ते गेले दुसरे येतील. राजकीय कार्यकर्त्यांना सगळे सारखेच ! एका माळेचे मणी !'

* * *

या आमच्या भाषणानंतर कांहीं काल गेला. दुसऱ्या राजवटीला सुरवात झाली. आणि आश्चर्याची गोष्ट याच ताईच्या नातलगास संस्थानांतील श्रेष्ठ अधिकाऱ्याची जागा मिळाली ! मी तर आनंदानें बेहोष झालो. या बातमीचं वर्तमानपत्र हातांत घेऊन खोलींत उड्या मारू लागलो बायकोला तेथूनच मोठमोठ्याने हांका मारू लागलो.

"अग ए ! अग ए ! आधी इकडे ये पाहू ? आलीस कां ? हे पहा. वाच; ताईचा आपला हा...... केवढ्या मोठ्या जागेवर आला माहित आहे ?"

मी नोकराला हांक मारली. ' रामू इकडे ये पाहू. एवढी तार करून ये अगोदर—' बायको हंसू लागली. ' असं काय करताय अगदी खुळयासारखं ? रामूनं कधी केली आहे कां तार आतापर्यंत ? त्याला काय समजणार त्यातलं. अन् तार कशाला करायची ? ते कां परगांवीं आहेत ? माणूसच पाठवा म्हणजे झालं! आमचे गणपतराव—दम्मा जातील. '

लगेच मी पत्र खरडलं ! खूप खूप अभिनंदन केलं. आणि आशा प्रकट केली. कीं आता आमच्या संस्थानचं भाग्य उदयाला येणार !

' आता ग काय. सत्याग्रह आणि तुरुंग संपला. आता त्यांचा हात धरून कामं करून घेईन. तिला पण तार केलीच पाहिजे. ताईपण राहील त्यांच्याचकडे. ' ही बडबड चालली आहे इतक्यांत दारांत पोस्टमन आला. पाकीट पाहतो तो हस्ताक्षर ताईचंच. घाईघाईनं फोडलं तो काय ' आपण कांहीं दिवस राहण्याकरता म्हणून सगळी मुलेबाळें व मंडळी येणार आहोत...... यांच्याचकडे उतरीन. आल्यावर तुझी गांठ घेईन. '

माझ्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. दुसऱ्या दिवशीच मी तिच्या आता मोठ्या अधिकारावर आलेल्या—आप्तांच्या घरीं गेलो. त्यांनाही ताई येणार असल्याचे पत्र आले होते. ताईविषयीं विचारपूस झाल्यानंतर मी त्यांना म्हणालो, ' आता तुम्ही मोठ्या जागेवर आला आहात. गेल्या अमदानीतील सगळा बदलौकिक आता तुम्ही धुवून काढला पाहिजे.'

कां कोण जाणे पण मला त्यांच्यांत एकदम बदल झाल्याचा भास झाला. मी त्यांना त्यांच्या नांवानेच हांक मारीत होतो. याही खेपेस नेहमीप्रमाणेच ते घरचं नांव घेऊन बोललो. पण त्यानें त्यांच्या कपाळयाला आठ्या पडल्या. ते म्हणाले,

' मिस्टर बागल तुम्ही नांवानें मला हांक मारीत जाऊ नका बरं कां. पूर्वीच्या अमदानीतील घाण काढायची तर खरीच. पण ती एकदम कशी जाणार ! होईल अस्ते अस्ते. संस्थान आहे हे ! राजकीय हक्क स्वीकारण्याची लोकांत तरी पात्रता कुठे आहे ! मला तरी असं वाटतं, आज हिंदुस्थानला ' स्ट्रॉंग रुलरचीच ' खरी अवश्यकता आहे.'

मी घरीं निघालो. मण माझं मन अस्वस्थ झालं! मी नांवानं संबोधणं आता त्यांना अपमानास्पद वाटावं ! हे जवळचे नाते त्यांना आता नको झाले. आणि विचारांत पण किती बदल झाला हा !

* * *

ताई आली. ताई, ताईची आई व नवरा माझ्या घरीं जेवायला आले. मीपण ताईला भेटायला जाऊ लागलो. आई तर केव्हां केव्हां चालतच येत. त्या एकदा भीत भीत म्हणाल्या ' बाबुराव सांगायला मला दुःख होतं... म्हणाले बागलांनी यावेळीं माझ्या घरीं न येणं बरं. महाराजांना व रेसिडेंट साहेबांना हे आवडणार नाहीं ' ( ताईच्यामुळें हा पुढचा प्रसंग आठवला म्हणून येथे दिला पण ही पुढची गोष्ट )

* * *

**शंकरराव पारकर.**—ताईच्या घरीं राहिल्यावर मुंबईतील माझ्या दुसऱ्या वर्गबंधू शंकरराव पारकर यांना ' मी आलो आहे, सहकुटुंब आलो आहे, ' एवढं कार्ड टाकलं. हातीं पडतांच तो धांवत आला. घरीं नेण्यासाठीं मोटार घेऊनच आला. त्यांनाही मी माझी परिस्थिति कळवली. ' मग मीही त्याचपैकीं समजता काय तुम्ही ?' असें म्हणून त्यानें माझी चांगलीच कानउघाडणी केली. पण शांताबाई परवानगी देईनात. ' आलेत तर कांहीं दिवस तरी आमचे येथे राहू द्या. मग न्या, ' म्हणूं लागल्या. तेव्हां कांहीं दिवस बहिणीकडे काढून मी शंकरराव पारकर यांचेकडे गेलों. त्यांनी मला रेवदंड्यास नेले. आपला एक सुंदर हवेशीर बंगला मोकळा केला. तैनातीस नोकर दिला व आमची राजासारखी बडदास्त ठेवली.



शंकरराव पारकर

उत्कृष्ट हवा. स्वादिष्ट जेवण, पाम्प्लेट मासे. शाळीचे पाणी. कोंवळं कोंवळं खोबरं हा रोजचा खुराक. समोर सुंदर देखावा. फिरायला समुद्रकांठी जावे व घरांत बसून वाटेल तेवढी पेंटिंग्स समोरच्याच देखाव्याची काढत बसावीत! यामुळें बायकोची प्रकृति सुधारली, संध्याकाळची व चांदण्याची कितीतरी चित्रें काढली, अशा गोड पाहुणचारांत अज्ञातवासाचा लोभनीय काल घालवला.

याच विसाव्याच्या कालांत माझी विचारक्रांति घडून आली. मी सोशालिस्ट मताचा बनलों.!

दोन वेळ सुखानें सुग्रास जेवण. सकाळ दुपार चहा व फराळ. आरामखुर्चीत कुमारी सिगरेटच्या चुंबनसौख्याची लूट करीत, ऐषआरामांत दुसऱ्याच्या कष्टावर यथेच्छ ताव मारीत, श्रमजीविवर्गाच्या दुःखाचा अभ्यास केला! परोपजीवी तर मी जन्मापासूनचा. आणि अद्यापही आहेच. पण त्या वेळच्या अभ्यासानें माझ्याकडे पहाण्याची माझी दृष्टि मात्र साफ बदलून गेली. आत्मपरीक्षणाची संवय लागली. माझे व माझ्या वर्गाचे दोष, त्यांची पापें मला स्पष्ट दिसूं लागलीं. शेतकऱ्यांच्या जीवनावर निराळा प्रकाश पडला. कामकरीवर्गाबद्दल मनस्वी आदर उत्पन्न झाला. तितकाच माझा व माझ्या वर्गाचा तिटकारा येऊं लागला.

पुण्यास उतरलों होतों त्यावेळीं मला विलायतेस जाऊन आलेल्या दिनकरराव जवळकरनी 'सोशालिझमच्या' पुस्तकांची मोठी यादी दिली होती. मी प्रथम 'इन्टेलिजंट वुमन्स गाइड टु सोशालिझम्' या पुस्तकानें सुरवात केली. भाषा फार सोपी, मांडणी नवशिक्याला समजण्याजोगी, यामुळें त्या तत्त्वाची साधारण कल्पना चांगली आली. यापुढें इतर पुस्तकें जड गेली नाहींत. 'कार्ल मार्क्स' कांहीं ठिकाणीं फार क्लिष्ट वाटला. रसेल व वेब यांचे ग्रंथ आवडले. लॅस्की—वेल्स—लेनिन, बुखारिन वगैरेंचे पुष्कळ ग्रंथ वाचले. त्यांची यादी बरीच मोठी होईल. सोशालिझम खेरीज मात्र कोणचेही दुसरें पुस्तक हातांत धरलें नाहीं. बहुधा मी एखाद्या विषयावर लिहायला किंवा वाचायला सुरवात केली म्हणजे तींच पुस्तकें दुसऱ्या विषयाला सुरवात करीपर्यंत वाचत असें. मग दुसरा

विचारही करायचा नाहीं. डोक्यांतही तेच विचार यामुळें स्वतंत्र विचारही पुष्कळ येऊं शकले.

मी स्वतः शेतकऱ्याकडून मिळणाऱ्या खंडावर व कर्जावर जगणारा. यावेळीं छापखान्यापुरता मजुरांचा मालक होतो. अधिकाऱ्याचा मुलगा. इनामदारांचा स्नेही. बड्या रावसाहेब रावबहादुरांच्यांत नेहमी मिसळून असणारा. यामुळें या लोकांच्या गुणदोषांची, या पुस्तक वाचनानें मला चांगलीच छाननी करतां आली. अनुभव तर पूर्वींपासूनचाच होता, पण दृष्टि मिळाली नव्हती. आतां मला नवा चष्मा मिळाला. त्या नव्या विचारांची सत्यता पटूं लागली. यानें माझ्या श्रीमंती संवयीं गेल्या नाहींत. पण मन मात्र बदलेले. मी पूर्वीचा राहिलो नाहीं. अधिक विचार करूं लागलो.

माझ्या निषेधाच्या सभेनें मला वाणी दिली व या अज्ञातवासानें मला नवा दृष्टिकोन दिला. यामुळे ज्या लोकांनी अडचणीच्या वेळीं मला थारा दिला नाहीं त्यांचा मला आता राग येत नाहीं. त्या ठराविक परिस्थितीचे ते गुलाम होते. त्या ठिकाणीं मी असतो तर कदाचित् तसेंच केले असतें.

हिंदुस्थानचे तसे जगाचे दारिद्र्य जायचे असल्यास, बेकारी नाहीशी व्हायची असल्यास, गुलामवृत्ति जायची असल्यास, 'सोशालिझम' हाच एक खरा व प्राणाणिक उपाय आहे. इतर सर्व उपाय निव्वळ काल पुढें ढकलणारे व मूलतः चुकीचे, बऱ्याच वेळीं अप्रामाणिक असतात असें माझें मत बनले.

बोलतांना, समाजाकडे पाहतांना व व्याख्यान देतांना, तसेंच लिहितांना, हे विचार आल्याखेरीज रहात नाहींत. या पवित्र धर्मासाठीं घरादारावर तुळशीपत्र ठेवून वाहून घ्यावे व हिंदुस्थानचा कोनाकोपरा जागा करावा असें वाटे. आणि या विचारसरणीनें प्रेरित होऊन मी लिहायला सुरुवात केली.

**सोशालिझम व सत्यसमाज.**— सत्यशोधक समाजाची तत्वें समतेला पूर्ण अनुकूल अशीच मला वाटली. ब्राह्मणद्वेषाचा आरोप त्यावर कांहीं व्यक्तीमुळें जरी केला जात होता, तरी कोणत्याही वर्गाचा द्वेष करावा असें सत्यशोधक समाजाचे कांहीं ध्येय नव्हते. सत्य आणि समता या

आड येणाऱ्या व्यक्तीविरुद्ध सत्यशोधक समाज आहे व तशीच त्याची तत्वें आहेत असें पूर्ण विचारांती मला वाटूं लागले. तेव्हां याच समाज-तर्फे 'सोशालिझमचे' विचार मांडणें मला योग्य आणि सोईचें वाटलें. सोशालिझम व रशिया यांची सांगड असल्यामुळें ते कांहीं तरी भयंकर असंभाव्य मत आहे अशी बऱ्याच लोकांनी आपली त्या विषयीं विचार न करतां समजूत करून घेतली आहे व कांहीं जाणून बुजून या तत्वाबद्दल गैरसमजही करीत आहेत. 'सत्य आणि समता या पवित्र तत्वासाठीं व ते तत्त्व व्यवहारांत आणण्यासाठींच सोशालिस्टांचा प्रयत्न आहे. सत्य-समाज त्यासाठींच अस्तित्वांत आहे. यासाठींच मी सत्यशोधकांना 'इशारा' ही लेखमाला लिहायला सुरवात केली.

**घरीं परत निघालो.—** कोल्हापुरांतली चळवळ आता पूर्ण थंडावली होती. वातावरण शांत झाले होते. घरीं येण्याबद्दल मला वडिलांचे पत्र आले. वडिलांना केव्हां पाहीन असें झाले होते मला. कारण परिस्थितीमुळें ते माझ्यावर कितीही रागावले, तरी वडिलांच माझ्या-वर प्रेम तर होतेच. माझ्याबद्दल व अभिमान, आदरही वाटत होता त्यांना. स्वतः नखशिखांत खादी वापरीत होते. मनांत तळमळ दांडगी होती. माझ्या रागीट व अविचारी स्वभावामुळें त्यांचे माझे पुष्कळ वेळां खटके उडत. पण आपली चूक कबूल करण्याचा थोरपणा त्यांनीं दाख-वला आहे. वडील इतक्या उतार वयाचे झाले, तरी त्यांचे अंतःकरण मुलासारखे प्रेमळ असें. त्यांच्यापासून दूर राहिल्यानंतर त्यांचे गूण विशेष दिसूं लागले मला.

पत्र आल्यानंतर मी निघण्याच्या तयारीस लागलो. शंकरराव पारकरनी बायकोस लुगडें चोळी-खण घातले व रेवदंड्यापासूनचे तिकीटही काढून माझ्या हातीं दिले. मुंबईपर्यंत बरोबर आले. मुंबईत पुनः एक दोन दिवस बहिणीच्या घरीं राहिलों. पुण्यास एक दोन दिवस 'दीनबंधू'कार नवले यांचेकडे राहून गुरुवर्य विठ्ठल रामजी शिंदे यांची गांठ घेण्यास गेलो. ते तुरुंगांतून सुटून आले होते. त्यांनीं आग्रहानें आठ दिवस घरीं ठेवून घेतले. मी पाहुणा आहे ही कल्पनासुद्धां त्यांनीं मला येऊं दिली नाहीं. माझी लेखमाला 'सत्यशोधकांना इशारा' त्यांनीं वाचली. त्यांना ती फार आवडलीही व त्याला प्रस्तावना देण्याचें त्यांनीं कबूल केलें

कोणालाही वांकून नमस्कार करणें मला बेरें वाटत नाहीं. पण गुरुवर्यांचे पायाला हात लावून नमस्कार करतांना माझी मानसिक अधोगति होत आहे असें मला केव्हांच वाटलें नाहीं. स्वभाव प्रेमळ तसाच तापटही होता. भोंदूपणाची त्यांना फार चीड येई. आपला राग ते मनांत राखून ठेवीत नसत. यामुळें पुष्कळांना त्यांची भीति वाटे. पण सत्य हें गोड आहे तसंच भीतिप्रदही आहे. असत्य आचरण करणाऱ्यांना ती व्यक्ति अप्रियच असते.—

जातांना ज्या पाहुण्यांच्या घरीं उतरलो होतो, त्यांची मोटर आतां बोलवण्यास आली. त्यांचेकडेही गेलों. नंतर कोल्हापुरची वाट धरली.

**घरीं आलो.**— मी कोल्हापुरास परत आलो. पण पूर्वीचे कोल्हापूर आणि आतांचे कोल्हापूर यांत बरेच अंतर दिसूं लागले. लोक माझ्याकडे टकमक पहात. बडे लोक गाडीतून परतून पहात. खालच्या वर्गात स्नेही नव्हते. मी आल्याबरोबर सहजीं गांठ घ्यायला म्हणून पूर्वीच्या एका अधिकारी स्नेह्याकडे गेलो. तेथें दुसरे ही कांहीं आधिकारी होते. मला पाहून त्यांचा एकमेकास विद्युत्संदेश सुरूं झाला. त्या मित्रालाही मी केव्हां घरांतून बाहेर जाईन असें झाले. तसे बोलण्याची मात्र छाती झाली नाहीं; आपल्या घरीं महाराजांना मी दिसलो तर आपण गैरमर्जीत जाऊ ही भीती.

मनांत तिटकारा नव्हता. कांहींचे तर मनांतून माझ्यावर प्रेमही होते व अद्याप आहे. पण भीतीमुळें माझ्याशी संबंध ठेवणे त्यांना बेरें वाटेना. त्यांच्याकडून मला फायदा करून घ्यायचा नव्हता. जाऊन मला कांहीं मिळायचे नव्हते. त्यांना मात्र त्रास. हे जाणून मी त्यांच्याकडे जाणेयेणे अजिबात टाकून दिलें. घरीही माझ्यावर तसे प्रेम करणारे वडील पण वडीलपणामुळें एक प्रकारचा संकोच राहतो. त्यामुळें इतर बंधूशी उघड्या मनानें व मित्राप्रमाणें वागणे शक्य नव्हते.

**चळवळीचा परिणाम.**— पत्र बंद पडल्यानंतर वडिलांच्या वकीलीवर विशेष परिणाम झाला. प्रॅक्टिस फार कमी झालें. जनसेवा व राजप्रेम दोन्हीही साधणे कठीण असते. ते साधणारे मला अप्रामाणिक, स्वार्थी, काल पाहून स्वतःचा फायदा करून घेणारेच दिसले.

ज्या गांवीं आमची सावकारी होती, त्या गांवच्या उठाठेवी लोकांनी या परिस्थितीचा फायदा घेतला. वडिलांनी ज्याच्यावर खंडोगणती उपकार करून ठेवले होते त्यांनाच आमचा मत्सर वाटत होता, हे या प्रसंगानें उघडकीस आले. चळवळीच्या वेळीं आमच्याबद्दल वाटेल त्या खोट्या बातम्या उठवल्या. आमच्या घरादाराला कुलूप लागले. आम्ही सर्व खालसा मुलुखांत निघून गेलो, आमचे घरदार जप्त झाले. अशा अफवा सारख्या उठवून गांवांतील बोज घालवण्याची शिकस्त केली. त्याचवेळीं वसूली करणाऱ्या एका गुमास्त्याची मिरास जमीन सरकारनें काढून घेतल्यामुळें ते कारणही दाखवता आले. आमच्यावर सरकारी रोष आहे. त्याचा फायदा घ्यावा म्हणून आमच्या भाऊबंदानें आमच्या जमिनींत शिरून तिचा ताबा घेतला. त्यासाठीं मग रीतसर काम चालवावें लागलें.

पत्र बंद पडलें होतें. ते परत चालू करण्याची इच्छा फक्त माझ्यांत होती. पण घर उलट होतें. उलट छापखाना विकावा हीच इच्छा दिसली. फुरसतीच्या वेळीं गप्पा मारण्याजोगें ठिकाण उरलें नव्हतें. कारण चळवळीमुळें पूर्वीचे मित्र तुटलेले. आणि मीही कोणाकडे जायचें नाहीं असें ठरवलें होतें. चित्रकलेकडचा ओढा बराच कमी झाला होता. यामुळें लेखन आणि वाचन हें एकच साधन काल घालवण्याचें हातीं राहिले.

**माझे लेख.**— माझे लेख मी संस्थानबाहेरच्या पत्रांत द्यायला सुरवात केली. विजयी मराठ्यांतून मी सत्यशोधकांना इषारा ही लेखमाला सुरू केली. महाराष्ट्र, दीनबंधू, जनता यांतूनही लेख येत होते. समाजसत्ता की भांडवलशाही, यांची तुलनात्मक लेखमाला चित्रमयजगत्-मधून येऊं लागली. कांहीं मासिकांतूनही लेख चालूंच होते. यावेळचे बहुतेक सर्व लेख सोशालिझमवरचेच होते. चित्रमयजगत्मधील या लेखाबद्दल सयाजीराव महाराजांनीं पत्र पाठवून प्रोत्साहन दिलें. अशा प्रकारें माझा लेखनव्यवसाय जोरांत चालला होता. डी. एस्. जाधव नांवाचे एक विद्याव्यासंगी अधिकारी स्नेही केव्हां केव्हां या विषयाची माझ्याशीं चर्चा करीत. त्या चर्चेचा मला पुष्कळ फायदा होई. ते पुरे नास्तिक बनलेले होते. आमच्या एकमेकांच्या विचारांचा परस्परांवर परिणाम होत असे. चुकाही समजत.

या चाललेल्या आयुष्यक्रमांत एकदम विघ्न आलें आणि निराळया अनुभवाला व आयुष्यक्रमाला सुरवात झाली.

**जीवनांत पालट.**— आतापर्यंतच्या आयुष्यांत मला घरचा त्रास कसलाच नव्हता. कसली काळजी नव्हती. जबाबदारी नव्हती. आर्थिक अडचण कधीं भासली नाहीं. पोटाचा प्रश्न कधीं उभा राहिला नाहीं. वडिलांनी मिळवावें व मी सुखानें खावे. अद्यापही त्याच पैशावर जगतो आहे. त्यावेळीं पसतीस वर्षांचें वय असेल माझे. पण वडिलांनी प्रपंचांतली जबाबदारी माझ्यावर न टाकल्यामुळें एखाद्या अल्लड मुलाप्रमाणें स्थिति होती माझी. हातांत पैसा पडल्यास मी उधळून टाकीन या कल्पनेनें वडील तिजोरीच्या किल्ल्या मजकडे स्वाधीन करायला धजत नसत. यामुळें मी अगदी व्यवहारशून्य बनलो होतो. साधा प्रपंचाचा बाजारहाट करण्याची अक्कल नव्हती. बाजारांत जाऊन जोंधळे कसा तोळा मागावेत व भाजी कशी शेर मागावी हे ज्ञान मला नव्हते आणि नाहीही. ही कामें हलकी, दर्जास कमीपणा आणणारी वाटत. शेतकरी मजुराबद्दल आदर उत्पन्न झाला असला तरी त्यांची कामें करण्याइतकी मजल गेली नव्हती. विचार आणि वागणूक यांत साम्य नव्हते. एखादे लहान बोचकेंसुद्धां रस्त्यावरून न्यायला लाज वाटे व ती लाज अद्यापही गेलेली नाहीं. माझी सावकारी किती आहे, इस्टेट किती आहे, याचीही कधी मी पंचाईत केली नव्हती. सावकारी जमाखर्च कारकून पाही, गुमास्ता वसूल करून आणी. नोकर इतर सर्व कामें करीत. अगदी परावलंबी जिणं होतं माझं.

हीच स्थिति अधिक केविलवाणी होण्याचा दुर्धर प्रसंग माझ्यावर आकस्मिक ओढवला आणि त्यानंतर आयुष्यांतील एका निराळया अंकास सुरवात झाली.

* * *

**वडिलांचा आधार तुटला**— दुपारी जेवून आरामखुर्चीत बसलो होतो. जवळच तुकारामाची गाथा टेबलावर पडली होती. सहजी मी ती हातांत घेतली. आणि उघडली. तो काय ? उघडलेल्याच पानावर एक अभंग. त्यावर वडिलांनी आपल्या नेहमीच्या तांबड्या पेन्सिलीनें केलेली खूण !!! अभंग वाचला आणि छातीत चर्रर् झाले !

बाप मेला न कळता । नव्हती संसाराची चिंता ॥

हीच ती भयंकर ओळ !

पुस्तक घेतो काय, उघडतो काय आणि उघडतांच निघालेल्या पानावर पाहतो काय! आणि त्याच अशुभ ओळीवर वडिलांचीच हातची खूण असते काय ! सर्वच चमत्कार! मला पुढची ओळ दिसली नाहीं! बसल्या जागीच चक्कर आल्याप्रमाणें झाले. पुस्तक रागानें फेंकून देऊन देऊन मी डोळे घट्ट मिटले. उडूं लागलेली छाती हातानें दाबून धरली. कुठं तरी खोल अंधारांत जात आहे असा भास झाला.

इतक्यांत धाकट्या भावाच्या बायकोची 'मामासाहेब' म्हणून मोठी किंकाळी ऐकूं आली. घाबरून जिन्याच्या चार चार पायऱ्या टाकीत वर गेलो तो काय ! आबा झोंपीं गेलेले. डोळे मिटलेले !

'अगं असं काय ! ते झोंपीं गेलेत आणि असं ओरडायला काय झालं !'

'नाहीं झोंपीं गेलेले, नाहीं ! ते गेले ! ते आम्हाला सोडून गेले! ते बोलत नाहींत ! त्यांचे डोळे बघा !'

एकाहून एक शाहणे डॉक्टर धांवून आले. त्यांनीं करायचे ते केले. पण आबा शुद्धीवर आले नाहींत ! आबा माझ्याबरोबर बोलले नाहींत ! आबांचे डोळे जगाचा निरोप घेत होते !! मी आबांच्या पार्थिव देहाकडे पहातच राहिलो. माझें डोळे सताड उघडे राहिले. मी वेड्यासारखा सर्वांकडे पहातच राहिलो. मला माझ्यापुढे काय चाललें आहे ते समजेना, मी कुठं आहे ? हे काय आहे ? मी भ्रमिष्ट झालो. माझ्या डोळ्यांतले पाणी आटून गेलं. रडं बंद झालं. तारवटल्यासारखा मी कुणीकडे तरी अर्थशून्य पहात होतो. डोळे उघडे पण कांहीं दिसत नव्हतं. भावनाशून्य जिवंत प्रेत झालो होतो मी !! कांहीं वेळ गेला ! मी शुद्धीवर येऊं लागलो. मला समजूं लागलं. बाबांचा हालचाल न करणारा देह पाहून मी अशी भयंकर किंकाळी फोडली कीं आकाशांत देव असता तर त्याच्या कानीं ती हांक पोचली असती, आणि तो धांवून आला असता. त्या देवाला ती हांक ऐकू गेली नाहीं. माझ्यासमोर निश्चेष्ट पडलेल्या बाबांनाही ती हांक ऐकू गेली नाहीं—!

मी निरधार झालो! जगांतला माझा एकुलता एक आधार नाहीसा झाला. मोठ्यांतल्या मोठा आधार नाहींसा झाला. मी पोरका झालो. मातृप्रेमानंतरचा माझा उरलेला धागा तुटून गेला! ते बाबांना नेऊं लागले. मी त्यांच्या आड आलो. बाबांचे पाय मी घट्ट घट्ट धरून ठेवले! नाहीं! मी नाहीं माझ्या बाबांना नेऊं देणार! नका नेऊं त्यांना आमच्या घरांतून, म्हणून मी हंबरडा फोडला! पण माझ्याच आतेष्टांनी मला बाबांच्यापासून ओढून काढलं! मी आकाश-पाताळ एक केलं! गडबडा लोळूं लागलो! नको हा जीव! माझे बाबा गेल्यावर माझं जगांत आता कोण आहे, म्हणून भिंतीवर धाडकन् डोकं आपटलं. पडदी पडली पण डोकं शाबूत राहिलं. माझा प्राण गेला नाहीं! बाबा परतून आले नाहींत.

भाग्यवानांचं मरण लाभलं माझ्या बाबांना. त्यांनी कांहीं अंथरुण धरलेलं नव्हतं. जेवून गाईला घांस घालून आले होते. भाविक लोकांनी हेवा करावा बाबांच्या मरणाचा. काशीरामेश्वर करून आले होते. नोकरी करून वानप्रस्थापनेच्यावेळीं जनसेवेला लागले होते. मुले सर्व मोठी झाली होती. बोलता बोलता बाबा निघून गेले! त्यांना पाहिजे होतं तसं सुखाचं मरण लाभलं माझे बाबा होतेच तसे पुण्यवान्! जनसेवेलाच वाहून घेतलं होतं त्यांनी.

अगोदर दरिद्री पण स्वकष्टानें लक्षाधीश झाले. पण दारिद्य्र विसरले नव्हते. साधे दोन कोट, झोंपायला खाली-वर घोंगडी. आम्हाला मात्र कांहीं कमी पडूं दिलं नाहीं. जहागिरदारी थाट आम्हा मुलांचा! वयानं मोठा असलो तरी अल्लड मुलाप्रमाणं वाढलो होतो मी!

इतर भावाकडे मी अद्याप पाहिलें नव्हते. एक भाऊ डोकं खाली घालून रडत बसलेला पाहून, 'अरे भाऊ!' म्हणून मी टाहो फोडला. 'भाऊ! बाबा कुठे आहेत, ते बोलत कां नाहीत; ते कां रागावलेत! भाऊ तूं तरी बोलव–' दुसरा कोपऱ्यांत डोकं घालून हुंदके देऊन रडत होता. धाकटाही खुळयासारखा करूं लागला! बाबांचा आधार नाहींसा होतांच आम्ही एकमेकांचा आधार घेऊन परस्परांच्या गळीं पडून ओक्साबोक्शी रडूं लागलो. त्या पितृदेवासाठीं वाहूं लागलेल्या गंगेनं आमचं किंचित्सं

शांतवन केलं. आमचे विभक्त जीव त्या पवित्र अश्रुसिंचनानें जणुं एकजीव झाले! एक रक्त तर आमच्यांत वहात होतंच. पण देहाचा विभक्तपणाही जणुं नाहींसा झाला आमचा! बंधुप्रेमाचा पवित्र झरा दुथडी वाहूं लागला. स्मशानभूमीवर बरीच मंडळी आली होती. अंमलदार होते. वकील होते. दहनावेळीं कांही बोलले. मी पण बोललो.

' वडिलांची इच्छा प्रजापरिषद् स्थापन करण्याची होती. तुम्हा सर्वांनी साहाय्य केल्यास ती वडिलांची इच्छा पुरी करण्याचं सामर्थ्य माझ्यांत येईल. '

वडिलांच्या मृत्यूनें माझ्या वृत्तीत बराच फरक पडूं लागला. मला जग शून्यवत् वाटूं लागलं. माझा कल पूर्वीपासूनच जनसेवेकडे थोडाबहुत असल्यानें माझ्यांत संन्यस्त वृत्ति उत्पन्न होऊं लागली. संसारापासून अलिप्त होण्याची वृत्ति वाढूं लागली. दोनवेळां खायला मिळाले आणि अंग झांकण्यापुरते कपडे मिळाले म्हणजे पुरे असें वाटूं लागले.

सर्व आयुष्य देशसेवेला घालवावें हीच एक महत्त्वाकांक्षा होती. पैसें मिळवावेत, वडिलांच्या इस्टेटीत अधिक भर घालावी, एखादा धंदा काढावा किंवा कोठेतरी नोकरी करावी, असें वाटत नव्हते. ज्यांच्या श्रमावर जगतो त्या शेतकऱ्यांची सेवा करण्याचे मनानें तरी मी योजले प्रपंचाकडे मीं पहात नसें आणि पहाण्याची अंगीं योग्यताही नव्हती माझ्या.

**राजेभोसल्यांचा उपदेश.**— पण माझे हे करणे माझे स्नेही राजेभोसले यांना अगदी पसंत नव्हते. माझे बऱ्याच दिवसाचे स्नेही होते ते.

मी एकटाच आहे असें पाहून त्यांनीं बोलणं काढलं. राजकारण! तुमच्या आमच्या सारख्यांच्या या गोष्टी नव्हेत. राजकारणांत पडणाऱ्यालासुद्धा गाडगेबोवा सारखा संसाराचा त्याग करायला पाहिजे. प्रत्येक उठून मी ' गाडगेबोवा ' होऊं म्हणूं लागलो तर ते शक्य नाहीं. '

' कां नाहीं होता येणार ? ' मी म्हणालो. ' ते पण आपल्यासारखेच मनुष्य आहेत. त्यांनीं तरी प्रपंच कुठं टाकलाय. त्यांनी आपल्या प्रपंचाची मर्यादा वाढवली आहे एवढेच. ' आज मी ऐकण्याच्या स्थितीत नाहीं असें वाटून त्यांनीं मग विषय बदलला.

ते निघून गेल्यावर मी गाडगेबोवांचा विचार करूं लागलो. त्यांची निरपेक्षसेवा सर्व महाराष्ट्राच्या परिचयाचीच होती. मी त्यांना प्रत्यक्ष असें कधीच पाहिले नव्हते. कीर्ति ऐकली होती. मात्र त्यांचेच विचार रात्रभर मनांत घोळत होते. स्वप्नांतही तेच.

‘ काय, आपल्यालाही प्रपंचाची माया टाकता येणार नाहीं काय ? गाडगेबोबांचा त्याग थोडासुद्धा आपल्यांत येणार नाहीं काय ? ’ याच विचारांत डोळा लागला.

**गाडगेबोवांचे दर्शन.**— आश्चर्याची गोष्ट ! बाराचे सुमारास वडील गेले तीच वेळ ! दुसरेच दिवशीं गाडगेबोवा दारांत उभे.

गाडगेबोवांचे येणे जाणे केव्हांच नव्हते. पूर्वी कधीं आलेले नव्हते. आले ते थेट माडीवर गेले. आबा वारले त्याच ठिकाणीं जाऊन बसले. तीच खिडकी उघडली. आम्हा सर्वांना बोलावलं आणि आबांनीच जणु शेवटची इच्छा बोलून दाखवावी त्याप्रमाणे ते बोलले.

‘ तुम्ही एकत्र आहात, फार चांगले आहे. तुमचं घराणं नांव-लौकिकाला आलं आहे. तो लौकिक राखा. एकोप्यानें रहा. आणि वांटणीचा प्रसंग आल्यास कोर्टाची पायरी चढूं नका. ’

वांटणीची कल्पना माझ्या ध्यानीमनी नव्हती. हा उपदेश ऐकून मला हंसू आले.

या गाडगेबोवांच्या भेटीचे गूढ मी उकलू शकत नाहीं. या अशा गोष्टी कशा घडतात याचे उत्तर देणे मला कांही शक्य नाहीं. पण घडतात एवढे खरें. ज्यांची माझी फार मैत्री आहे अशा एक दोन स्नेहांच्या बाबतीत असेंच घडून येई. आमची पत्रें नेहमीं एकाच दिवशीं एकमेकांना पोचून, त्या पत्रांत विचारल्या प्रश्नाचीं उत्तरें त्यांच्या पत्रांत असावीत. माझ्या एका अत्यंत जिवलग स्नेह्यासंबंधी कांहीं कळावे ही भयंकर तळमळ लागून राहिली होती मला. म्हणून त्याची माहिती काढण्यासाठीं दुसऱ्या एका स्नेहाला लिहिले. तर वर्षानुवर्षे गांठी न पडलेला माझा तो स्नेही पत्र पोचले त्याच दिवशीं त्याला भेटला आणि त्यानें माझी चौकशी केली.

मनाचा लय लागला. आणि दोन्हीकडची हृदयें एकाच विचारानें प्रेरित झाली म्हणजे ते परस्परांना संदेश पोचवूं शकत असतील त्यातलाच हा एक प्रकार तरी नसेल ?

मी एक मोठा पुण्यवान गृहस्थ आहे म्हणून हा साक्षात्कार घडला अशांतला मुळींच अर्थ नाहीं. मी हा प्रसंग कांहींना सांगितल्यानंतर ते ही म्हणाले, ‘ असें प्रसंग आमच्याही आयुष्यांत घडले आहेत.’ मला याच प्रसंगाची विशेष आठवण राहिली याचे कारण हा प्रसंग वडिलांच्या मरण प्रसंगींचा. तिचा संबंध गाडगेबोवा या थोर व्यक्तीशी आला शास्त्रीयदृष्ट्या या प्रश्नाचा उलगडा आज ना उद्या झाल्याखेरीज रहाणार नाहीं. या प्रसंगामुळें माझा ईश्वरावर किंवा चमत्कारावर श्रद्धा बसली आहे असें मुळींच नाहीं.

**समाइक इस्टेट.—** मी लहानपणी मामांच्या घरीं रहात असें. त्या घरीं भावाभावांची सारखी भांडणें होत. ते भाऊ दोघेही चांगले सुशिक्षित वकील. पण भांडण सुरू झाले कीं कुऱ्हाडी घेऊन एकमेकांवर धांवत. तोंडानें ऐकूं नये अशा अभद्र शिव्या देत. आणि भांडण कशासाठीं तर परळ्यांतल्या झाडाच्या आंब्यासाठीं किंवा परळ्यांत बांधलेल्या बैलांच्या शेणासाठीं किंवा अशाच हास्यास्पद गोष्टीसाठीं. पण हंसत होतो तशाच गोष्टी मी अनुभवल्या. माझी व इतरांची कांहीं कमी अधोगती झाली नाहीं. सर्व सोहाळे मी पाहिले. कुणाच्या मनाचा अधिक अधःपात झाला हे दाखवण्यांत कांहीं विशेष आहे असें आता मला वाटत नाहीं. कोणी कोणावर कुरघुडी केली याला आज तरी मी महत्त्व देत नाहीं. हा खेळ समाईक इस्टेटीचा ! अनादिकालापासून चालत आला आहे. कौरव-पांडवांचे युद्ध यासाठींच झाले. सख्खे भाऊ पक्के डाइज ही अन्वर्थक म्हण पडायला कारण ही समाईक इस्टेट. बंधूचें शत्रू बनवणारी, माणसाचें पशू बनवणारी, मनुष्याच्या उच्चगुणाचा ऱ्हास करणारी, ही एक मंथरा आहे. श्रम करावे त्यानेच जगावे असें झाले, वडिलार्जित इस्टेटीवर जगण्यास कायद्यानें मनाई झाली, व श्रम करणाऱ्याला जगण्याचा आधार झाला तर इस्टेटीपायीं होणारे अनन्वित प्रकार खात्रीनें कमी होतील.

आलेल्या अनुभवावरून असें वाटतें कीं आपल्या मुलामध्यें वितुष्ट येऊ नये असें वाटणाऱ्या बापानें आपल्या हयातीत आपल्या हातानें आपल्या इस्टेटीच्या वांटण्या करून आपल्या डोळयादेखत त्यांना निराळा प्रपंच करूं द्यावा. म्हणजे पुढे वितुष्टाचे प्रसंग येणार नाहीत.

चालू समाज व्यवस्थेत एकत्र कुटुंब संस्था जिवंत राहणे फार अवघड आहे. ती संस्था शाबूत राखायला बऱ्याच स्वार्थत्यागाची जरूरी असते. मी मिळवतो ते सर्वांचे, ही भावना प्रत्येकांत असावी लागते. तसें न होता बहुधा त्यांतील प्रत्येक हिस्सेदार हाच कोण खर्च करणार म्हणून चढाओढीनें समाईक इस्टेटीचें वाटोळे करतो. इस्टेट जतन करण्यापेक्षां, ती वाढवण्यापेक्षां, घालवण्याची व शक्य तितका त्याचा फायदा स्वत: घेण्याचीच प्रवृत्ति असते. काटकसरी स्वभाव राहूं शकत नाहीं. इस्टेटीची धुळधाण होते. एखादे वेळीं नव्हे, बहुधा कोर्टाची पायरी चढावी लागते व बंधुत्वाचे नाते जाऊन तेथे शत्रुत्वाचे उत्पन्न होते.

असो. या गलिच्छ मन:स्थितीतून वर निघायला वर्ष दीडवर्ष लागले.

आणि जगांत आपले कोणी नाहीं. जो तो पैशाचा. असा अनुभव आला. मी पूर्ण एकाकी झालो. माझ्या सार्वजनिक कार्याबद्दल कोणी सहानुभूति दाखवली नाहीं. तसेच कौटुंबिक आपत्तीची लागलेली परंपरा हलकी करण्यास कोणी हातभार लावला नाहीं. मित्र तर चळवळीमुळें तुटलेच होते. स्वकीय दुरावले होते. वडिलांच्या इस्टेटीचा आधार नसता तर भीकच मागावी लागती. पण भीक तरी कोण देणार? वडिलांच्या मृत्यू नंतरच्या दीड वर्षांत एका मोठ्या कादंबरीला पुरेसे अनुभव, तेवढ्या अवधीत मिळाले. एकत्र कुटुंबांतल्या समाईक इस्टेटींत जे प्रकार व्हायचे ते कमी अधिक प्रमाणांत आमच्या घरीं झाले नाहीत असें म्हणतां येणार नाहीं.

* * *

**करवीर इलाखा खादी संघ.—** राजाराम कॉलेजमध्ये खादी प्रदर्शन भरले होते—त्यावेळीं करवीर इलाख्यांत खादी प्रचार करणारी एखादी संस्था काढावी असें ठरले. ‘ चरखा संघ ’ म्हणून डॉ. केळकर

याचे अध्यक्षतेखाली एक संस्था कांहीं थोडें काम करीत होती. त्यांत श्रीधर श्रेष्ठी नांवाचे एक प्रामाणिक, कळकळीचे, समाजसेवक काम करीत होते.

काकासाहेब कालेलकर यावेळीं खादी संमेलनासाठीं आले होतें. त्यांच्याच इच्छेनुसार 'करवीर इलाखा खादी संघ' ही संस्था स्थापन झाली व मला अध्यक्ष म्हणून निवडण्यात आले. त्यांत मगदूम मास्तर, सांगाव, तात्याराव देसाई, शंकरराव जोशी, श्रेष्ठी वकील अशी माणसें होतीं. पहिल्या वर्षी आमचे काम जोमानें झाले. बरेच प्रचारकार्य व जागृति झाली. पण पुढेंपुढें सर्वांचाच उत्साह कमी होत आला व खेड्यावरच्या खादीप्रेमी लोकांना अनधिकृतरीत्या त्रास होऊं लागला. कांहीं लोक पोटाच्यामागें विशेष लागले. भाऊसाहेब धर्माधिकारी व मेथे मास्तर यांनीं कोल्हापूर सोडून बाहेरचे काम करण्याचे ठरवले व मजवर कौटुंबिक आपत्तीची परंपरा सुरू झाली. श्रीधर श्रेष्ठी यांनीं वळिवडे गांवीं संमेलन भरवून 'विनोबा भावे' यांना बोलवून अध्यक्षपद दिले. पण त्याचाही कांहीं परिणाम झाला नाहीं. ही माझ्या अध्यक्षतेखाली एक निव्वळ नामधारी संस्था होऊन बसली.

माझे खादीवरचे माझे प्रेम कांहीं कमी झाले नव्हते. पण खादी ही हिंदुस्थानांत कायम राहिलीच पाहिजे असें मात्र माझे मत नव्हते. गिरण्यावर जोपर्यंत भांडवलवाल्यांची मालकी आहे व आवश्यक धंद्यांचे जोपर्यंत राष्ट्रीकरण झाले नाहीं, तोपर्यंत गरीबांच्या उपजीविकेचें ते एक साधन या दृष्टीनेच मी खादी व चरख्याकडे पहात होतो.

माझ्या संस्थानांतील कामाला, सभाबंदीमुळें अडचण होतच होती. मी प्रचारक. शांतपणें एखाद्या गांवीं राहून तेवढ्या मर्यादेत काम करणे माझ्या स्वभावाला जमत नसें. सातारा जिल्हा कॉंग्रेस परिषदेने माझ्या कार्याची व्याप्ती वाढवली.

**सातारा जिल्हा कॉंग्रेस व माझे ठराव.**— सातारा जिल्हा कॉंग्रेस भरण्याची तारीख निश्चित झाली होती; दे. भ. अणे हे अध्यक्ष होते. वाळवे तालुक्यांत पूर्वी काढलेल्या दौऱ्यामुळें मला सातारा

जिल्ह्याविषयीं प्रेम वाटत होते. व त्या तालुक्याचाही माझ्यावर लोभ होता. यामुळे जिल्हा कॉंग्रेसला वाळवे तालुक्याचा डेलिगेट म्हणून मला जातां आले.

'शेतकऱ्यांचेकडून सावकारांनी सहकारी पतपेढ्यांनी आठपेक्षां जास्ती व्याज आकारूं नये, व हिंदूंची देवालयें हिंदूंना मोकळी असावीत' असें दोन ठराव मी सब्जेक्ट कमेटी समोर मांडले. पण हे साधे ठराव सुद्धा कांहींना आवडले नाहीत. व प्रत्यक्ष विरोध न करतां वेळ झाली आहे आता विचार करता येणार नाहीं असें सांगून त्यांनी मोडता घातला. पण त्या सभेत मी बराच त्रागा केला.

'कॉंग्रेस शेतकऱ्यांची म्हणायची. त्या शेतकऱ्यांसाठीं संन्यास पतकरलेल्या महात्मा गांधींची अवास्तव स्तुती करायाची आणि शेतकऱ्यांच्याच कल्याणाचे ठराव वेळेची सबब पुढे करून हाणून पाडायचे, हा काय प्रामाणिकपणा! पुनः कॉंग्रेसमध्यें ब्राह्मणेतर भाग घेत नाहीत म्हणून त्यांना दूषण द्यायचें. आणि ते आले म्हणजे त्यांच्या हिताचे ठराव वांकड्या मार्गानें फेटाळायचें. शेतकऱ्याचा औपचारिक कळवळा मात्र दाखवायचा.'

या भाषणाचा व त्राग्याचा परिणाम झाला. त्यावेळीं पूर्ण अनोळखीचे दे. भ. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांनीं मला पूर्ण सहानुभूति दाखविली. त्यांनीं अनुमती दाखविली व अखेर शेतकऱ्यांचा तेवढा ठराव मांडण्यास परवानगी मिळाली. अस्पृश्यांना अनुकूल असलेल्या ठरावाची वर्णी मात्र लागली नाहीं.

इतके झाले तरी शेतकऱ्यांच्या माझ्या ठरावाला धोपटे नांवाचे वकील आंतून विरोधी खटपट करीत होते.

**ब्राह्मणाचा विरोध.**— मी सभेत उठण्याच्या सुमारालाच धोपटे यांनीच शेतकऱ्यांचा हा ठराव जातिवितुष्ट माजवणारा व वर्गकलह उत्पन्न करणारा आहे, ब्राह्मण–ब्राह्मणेतर द्वेषाचा यांत वास आहे, तरी हा ठराव सभेत मांडूच देऊ नये म्हणून अध्यक्षापुढें तक्रार केली. पण सब्जेक्ट कमिटीत पास झालेल्या ठरावाला मला बंदी करतां येणार नाहीं. तो ठराव मांडल्यानंतर तुम्ही बेलाशक विरोध करा माझी हरकत नाहीं

असें सांगितल्यावरून मग मी तो ठराव सभेपुढें मांडला. धोपाटे यांनीं विरोध केला, पण त्यांनीं तोंड उघडण्यापूर्वीच लोक बसा बसा म्हणू लागले. व लोकांना शांत करण्याकरतां अध्यक्षांनाच उठावे लागलें. त्या माणसाच्या विरोधानंतर पुनः मी बोललो. एकूण एक लोकांनीं हात वर केले. इतकेच नव्हे तर मंडपाबाहेर असलेल्या शेतकऱ्यांनींही हात वर केले. दोन तीन मंडळीच उलट होती व ती ब्राह्मण !

**ब्राह्मणेतर व कॉंग्रेस.—** या अनुभवानंतर मला असें वाटूं लागले कीं आपल्या ब्राह्मणेतर समाजांतील लोक सवता सुभा स्थापन न करतां जर एकजुटीनें कॉंग्रेसमध्यें भाग घेतील तर त्यांत संख्याबलावर आपलें वर्चस्व स्थापूं शकतील. कारण जो तो उड्या मारतो तो खालच्या बहुसंख्य वर्गाच्याच जोरावर. तो वर्ग, सातारा जिल्ह्यांत तर मराठा जातीचा व इतरत्र ब्राह्मणेतर वर्गापैकीच आहे. याच समाजाचे प्रतिनिधी म्हणून पुढे होण्याचा जो तो प्रयत्न करतो. साताऱ्यापुरता तरी मला अनुभव आला कीं दुसऱ्या कोणत्याही जातीपेक्षां मराठा जातीच्या पुढाऱ्यांना खेड्यावर अधिक काम करता येईल. कारण बहुजनसमाजावर अद्यापही त्यांचीच छाप विशेष पडूं शकते. पण मराठा समाजांत ब्राह्मण द्वेषापेक्षां दुसरे विधायक कार्य करण्याकडे प्रवृत्ति दिसली नाहीं. शिकणे पुरे होईपर्यंत जनसेवेची तळमळ. मनांत परीक्षा पास झाली कीं संपले. मग पैसा म्हणजे नोकरी हें ध्येय. चळवळ करायची ती याच धोरणानें. कलेक्टर किंवा संस्थानांतील एखादा राजा याला खूप करण्याकरता. आमच्यांतले, पुढारी या नांवाला बट्टाच लागणारे बहुतेक. नोकरी करून लोकप्रियता मिळविण्याची हांव. पैशाचा व देहाचा त्रास न सोसता व अधिकाऱ्यांची मर्जी न घालवता, पुढारीपणाची माळ गळीं पाडून घेण्याची हांव दांडगी. स्वार्थत्याग नाहीं, जनसेवेची खरी तळमळ नाहीं.

ना. जाधवांचीच गोष्ट घ्या. ते किती तरी विद्वान्. वाचन दांडगें विचारसरणी उदात्त. कायद्याची पूर्ण माहिती. स्वभाव निगर्वी, कॉंग्रेसचे अध्यक्ष होण्याइतकी अंगीं पात्रता. पण सुखासुखी होईल तशी जनसेवा करण्याच्या वृत्तीमुळें त्यावेळीं सातारा जिल्ह्याचेसुद्धां त्यांना अंतःकरण काबीज करतां आले नाहीं. कॉंग्रेसच्या एखाद्या यःकश्चित् सैनिकाचा

त्याग आणि धडाडी त्यांनीं दाखवली असती तर सातान्यानें त्यांना डोक्यावर घेऊन नाचवले असतें. कारण मराठा पुढान्यांची उणीव सातारा मराठ्यांचा असूनसुद्धां त्याला भासत असे. अखिल भारतीय योग्यता मिळवण्याजोगी पात्रता असून ते मागें पडले.

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे व केशवराव जेधे या दोन माणसाखेरीज नांव घेण्याजोगा एकही पुढारी पुढें येऊ शकला नाहीं.

**वाळवे शेतकरी परिषद.**— जिल्हा कॉंग्रेसमध्ये आलेल्या या अनुभवानें एका तालुक्यापुरती तरी संघटना करून एकजुटीनें कॉंग्रेसमध्ये शिरावे या हेतूनें वाळवे तालुका शेतकरी परीपद भरवण्याचे मी ठरवले. त्याला आत्माराम पाटील, बोरगांवकर यांनीं सक्रीय सहानुभूति दाखवली. परिपदेची कल्पना एका मोठ्या यात्रेच्या सभेंत जाहीर केली. पण या वेळींही धोपाटे या ब्राह्मण पुढान्यानें मी मुद्दाम कळ लावण्यासाटीं आलो आहे असे लोकांना भासवण्याचा प्रयत्न केला. तथापि त्याच्या प्रयत्नाला यश आले नाहीं. अखेर वाळवे तालुका शेतकऱ्याची पहिली परिषद ( ६–६–३१ ) ला तरुण पिढीच्या सहाय्यानें पार पडली. गुरुवर्य विठ्ठल रामजी शिंदे यांची आगाऊ गांठ घेऊन अध्यक्षपद स्वीकारण्याचे कबूल करून घेतले होतें. परिपदेचा स्वागताध्यक्ष मी होतो. सेक्रेटरी आत्माराम पाटील हे होते. सभेंत सर्व ठराव माझ्या इच्छेप्रमाणेंच पास झाले. ती सभा जवळजवळ जिल्हा कॉंग्रेस इतकीच मोठी भरली होती. त्या सर्व ठरावांवर समतातत्त्वाची छाप चांगलीच होती.

‘ हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालें पण शेतकऱ्यावर सरकारी डोईजड सारा व अप्रमाणशील जमीनदारी खंड कायम राहिला. सावकारी पकड ढिली पडली नाहीं, तर ते स्वातंत्र्य चिनकष्टाळू वर्गाच्या फायद्यांत पडणार. गोरी नोकरशाही जाऊन काळी भांडवलशाही स्थापन करणे हा स्वराज्याचा हेतु नव्हे. आर्थिक समता हाच खरा उपाय आहे व त्या धोरणानें आपली चळवळ, आपला प्रयत्न, चालला पाहिजे ’ अशा अर्थाचे मी भाषण केलें.

राष्ट्रीयसभेला पाठिंबा देणारा पहिलाच ठराव होता. कांहीं थोड्या व्यक्तींच्या शेंकडों एकर जमिनी आणि निढळाचा घाम निरंतर काढणाऱ्या

शेतकऱ्यांच्या वांटणीस थोडीही जमीन नाहीं, अशी जुलमी स्थिति यापुढें न चालेल अशी एखादी योजना राष्ट्रीयसभेकडून लवकर तयार व्हावी, असा मी ठराव पुढें मांडला व तो बिनविरोध पासही झाला.

या परिषदेनंतर कांहीं गांवीं ग्रामपंचायती स्थापन करण्याचा प्रयत्न केला. पुढें घरच्या कांहीं भानगडी उपस्थित झाल्यामुळें प्रचारकार्य बंद पडलें. घरच्या अडचणीमुळें शहर सोडून बाहेर जाणे अवघड होऊं लागलें.

**सत्यसमाजालाही मी जड गेलो.—** या वेळीं कोल्हापुरास राजकीय चळवळ कसलीच नव्हती. म्हणून सत्यशोधक समाजाकडे माझें मन वळले. सत्यसमाज वाटेल तितका व्यापक बनवतां येईल अशीच त्याची तत्वें होती. त्यावेळीं स्थानिक संस्थेचे अध्यक्ष भास्करराव जाधव हेच होते. त्यांच्या व माझ्या विचारसरणीत मला बरेंच साम्य आढळून आलें. मनांत ते सोशालिस्ट असल्याचे मला तरी आढळून आलें. म्हणून सत्यशोधक समाजांत काम करण्याची इच्छा झाली. तो समाज अधिक व्यापक व्हावा म्हणून ज्ञानप्रकाश मधून एक लेख लिहिला. तो सनातनी सत्यशोधकांना आवडला नाहीं. फुल्यांचे पुढें जाण्याची त्यांची तयारी नव्हती. याचे खरें कारण संस्थानी वातावरण कीं प्रामाणिक मत हे कळणे फारसे कठिण नव्हतें. पण माझ्या उलट कांहीं लोक होते. त्यांत एक अधिकारी सत्यशोधकही होते. या वादाला त्यावेळीं बरेच मोठे स्वरूप आले होते, बऱ्याच पत्रांना तो चर्चेचा विषय झाला होता. माझे मित्र रामभाऊ जाधव यांचाही बराच विरोध होता. त्यांनीं माझ्याउलट हस्तपत्रकेंहीं काढली.

सत्यसमाजतत्वाच्या उलट किंवा मारक तर मी लिहिलेच नव्हते. ‘ सर्व मनुष्यें एका परमेश्वराची लेंकरें आहेत. त्यात उच्च नीच भाव नाहीं. या तत्वात उच्च नीच भाव म्हणजे धार्मिक उच्च नीच भाव एवढाच अर्थ निघणार नाहीं. कृत्रिम भेदभावावर फुल्यांचा कटाक्ष दिसतो त्यांत इतर भेदभावही येणारच. धार्मिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय येणार. तसेच दलाल ब्राह्मण जातीतला नको, तसा आपल्या जातीतलाही नको, तसेच ईश्वराचे अस्तित्वही सर्वांवर लादतां येणार नाहीं. कारण

नास्तिकही सत्यशोधक असू शकेल. तेव्हा सत्यशोधक समाजाचें व्यापकत्व नष्ट होइल अशी गोष्ट करूं नये. ' असें मी लिहले होतें.

**सत्यसमाजांतील विरोध.**— पण सत्यशोधक समाजाला राजकारणाचा वास लागू देणे हे महापाप घडू नये म्हणून त्या संस्थेतील ऱ्याच जणांनीं काहूर उठवून दिले. व मला डिस्मेंबर करण्याचाही घाट घातला. कारण या समाजाला सरकारांतून ग्रँट मिळत होती ती यामुळें जाईल असें त्यांना वाटले असावे.

तथापि मला बाहेर काढण्यात त्यांना कांहीं यश आलें नाहीं व मजकडे संपादकत्व आलेल्या 'सत्यशोधक हीरकमहोत्सव' ग्रंथांतही मी माझे विचार स्पष्टपणें नमूद केले. पण एकंदरीत 'जी हां' लोकांचा व अधिकाऱ्यांचाच त्यांत भरणा व वर्चस्व दिसूं लागल्यानें मी त्यांतून अंग काढून घेतले. ती संस्था त्यावेळीं होती सरकारजमा असल्यासारखीच. तीत अधिकाऱ्याशिवाय दुसरा अध्यक्ष निवडून येऊच शकत नसें. हीच संस्था खालसा मुलखांत असती तर तिचे धोरण व्यापक होण्यास अडचण पडली नसती. पण संस्थानी वातावरणांतील गुलामवृत्तीमुळें विशेष असें कांहीं कार्य घडून येत नव्हते. सत्यशोधक समाजातर्फे म. गांधींना मानपत्र देण्याचा समारंभ माझे वडिलांनीच घडवून आणला मानपत्राची भाषा माझीच होती.

अद्यापही त्या संस्थेवरचे माझे प्रेम कमी झालेले नाहीं. ती संस्था निस्वार्थी व निर्भीड लोकांच्या हाती जाईल तर खालच्या वर्गाची पुष्कळच जागृती तिला करता येईल.

यानंतर कांहीं दिवस मी अगदी स्वस्थ बसलो. आमंत्रण आले म्हणजे व्याख्यानाला जाई व इतर वेळ वाचनांत व लेखनांत घालवी.

**जगदंबा मंदिर प्रवेश.**— गांधींजींच्या उपोषणाची बातमी कोल्हापुरास येऊन थडकली. या उपोषणामुळें सर्व देश विजेच्या धक्या-प्रमाणें खडबडून जागा झाला होता. अस्पृश्यांच्या प्रश्नापेक्षां महात्माजींच्या प्राणाचाच प्रश्न सर्व भरतराष्ट्रासमोर उभा राहिला होता. महात्मा गांधी मला अत्यंत पूज्य व आदरणीय व्यक्ति वाटतच होती. मी एक त्यांचा दुरून पूजा करणारा भक्त होतो. त्यांची वचनें मला धर्मवाक्याहूनही

पूज्य वाटत. देवभक्त ज्या पूज्य भावानें ईश्वराकडे पहात असतील, त्याहूनही गांधीजींच्याबद्दल पूज्यभाव वाटत होता.

उपोषणाची बातमी कानावर पडतांच जीव घाबरा झाला. झोंप येईना, चैन पडेना, आपल्या हातून करता येईल ते केलेच पाहिजे असें मनानें ठरवले व कार्यास लागलो—

लागलीच अर्ज तयार केला. डि. मॅजिस्ट्रेटकडून सभेची परवानगी काढली, ताबडतोब पांचसात हजार पत्रिका काढून त्या गांवांत वाटल्या व ता. १८–९–३२ ला मी माझ्या नांवाची जाहिरपत्रिका काढून सभा बोलावली व संस्थानांतील सार्वजनिक देवळें अस्पृश्यांना खुली ठेवण्याबद्दल दरबारला विनंती करणारा ठराव सभेपुढे मांडून पास करून घेतला. सभेला कल्पनेबाहेर यश मिळाले. हजारो लोक सभेला हजर होते. विरोधाचे वातावरण जरासुद्धा दिसून आलें नाहीं. या सभेमुळें लोकमताची नाडी अजमावता आली. मंदिरप्रवेशाचा प्रयत्न केल्यास त्यालाही विरोध होणार नाहीं असें वाटले.

म्हणून पुनः मंदिरप्रवेशाचा विचार करण्याकरता ता. २५ ला आणखी ७।८ हजार जाहीर पत्रिका काढल्या, पत्रिका माझ्याच नांवच्या होत्या. आणखी माझ्या घरीं असलेल्या वाघमारे नांवच्या अस्पृश्य विद्यार्थ्याचे त्यावर नांव घातले. विरोध आलाच तर सत्याग्रह करायचा असें ठरवलें व त्यावेळच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनी मुद्दाम बोलवून विचारता त्यानाही तेच सांगितले.

तथापि आश्चर्याची गोष्ट कीं यावेळीं अस्पृश्य समाजापैकींच कांहीं गृहस्थ घरीं येऊन घाई करूं नका, यानें एखादे वेळीं नुकसानच होण्याचा संभव आहे म्हणून मला परावृत्त करूं लागले. पण मी निश्चय ठरवलाच होता. सभा जाहीर केली होती. जागा ठरवली होती—

याच वेळीं एकदम कांहीं अधिकाऱ्यांना समाजसेवेचा व अस्पृश्योद्धाराचा पुळका आला. ज्यांनीं यापूर्वी कसल्याही चळवळीत भाग घेतला नव्हता व सार्वजनिक सभेचा प्लॅटफॉर्म कधी भूषित केला नव्हता असें अधिकारी एकाएकीं माझ्या घरीं आले व तुमच्यामुळें एखादे वेळीं अनिष्ट

प्रसंग उद्भवेल तरी त्यावेळीं तुमच्या सभेऐवजी आमची सभा पार पाडतो, म्हणजे कसला अडथळा होणार नाहीं व वाटल्यास तुमचे ठराव त्यांत मांडा म्हणजे झाले, असें सांगू लागले.

**अगांतुकांना धुडकावले.—** या आयत्या वेळच्या अगांतुकीची मला चीड आली. याचा अर्थ काय तेच समजेना. यापूर्वी मी एकट्यानेच सभा भरवली, ती पार पडली, लोकांची अनुकूलता लाभली; त्यावेळीं यांतले कोणीही आले नव्हते! आतांच एकदम कढ आला. मी त्यांचे म्हणणे नाकबूल केलें.

परवानगी मागितली मी. पत्रिका काढल्या मी. सभेची जागा वेळ ठरवली मी. पत्रिका वाटल्या माझ्या माणसाकडून मीच. असें असता माझी सभाच नको म्हणणाऱ्यांची चीड आली. अध्यक्षही मीच ठरवले होते.

बरोबर वेळ होतांच मी सभेंत हजर झालों–अध्यक्षांचें नांव सुचवलें, मंदिरें अस्पृश्यांना खुली करण्याचा ठराव मीच मांडला. त्यानंतर अधिकाऱ्यांनीं व इतरांनीं तयार करून आणलेले ठराव वाचून दाखवले व नंतर वाघमारे या अस्पृश्यांच्या हातांत हात घालून जगदंबा देवालयांत प्रवेश केला. जेथें अस्पृश्येतर जात होते तेथपर्यंत अस्पृश्यासमवेत गेलो. कसलाच अडथळा न होता हे कार्य पार पडले.

वडील ज्या गोष्टीसाठीं नेहमीं तळमळत, ती त्यांची इच्छा फलद्रूप झाल्याचें पाहून मला आनंदानें गहिंवरून आलें व वडिलांच्या फोटोखालीं माझ्या अश्रूंचीं फुलें मी वाहिलीं. पिताजी जिवंत असते तर त्यांनीं मला कडकडून मिठी मारली असती. केवढा आनंद झाला असता त्यांना. या आनंदाची वाटेकरीण घरीं माझी एकटी बायकोच तेवढी होती.

**नृसिंहवाडीकडे मोर्चा.—** या यशानें माझा उत्साह फारच वाढला व दुसऱ्या एका अत्यंत महत्त्वाच्या सनातनी किल्ल्यावर आम्ही स्वारी करण्याचें ठरवलें. नृसिंहवाडी म्हणजे संस्थानांतील ब्राह्मणांचा बालेकिल्ला होता. तिकडे मी तावडतोब मोर्चा फिरविला. तात्पुरते चार्ज घेतलेले डि. मॅ. जरा भित्रे होते. तेव्हां थोडा त्रास झाला. पण थोडी खटपट केल्यावर परवानगी मिळाली. पुनः वाडीच्या सभेबद्दल बरीच हँडबिलें काढून

तीं वाडीच्या आसपासच्या गांवीं वाटण्याकरतां गायकवाड नांवाच्या एका उत्साही स्वयंसेवकाला पुढें पाठवलें. माझ्याबरोबर करवीरहून दोनतीन लॉऱ्या निघाल्या होत्या. सत्यसमाजाची कांहीं मंडळी, अस्पृश्य समाजांतील कांहीं व मराठा बोर्डिंगमधीलही बरेच विद्यार्थी जी. डी. पाटील यांनीं काढले होते. जातांना मराठा बोर्डिंगच्या मुलांनीं झुणकाभाकर भरपूर घेतली होती.

जगदंबामंदिर प्रवेशाच्या सभेवेळीची पुनरावृत्ती येथेही झाली. पुन: अधिकारी मंडळी येऊन त्यांनीं माझ्याशीं सहकार्य करण्याऐवजीं मला अजिबात वगळण्याचें व ती सभा आपणच पार पाडण्याचें ठरवले. अशा प्रकारचें बळजबरीचें सहकार्य अद्यापपर्यंत अधिकाऱ्यांनीं माझ्याशी केलेलें मला तरी आठवत नाहीं. ते मला बोलूंच नका म्हणूं लागले. जी सभा माझी होती त्यांतून मला वगळून सभेची धुरा आपण घेण्याचें योजिलें. एकप्रकारें पुढें नाचण्याची हौस म्हणा किंवा या अधिकाऱ्यांच्या वर्तनाची चिव येऊन म्हणा मला हें असह्य झालें. जेथें सभा व्हायची त्या पाराचे-खाली टेबल खुर्ची मांडून मी येण्यापूर्वींच ते अडवून ठेवले होते. मला शिरकण्याला वाव ठेवली नव्हती. मी हे पाठीमागच्या पारावरून पहात होतो. मी सर्वांना धाब्यावर बसवून त्या पारावरूनच भाषणाला सुरवात केली. सर्वांना आमंत्रण माझ्याच जाहीरपत्रिकेनें मिळालेले होते. तेव्हां आलेल्या लोकाबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे कर्तव्यच होते. अध्यक्षांचें नांव मीच सुचवलें, नंतर रीतसर सभेला सुरवात झाली. सभेंत कसलाही अडथळा झाला नाहीं. या सभेला दरबारची पूर्ण सहानुभूति होती, हें दिसतच होतें. कारण त्याखेरीज अधिकारी व वकील कोणत्याही सभेंत भाग घेणें शक्य नव्हते. महात्माजींचा फोटो मी व एका अस्पृश्यानें हातीं धरून मंदिराभोंवतीं फेरी घातली. गंगाराम कांबळे नांवाच्या गृहस्थानें पादुकांस फुलें वाहिलीं व दत्तमंदिर अस्पृश्यांना आजपासून खुलें झाल्याचे मीं जाहीर केलें. रविवार २-१०-३२ ला ज्या शिवाशिवीबाबत डी. एस. जाधव या तेथील मामलेदारानांसुद्धां पुजाऱ्यांनीं मार देण्यापर्यंत मजल नेली होती, तो सोंवळेपणा नाहींसा झाला. सर्व गोष्टी त्यावेळीं तरी पार पडल्या.

दरबार शाहू महाराजापासून अस्पृश्यतानिवारणेला अनुकूल होतेच. पण महात्माजींनीं उपवासास सुरवात केली नसती तर हीं मंदिरें खुलीं होण्याला आणखी किती तरी वर्षे लागलीं असतीं.

या नंतर त्याच आठवड्यांत ता ९ रोजीं गंगावेशींत सत्यसमाजियातर्फे जाहीर सभा बोलावून, माझें अभिनंदन करण्यांत आलें.

जुन्या बुधवार पेठेतील दुतोंडीं मारुतीचें देवालय लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें पुढें माझ्या हस्तें उघडलें.

एकंदरींत या चळवळीला दरबारनें जी सहानुभूति दाखविली व गॅझेटनें मंदिरें खुलीं झाल्याचें जाहीर केलें. त्याबद्दल करवीर इलाखा हरिजनातर्फे माझे अध्यक्षतेखालीं सभा भरून महाराजसाहेब व रा. ब. सुर्वे, दिवाण याचें अभिनंदन करण्यांत आलें व त्याबरोबर महात्माजींचेंहि अभिनंदन करण्यांत आलें.

अशा प्रकारें खालसा मुलखाआधीं करवीर राज्यांतली मंदिरें कायदेशीरपणें अस्पृश्यांना खुलीं करण्यात आलीं.

बाकी हीच चळवळ जर प्रजेच्या राजकीय हक्कासाठीं असती तर भित्रेपणामुळें या लोकांचा तिला पाठिंबा मिळाला नसता व असें यश आलें नसतें म्हणून निव्वळ लोकशक्तीमुळें हें होऊं शकलें असें मी म्हणत नाहीं. योग्यवेळीं उचल खाल्ली ही एकच गोष्ट आम्हीं केलीं एवढेंच.

**कोल्हापुरातले साहित्य संमेलन**— कांहीं दिवस स्वस्थ बसल्यानंतर अचानकपणें एका सार्वजनिक कामांत थोडासा भाग घ्यावा लागला.

कोल्हापुरांत साहित्यसंमेलन होण्याचें नक्की ठरलें होतें. खुद्द महाराजांची व अधिकारी मंडळींचीही तें येथें भरावें ही मनापासूनची इच्छा होती. मोठमोठ्या अधिकाऱ्यांनीं पुढाकार घेतला होता. तेव्हां अशा ठिकाणीं माझ्यासारख्याची वर्णी लागायची ही गोष्ट मला तरी जवळ जवळ अशक्य वाटत होती. तथापि स्वागतसभासदाची वर्गणी भरल्यामुळें त्यांच्या सभेला मला हजर राहता आलें व अगदीं अनपेक्षितरीत्या ग्रंथ प्रदर्शन कामिटीवर कार्यकारी अध्यक्ष म्हणून माझी निवड झाली. व त्या बाजूचे स्वागताध्यक्ष म्हणून भाषण करण्याचीहि संधि मला लाभली.

**मालपेकर.—** यावेळीं दामोदर सांवळाराम यंदे व त्यांचे स्नेही कृष्णराव मालपेकर आमचे घरीं आले होते. आमच्या धाकट्या बंधूंचें पहिलें कुटुंब वारले होतें. मालपेकर यांना स्थळ पसंत पडलें व बंधू शंकरराव यांचे लग्न ठरलें. लग्नाला मुंबईस मी सहकुटुंब गेलो होतो.

यावेळीं या बहुमोल रत्नाचा मला लाभ झाला. बंधूचे सासरे यांचीं ह्या प्रसंगामुळें चांगलीच ओळख झाली. स्वभाव साम्यतेमुळें आम्हीं एकमेकांकडे ओढले गेलो व पुढें त्याचें रूपांतर मैत्रींत झालें.असा निष्कपटी, निर्मळ मनाचा व बालअंतःकरणाचा माणूस मला तरी आढळला नाहीं. या मैत्रीनंतर ते माझ्या हरएक संकटप्रसंगी उपयोगी पडले व तो मला अत्यंत मोठा आधार वाटे. आठवड्यांत त्यांचे पत्र नाहीं असें बहुशः होत नसें.

× × ×

**कोल्हापूर कॉंग्रेस कमिटी.—** साहित्य संमेलनानंतर माझ्या दृष्टीनें महत्वाची गोष्ट म्हणजे कोल्हापुरांत स्थापन झालेली कॉंग्रेस कमिटी. माझ्याच अध्यक्षतेखालीं सभा होऊन कार्यकारी मंडळ निवडण्यात आलें. अध्यक्ष बळवंतराव माने व सेक्रेटरी हवेरी असें निवडून आले.

**कोल्हापुरास राजेंद्रबाबू—** याच सुमारास म्हणजे ता. १४–१०–३५ ला दौऱ्यावर असलेले त्यावेळेचे कॉंग्रेसचे अध्यक्ष राजेंद्र-बाबू रत्नागिरी मार्गे कोल्हापुरास आले. यावेळीं प्रजापरिषदेचे अस्तित्व नव्हते. माझ्या अध्यक्षतेखालीच संस्थानी कॉंग्रेस कमेटी स्थापन झाली होती. वीर माने, हवेरी, गायकवाड हीच त्यावेळची प्रमुख मंडळी. लोकांत भीति दांडगी. तथापि राजेंद्रबाबूंची मोठी मिरवणूक निघाली. आयत्या-वेळीं दीड दोनशें सायकलस्वार पुढें झाले. खासबाग मैदानांत माझ्याच अध्यक्षतेखालीं सत्कार व मानपत्र देण्यात आले. ‘संस्थानी चळवळीस तुमची सहानुभूति असावीं, अशी भाषणांत विनंती केली. कॉंग्रेसनें कायदेभंग तूर्त तहकूब केला होता व आम्ही पूर्ण सनदशीर असा कार्यक्रम हातीं घेणार होतो. विशेषतः सभासद करायचे व प्रजेचीं गाऱ्हाणीं दरबारच्या नजरेसमोर आणायची. एवढें कार्य करतां आलें असतें तरी पुष्कळ झालें असतें. कारण संस्थानी प्रजेंत अद्याप विनंतीवजा अर्ज

वगैरे करून भीक मागण्याचें धारिष्टही आलेलें नव्हते. आम्ही हेंच मोठें धाडसाचें काम करणार होतों. पण त्यालाही बंदी झाली. करवीरच्या डेलिगेट म्हणून मुंबई कॉंग्रेसला गेलो. महात्माजींची गांठ घेण्यासाठीं संस्थानी डेप्युटेशन बरोबर गेलो. झालेल्या वाटाघाटींत म. गांधींचे धोरण संस्थानां-बाबतीत मला स्वतःला तरी निराशाजनक वाटलें. संस्थानांत अशी परिस्थिति व कॉंग्रेसचें दुर्लक्ष यामुळें सर्वांचाच निरुत्साह झाला. सभासद करण्याला सरकारी मनाई होऊं लागली. कॉंग्रेस कार्यकर्त्यांतही कांहीं बेबनाव उत्पन्न झाले. माने यांनीं राजिनामा दिला. हवेरी सेक्रेटरी व श्री. माधव गायकवाड हे कांही तरी धडपड करीत असत. पण कांहीं काम होत नसे. म्हणून सरकार लक्ष घालीत नव्हते, व इतर कोणत्याही चळवळींत भाग घ्यावा तर तेथें अधिकाऱ्यांचें प्राबल्य. सामाजिक संस्थेतील समाजसेवेचा मक्ता त्यांनीं घेतलेला. राजकीय चळवळ करणें अशक्य, ती करण्याला लागणारा स्वार्थत्याग अंगीं नाहीं. सुखवस्तु—सुशिक्षित, इकडे ढुंकून पहायचे नाहींत. याच सुमारास घरीं आपत्ती ओढवली. त्या संकटामुळें सार्वजनिक कामाला डोकं वर काढायला फुरसत मिळाली नाहीं. एकाच ठिकाणीं जखडून बसावं लागलं.

**वैवाहिक जीवनांतील सुखदुःखें.**—लग्न होऊन दोन वर्षें कशी-बशी उलटली असतील. बायकोस बारीक ताप येऊं लागला होता. पोटांत कळ सुरू झाली होती. एकंदर प्रकृती काळजी करण्यासारखी होती. पुष्कळ डॉक्टर पाहिले. इंग्रजी पाहिले. देशी पाहिले. होमिओपाथिक पाहिले. कोणी म्हणाले हवापालट करावी हें बरें. चार डॉक्टरांची चार निदानें आणि निरनिराळे उपाय! एकानं एक सांगितलं तर दुसऱ्यानं त्याच्या अगदीं उलट सांगायचं! रोग्यानं काय करावं? मनाची तारांबळ कशी झाली ती या स्थितीत असणाऱ्या माणसालाच माहीत. डॉक्टरला आमच्या मनःस्थितीची काय कल्पना?

सगळे झाले. आतां एम्. डी. व्हायचा होता. तो निव्वळ सल्ला देणारा होता. रोग्याचा आजार वाढवण्यांत त्याला पैशाच्या दृष्टीनें फायदा नसे. यामुळं त्याच्या निदानावर माझा विश्वास बसला. त्यानं सांगितलं रोग औषधानं बरा होणार नाहीं, केस ऑपरेशनची आहे.

ऑपरेशनच्या कल्पनेनें छाती दडपून गेली. ऑपरेशन करायचं म्हणजे मिरजेचे डॉ. व्हेल याखेरीज दुसऱ्याकडून करून घेणं भीतीचं! म्हटलं, होऊन जाऊं द्या एकदां; कटकटींतून तरी मोकळे होऊं. ऑपरेशन झाल्यानंतर मग काळजी तरी गेली! डॉ. व्हेलना केस दाखवली. त्यांचं आणि एम्. डी. डॉक्टर शिरगांवकरांचं म्हणणं एकच पडलं.

पहिलंच ऑपरेशन! डॉ. व्हेल असल्यावर कसलीच भीति नाहीं असं ज्यांनीं त्यांनीं सांगितलं. सांगणं फार सोपं. आपलं माणूस असलं म्हणजे काळजीची कल्पना येणार. पण एकदां या काळजींतून मुक्त होणार म्हणून मन घट्ट करून ऑपरेशन करून घ्यायचं ठरवलं!

ऑपरेशन झालं! पहिले तीन दिवस फार काळजीचे गेले. हातपाय जोरानें ताणले कीं टाके तुटण्याची भीति. काळजीनं पहिलें दोन दिवस डोळा मिटला नाहीं कीं जमीनीवर अंग टाकलं नाहीं. सात दिवस झाले. काळजीचे दिवस निघून गेले. टांके काढले. ती उठून बसूं लागली. पण अशक्तता आलेली. अंगावर मांस कांहीं चढेना.

घरीं आलो. पण केव्हां केव्हां अंग मोडून येई. तसल्यांत खोकूं लागली म्हणजे नाहीं नाहीं तें मनांत यायचं. क्षयावर गेल्यास काय करा! काळजी वाटूं लागली! खोकला आणि ताप याला ऑपरेशन नसल्यामुळं थोडसं समाधान वाटलं. कांहीं झालं तरी डॉक्टर लोक ही केस आतां ऑपरेशनवर घालवत नाहींत, हें पाहून त्यांच्या दयाळूपणावर माझा विश्वास बसूं लागला. मला त्यांचे किती म्हणून उपकार वाटले, येऊन जाऊन खर्चाचाच प्रश्न. औषधें आणि टॉनिक्स यांचाच खर्च! ज्यांनीं सांगावें तें टॉनिक देऊन पाहिलें. बहुतेक कंपन्यांच्या टॉनिक्सचीं नांवें मला पाठ झालीं होतीं. त्याचं कारण हे कीं प्रत्येक डॉक्टर आपल्या आवडीचं एक टॉनिक सांगत असे. त्यामुळें माझ्या टॉनिकच्या ज्ञानांत असामान्य भर पडत चालली होती.

रोग औषधानं कांहीं बरा होईना. डॉक्टरचे औषधानं रोग बरा होईल असं कांहीं दिसेना. औषधाचें बिल मात्र मी अगदीं पहिल्या तारखेस अगदीं पगाराप्रमाणें चुकतं करीत असें. या औषधांच्या बिलापेक्षा तो ऑपरेशनचा खर्च पुष्कळ कमी वाटला.

डॉ. शिरगांवकर डॉक्टर मात्र निराळया वृत्तीचे दिसले. त्यांनीं सर्व औषधें बंद करून हवापालट सांगितली. स्वच्छ हवा, ताजें अन्न आणि फळें यांनीं खरोखरीच प्रकृती सुधारूं लागली. वजन वाढलें.

मला वाटलं आतां मी निस्संशय काळजींतून मुक्त झालों. पण छे ! माझ्या मागें काळजीचा ब्रह्मराक्षस जणुं हात धुवून लागला होता. बायकोच्या पोटांत एक गांठ वाढत चालली होती. आली कीं पुनः ऑपरेशनची पाळी! ऑपरेशन कीं मरण, यांत कोणीही ऑपरेशनच पतकरणार. मात्र या खेपेस ऑपरेशनची भीति थोडी कमी झाली होती. नेहमीं काळजी करीत बसण्यापेक्षां ऑपरेशन करून मोकळं झालेलंच बरं असं मनाशीं ठरवलं. रोजचं मरण तरी चुकलं. होईल महिना पंधरा दिवस त्रास. किती म्हणून काळजी करायची !

पण या काळजींतून मोकळं व्हायला पैशाचा ताण बराच भासला. स्पेशल रूममध्यें राहणं कितीतरी महागाईचं. मिरजेस दवाखान्यांत व बाहेर–दिवसावर भाडें. मध्यम स्थितींतल्या माणसाला रोज पांच दहा रुपये म्हणजे जास्तच. रोग्याला आराम वाटावा म्हणून चांगली खोली पाहिजे. पण चांगली खोली घेतली कीं ऑपरेशन चॉर्ज वाढतो. नोकरांची अपेक्षा वाढते. पण म्हटलं जाऊ द्या. जिवापेक्षां का पैसा जास्त आहे. पैसा केव्हांही मिळवता येईल. पण गेलेलं माणूस कुठलं परत येणार ?

दुसरं ऑपरेशनही पार पडलं. पण दोन ऑपरेशन्स झाल्यानंतर प्रकृति मुद्दढ कुठली राहायला ? जो तो म्हणणार काय किती रोडावल्या ह्या ! येणार जाणार बायकांनीं तेंच म्हणायचं. शेजाऱ्यांनीं, आतेष्टांनी तेंच म्हणायचं. हीच एक गोष्ट सारखी कानावर आदळल्यामुळं जीव काळजीनं कसा घेरून गेला. बायको आतां हातची जाणार या काळजीनं मन सारखं अस्वस्थ होऊं लागलं. माझ्या प्रकृतीवरही त्याचा परिणाम झाला.

तिच्या प्रकृतीसाठीं चांगल्या हवेस जाऊन राहिलों. जयसिंगपूरला एका मित्राच्या घरीं मुक्काम टाकला. रामराव शिंदे, मुनसफ माझे बऱ्याचे वर्षांचे स्नेही असल्यामुळें राहण्याला संकोच कांहीं वाटला नाहीं. त्यांनीं बिचाऱ्यांनीं आमची किती म्हणून सोय पहावयाची ? डोंगराएवढे उपकार

झालें त्यांचे. पण म्हटलं असूं द्या. मित्राचे ते उपकार कसले? मग तो मित्र कसला!

सौभाग्यवतीची प्रकृती पुष्कळच सुधारली. पण मन साशंक. जरा कांहीं झालं कीं डॉक्टरकडे धांव मारायची. तसें बघायला गेलं तर फारसं असं कांहीं असायचं नाहीं. पण मनाला काळजी ही वाटायचीच!

अशा स्थितींत कांहीं काल निघून गेला. या मुदतींत अंथरुणावर पडून अशी ती कांहीं नव्हती.

* * *

वीस वर्षांनंतर आलेला प्रसंग हा! तिला कांहीं महिनें उलटून गेले होते. मला आनंद तर मुळींच झाला नाहीं. मला हें एक गंडांतर आल्यासारखंच वाटूं लागलं. माझ्या स्नेह्यांनीं सांगितलं कीं, आतांपासून चांगल्या डॉक्टराची मदत घ्यावी म्हणून.

आमच्या गांवीं खास बायकांच्या रोगाचं शिक्षण घेऊन डॉक्टर शिंदे विलायतेहून नुकतेच आले होते. त्यांना बोलवून तिची प्रकृती दाखवली. त्यांनीं सुखरूपपणें संकटांतून पार पाडण्याची जबाबदारी घेतल्यामुळं माझा जीव खालीं पडला. कसलाही प्रसंग आला तरी तुम्ही भिऊं नका, आपण निभवून घेऊं असं त्यांनीं मला आश्वासन दिलं होतं. मी पण सर्व भार त्यांच्यावर टाकून स्वस्थ बसलों.

आतां आठवा महिना चालू होता. बाळंतपणात बहुतेक सिझरीन ऑपरेशनचा म्हणजे पोट चिरून मूल काढण्याचा प्रसंग येईल असें त्यांचें मत पडलें. याचा माझ्या मनावर काय परिणाम झाला असेल तें माझं मलाच माहित.

नात्यागोत्याचे जवळचे मदतीला असें कोणी नव्हते. आणि अशा स्थितींत बायको जाण्याचा प्रसंग! ‘ एक मेली दुसरी कर ’ या वृत्तीचा मी नव्हतों. नवी आयुष्याची घडी बसवणं पुनः जमत नाहीं. मला म्हणजे अगदीं वेड लागल्यासारखं झालं. डॉ. धनवडे माझे स्नेही त्यांनी आश्वासन दिल्यामुळं आधार वाटत होता. पण हा आधार मला लाभला नाहीं. ज्यांच्या आधारावर मी विसंबून होतों त्यांना अचानक स्पेशल

ड्यूटीवर पाठवण्यात आलं. सरकारी हुकूम तो. कुणाकडं तक्रार करणार! आकाशांत अधांतरी लोंबत ठेवल्याप्रमाणं मला झालं. माझा धीर एकदम सुटला. आतां डॉक्टर कोण पहावा? हा माझ्यासमोर मोठा प्रश्न पडला. कोल्हापूरास डनिंग या युरोपियन बाईनं बरीच ख्याती मिळवली होती. तिच्याकडं जाणं हाच आतां एक उपाय होता. तिला केस दाखवली. दर आठवड्यास तिला दाखवण्यासाठीं जाऊं लागलों. पण तिची नजर सहजी तिच्या पोटावरील एका गांठीवर गेली. तिनं सांगितलं कीं, बाळंतपणाअगोदर ती गांठ कापली पाहिजे. आतां पुन: ऑपरेशन आणि तेही बाळंतपणापूर्वी! ऑपरेशन म्हणजे निदान आठ दहा दिवस तरी खिळून रहायलं पाहिजे. पथ्य करायचं. बरं अशा वेळीं टाके बसले तर आंतील मुलाच्या वाढीबरोबर ते ताणत नाहीं कां जाणार! अशा नाहीं नाही त्या शंका मनांत येत.

सरकारी दवाखान्यांतील मुख्य डॉ. धनवडे हे माझे बऱ्याच वर्षांचे स्नेही. पण बहुतेक काळ ते महाराजांच्या सेवेंतच गुंतलेले असल्यामुळें आणि विशेष मर्जींत असल्यामुळें त्यांना वाड्यावरची नेहमीं बोलावणीं येत असत. यामुळं ते स्नेही असूनही त्यांच्या मदतीची मीं फारशी अपेक्षां करीत नसें. कारण अपेक्षेप्रमाणें त्यांना माझ्या उपयोगी पडणं शक्य नव्हतं. पण आपली गोष्ट कानावर घालावी म्हणून घातली. त्यांनीं मला धीर दिला. 'ऑपरेशन मागाहून करता येईल. तें कांहीं विशेष धोक्याचें नाहीं. तुम्ही उगाच काळजी करीत बसूं नका. आणि बाळंतपणाच्या दरम्यान मी खात्रीनं इथं आहे. तेव्हां मी सर्व कांहीं मदत देऊं शकेन. सीझरीन ऑपरेशनचा जरी प्रसंग आला तरी सुद्धां भिऊन जाण्याचं कारण नाहीं. आम्ही सर्व कांहीं पार पाडूं.'

त्यांनीं कांहीं सीझरीन ऑपरेशन्स केलीही होती. आणि माझे स्नेही. दवाखान्याचे मुख्य. मग मला कशाची भीति! आतां वाटलं कीं मी काळजींतून सुटलों. आणखी यापेक्षां काळजी घेणारा मिळणार तरी कोण? वरची गांठ पहायला येतों, असं त्यांनीं सांगितलं. पण आतां मी कशाला काळजी करूं. मी घरीं येण्याचा फारसा आग्रहही केला नाहीं. वाटलं येतीलच म्हणून, पण त्या बिचाऱ्याला वेळ मिळाला नाहीं. त्यांना घरच्या

मंडळींना औषध द्यायला वेळ मिळायचा नाहीं, मग माझ्याकडे यायला नाहीं तर विशेष काय? पण माझी खात्री होती कीं, कसाही प्रसंग आला तरी आपण आतां काळजी करत बसण्याचं कारण नाहीं.

पण हें समाधान मला फार दिवस लाभलं नाहीं. ते एकाएकीं महाराजाबरोबर निघून गेले. त्यांचा नाइलाज झाला. माझे हातापाय मात्र गळून गेल्यासारखे झाले.

डॉक्टर गेले आणि बायकोच्या पोटांत वेणा सुरू झाल्या. तिथं ऑपरेशनची जबाबदारी घेण्याजोगं कोणी नव्हतं. माझ्यावर हें एक मोठंच संकट चालून आलं. याला जबाबदार डॉक्टर असें कसें म्हणतां येईल. ते हुकुमाचे नोकर. मालकांनीं बोलावल्यावर त्यांना जाणं भागच. दवाखान्याचा डॉक्टर हा जणूं आपला खासगी डॉक्टर समजून महाराज वागत.

पण माझं मरण ओढवलं. बायकोवर म्हणजे जिवाचा प्रसंग! ज्या आधारावर विसंबून रहावं तो आधार अचानक तुटावा! पण श्रीमंतांना आमच्या संकटाची कल्पना कुठली यायला! आतां मिरजेला नेण्याखेरीज मार्ग नव्हता. कळ सुरू होती. त्याच स्थितींत मोटारीमध्यें घालणं अपायकारक पण त्याहीपेक्षां गांवीं राहणं धोक्याचं. दोन संकटांत जाणं हा संकटाचा मार्ग नाइलाजानें पत्करावा लागला. डॉक्टर व्हेल यांचे पाय धरले, आणि सांगितले, 'डॉक्टर कांहींही करा पण माझ्या बायकोला वांचवा.' बायको जगली म्हणजे झालं. मला एवढीच काळजी होती. मुलाचा विचार डोक्यांत नव्हता. काळजी फक्त बायकोची.

डॉ. व्हेलनी केस तपासली. त्यांनाही काळजी करण्याजोगी केस वाटत होती. पोट चिरण्याचा प्रसंग येणार नाहीं असं निश्चितपणें त्यांनीं कांहीं सांगितलं नाहीं.

**बाल दौलतचा जन्म.—** वीस वर्षांनं मूल म्हणतांच ते ऑपरेशन टाळण्याचा शक्य तो प्रयत्न करीत होते. वेणा सुरू झाल्याच होत्या, त्या आतां जास्त जास्त वाढत चालल्या, असह्य होत चालल्या. बाळंतिणीनं डॉक्टरचा हात घट्ट धरून ठेवला. 'जीव घ्या पण या कळा बंद करा,' असं अगदीं काकुळतीला येऊन तिनं सांगितलं. मूल

स्वाभाविकपणें होण्याचें लक्षण कांहीं दिसेनात. प्राणांतिक वेदना सुरू झाल्या होत्या. ऐकतांना माझं काळीज फुटून जात होतं. माझा धरबंध सुटला. मी तर आशा सोडलीच होती. अखेर बायकोला ऑपरेशनच्या रूममध्यें नेलं. न्यायला स्ट्रेचर घेऊन मुडदेफरास आले. क्लोरोफॉर्म दिला. झालं ! संपलं ! आतां बायको कसची जगते. मी पूर्ण निराश होऊन डोळे सताड ठेऊन पहात होतो. पण डोळ्याला दिसत नव्हतं.

दहा पंधरा मिनिटं गेलीं असतील. ऑपरेशन रूममधून एकदम रडण्याचा ' ट्यॉं ट्यॉं ' असा आवाज ऐकूं येऊं लागला. मला वाटलं मुलाच्या त्या प्राणांतिक किंकाळ्या असाव्या.

पण लगेच एक नर्स माझ्याकडे धांवत आली आणि ' पेढे द्या, मुलगा झाला, ' म्हणूं लागली. मला कसला तो आनंद वाटला नाहीं. मला होती बायकोची काळजी. मी विचारलं ' बायको कशी आहे ? '

ती म्हणाली, ' चार पांच मिनिटांत त्या येतील शुद्धीवर. ' हें ऐकल्यावर मात्र आनंद झाला. त्या बातमीनें माझ्या अंगावर मूठभर मांस चढलं असेल. मी केवढ्या काळजींतून मुक्त झालों. खोलीमध्यें बाळंतिणीला व मुलाला टाकलं. मूल स्वस्थ पडूनच होतं. प्रथम तिनं किंकाळी फोडली असेल तेवढीच !

**दुसरी काळजी.**— माझी बायको जगली ! मी अखेर काळजींतून सुटलों ! पण रात्र झाली आणि पोराचं ' ट्यॉंऽट्यॉं ' सुरू झालं एवढासा जीव तो ! त्याला काय सांगतां येणार ? काय बोलतां येणार ? त्याच्या प्रत्येक किंचाळीबरोबर माझं काळीज तुटल्यासारखं होऊ लागलं. मी कोट टोपी न अडकवतांच डॉक्टरकडं धांव मारली.

मला वाटलं होतं कीं आतां मी काळजींतून सुटलों, पण ही त्याहूनही अधिक काळजी लागली. आतां मुलाच्या काळजीची त्यांत भर पडली.

* * *

**दुसरे संकट.**— साध्या शिळोप्याच्या गप्पांतून अशी भलतीच गोष्ट निष्पन्न होईल अशी मला काय कल्पना !

आम्ही चार मित्रमंडळी संध्याकाळच्यावेळीं गप्पा मारीत बसलों होतों. एका पत्रांतील अक्षराचा कीस चालला होता. पत्रांतील अक्षर

कांहीं कोणाला लागेना ! एकाला एक, दुसऱ्याला एक, असें करतां करतां सर्वांनीं मिळून त्या पत्रांतील आशय जुळवला !

तें पत्र होतें एका डॉक्टराचें दुसऱ्या डॉक्टरला, एका पेशंटबद्दल. ज्या रोग्याची थुंकी त्यांनीं तपासली होती, त्यांत त्यांना क्षयाचे जंतु सांपडले होते. त्याकरितां त्यांनीं त्याला हवापालट सांगितली होती. हाच पत्रातला मजकूर !

या मजकुरानें माझ्या मनावर काय परिणाम होणार ! अनोळखी मनुष्याला क्षय असला काय आणि मेला काय, दोन्ही गोष्टी सारख्याच !

पण या पत्रानें उगाच एक विचार मनांत आला व जिज्ञासा उत्पन्न केली !

आमची मित्रांची मैफल उठली. जो तो आपल्या उद्योगाला लागला. मी आणि त्यांतले एक माझें डॉक्टर स्नेही डफळे फिरायला म्हणून बाहेर पडलों. जरूर नव्हती पण सहजी घ्यावा म्हणून एका हॉटेलांत चहा घेण्यासाठीं गेलों. बोलतां बोलतां डॉक्टरना मी म्हणालो, ' डॉक्टर! माझीही बायको बाळंत झाल्यापासून फार अशक्त होत चालली आहे. उगाच नाहीं त्या कल्पना येऊं लागल्या आहेत त्या पत्रापासून. तिचीही थुंकी तपासून घ्यावी म्हणतों. पाठवून देऊ कां तुमच्याकडे!'

' द्यो लावून द्या उद्याच. पाहूं काय आहे तें.' दुसरेच दिवशीं बायकोची थुंकी भरून डॉक्टरकडे पाठवली. मनाला वाटलें कांहीं दोष असले तर समजतील आणि औषधही सुरूं करतां येईल.

नेहमीप्रमाणें दुपारच्यावेळीं ईझीचेअरवर वाचीत पडलो होतो. टेबलावर चहाचा कप आणून ठेवला होता. इतक्यांत कोणी माणूस डॉक्टरकडून पत्र घेऊन आला. पत्र बंदच होतें. डॉक्टरनें ताबडतोब रिझल्ट पाठवल्याबद्दल आनंद झाला. पत्र फोडलें. वाचूं लागलो! शब्द कसले ! प्रत्येक शब्द संगिनीप्रमाणें छातींत भोसकला जात होता. घांव बसल्याशिवाय कळ येत होती. डॉक्टरच्या घाईबद्दल आता रागच आला. माझ्या जिज्ञासूवृत्तीबद्दल पश्चाताप झाला! पत्र कसलें! फांशीची शिक्षाच ती! काळपाशच तो! त्या शब्दांनीं हृदयावर जणु अग्निस्फुलिंगच टाकला.

ज्वाला दिसत नव्हत्या पण हृदय जळून खाक होऊं लागलें होतें. टेबलावर चहाचा कप होता. जवळ बायको उभी होती पण मला डोळे होते कुठें—?

‘ चहा गार होत चालला ना ?’

हे बायकोचे शद्ब कानांवर पडतांच दचकून जागा झालों. शुद्धीवर आलो. पुनः मन चरकलं. हातांत पत्र होतें. बायको पाहणार तर नाहीं! पण लगेच जीव हलका पडला. पत्र इंग्रजीत होतें. तिला इंग्रजी येत नव्हतं. केवढी सुटका झाली माझी. आतां वाटेल ती थाप मारता येईल. पण हाही प्रसंग टळला.

बाळ आंत रडूं लागतांच ती घाईनें निघून गेली. बाळनेंच मला प्रसंगांतून बचावलें. ती आंत जातांच पुनः पत्र हाती घेतलं. चुकलं असेल कदाचित. म्हणून पुनः डोळे फाडून वाचूं लागलो. पण नाहीं. तेंच! तीच भयंकर बातमी! पत्रातलं अक्षर पुढें दिसेना. डोळें पाण्यांनीं भरून आले. हात थरथर कांपूं लागले. ओठ उगाच हलूं लागले. छातींत कालवाकालव होऊं लागली. घश्यांत आवंढ येऊं लागले. मी आता ओक्साबोक्शी रडूं लागणार कीं काय? अशी भीति वाटूं लागली. ही मनःस्थिति तिच्या दृष्टीस पडली तर सर्वच घोटाळा, म्हणून मी खोलीचें दार लावून घेतलं आणि हृदयाला मोकळी वाट करून दिली. तथापि हुंदके मोठ्यानें येऊ नयेत म्हणून आंवरून धरीतच होतो.

भावनावेगानंतर विचार सुरू झाले! काय केलें मीं हें! कशी बुद्धी झाली मला? अज्ञानातच मी किती सुखी होतो? रोगाची जाणीव प्रत्यक्ष रोगाहून किती भयंकर! तिला समजलें तर! कल्पनासुद्धां असह्य झाली. छे! छे! तिला तर समजता कामा नये. पण ही गोष्ट मी दडवूं कशी! मला दवडता येईल काय?

इतक्यांत दारावर थाप आली बायकोची! काय गोंधळ उडाला माझा. डोळे वर केले तर ती अंतःकरणाचा ठाव घेईल म्हणून मी वर पाहिलंच नाहीं. शंका येऊ नये म्हणून उगाच हंसूं लागलो. कांहींतरीच बोलूं लागलो. काय बोलत होतो तें माझं मलाच समजत नव्हतं. नजरा-नजर चुकवावी म्हणून मी घराबाहेर पडलों.

रात्र पडली. अंथरुणावर येऊन पडलों. जेवण घांसभरही गेलें नाहीं. बाहेरून खाऊन आलो असें सांगून बायकोची समजूत घातली. बायको व बाळ शेजारीच पडले होते. माझ्या चेहेऱ्यावर उठणारे मनोविकार बायकोला दिसतील, आणि मग ती प्रश्न विचारू लागेल म्हणून कांहीएक वाचीत न बसतां दिवा मालवून मी गादीवर पडलो. डोक्यावर पांघरूण घेतलें, अंधार झाला खरा, पण अंधारांत भवितव्यतेची भेसूर चित्रें स्पष्ट दिसूं लागली. सारखी भेडसाऊ लागली. झोंपतर पार उडूनच गेली होती.

सतत दुष्टावा करणारें भाऊबंद सुद्धां असें वाईट चिंतित नसतील, अशा वाईट वाईट गोष्टी डोळयासमोर सारख्या नाचत होत्या. माझ्या इतका माझा शत्रू जगांत दुसरा कोणी नसेल. किती अभद्र कल्पना त्या!

माझा मुलगा माझ्याच जवळ झोंपला होता. गाढ निद्रेंतील त्याचे सुस्कारे ऐकूं येत होते. पलीकडे त्याची आई ‘बाबा, बाबा’ म्हणून प्रेमानें आळवीत होती.

ध्यानीं मनीं तरी तिच्या आलें असेल काय? कीं हे मोहपाश टाकून आपल्याला जावें लागेल! जावे लागेल!!!

वाचकहो हे लिहिताना माझा हात कांपतो. काय लिहलें मीं हें! छे छे, नाहीं जाणार ती! आजार आला कीं माणूस जातेच असें आहे काय? कितीतरी रोगी मरणाच्या दारांतून परततात. मग तीच का जाईल बरं! आणि ती अशी आजारी आहे तरी कुठे? अद्याप चांगली चालते, बोलते, घरचा प्रपंच पाहते, कामधाम करते, मग मी एवढें का भ्यावे?

पण चांगल्यापेक्षां वाईटच कल्पना का धुमाकूळ घालतात कोण जाणे! वाईट वाईट त्याच गोष्टी आठवतात. छे छे, मी तिला मरू देणार नाहीं. मानवी शक्तीला ज्या कांहीं गोष्टी करता येतील तेवढ्या करीन. वाटेल तेवढा पैसा खर्च करीन, सर्व जिनगानी विकून तिला बरं करीन.

पण विचार! विचारांचा राग आला.

विचारांनो तुम्हीं अशी कां दंडेली चालवली आहे. का माझ्यावर एवढी जबरदस्ती! नका असें माझें हाल करूं!

माझ्या मुलाला नको का तिचा आधार! त्यानें तुमचं काय केलें आहे? ती गेली तर त्याचें कसें होईल! मी कसा त्यांचा संभाळ करूं! मातेची वाण मला कशी भरून काढता येईल? आणि मला या वयांत टाकून गेली तर मला तरी कोणाचा आधार! मग मला जगांत कोण आहे बरें? बाळाची ती आई असली तरी मलाही तितकीच पूज्य आहे ती. ती गेली तर मन मोकळं करून मी कुणाजवळ बोलू? सुखदुःख कुणाला सांगू? परगांवीं गेलो म्हणजे कुणासाटीं घराकडे धांव मारू?

विचार! विचार! विचार!

एक पळही विसावा नाहीं. डोळे झांकले, उघडले, तरी तेच! विसरावे, दुसरीकडे मन लावावे, म्हणून पुस्तक हातीं घ्यावे तरी कांहीं दिसूं नये. विचारल्या प्रश्नांची उत्तेंर भलतीच द्यावीत.

तिला माझ्या यातनेची कांहीं तरी कल्पना येत असेल काय? रस्त्यावरून चाललो तरी पुढची माणसें दिसेनात. काय मी वेडा होणार? फांशीची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराला अशाच यमयातना होत असतील नाहीं!

डॉक्टराची सल्ला, मी मिरजेसारख्या ठिकाणीं हवापालट करण्यास न्यावें अशी पडली. मिरजेस आणि तेही दवाखान्यांत राहणे म्हणजे दिवाळंच. पण पैशाचा विचार करण्याची ही वेळ नव्हती; जाणे हे भाग होतेंच! जिवाचा प्रश्न. ती जाणे म्हणजे बाळ उघडे पडणें!

मन वाईट चिंततें. पण त्याचवेळीं सुखाची मनोराज्येंही रचीत असते.

कोणाची सल्ला वगैरे घेण्याचे भानगडीत न पडतां मी मिरजेची वाट सुधारायचा निश्चय केला.

आतां दुसरीच अडचण उभी राहिली!

बायकोच परगांवी जाण्याला कबूल होईना. त्याचें कारण म्हणजे तिला तिच्या रोगाची कल्पना नव्हती! किरकोळ खोकला आणि ताप. नेहमींप्रमाणें लवकर बरा होईल ही समजूत! मला मोठें कोडें पडलें; तिला अमका एक रोग झाला आहे, असें मी तरीं कसे सांगू? आणि हा तर दुसरा तिसरा रोग नव्हे.

तूं रोडकी होत चाललीस. तुझ्या प्रकृतीसाठीं कांहीं दिवस हवेशीर जागीं जाऊन राहणें भाग आहे, नाहींतर रोग कोणचाही असो बळावला म्हणजे मग उपाय चालत नाहीत, म्हणून सावधगिरी घेतली पाहिजे, म्हणून तिला सांगून पाहिलें, पण त्याचा परिणाम होईना.

तिची समजूत कीं मी नाहीं त्या गोष्टीचा उगाच बाऊ करीत आहे. नेहमीच्या स्वभावापैकीं हा प्रकार आहे.

खेरं रोगाचें कारण सांगावें तर धैर्य होईना. एकानें सांगितलें लवकर तर जावाच, पण मुलाला ज्ञाजूला काढा.

मुलाला कसे काढून घ्यायचं ? काय सांगायचं ? काढून घ्यायचें म्हणजे ते माझ्याजवळ घेतलें पाहिजे. मला एक कल्पना सुचली.

आम्हीं सर्व जमिनीवरच एका खोलींत बिछाना घालून झोंपत होतों. तेव्हां निमित्त सांपडलें. मी तिला म्हणालों.

' डॉक्टरनें तुला पलंगावर झोंपायला सांगितलें आहे. जमिनीवरचा गारठा आणि धूळ वाईट आणि खोलींत दुसरीं माणसेंही निजतां कामा नयेत. भरपूर हवा पाहिजे.'

तिनें हें ऐकलें. मूल पलंगावरून खालीं पडेल म्हणून मी त्याला माझ्याच जवळ झोंपवून घेऊं लागलों.

ही झाली मुलाची सुरक्षितता. पण तिचें जाण्याचे काय ? मिरजेला तर नेणें भाग होतें. ती कांहीं कबूल होईना !

खऱ्या रोगाची कल्पना करून दिली असती तर कदाचित् कबूल झाली असती, पण !!! धैर्य होईना.

कोणच्या तोंडानें सांगू मी तिला ? तिच्या मरणाची बातमी माझ्याच तोंडानें मी सांगू कशी ? मला तर तो रोग मरणाहूनही भयंकर वाटत होता. त्याच राक्षसाच्या भक्ष्यस्थानीं माझी पहिली आई, दुसरी आई, तिची बहीण व भाऊ, बायकोचा बाप, इतके पडले होतें. ती भीति, ते हाल, तें दृश्य रात्रंदिवस भेडसावत होतें. त्या वेळीं तर मी, देवा आतां माझ्या आईला लवकर सोडीव म्हणूनच प्रार्थना करीत होतो.

क्षयासारखा भयंकर रोग तिला झाला आहे असें मी कसें सांगू ? तो रोग—ती अक्षरें लिहायलाही मला भीति वाटते.

अगोदरच ती आजारी, तिला केवढा धक्का बसेल? त्यानेंच नाहीं कां तिचा रोग बळावर! मग आतां कोणचा उपाय करावा आणि तिचें मन वळवावें? तशांत ती हट्टी आणि दुराग्रही, भयंकर हेकेखोर!

एक उपाय सुचला. कदाचित त्याला यश येईल. आतां फक्त तोच एक मार्ग उरला होता.

ती हट्टी दुराग्रही हेकेखोर होती खरी, पण ती मुलाची आई होती. तिच्या दुराग्रहाची भिंत फोडायला मी मातृप्रेमाचा उपयोग करून घ्यायचं ठरवलं!

ती थोडी स्वस्थचित्त आहे असें पाहून मी म्हणालो,—

'अग तूं असा कां हट्ट धरून बसली आहेस बरं? मी काय केवळ हौसेसाठीं हवापालट करतो आहे होय! मला काय पैसा जास्ती झाला आहे? मी मिळविता नाहीं, तसा श्रीमंत नाहीं, किंवा मला कोठून पैसा मिळेल असेंही नाहीं. असं असून मी जो जाण्याचा आग्रह धरला आहे तो काय मी वेडा म्हणून?

'तुला अद्याप चालता हालता येत आहे. तूं चांगली हुषार आहेस. यावेळीं हवेला गेलो तर तूं सशक्त होशील. तुझें आयुष्य वाढेल! बाळाचा जास्ती दिवस सांभाळ करतां येईल.'

'तूंच विचार कर. आम्हां दोघांशिवाय आमच्या बाळाला पाहणारे असें कोण तरी आहे काय?' या बोलण्याचा मात्र तिच्यावर परिणाम झाला व ती निघायला कबूल झाली.

मी पूर्ण निराश अशा मनःस्थितींतच होतो, प्रसंग तर कठीण ओढवला होता. संकटाच्या प्रसंगीं कोणाचा आधार नाहीं असें वाटलें म्हणजे धैर्य खचतें. कांहीं सुचेनासें होतें. मी, माझी बायको आणि माझें मूल हेंच माझें कुटुंब!

बायकोला तर भयंकर दुखण्यानें पछाडले होतें. रोग भयंकर होता पण सुरुवात होती. वेळींच उपाय झाला तर कदाचित आंवरण्याचा संभव. डॉक्टरनें सॅनिटोरियममध्यें जाण्यास सांगितलें—वर्ष दोन वर्षें सुद्धां रहावें लागणार!

पण जाण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. तीच एक जगायची आशा. माणुसबळ नाहीं म्हणून स्वस्थ तरी बसून कसें चालेल? काय व्हायचें तें होईल असें म्हणून सॅनिटोरियम गांठलें. सामान टाकून स्थिरस्थावर करूं लागलो. इतक्यांत जगन्नाथ जाधव नांवाचा मुलगा आपणहून पुढें झाला. त्यानें सामान व्यवस्थेशीर लावलें. घरून थोडेंबहुत करून आणलेच होतें. तें सोडून जेवायला बसलो. त्यांतलेंच थोडें आग्रहानें जगन्नाथलाही खायला घातलें. जगन्नाथनें असें विशेष कांहीं केलें नव्हतें खरें, पण ओळख ना देख. आल्याठिकाणीं अगदीं अनोळखी माणसानें केलेल्या मदतीनें कोणालाही उपकार वाटणारच.

दुसरा दिवस उजाडला! बाजारहाट कसा करायचा हा माझ्या-समोर प्रश्न पडला. मला बाजारहाट करणें माहीत नव्हतें. त्यांत ठिकाण परकें. कुठें मिळतें याची माहिती नव्हती.

मी अगदी बुचकळ्यांत पडलो पण ही अडचण लगेच दूर झाली. जगन्नाथ सायकल घेऊन दारांत उभा. त्यानेंच आपणहून विचारलें ' मी गावांत जाणार आहे, कांही भाजीपाला, धान्य आणायचें असेल तर सांगा. मी जाणारच आहे. आणीन येतांना.'

देव पावल्याप्रमाणेंच झालें! यापुढें जगन्नाथ रोज सकाळीं आपणहून 'काय नक्की पाहिजे' हें विचारून आणूं आगला. परक्या ठिकाणीं एवढ्या तेवढ्यासाठीं किती म्हणून अडून बसतें. पण सांगायची फुरसत, जगन्नाथ निघालाच. कसलीतरी अपेक्षा ठेवून तो असा अगत्यानें वागत होता असें मुळींच नव्हतें. स्वभावच त्याचा तो. असेंच आजूबाजूच्या पांचदहा झोंपड्यांतील रोग्यांचीं तो स्वखुशीनें कामें करीत असे.

* * *

मला हक्काचा माणूस मिळाल्यासारखें झालें. अगदी एका पगारी नोकराचें काम फुकट होऊं लागलें. हांक मारली कीं जगन्नाथ हजर. मग दिवस असो किंवा रात्र असो.

एक आठवडा गेला. घरच्या कोणाचें विचारपुसीचें कार्डही आलें नाहीं. मग समाचारासाठीं येण्याची गोष्ट कशाला! पण कां कोण जाणे



## दंतवैद्य डॉ. काटे

दंतवैद्य डॉ. काटे, तपास करीत येत असल्याचें दिसलें. त्यांना लांबून पाहतांच माझी छाती दडपून गेली. वाटलें आपण बरेच दिवस दिसलों नाहीं म्हणून स्वतःच बिल वसूल करायला स्वारी आली कीं काय कोण जाणें ! कारण मी स्वतः आणि माझी बायको त्या डॉक्टरांचे कित्येक महिन्याचे पेशंट. रोजची तक्रार. बिल काय म्हणून विचारलें असतां 'पाहूं आजच काय त्याचें, म्हणून त्यांनीं चालढकल केली होती.' केलेंच बिल तर सहजीं तीन चारशेंचे वर जाणार ! या वेळीं पैशाची गरज आणि यांनीं मागणी केली तर कसें व्हायचें. या विवंचनेंत मी पडलो पण. ही भीति लगेच दूर झाली. बरेच दिवस दवाखान्यांत गेलो नाहीं म्हणून त्यांनीं

माझी चौकशी केली होती आणि मोठ्या अडचणींत सांपडल्याचें ऐकून ते स्वतः समाचारास आले होते. रोजचा येणारा माणूस न आल्यामुळें त्यांना चुकल्या चुकल्यासारखें झालें होतें. भेटीस आले तेही रिक्तहस्तें नव्हते आले. भाजीपाल्याची करंडी आणि फराळाचा डबा गच्च भरून आणला होता. आणि पुनः निरोप घेतांना काय हवें असेल तें कळवत चला म्हणून त्यांनीं फिरफिरून बजावलें. उपकाराचा हा विलक्षण प्रकार पाहून माझे अंतःकरण भरून आलें. डोळयांतली आंसवें दडवतांना माझी कोण त्रेधा उडून गेली.

जवळच्यांनी नुसती शाब्दिक सहानुभूति दाखवू नये आणि ज्याचा रक्तामांसाचा कसलाच संबंध नाहीं अशानें—उलट ज्याचे शेंकडो रुपये देणें त्यानेंच—मदतीला धांवून यावें! भरल्या हातांनीं भेटीला यावें! महात्मा आणखी कुणाला म्हणायचें! नांव-लौकिकाची आणि वर्तमानपत्री प्रसिद्धीची अपेक्षा न ठेवता केवळ भूतदयेनें प्रेरित होऊन धांवत येणारा माणूस देवतुल्य वाटल्यास नवल काय? निस्वार्थी प्रेमाच्या प्रभावानें मी डॉक्टरांचा निस्सीम भक्त बनलो. चार मंडळींत त्यांच्या गुणाची स्तुती करतांना मला कृतकृत्य झाल्यासारखें वाटते.

डॉक्टर गांवीं निघून गेल्यानंतर ते वेळोवेळीं पत्रें पाठवू लागले. लागतील ते जिन्नस पोहचवू लागले. त्यांच्या भेटी पुनःपुनः होऊं लागल्या.

डॉक्टरचे व्यवहारी नातें जाऊन तेथें जिव्हाळयाचा संबंध जुळला. दुरावलेले रक्तसंबंधी डॉक्टरांच्या रूपांत पाहतां आले. निराधार वाटू नये म्हणून त्यांनीं मला एका पत्रांत मुद्दाम लिहिलें 'तुम्हाला कांहीं हवें असल्यास जरूर कळवावें, संकोच धरू नये. मी तुमचा आहे हे विसरू नये. म्हणजे तुम्हाला जगांत कसली फिकीर वाटणार नाहीं.' एवढा आधार मिळाल्यानंतर मग काय?

जगांत आपल्याला कोणी नाहीं असें वाटणाऱ्या मला डोंगराएवढा आधार मिळाला! संकटांतून हा एक अलभ्य लाभ मिळाला!

डॉ. कात्र्यांच्या नंतर दुसरा बहुमोलाचा आधार म्हणजे आमच्या सासुबाईंचा.

**आमच्या सासुबाई चंद्राबाई गोरे.**—माझं लग्न झाल्यापासून तो या कालपर्यंत ( मार्च १९५४ ) त्यांचे जीवन, त्यांचा स्वभाव, त्यांची वागणूक मी बारकाईनें पहात आलो. हिंदू स्त्रीचा एक आदर्श नमुना ! त्याग, सेवा, निष्ठा, नम्रता, सोशिकपणाचं जणु मूर्त स्वरूप. सारं जीवन लहान थोरांच्या सेवेंत घालवलं. तरुणपणी नवऱ्याच्या हुकमतीत. पण ती हुकमत आनंदानें आणि भक्तीनें मानायची. त्याच्या गुणावगुणाकडं पाहणं हे जणु आपलं काम नव्हे. म्हातारपणी मुलांनी अंमल गाजवावा. त्यांनी कोणावर हुकमत गाजवलेली मी पाहिलं नाहीं. सुनांवरही गाजवली नाहीं. उलट त्यांचीच कामे करायची.

मुलीच्या शुश्रुषेसाठीं काय काय करावं त्यांनी. सारं घर टाकून एकट्याच आल्या. प्रेमानं आणि जिव्हाळयानं आमची नोकराप्रमाणं सेवा करायची. जेवण करायचं त्यांनीच. भांडी घासायची त्यांनीच, अन् रात्रभर जागरण करायचंही त्यांनीच. आणि यातूनही सवड काढून शेजारपाजारच्या कॉटेजीसमध्ये असलेल्या रोग्यांची विचारपूस करायला जाणारच. त्या कितीतरी लोकांशी त्यांनी ळळा लावला. त्यावेळीं त्यांचे सहाय्य नसते तर आमची काय गत झाली असती कोण जाणे. दोन तीन नोकर आणि नर्स ठेवूनही इतकं काम कलं नसतं. अन् असा जिव्हाळा आणि कळकळ कुठली ? ती काय पैशानं विकत मिळणार.

आतां त्यांच वय असेल सत्तरापुढे. चार मुलांच्या बायका घरीं आलेल्या. नातवंडांनीं घर भरलेलं. पण स्वतः कोणाकडून सेवा करून घेणार नाहींत. उलट त्यांचीच काम हलकी करणार. नातवंडांचे कपडे धुणार. स्वस्थ म्हणून बसणं माहीत नाहीं. सासूचा जाच त्या घराला माहीत नाहीं. उलट तिलाच त्यांनीं त्रास द्यावा. पण कुरकुर नाहीं.

त्या आहेत शाहुपुरींत, आम्ही राजारामपुरींत. आतां पायांत जोर नाहीं. मान हलते. डोळयाला चांगलं दिसत नाहीं. माझा मुलगा सांगलीच्या इंजिनियरिंग कॉलेजमध्यें आहे. तो आला म्हणून समजलं कीं पायीच धांवून यायच्या बस् असूनही ती करणार नाहींत व आल्यातरी रिक्त हस्ते नाहीं. त्याला कांहींतरी खायला घेऊन येणार ! मी रागावलो ' चालत कां आला म्हणून ' तर म्हणणार ' असं किती लांब आहे ? '

नव्या पिढीला अशा माऊली पुनः पहायला मिळणार नाहींत. आम्हाला कांहीं अडचण आली, कामाची बाई गेल्याचं समजलं, कीं मुलीचं काम हलक करायला या येणार ! पण याचं काम कुणी हलकं केलं ? नव्या शिकलेल्या मुलींत कर्तव्याची ही जाणीव मिळणार नाहीं. ही संस्कृती आढळणार नाहीं. असली हलकी कामं करणं त्यांना कमीपणाच वाटणार ! सर्वांचा त्रास, अपमान, सहन करून हंसत खेळत घराचं गोकुळ करणार. हिंदू एकत्र कुटुंबें टिकली ती अशा त्यागी, प्रेमळ, आणि सोशिक जीवनानी. चंदनासारखं झिजणं एवढंच माहित. सर्वांच्या चुका पोटांत घालून. त्यावर प्रेमाची पांखर घालणार. शिक्षणाचा गंध नाहीं. पण यांचं जीवन पाहून साहित्यिकांनी स्त्रीदाक्षिण्याचे ग्रंथ लिहावेत. मला आईचं प्रेम लाभलं नाहीं, पण सासुबाईना पाहिलं म्हणजे हीच माझी आई असं वाटतं.

कोण आश्चर्याची गोष्ट ! वरील वाक्य पुरं व्हायला आणि पापडाचा हारा घेऊन सासुबाई आल्याचं, त्यांच्या आवाजावरून समजलं. मी विचारलं 'तुम्ही चालतच आलात कां पुनः' 'छे या बाईच्या डोईवर हा हारा दिला होता' पण तुम्ही चालतच आलात ना ?' त्याला उत्तर फक्त हास्यानंच मिळालं ! !

बरोबर आलेली बाई म्हणाली 'पीठ मळून ठेवलं आणि मीठच घालायचा विसरल्या. मग मीठ घातलं सुनांनी' यावर माझी बायको त्यांना म्हणाली 'तुला आठवण रहात नाहीं तर करायला घेतलंस कशाला ?' त्यावर सासूबाई म्हणाल्या 'सुना आपआपल्या कामांत त्यांना कशाला त्रास देऊ.'

**सॅनेटोरियम मधील प्रेमभाव.—** आम्हा एकमेकांत भाजी-पाल्याची अदलाबदल होऊं लागली. कांहीं चांगला पदार्थ झाला कीं थोडा थोडा सर्वांना वाटायचा ! स्वयंस्फूर्तीनें स्वीकारलेल्या या पद्धतीमुळें तो तेवढा समाज एकत्र कुटुंबवजा होऊ लागला. सर्वांघरचे जिन्नस आल्यानें प्रत्येक झोपडींत भाज्यांच्या हरतऱ्हा पहायला मिळत. सर्वांवर एकच संकट. त्यामुळें ते एकमेकाकडे सहजगत्याच ओढले जात. कुणाला अधिक ताप चढला कीं तो सर्वांच्या काळजीचा विषय होऊन राही.

नवीन रोगी आला कीं त्यांची सर्वांनीं चौकशी करायची. त्यांतले कांहीं तर तर एकमेकांचे अगदीं जिवश्च कंठश्च बनले होते. थोडक्यांत म्हणजे भिन्न जातीचे असे ते अगदीं घरच्याप्रमाणें वागू लागले.

या अशा सर्वांच्या प्रेमळपणामुळें आलेली आपत्ती मला स्वतःच्या सुखासाठींच आली कीं काय असें वाटूं लागलें. आणि आतां लवकरच आपल्याला या प्रेमळ सहवासाला मुकावें लागणार, तसेंच डॉ. कार्ट्यांच्या प्रेमळ पत्रांनाही आतां मुकणार म्हणून वाईट वाटूं लागलें. आपेली बायको असाध्य रोगांतून बरी झाली याचा आनंद, आणि गोड सहवासाला मुकणार म्हणून दुःख मी एकाच वेळीं भोगीत होतो.

सर्व मंडळींचा निरोप घेताना आपल्या देहाचे भागच जणू गळून पडत आहेत असा मला भास झाला. इतके एकजीव आम्ही झालो होतो. त्यांतील कांहीं हळव्या मनाचे उघडपणें रडू लागले. कांहीं आपले चेहरे लपवू लागले. जगन्नाथ चव्हाणाच्या तोंडून तर शब्द उमटेना ! सर्व आयाबायांचा घोळका गाडीजवळ जमला होता.

डॉक्टर कार्टे मला न्यायला आले आले होते.

**संयम.**— खेदाची गोष्ट जिला महत्प्रयासानें आतापर्यंत पाण्यासारखा पैसा खर्च करून जगवली ती आजारामुळें चिडखोर होत चालली. तिला दुखवण्याची किंवा मनाविरुद्ध वागण्याची जरा सुद्धां सोय नाहीं. त्यानें त्रास करून घेणार व त्यानें लगेच प्रकृतीवर परिणाम होणार.

वैवाहिक जीवनांत बायकोच्या नेहमीच्या या ना त्या आजारामुळें मला नेहमीच आत्मसंयमन करावे लागे. व आतां तर तिला आयुष्यभर बहिणीप्रमाणें मानले पाहिजे अशी डॉक्टरांनीं ताकीद दिली. लेखन, वाचन व प्रचारकार्य यांत जरी वेळ घालवला तरी विषयसुखाची लालसा माझी नष्ट झाली नव्हती. या उपासमारीमुळें मनाला पुष्कळ त्रास झाला. दुसरे लग्न करावे, तर एक स्त्री जिवंत असता दुसरे लग्न म्हणजे एका स्त्रीचा बळी घेण्यासारखेच आहे—व तिघांनाही ते त्रासदायक व्हायचे, हे ठरलेले. सहवासामुळें, दुसऱ्या माणसांचा कितीही राग आला तरी ती नको अशी केव्हांच वाटली नाहीं. आपल्या नवऱ्याचें दुसरीवर प्रेम बसले आहे ही कल्पना कोणा स्त्रीला खपेल ? बरे, प्रेम आणि विषय यांत

फारकत करण्याइतका समजूतदारपणा स्त्रियांत कुठला आढळणार यामुळें दुसऱ्या लग्नाची कल्पना सोडून द्यावी लागली. आणि मला स्वतःला ही पुनः आतां नवा प्रपंच थाटण्याची इच्छा नव्हती. 'ठेवेली' ही गोष्ट आमच्या समाजांत भयंकर आहे व त्यामुळें माझा सामाजिक दर्जा नाहींसा होणार होता असेही नाहीं. ती तर मला आवश्यकता होती. पण लौकिकाची चाड म्हणून हीही गोष्ट करण्याचे धारिष्ट्य अंगी नव्हते. पुनः बायकोला ही गोष्ट खपेल की नाहीं याची खात्री नव्हती. स्त्रियांच्या स्वभावांतून मत्सराचे उच्चाटन झालेले कधी आढळायचे नाहीं. संशयाच्या वाऱ्याने डोंगर उभा करतील! साप मानून दोरीला उगाच झोडपतील! हा बहुतेक स्त्रियांचा जातिस्वभाव म्हणून आयुष्याच्या या भागावर मला बळजबरीनें पदरा ओढावा लागला. त्यांतही लोकापुढें आलेल्या मनुष्याला त्याचे इच्छेविरुद्ध स्वतःचे हाल करून घ्यावे लागतात. हे एक मनाचे दौर्बल्य आहे. असले बळजबरीचे आत्मसंयमन ही कांहीं फुशारकीची गोष्ट नाहीं. यांत पावित्र्य ते कसले!

× × ×

### हायकोर्ट जज्ज बॅ. दादा सावंत

अधिकारी मित्रांच्याकडे जाणे येणें मी टाकलेंच होतें. एक दोन स्नेही होते. ते मी लांब असलों तरी गांठ घेण्यासाठीं येतच? हजारो ओळखी प्रसंगीं कांहीं उपयोगाच्या नसतात. आणि मित्रही एखादाच उपयोगी पडतो. अधिकारी स्नेही भेटलेच तर हस्तिदंती दाखवून त्या वेळेपुरती विचारपूस करण्यापुरतेच. जिव्हाळयाचे मित्र अधिकारी झाले कीं लगेच शेफारतात असाच बहुतेकांचा अनुभव आला. त्यांत मी राजकीय चळवळ करणारा. मग माझ्या वाऱ्याला कोण उभा राहाणार!



हायकोर्ट जज्ज बॅ. दादा सावंत

पण कांहीं एका कामासाठीं म्हणून पूर्वीच्या एका अधिकारी स्नेह्याकडे नाइलाजानें जाण्याचा प्रसंग आला. त्यावेळी तो फारच मोठ्या हुद्यावर होता. माझें स्वतःचें असें काम नव्हतेंच त्याच्याकडे. पण मी घरीं जातांच त्यांनीं मला फारच प्रेमानें वागवलें. त्यांच्या वागण्यांत मला औपचारिकपणा कांहीं दिसून आला नाहीं. कारण कसेंही वागते तर काय वांकडें करणार होतों मी त्यांचें. ते म्हणाले

'बाबुराव,' माझें घरचें नांव बाबुराव—

'इतक्या दिवस मी तुमच्याकडे आलो नाहीं, भेटलो नाहीं, यामुळं तुम्हाला वाटलें असेल कीं माझे डोळे फिरले, मी गर्विष्ठ झालों, मैत्री विसरलों. पण खरी गोष्ट मात्र तशी नाहीं. उलट माझ्या या परिस्थितीबद्दल तुम्ही माझी कींवच कराल. ही अधिकाऱ्याची जागा वाटते तशी सुखाची व हेवा करण्याजोगी नाहीं. तुमच्याकडेच नव्हे तर मी अलीकडे शक्य तितकें कुणाकडे जात नाहीं. जाणूनबुजून मी जगापासून अलिप्त राहतों आहे. स्वतःला मी स्वखुषीनें डांबून टाकले आहे. तुम्हाला असे कां वाटते कीं मला मित्राची जरुरी नाहीं? जिव्हाळ्याची आवश्यकता नाहीं! जिवाभावाच्या गोष्टी बोलायला मनमोकळे हंसायखिदळायला मिळावें असें प्रत्येकाला नाहीं कां वाटत? मी काय माणसावेगळा कोणी आहे? पण माझ्यासारख्या अधिकाऱ्यांना, मला तरी, हा आनंद भोगतां येत नाहीं. आम्ही मैत्री करावी तर निःस्वार्थी मित्र लाभणार नाहींत. प्रत्येक कांहीं तरी आशेनें चिकटतो. आमच्याबरोबर कोणी फिरलेला पाहिला कीं तो वशिल्याचा समजून लोक त्याचे मागें लागतात. कांहींनीं माझ्या ओळखीचा भरपूर दुरुपयोगही करून घेतल्याचें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे. त्यामुळें चांगल्या वाईटाची निवड करणेंही कठीण झालें आहे. तेव्हां अशा गोष्टीला सवलत नको म्हणून जवळजवळ अज्ञातवास पतकरला आहे. मी एकलकोंडा बनलों आहे. हा माझा भित्रेपणा असेल, स्वार्थीपणा असेल, पण मला दुसरा मार्ग दिसत नाहीं.'

त्याचें हें हृदयाविष्करण ऐकून त्याची खरोखरीच कींव आली मला. तसें पहायला गेलें तर संस्थानांत तरी कोणालाही हेवा वाटण्याजोगी

‘ पोझिशन ’ होती त्यांची. ती जागा म्हणजे कित्येकांची आयुष्यांतील महत्त्वाकांक्षा असूं शकेल !

त्यांच्या या बोलण्यानें निदान त्यांच्याविषयींचा तरी दुराग्रह नाहींसा झाला. म्हणून मी म्हणालों.

‘ तुम्ही येत नाहीं म्हणून मला तरी मुळींच वाईट नव्हतें. कारण मीसुद्धां कोणाकडे जात नाहीं. अर्थात् त्याचीं कारणें निराळीं आहेत. तुम्ही येऊं लागला असतां तर मीच तुम्हांला येऊं नका म्हणून सांगितलें असतें.’

तथापि त्यांनीं मला दुसरें दिवशीं सहकुटुंब येण्याविषयीं आग्रहानें सांगितलें. घरीं गाडी पाठवून दिली. आम्हां नवरा बायकोंना चमचमीत मेजवानी देऊन ‘ दक्षिणेसह ’ घरीं परत आणून सोडलें. या प्रसंगानें पुष्कळ वर्षें भेट झाली नाहीं तरी या स्नेह्याचें प्रेम नष्ट कांहीं झालें नाहीं याची प्रचीति पटली. आज दादा मुंबई हायकोर्टांत प्रॅक्टिस करीत आहेत. सौजन्य, प्रामाणिकपणा, सचोटी आणि चिकाटी या गुणामुळें त्यांनीं तेथेंही जम बसवला आहे. माझ्या त्यांच्या प्रेमसंबंधांत कांहींही बदल झालेला नाहीं.

**विभक्त झाल्यानंतर.—** बंधूंच्या घरीं माझें जाणें येणें नव्हतें. मी त्यांचें अस्तित्व जवळ जवळ विसरलों होतों.

माझ्या भावाला मुलें झालीं—चारसे झालें. मला मुलगा झाला. पण या आनंदसोहाळयांत एकमेकांनीं भाग घेतला नव्हता. भाग घेण्याजोगें अंतःकरणाचें प्रेम उरलें नव्हतें. जनरीति म्हणून बोलावणं व जाणें हा शिष्टाचार. पण तोहि आम्ही पाळला नव्हता. त्यातल्या एका भावानें बोलावलें पण तें मी नाकारलें. मलाहि औपचारिकपणा आवडत नव्हता—

येणें जाणें नव्हतें. बोलाचाली नव्हती. माझ्या सुखदुःखाचा भार मीच वहात होतों. जगाच्या कटु अनुभवामुळें मी निष्ठुर झालों होतों. त्यांच्या आनंदांत आनंद मानण्याजोगें निर्मल मन नव्हतें माझें. माझें मन असें बनायला कांहींच कारणें नव्हतें असें मात्र नाहीं. यांचमुळें मी एकाकी होतों व त्या वृत्तीचा बनलों होतो. जनतेशीं संबंध प्लॅटफॉर्मपुरताच येई. प्रत्यक्ष सहवास फारसा येत नसे. लोक मला जाणत एवढेंच.

माझ्या पूर्वींच्या रहात्या घरीं पाय टाकून कित्येक दिवस झाले होते. त्या बाजूलाहि मी क्वचितच जात असें. जाण्याचें कारणहि नव्हतें.—

पण एका भावाचा मुलगा मरणोन्मुख असल्याची बातमी एकानें येऊन कळवली ! त्या बातमीनें माझ्या पितृहृदयावर जबर आघात केला ! माझ्या मुलावर माझें मनस्वी प्रेम ! त्याला जरा पडसें आलें, खोकला आला कीं झालो मी गर्भगळित ! भावाच्या मनःस्थितीची मला कल्पना करतां आली. मुलावर गुदरलेल्या त्या प्रसंगानें दुसऱ्या पितृ-हृदयाच्या यातनेची कल्पना येताच माझ्या रागद्वेष, अबोला, संकोच, मान अपमान, स्वाभिमान, वडिलकीचा ताठा सारा लोपून गेला ! एक 'दुःख' माझ्या डोळयापुढें उभें राहिलें ! हृदय पिळवटून काढूं लागलें. सारा पूर्व इतिहास विसरून गेलो मी !

सर्व हृदय व्यापून टाकलं होतं त्या एका दुःखानें. इतर कोणत्याही अपवित्र व कुढ्या विचारांना त्यांत जागा नव्हती.

दुःखाची दिव्यदृष्टी मला आली होती. पितृप्रेमाची दिव्य ज्योत अंतःकरणांत तेऊं लागली. भाऊबंदकीचे काळेकुट्ट विचार पळून गेले होते. दुःखाच्या पवित्र निर्मल उदात्त वातावरणानें पुनीत झालों होतों मी ! कोट अडकवला आणि घराबाहेर पडलों !

अरेरे काय पाहिलं मी ! मूल घटका मोजत होतं ! त्याची आई डोळयांत जीव आणून बाळाच्या श्वासोच्छ्वासाकडे पहात होती. मूल आणि माता ! एवढ्या दोन गोष्टीच माझ्यापुढें उभ्या राहिल्या. त्या मुलाचा मी काका ! माझ्या भावाचं मूल तें ! पण या रक्तसंबंधाचा धागा आठवलाही नाहीं, त्यावेळीं ! तें मूल आणि त्याची ती माता ! मुलाच्या श्वासोच्छ्वासाबरोबर हेलकावे खात असलेली माता ! छाती दुभंगून जात असतां तिला आंवरून शुश्रूषा करणारी जननी ! मुलावर कालपाश पडलेला ! तो तोडण्याची तिची खटपट चाललेली ! दृश्य पहावेना मला ! छाती गुदमरून गेली. श्वास घेतां येईना मला. घेरी येईल असें वाटूं लागलें. जड पावलानें परतलों. माझा दौलत माझ्या शिवाय झोंपायचा नाहीं ! त्याची हांक आली कीं ओ द्यायला पाहिजे म्हणून परतलों. माझा दौलत जवळ झोंपला होता.

तो त्या मातृहृदयाची जाणीव देत होता. त्याचा श्वास कानावर पडत होता. मनांत नाहीं नाहीं ते विचार येत. प्राण गेला तरी लिहिणार

नाहीं त्या गोष्टी मी येथें. त्या अगोदर माझा प्राण नाहींसा होईल. विचाराच्या वेदनांनीं छातीत कळ आली! पोटांत कालवाकालव सुरू झाली. थंडीच्या दिवसांत कपाळाला घाम सुटला माझ्या! इतक्यांत बाहेर कोणी हांक मारली. छाती दाबून धरूनच ऐकायला पुढें झालों. ज्याची भीति वाटत होती तीच बातमी! तीच अशुभ वार्ता. न्यायला मोटर आली होती! इतर वेळ असती तर कधींही पाय टाकला नसता त्या मोटारींत व टाकलाही नव्हता यापूर्वी. पण आतां निःशंकपणें गाडींत बसलों. ज्याच्या बारशाचें जेवण मी जेवलों नव्हतों, ज्या मुलाची काका ही हांक मी कधींच ऐकली नव्हती. त्या मुलाच्या देहांतानें मात्र माझ्या हृदयाचा ठाव घेतला! पितृप्रेमाला पूर आणला! त्या पवित्र ओघांत मी धुवून गेलों! माझ्या दुःखी बंधूबद्दल मला कळवळा उत्पन्न झाला. त्याचें शांतवन करण्याकरतां मी पुनः दुसरे दिवशीं गेलों. माझ्या जाण्याचा त्याच्यावर परिणाम झाला असेल कदाचित्. त्यानें पुढें होऊन मला कडकडून मिठी मारली, पाय धरले. आणि म्हणाला—'क्षमा करा, आमचे सर्व अपराध पोटांत घ्या. लुळ्या पडलेल्या माझ्या या जिवाला तुमचा आधार द्या. तुम्ही आम्हां सर्वांना आबांच्या ठिकाणीं आहांत.'

पण ही मनःस्थिती आणि संबंध पुढें टिकले नाहींत. व्यक्तिस्वार्थ उभा राहिला कीं सगळे लागेबांधे तुटून जातात. स्वार्थासाठीं जवळ येतात तसे दूर जातात! निःस्वार्थी व्यक्ती असेल तीच अखेरपर्यंत टिकते. वरची सफेती पुसून जाते. आणि आंतला सांगाडा उघडा पडतो.

तो दिव्य क्षण दिव्य हिरकणीप्रमाणें अयोग्य ठिकाणीं पडला एवढेंच! त्याची चमक कांहीं नाहींशी झाली नाहीं.

दुःखाची महति त्यानें कशी कमी होणार? त्या पवित्र प्रसंगाचा फायदा पदरीं पाडून घेण्याची पात्रता आमच्यांत नाहीं एवढेंच ठरलें त्यानें. आणि स्मशानवैराग्य हें आमच्यासारख्या सामान्य जनांत—क्षणिक उन्नतीची लाट उठविण्यापलिकडे कांहीं करूं शकत नाहीं हाच अनुभव पुन्हां प्रत्ययाला आला. आणि तें स्मशानवैराग्यच ठरलें!

पण या लाटा परदुःखापासून जर सारख्या उसळूं लागल्या तर मानवी जीवित किती समृद्ध होईल.

# कोल्हापुरातील कामगार चळवळ

**शाहूमिल मजूर.**— राहतं घर गिरणीच्या जवळ. मॅनेजर स्नेही. त्यांच्या संबंधामुळें गिरणीत जाणे येणें. खात्यातही केव्हां केव्हां जाऊ लागलो. परिस्थितीची कल्पना येऊ लागली. कामाचे तास ११–११॥ पगार ९–१० रु. अंमलदारांची वागणूक उन्मत्तपणाची. जॉबर लोकांची छळणूक व मास्तर लोकांचें पिळवणुकीचे प्रकार यांची माहिती झाली. एका मजूराला मास्तरने छप्पीने मारलेले मी डोळयांनीच पाहिलं. स्वस्थ बसवेना. हे साल १९३०. राजकीय चळवळीत विशेष असा पडलो नव्हतो. पण मजूरांचे हाल पाहून कांहीं तरी करावेसे वाटू लागले. यावेळीं वडिलानी सुरू केलेले ‘ हंटर ’ साप्ताहिक सुरू होतं. छापखाना मालकांचा होता. मॅनेजरच्या मैत्रीमुळें हजार दीड हजाराचं काम छापखान्याला मिळत होतं ! मॅनेजरचे संबंध फारच जवळचे. आम्ही मुंबईत एका हॉलमध्यें रहात होतो. त्यामुळें धनिष्ट संबंध आलेले. स्वभाव सत्शील, काटकसरी फार. सर्वांचा तो थट्टेचा विषय होऊन बसलेला. खादीचे भक्त. राहणी कमालीची साधी. राजघराण्यांतले पण आर्थिकस्थिती फारच खालावलेली. म्हणून काटकसरीने राहता राहता तो स्वभाव बनलेला. अत्यंत प्रामाणिक. एकनिष्ठ मित्र. अद्यापही संबंध प्रेमाचेच आहेत. आमच्या बायकांचीही आमच्या मैत्रीमुळें ओळख झालेली. घरोबा वाढलेला. आम्ही त्यांचे घरीं राहायलाही जाणार.

पण मजूरांचा प्रश्न हाती घेतल्यानंतर स्वारी बदलली. भांडवलशाहीच्या यंत्रांत काम करणारे मॅनेजर. बहुधा खुद्द मालकाहूनही मॅनेजरच त्या यंत्रणेचा अभिमानी बनतो. यामुळें आमचे मतविरोध उत्पन्न झाले.

भूतदयेचा परिणाम त्या यंत्राच्या मॅनेजरवर झाला नाहीं. खासगी बांकडे आले नाहीं पण त्या मुदतीत मॅनेजरच्या ताठ्यानेच मजूरांच्या प्रश्नावर ते उत्तर देऊ लागले. पण त्यांचीही अधिकारवाणी मी ऐकली नाहीं.

किती आश्चर्याची गोष्ट. स्वत: गरीब, गांधीभक्त. सूत काढणारें, यंग इंडिया वाचणारें. देशाबद्दल अभिमान वाटणारें. पुढाऱ्यांच्या सभेला नेहमी जाणार. पण स्वत: मॅनेजर बनताच त्या सर्वांवर पडदा पडला ! वाटलं भूतदयेच्या सनदशीर मागणीला मॅनेजर मित्राचा विरोध होणार नाहीं. माणसाला अकरा तासाहूनही अधिक काम कसे झेपणार ? ही गुलामगिरी पाहवेना. खालसांत जसे तास आहेत तसे येथे लागू करावेत म्हणून ' हंटर ' साप्ताहिकांतून एक विनंतीवजा स्फुट लिहले. फॅक्टरी ॲक्ट प्रमाणें काम घ्यावे ही मागणी संपूर्णत: कायदेशीर होती. अन् मॅनेजर हा कांहीं मालक नव्हे. तो पगाराचा धनी. मजूराचा तास कमी झाल्यास त्याचे स्वत:चे नुकसान काय होणार ? मला वाटलं त्यांना बरे वाटेल. पण तसं कांहीं झालं नाहीं. भांडवलशाही अंमलदार जागा झाला. पगारी शिक्षित हा पैसा देईल त्याशी इमानी राहतो. वर्गहिताहून व्यक्तिस्वार्थच तो साधत असतो. पहिल्या अवस्थेंत हा कामगाराला शत्रू प्रमाणें मानीत असतो. हा मार्क्सवादी सिद्धांत प्रत्यक्ष प्रयोगांत आलेला अनुभवता आला. मॅनेजर तसे त्याच्या हाताखालचे मास्तर. मजूराशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध. त्यांचा पगार मॅनेजरहून कमी. पण छळणूक मॅनेजरहून अधिक. छळणूकीचे प्रकार अनेक. हे पाहून मला लघुकथेला खाद्य मिळालं. ती कथा चित्रमयजगतमध्येंच आली.

आमच्या दोस्तांना कामाच्या तासाबद्दल व पगाराबद्दल सूचना करताच ती त्यांना माझी निष्कारण लुडबुड वाटली. ते खासगी संबंध विसरले. ते म्हणाले ' तुम्ही यांत पडू नये, पडलांत तर तुमचं नुकसान होईल. तुमच्या छापखान्याला मिळणारं काम बंद करावं लागेल.' मीही त्यांच्या बरोबरचाच होतो. मला हा अपमान वाटला. ' कांही हरकत नाहीं काम बंद करा ' असे सांगून सवरून पुन: उलट लिहिले. ११ तास काम हे फॅक्टरी ॲक्टला धरून नाहींत, ते कमी झाले पाहिजे म्हणून लिहिले. त्यांना याबद्दल कांहीं कायदेशीर इलाज मजवर करतां येण्याजोगा नव्हता,

आर्थिक दृष्ट्या नुकसान करता येण्याजोगं होतं. ते त्यांनीं केलें. छापखान्याला मिळणारं छपाईचं काम बंद केलं! मार्क्सवादाचें पुस्तक उघडण्यापूर्वीच हे प्रात्यक्षिक मिळाले! सरकारची गिरणी, मॅनेजरवरचे अधिकारी दिवाण सुर्वे. त्यांनीं मला ऑफिसमध्यें बोलावून घेतलें. 'तुम्ही उगाच या भानगडींत पडूं नये. तुम्ही काय मजूर नव्हे, मजूरांचे प्रतिनिधी नव्हे. त्यांना काम झेपत नसेल तर ते जातील. आम्ही कांही त्यांना राहाण्याची सक्ती केलेली नाहीं, ते नोकरी सोडण्यास मोकळे आहेत.' जातिवंत भांडवलवाल्यांची ही विचारसरणी! ही भाषा वस्तुतः एका व्यक्तीची नव्हती. ती या वर्गाची भाषा. अगदी याच नमुन्याची भाषा अगदीं हेच शब्द भांडवलवाल्यांच्या तोंडून बाहेर पडत असतात. मग तो तुमच्या जातीचा असो नाहींतर परका असो. जणु एकच रक्त, तीच कृती करतील, तेच शब्द बोलतील. पण ते मला मान्य झाले नाहीं. मी टीका चालूच ठेवली.

याच सुमारास भरणाऱ्या 'ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसकडे' मी एक सूचनावजा ठराव पाठवला. 'खालसा मुलखाप्रमाणें संस्थानांतहि फॅक्टरी ॲक्ट लागू करावा' हा तो ठराव. पाठविलेल्या पत्राचें उत्तर सेन्सार होऊन दिवाणांच्याकडे गेले. त्यांनीं मला पुनः बोलवून घेतले व या भयंकर गुन्ह्याबद्दल **हद्दपारीची धमकी** दिली. 'आपण आपल्या इच्छेप्रमाणें करण्यास समर्थ आहात, मी कांहीं वावगे केलें असें मला वाटत नाहीं.' असें सांगून बाहेर पडलों. हा प्रश्न धसास लावावा, मजुरांत जागृती करावी तर संस्थानांत सभाबंदीचा कायदा जारी होता. यामुळें भाषणस्वातंत्र्याची किंमत जाणवू लागली. भाषण स्वातंत्र्य नसलेली राजवट म्हणजे तुरुंगच होय. तुम्हाला त्याविना कांहीं हालचाल करतां येत नाहीं. म्हणून राजकीय चळवळींत पडलों. राजकीय लढा दिल्याखेरीज हे स्वातंत्र्य मिळण्याजोगे नव्हतें.

सभाबंदी उठल्यानंतर संघटना करणें सोपें झालें. तथापि यावेळचें दुसरे मॅनेजरही संघटनेला आडमार्गें अडथळा करूं लागले. मॅनेजर दुसऱ्या जातीचा आला तरी धोरण तेच. तीच पूर्वीची तास कमी करण्याची मागणी एक दोन मजूरांना पुढें करून ठेवताच 'त्यांना नोकरीवरून कमी' करण्यांत आले. 'रहा नाहींतर जावा. तुमच्या ठिकाणीं दुसरे हजार तयार

आहेत ' म्हणून दम देण्यांत आला. ' बागल कोण ?' तें काय गिरणी कामगार आहेत ? अशा उठाठेवी लोकांच्या मागें तुम्ही लागू नये, ' अर्थात् ही ठराविक भाषाच आहे. सर्वच गिरणी मॅनेजर आणि मालकांच्या तोंडीं सुरवातीला असते. म्हणून मजूरांची संघटना तयार केली. मागणी मान्य झाली नाहीं तर सर्वच बाहेर पडणार असें वाटल्यानंतर मग मॅनेजर नरमाईनें बोलूं लागले. पेरी मंत्री आल्यानंतर संघटनेला अधिक वाव मिळाली. ' शाहू मिल मजूर-संघ ' स्थापन केला. तथापि त्याला कायदेशीर मान्यता अद्याप मिळालेली नव्हती. पण काम चालू केलें. ११ ११॥ तास काम हे वस्तुतः अन्यायाचें आणि नियमाला सुटून असल्या-मुळें मॅनेजरला ते कमी करावे लागले. फॅक्टरी ॲक्टप्रमाणें ते नव्हते. संस्थानांत तो कायदा लागू नसल्यानें प्रथम ते बंधन त्यांनीं तितके मानले नाहीं. पण पुढे मानावे लागले.

कामगार चळवळीची माहिती व्हावी म्हणून विश्वास पाटील व राम घोरपडे या दोघांना अहमदाबादला पाठवून शिकवून आणले. त्यासाठीं पैसे जमवून त्यांची सोय केली. त्याचा फायदा मिळाला. पुढें संपाची धमकी देण्याइतकी संघटना वाढली. संप करावे लागले. त्यानें फायदे पडत गेले. सरळ सनदशीर मार्गानें कांहीं मिळाले नाहीं. लढे द्यावेच लागले. मोर्चा काढावा लागला. संपाची धमकी द्यावी लागली.

' महागाई भत्त्यांत वाढ व्हावी. बोनस सात आठ वर्षें मिळाला नव्हता तो मिळावा, वर्कमन्स कॉपेन्सेशन ॲक्ट, मॅटर्निटी ॲक्ट लागू करावेत. फॅक्टरी ॲक्टप्रमाणें तास चालू करावेत ' अशा मागण्या केल्या. मोर्चा व सत्याग्रह करण्याचे जाहीर केले. मुदत दिली. त्या मुदतीत मागण्या मान्य न झाल्यास सत्याग्रह करूं म्हणून कळवले.

सत्याग्रहाचा प्रसंग आला नाहीं. थोडक्याच दिवसांत इच्छेप्रमाणें निकाल लागला. फॅक्टरी ॲक्टप्रमाणें तास चालू केले. बोनस पदरांत पडला. पगार वाढही झाली. पण यासाठीं कांहीं वर्षें झगडा द्यावा लागला. कोल्हापुरांत स्थापन झालेली ही पहिलीच मजूर संघटना होय. कोल्हापूर शहरांतली हीच सर्वांत मोठी संघटना. दीड दोन हजार मजूर

गिरणींत होते. तिला व्यवस्थित स्वरूप येताच संपावेळीं एकदम उघडे पडूं नये म्हणून कांहीं रक्कम शिल्लक ठेवली. दवाखान्याची सोय केली. एक लायब्ररी चालू केली. यानंतर इतर मजूर संघटनेना चालना देतां आली. त्यांच्यांतही ती वृत्ती निर्माण झाली. विनायक कुलकर्णी, विश्वास पाटील, राम घोरपडे, माधवराव भोसले, अनंतराव वडगांवकर, जितमल छाजेड, सी. आर. पाटील वगैरे कार्यकर्ते पुढें झाले.

**सिनेमा कामगार संघटना.**— सदर संघटना करण्यास रॉयल सिनेमाचे मालक बाबुराव रुईकर यांनीच चालना दिली. डोअर कीपरचे पगार नुसते ७।८ रुपये होते. याही संघटनेचे अध्यक्षपद मजकडेच आले. चार थिएटर्सचे ऑपरेटर एक झाले. त्यामुळें या संघटनेला फार महत्व आले. त्याचा परिणाम मालकावर चांगलाच होऊं लागला. कांहीं मॅनेजर शेजारी व ओळखीचे होते. जातीचे होते. पण हा प्रश्न हातीं घेतांच ताठ झाले. तोच अनुभव पुन: आला. ठराविक उन्मत्तपणाची व बेपर्वाईची भाषा येऊं लागली. पण अखेर संघटनेपुढें नमावें लागलें.

**संतराम पाटील.**— शुगरमिल येथील मजूरांची संघटना, मजुरांतील अत्यंत चिकाटीचे कार्यकर्ते संतराम पाटील यांनी तयार केली होती. हंगामी मजुरांना महागाई भत्ता व बोनस दिला नव्हता. असंतोष वाढला होता. मजुर मजकडे आले. मी प्रश्न हाताळावा म्हणून त्यांनी आग्रह धरला. संपाऐवजी अन्न सत्याग्रहाचा मी सल्ला दिला. सुदैवानें याचा इष्ट परिणाम झाला. मला कांहींवेळां प्रचाराकरता जावे लागले. वाटाघाटीत भाग घ्यावा लागला. पगारांत वाढ झाली व दोन महिन्याचा बोनस मंजूर झाला.

कामगार चळवळीत आणि राजकीय चळवळीत काम करीत असताना अनेक कार्यकर्त्यांशी माझे संबंध आले. आज कॉंग्रेस समाजवादी, शेतकरी–कामगार व कम्युनिस्ट पक्षांत असलेले कोल्हापुरचे बहुतेक कार्यकर्ते प्रजापरिषदेंत कार्य करीत असत. त्या आलेल्या संबंधांत संतराम पाटील यासारखा, सर्व जीवन समाजसेवेसाठीं

वाहिलेला, प्रामाणिक, अत्यंत चिकाटीचा, अभ्यासू, निस्वार्थी कार्यकर्ता मी पाहिला नाहीं. शुगरमिल सत्याग्रह प्रसंगी त्यांनीच मला प्रचारासाठी व तडजोड घडवून आणण्यासाठीं नेले होते. कामाच्या अतिरेकामुळे त्यावेळीं ते टेंबे यांच्या चाळींत आजारी पडले. त्यावेळीं तापांत ते बडबडत होते, बडबडण्याचा विषय मजूर, मजूर, मजूरांचा सत्याग्रह व मी हा होता. अशी तन्मयता केवळ त्याचवेळीं मी पाहिली असं नाहीं. जे काम घेतील त्यासाठी जिवाचं रान करतील. कौतुकाची गोष्ट कीं काम करीत असतानं आपल्याला मोठेपणा मिळावा, पुढारीपण मिळावं ही इच्छा कधी असायची नाहीं. नेहमी स्वयंसेवकाची भूमिका कामासाठी भीड घालणार. आर्जव करणार. पण व्यक्तिस्वार्थासाठी कोणाची मिंदेगिरी करणार नाहीत. समाजसेवेला करमणुकीचे स्वरुप देणार नाहीं. सारं जीवन कार्यासाठीं वाहिलेलं. दुर्दैवानं ज्या संघटनेखाली ते काम करीत आहेत त्या नेतृत्वाबद्दल व संघटनेबद्दल बहुतेक पक्षांत अनादर आणि अविश्वास असल्यामुळें संतराम हे यावे तसे पुढे येऊ शकत नाहीत. व ते नेतृत्व ते सोडत नाहीत. हा ही इमानीपणा कौतुकास्पदच म्हणावा लागेल. अंगी त्याग आहे. कष्ट सोसण्याची संवयच झाली आहे. निर्भयता आहे. यांच्या जीवनाकडे पाहताना मला स्वतःची लाज वाटू लागते. खरा मोठा माणूस आहे हा ! सत्तेवर व अधिकारपदांवर असलेल्या नीतिभ्रष्टांकडे पाहिले म्हणजे यांची योग्यता अधिक पटते. प्रपंचांतला संन्यासी आहे हा ! आदर्श कार्यकर्ता.

**संस्थांचे जाळे.—** यानंतर परस्पर सहाय्याकरता मजूर संघटना एकमेकांस जोडण्याचा प्रयत्न केला. गुमास्ता, शिंपी कामगार, प्रेस कामगार, म्यु. कामगार संघ, औषधी, मेकॅनिक्स, शुगरमिल व शाहुमिल यांतील प्रमुख कार्यकर्ते घेऊन एक मध्यवर्ती संस्था स्थापन केली. व तिचे नांव ‘ कोल्हापूर संस्थान राष्ट्रीय कामगार संघ ’ असें दिले. इचलकरंजीला अनेक गिरण्या आहेत. त्यांच्याशी संबंध जोडले. संपावेळीं शाहुमिलकडून २५० रु. देवविले. वेळोवेळी तिकडे जाऊ लागलो माधवनगर, उगार, सांगलीची वेलणकर व बालाजी मिल या मजूर संघटनेचेही संबंध जोडले. संपावेळीं तिकडे गेलो. त्यांच्या एकीला व्याख्यानांनी

प्रोत्साहन दिले. याचा परिणाम म्हणूनच कीं काय मुंबईच्या कामगारांनी व्याख्यानांची आमंत्रणे दिली. व पुढें कॉंग्रेसने 'दक्षिणी संस्थान कामगार समितीचे' मला अध्यक्षपद दिले.

पण राजकीय धक्काबुक्कीत पडल्यानें इकडचे लक्ष कमी झाले. आता शाहूमिल कामगार संघ जरी इंटकच्या ताब्यांत गेला असलातरी त्या मजुरांचं माझ्यावर प्रेम आहे. मी उपवास करीत होतो त्यावेळीं मला पहायला सारे कामगार रोज जमावाने येत होते. मला अटक झाल्याचे समजताच त्यांनीं हरताळ पाडला! शाहूमिल पुढील रस्त्याच्या चौकाला 'बागल चौक' हे नांव देण्यांत आलं ते शाहुमिल मजुरांच्याचमुळें. राजकीय जीवनाचा श्रीगणेशा मला शाहुमिल मुळेच मिळाला. मी हांक मारतांच कितीतरी कामगार इंटक सोडून शेतकरी–कामगार पक्षाच्या मजूर संघटनेंत आले. पण आमचेच नेतृत्व कमताकत ठरले. व ती संघटना कार्यकर्त्याभावी मोडून गेली!!

# वाङ्‌मयातील मुशाफिरी

वाचनाचे वेड हे मला पूर्वी पासूनचे. इंग्रजी पांचवी पासूनचे. घरांपासून खेळाची ग्राऊंड दूर. त्यामुळें खेळाकडे दुर्लक्ष झाले. फुरसतीची करमणूक म्हणून वाचन. त्यानें कंटाळा आला म्हणजे आरामासाठीं जाऊन बसायचे पंचगंगा घाटावर किंवा रंकाळा तलावावर. दोन्ही घराजवळच. शाळेंत विषय कंटाळवाणा वाटला कीं शाळेच्या पुस्तकात कादंबरी ठेवून शाळेंतच वाचत बसायचे. लायब्ररीत नांव होते. कादंबऱ्यांची उणीव कधी भासायची नाहीं. सकाळी पुस्तक हाती धरलें कीं रात्री झोपेनें घेरीपर्यंत वाचायचे.

किती तरी कादंबऱ्या वाचल्या. गुलबकावली सुरवातीची. नंतर इंद्रभुवन गुहा, कालिकामूर्ति, अरेबियन नाइट्स, लंडन रहस्य वगैरे. रेनॉल्डच्या कादंबऱ्यांनी तर वेड लावलं. नंतर हरी नारायण आपट्यांच्या कादंबऱ्या हाताला लागल्या. सोपी ओघवती भाषा, कथानकाची मनावर लगेच बसणारी पकड, यामुळें कादंबरी खालीं ठेवावीशी वाटायची नाहीं. शिवाजी महाराजांविषयीं जात्याच भक्ति. त्यामुळें त्यांच्या विषयींच्या कादंबऱ्या वाचण्याची उत्कटता फार. सिंहगड, सूर्योदय, रुपनगरची राजकन्या, पण लक्षांत कोण घेतो, मी, या अद्याप आठवणीतून जात नाहींत.

मराठीनंतर इंग्रजी वाचायला सुरवात केली. चार्लस गॅर्व्हिसच्या प्रेमी कथानकांनी तर खूळ लावले. अरेबियन नाइट्स प्रथम मराठी नंतर इंग्रजी वाचले. इतकं सोपं इंग्रजी क्वचितच आढळेल. त्यामुळें इंग्रजीची

चट लागली. पुढें ड्यूमा, स्कॉट, मेरी कॉरेली, व्हिक्टर ह्यूगो वगैरेंच्या वाचल्या. ला मिझरेबलचा परिणाम इतकी वर्षें झाली तरी धुवून गेला नाहीं. म्हणून आतां वाचण्यासाठीं ते खरेदी केले.

**नानासाहेब देव.—** बालपणापासूनचे 'अरे तुरे' चे जिगर दोस्त. परस्परांना शिव्या देऊन घेण्यांतच आनंद. त्यांनाही वाचनाचा नाद दांडगा. गडकऱ्यांचे भक्त. ओस्कर वाईल्ड हा त्यांचा इंग्रजीतला आवडता ग्रंथकार. नेहमीं त्याच्या नाटकांतील वाक्यें नेहमींच्या बोलण्यांत घुसवायची व चोरलेल्या 'फ्रेजीस' आपल्याच म्हणून आमच्यावर मारा करायचे. ते पुस्तक दुसऱ्याच्या हातांत पडल्यास आपलं इंग्रजीतील प्रभुत्व उघडं पडेल म्हणून ते चोरून वाचायचे. वाचण्याचा प्रमुख हेतू त्यांतील फ्रेजीज पाठ करणं हा असायचा. अर्थात् त्यांतून ज्ञानाचा लाभ कसा चुकवतां येणार. या चोऱ्या माझ्या हातांत ते पुस्तक पडले म्हणजे उघड्या होत. मग सर्वांसमक्ष उघड्या करून त्याच्यावर शासन म्हणून चहा लादायचा. गडकऱ्यांच्या नाटकातील प्यारें स्वारीला मुखोद्गत. त्यांचे एखादे काव्य नेहमी गुणगुणत असायचे. गडकऱ्यांचा परिणाम म्हणजे आमच्या खासगी पत्रांतल प्यारेच्या प्यारे अलिटरेशननं (अनुप्रासानं) मूर्खासारखे भरलेले असायचें. ट—ला—ट, व प—ला—प जुळवून आम्ही स्वतः गडकरी बनणार. या वाङ्मयाला प्रसिद्धी देण्याची कल्पना त्यावेळीं न सुचल्यामुळं आमची ही प्रतिभा चव्हाट्यावर येऊ शकली नाहीं. पण आम्हा मित्रद्वयांच्या



नानासाहेब देव

वाग्युद्धांत गडकरी मात्र प्रत्येकानें बराच वेळ वाचून काढला. एकानें एक प्यारा म्हटला की आमची दुसरा प्यारा तोंडावर फेंकण्याची तयारी असे. मी समग्र गडकरी विकत घेऊन ती सारी पुस्तकें कसबी बायंडरकडून बांधवून घेतली. ती पुस्तकें वाचण्यातच नव्हे तर ते सुंदर बांधणावळीचे पुस्तक हातांत घेऊन नाचण्यातही मजा वाटे. आमची दोस्ती आजपर्यंत तशीच टिकली. पण आता तो नुसता बडबडतो. मी मात्र कांहीं पुस्तकें लिहिली आहेत. पण तो बी. ए.; एल्.एल्. बी.; अॅडव्होकेट आणि शाहू महाराजांचा लीगल अॅडव्हायसर झाला. खूप पैसे मिळवले. पण पुनः खाका वर करून उभा असतो. आम्हीं भेटलो कीं आनंदी आनंद! शिव्यांची लाथाळी चालू व्हायचीच. त्यांतून वाङ्मयाचे फूत्कार बाहेर पडायचे. — ! नाना कांहीं प्रसंगांची वर्णने करूं लागला म्हणजे खरं बोलण्याकडे कमी लक्ष देई. त्यामुळें त्याचीं कल्पना आणि प्रतिभा ओथंबून बाहेर पडायची. खऱ्याचा आभास निर्माण करणाऱ्या कल्पित गोष्टीची, कथानक रंगवण्याला आवश्यकता असतेच. त्याच दृष्टीनें मी त्याच्या संभाषणाकडे पहात आलो. प्रतिभेच्या विलासाला थापेबाजी कसं म्हणता येईल ? तसं कांहीं म्हणतात. पण मी त्या थापेबाजीचा कलेतच समावेश करीन. नाना तसं बोलला नाहीं तर सारी मजाच जाईल. नाना फार हुषार पण फुलपांखरासारखा. निरनिराळया वातावरणाचा स्वाद घेत हिंडणारा. त्यामुळें एका ठिकाणीं तो चिकटून राहिला नाहीं. या व याला आनुषंगिक स्वभावामुळें पैसे मिळूनही तो श्रीमंत होऊं शकला नाहीं. मित्र राहिले ते मुख्यतः त्याच्या संभाषण चातुर्यामुळें. म्हणूनच कीं काय कोण जाणें क्रिमिनल केसमध्यें हातखंडा. नानाची सोबत वाङ्मयदृष्ट्या मला फार उपकारक ठरली. दोघेही साठीजवळ आलो आहोत. पण भेटलो म्हणजे पोर वयाच्या आठवणींत वेळ जातो. माझ्यावर ज्यावेळीं राजद्रोहाची केस घालण्यात आली त्यावेळीं नाना संस्थानाबाहेर खालसा मुलखांत वर्ध्याला वकिली करीत होता. तो मुद्दाम माझ्या केससाठीं आला होता. माझी केस घेण्यात नानानें निर्भयता दाखवली यात शंका नाहीं. धंद्याचे दृष्टीनें नानानें माझ्याबद्दल दाखवलेली निष्ठा आठवणीत राहण्याजोगीच आहे.

**गडकरी.**— ही गोष्ट घडली त्यावेळीं मुंबईस महाराजांच्या पन्हाळा लॉजमध्यें होतो. सरदारी रुबाबमध्यें राहात होतो. वाटावं याचीं जहागिरी असावी मोठी ! एक साधे गृहस्थ, दिसायला कुरुपच होते, त्यांनीं मोठ्या अदबीनें आम्हांस विनंति केली. 'सवड काढून आपण नाटकाला येऊं शकाल काय ? आपण पहावं अशी आमची इच्छा आहे' आम्ही मान आंखडूनच रुबाबांत, विनंतीला मान्यता दिली. ते गृहस्थ व्हिक्टोरिया घेऊनच आले होते. गरीब मनुष्यावर उपकार करावे या ऐटीनेच गाडीत चढलो. आम्हाला पहिल्या रांकेतील मधली खुर्ची राखून ठेवली होती. जणु काय पाहून झाल्यानंतर हजार पांचशेहेची देणगीच देणार आम्हीं. नाटक फार फार आवडलं. माझ्या आवडीचंच होतं ते. त्यांतली किती तरी वाक्यं पाठ होती माझी. दुसरे दिवशी ते गृहस्थ आले. विचारलं 'नाटक कसं काय आवडलं ?' 'वा: ! ते काय सांगावं ? हो आपण तिथं काय काम करता आपण ?' 'मीच तो नाटककार, गडकरी' मला दरदरून घाम सुटला ! कोण ताठ्यानें वागलो मी !

**वाचनाचा हेतू:**— आपण कांहीं लिहावें ही कल्पनाहि अद्याप शिवली नव्हती. वाचायचे एवढें खरें. लिहायला यावं म्हणून कांहीं हें वाचन केलें नाहीं. अभ्यासाची दृष्टी मुळींच नव्हती. वाचनाचा हेतू मनरंजनाखेरीज कांहीं नसे. कादंबरीचे वैशिष्ठ्य काय ? ती लिहिली का ? लेखकाची लेखनशैली कशी आहे, प्लॉट कसा रचला आहे, तंत्र काय आहे, याचा अभ्यास करण्याची इच्छा केव्हांच असायची नाहीं. फार भूक लागली म्हणजे चवीचा प्रश्न उभा रहात नाहीं, तसें आपले वाचायचे एवढें खरें. किती कादंबऱ्या वाचल्या असतील याचीं मोजमाप करतां येणार नाहीं. यानं ललित वाङ्‌मयाचे ज्ञान कांहीं झाले कीं नाहीं हे सांगता येणार नाहीं. तहान लागली त्यावेळीं दूध मिळाले तर त्याचा परिणाम हा होतोच. ते साहजिक आहे. यावेळेपावेतो कादंबरीखेरीज कांहीं वाचले नव्हते.

मुंबईस स्कूल ऑफ आर्टला आल्यावर पुन: वाचायला मोकळा झालो. शाळेनंतर मिळणारी वेळ वाचनांतच जाऊ लागली. येथेंही नानासाहेब देव रुम कंपॅनियन होते. आणि विनायकराव घोरपडे हे ही

एक वाङ्मयप्रेमी तेथें नेहमी येत असत. यावेळीं आमची वाङ्मय मैफल चालायची. विनायकराव बी.ए. नव्हते पण वाचन एम्.ए.च्या विद्यार्थ्यांहून जास्त असें.

राजकीय वाङ्मयाकडे झुकायचं कारण आमचे दुसरें 'कंपॅनियन' तुळजाजीराव राजेभोसले. ते 'यंग इंडिया'चे वर्गणीदार व महात्मा गांधींचे चाहते होते. ते 'यंग इंडिया' आणून ठेवायचे. त्यामुळें शिष्टाचारासाठीं वाचणं भाग पडे. पण पुढें मलाच ते इतकं आवडूं लागलं कीं मी वर्गणीदार झालो. आणि अगदी नियमित वाचू लागलो. ते अगदीं बंद होईपर्यंत, मी वर्गणीदार राहिलो होतो.

यंग इंडियामुळें एक नव्याच वातावरणांत शिरलो. गांधीजींची भाषा कमालीची सोपी. अवघड विषय मुलाला समजावा अशी मांडणी. यामुळें माझ्यासारख्या अनभिज्ञाला राजकारण समजूं लागलें. अग्रलेख दीड कॉलमवर असायचा नाहीं. वाचायला शीण पडायचा नाहीं. वाक्यें छोटी छोटी. जराही पाल्हाळ नाहीं. एकही शब्द निरर्थक असायचा नाहीं. घातलेल्या शब्दाठिकाणीं दुसरा घालतां यावयाचा नाहीं. प्रत्येक वाक्य आणि त्यांतला प्रत्येक शब्द, जणुं मोजून टाकलेला. सोपे शब्द, सुटसुटीत वाक्यें, कोटी नाहीं, अलंकार नाहीं, अवडंबर नाहीं. प्रत्येक वाक्य आठवणींत रहावं. डिक्शनरी उघडायची कधी पाळीच आली नाहीं. प्रत्येक वाक्य अंतःकरणाचा ठाव घेई. यामुळें मी गांधीतत्वज्ञानाकडे न कळत ओढला गेलो. यंग इंडियांतून खादीचा प्रचार तर सारखा होत होता. खादी देहावर पडली नाहीं तरी मनावर पडूं लागली.

**घरीं आल्यावर.**— घरीं परत आल्यावर वडिलांनीं चालवलेल्या 'हंटर' पत्रांत काम करूं लागलो. छोटी छोटी स्फुटें लिहिण्याचं काम वडिलांनी माझ्यावर सोपवलं. धार्मिक बाबतींत वडिलांचा आल्यागेल्याशीं नेहमीं वादविवाद चालायचा. त्यामुळें न वाचतांच अनेक विषयांची ओळख होऊं लागली होती.

मी पदवीधर नव्हतो पण अनेक पदवीधरांशी बोलण्याचे प्रसंग येत गेल्यामुळें त्यांच्या विद्वत्तेचही मोजमाप साहजिकच होत असें. त्यामुळें पदवीधरांच्या बद्दलचा वाटणारा हेवा फारच कमी झाला. त्याबरोबर

माझा आत्मविश्वासही वाढूं लागला. माझी स्फुटें आणि विचार वर्गणी-दारांना आवडूं लागले. पंडित सातवळेकरांचे, माझ्या लेखाची वाहवा करणारे पत्र आले. मी कांहीं वाड्यावरचा आश्रित नव्हतो. कुणाचा मिंधा नव्हतो. मर्जीत जाण्यासाठीं खूष करण्याची जरूरी नव्हती. कलावंत हा जात्याच भावनाप्रधान असतो. आंत एक बाहेर एक त्याला साधत नाहीं. आपल्याला वाटते एक आणि लिहायचें एक, ही धंदेवाईक मुत्सद्देगिरी त्यांच्यांत असत नाहीं. अशा लोकांच्या दृष्टीनें तो नेहमीं अव्यवहारी ठरतो. पण एकंदर समाजाला हा अव्यवहारीपणाच आवडतो. मी मला पटलेले विचार प्रामाणिकपणें मांडू लागलो. खुनशीपणानें, सूड-बुद्धीनें किंवा कोणा अधिकाऱ्याला खूष करण्याकरतां कांहीं लिहीत नव्हतो. म्हणून माझे लेख विद्वत्ताप्रचुर नसले, तरी लोकांच्या भावना त्यांतून प्रकट होत होत्या. वडीलही कोणाची मिंधेगिरी करत नव्हते. यामुळें पत्राचा खप बराच वाढला. त्यावेळीं आमच्याच पत्राचा खप सर्वांत जास्ती होता म्हटले तरी चालेल.

**वर्तमानपत्रामुळें** नियमित लिहिण्याची संवय लागली. सक्तीनें लिहावेंच लागे. स्फुटामुळें विचार अगदी संकलित स्वरूपांत लिहावें लागत. जागा अगदीं मोजकी. तेवढ्या जागेंत आपल्याला जे म्हणायचे तें आलें पाहिजे. भाषा लालित्याला, कोट्यांना, अलंकाराला त्यांत वाव नव्हता. एखादं वाक्य निरर्थक पडलेलं जागेच्या अभावीं खोडावं लागे. म्हणून लिखाणांत रखरखीतपणा येणं स्वाभाविक होतं. लिहिण्याच्या या सरावानें विचार सुचले कीं लिहिण्याची संवय लागली. अन् ज्यावेळीं कांहीं विचार सुचतात. ज्यावेळीं एखाद्या गोष्टीबद्दल लिहिण्याची इच्छा प्रबल असते त्यावेळीं जे लिहिलं जातं, ते पुष्कळ परिणामकारक होतं असा अनुभव आला.

**प्रामाणिकपणा** हा संपादकाला नेहमीं महाग जातो. ज्याला धंदा म्हणून पत्र टिकवायचं असतं त्याला प्रामाणिकपणा गुंडाळून ठेवावा लागतो. पत्र अजरामर व्हायचं तर येईल त्या अधिकाऱ्यांचे फोटो व असेल त्या राज-वटीला अनकुल ते धोरण, स्वीकारावें लागतें. असं पत्र कोणत्याही राजवटींत सरकारमान्य ठरतं. मला हे जमत नसे. त्यामुळें हंटर, नंतर आघाडी, नंतर धडाडी, अखंडभारत ही जवळ जवळ माझीच असलेली पत्रें सरकारी रोषास बळी पडली.

मनांतले विचार प्रामाणिकपणें मांडण्यानेच मला हद्दपारी भोगावी लागली. मी सुरवातीपासून ते या कालापर्यंत जे जे लिहिलें तें ९९ टक्के वाङ्मय हे प्रचाराकरताच लिहिले. वर्तमानपत्राचा मुख्य हेतू प्रचाराचाच होता. तो कांहीं मनरंजनाचा नव्हता.

माझं पहिलं वाङ्मय ' महात्माजींची कामधेनू ' हे प्रचारांतूनच निर्माण झालं. मी खादी संघाचा अध्यक्ष होतो. खादीचा प्रचार करीत होतो. त्या व्याख्यानांना जोड म्हणून खादीची इष्टता प्रतिपादन करणारीच ही पुस्तिका होती. ' ज्ञानप्रकाश ' चे संपादक पूज्य काकासाहेब लिमये यांनी या लेखमालेला आपल्या पत्रांतून जर प्रसिद्धी दिली नसती तर पुस्तक रुपानें हीं मला प्रसिद्ध करण्याचं धाडस झालं नसतं. म्हणून राजकारणाप्रमाणेच साहित्याच्या जगांत ढकलण्याचं काम काकासाहेब लिमयांनीच केलं म्हटलं तरी चालेल.

वर्तमानपत्रामुळें समाजाकडे बारकाईनें पाहण्याची, त्यांची सुखदुःखें हुडकून काढण्याची, कारणें शोधण्याची व कांही तरी मार्ग दाखवण्याची आवश्यकता भासत असें. यामुळें राजकीय विषयाची पुस्तकेही चाळावी लागली.

**हद्दपारीच्या कालांत** हा अभ्यास काळजीपूर्वक करता आला. हद्द-पारीच्या स्थानाकडे जाण्यापूर्वी पुण्यास दिनकरराव जवळकरांची गांठ पडली होती. त्यांनीं मला वाचण्यासाठीं ' सोशालिझमच्या ' पुस्तकांची बरीच मोठी यादी दिली. त्यांतले बर्नार्ड शॉचे ' इंटेलिजंट वुइमेन्स गाइड टु सोशालिझमनें ' मला या विषयांत प्रवेश करुन दिला. त्या रोखानेच मी आतापर्यंत सारखा चाललो आहे. या कालांत मात्र पुस्तकें लिहिण्याच्याच इराद्यानें मी वाचू लागलो. दुसरा कसलाही या वेळीं उद्योग नसल्यामुळें या अज्ञातवासांत वाचन, मनन आणि लिखाण तिन्हीही साधले. वाचलेल्या पुस्तकांतील मुद्यांच्या नोट्स काढून ठेवल्या. त्यांचा फारच उपयोग झाला. त्या सर्व नोट्स आता बांधवून ठेवल्या आहेत.

यावेळीं ' सत्यशोधकांना इषारा—किंवा नव्या पिढीचे राजकारण ' हे पुस्तक लिहून काढले. करविरी परततांना ते पुण्यास कर्मवीर विठ्ठल रामजी सिंदे यांना दाखवले. ते त्यांना आवडले व त्यांनीं आपण या

पुस्तकाला प्रस्तावना लिहून देऊं म्हणून आश्वासन दिले. मराठा समाजांतील एका विद्वान, त्यागी, वयोवृद्ध पुढाऱ्याची प्रस्तावना मिळतांच माझ्या लिखाणाबद्दलचा आत्मविश्वास वाढला. लिखाणाचा मुख्य उद्देश प्रचार हाच असल्यामुळें पुस्तक प्रसिद्धी अगोदर मी ती लेखमाला श्रीपतराव शिंदे यांनीं चालवलेल्या 'विजयी मराठा' पत्रांत दिली. त्यांनीं ती सर्व क्रमवार घेतली. ज्ञानप्रकाशनें 'महात्माजींची कामधेनू' या लेखमालेला प्रसिद्धी दिलीच होती. 'विजयी मराठ्यानें' समाजवादी लिखाणाला प्रसिद्धी दिली. यामुळें महाराष्ट्रांत बहुजनसमाजांतील एक लेखक म्हणून प्रसिद्धी झाली. 'सत्यशोधकांना इशारा' या माझ्या पुस्तकाला अपेक्षेहून अधिक यश मिळालं! बहुतेक सर्व पत्रांचे अभिप्राय चांगले आले. कांहींनीं तर खूप स्तुति केली. शंकरराव देव व थोर गांधीवादी लेखक शंकरराव जावडेकर यांनीं मुद्दाम भेटीसाठीं बोलावले.

या पुस्तकानंतरच वीर सावरकरांनी रत्नागिरीस व्याख्यानासाठीं बोलावले. पतितपावन मंदिरांत दोन व्याख्यानें त्यांच्यातर्फे झाली.

यामुळें पुनः आणखी लिहिण्याचा उत्साह वाढला. तूर्त राजकारणापासून अलिप्त होतो. घरच्या दाबामुळें अलिप्त रहावे लागले. आणि या कार्याला इकडे वाटही योग्य मिळाली. रेवदंड्याला लायब्ररीचा फायदा मिळत नव्हता. करविरी तो मिळू लागला. आमच्या हद्दपारी नंतर आम्ही राजकोपांत आहोत ही सर्वत्र प्रसिद्धी झाल्यामुळें आमचा पूर्वीचा मित्रगण तुटलाच होता. त्यामुळें भेटी—परत भेटीच्या सोहाळयांत जाणारी वेळ वाचत होती. ती सदुपयोगाला लागली.

सोशालिझमच्या ज्ञानांत आणखी बरीच भर पडली. मी कोणत्याही एका नादाला लागलो म्हणजे दुसरा विषय सुचायचा नाहीं. खाण्यापिण्यावरचेही लक्ष उडायचे. खेळाकडे ओढा पूर्वीपासूनच नव्हता. यामुळें बारा तासांतले जवळजवळ दहा तास, याच उद्योगांत जायचे. ऑफिस तेच घर. आवश्यक गरजेपुरतीच खुर्ची सोडायची! चहा बसल्या जागीं येत होता. उठायचे फक्त जेवायला. बाकी सर्व वेळ लिहिण आणि वाचणं. यामुळें लिखाणाचा सांठा भरपूर झाला.

यांतून ' बेकारी व तीवर उपाय ' हे पुस्तक बाहेर पडले. या आंत-बट्ट्याच्या व्यापाराला वडिलांच्याकडून मदत मिळणे शक्य नव्हते. म्हणून मी त्यांच्याकडे पैसे मागण्याचं धाडस केलं नाहीं. बायकोची विनवणी केली आणि तिचे दागिनें मिळवले. तिच्या पाटल्या विकून ही हौस पुरी केली.

याही पुस्तकासाठीं लिहिलेले लेख पुस्तक प्रकाशनापूर्वी निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलें. या पुस्तकाला मराठा समाजांतील वयोवृद्ध पंडित आणि नामवंत साहित्यिक कृष्णराव केळूसकर यांनीं प्रस्तावना लिहून दिली. त्यावेळीं ते दादरला आपल्या घरीं अंथरुणाला खिळून होतें. त्यांना सर्व हस्तलिखित वाचून दाखविण्याचं काम माझे परममित्र आणि माझे धाकटे बंधू शंकरराव बागल यांचे श्वशुर कृष्णराव मालपेकर यांनीं केलें. रोज दादरला नियमितपणें जाऊन वाचून दाखवलें आणि प्रस्तावना लिहून द्यायला सहाय्य केले. भास्करराव जाधव यांनींही यापूर्वी सर्व हस्तलिखित वाचून चर्चा केली आणि कांहीं सूचना केल्या. व आपल्या अभिप्रायांत ' हें पुस्तक साहित्य परिषदेच्या आश्रयास पात्र आहे ' असें लिहिले होते. याही पुस्तकाला सर्व पत्रांनीं उचलून धरलें.

नंतर ' समाजसत्ता कीं भांडवलशाही ' अस्पृश्यतेवर ' स्वराज्याचा शत्रू ' व स्त्रियांच्या गुलामगिरीवर ' लग्नबंधन कीं तुरुंगवास ' संस्थानी प्रश्नावर एक छोटी पुस्तिका ' संस्थानिक, संस्थानी प्रजा व फेडरेशन ' अशी पुस्तकें लिहिली.

' समाजसत्ता कीं भांडवलशाही ' या पुस्तकाचें सर्व लिखाण चित्रमयजगत्मधून येत होते. ते सयाजीमहाराज स्कॉटलंडमध्यें असतांना त्यांच्या नजरेखालून गेले असावे. त्यांचे तेथून ' आपली मतप्रतिपादनाची शैली पसंत ' असल्याचें पत्र आले.

समाजसत्तावादी लेखामुळेंच वसंत व्याख्यान मालेकडून आमंत्रण आले. ' बेकारी व तीवर उपाय ' हा विषय पहिल्या वर्षी व ' विराट पुरुष ' Massman हा दुसऱ्या वर्षी विषय घेतला. ' आत्मचरित्रपर ' एक व ' कलेवर ' एक अशी चार पांच व्याख्यानें झाली.

कलेवर दोन पुस्तकें लिहिली. कलावंत हे लेखक असें फारसें नसल्यामुळें या पुस्तकांना साहजिकच विशेष महत्व प्राप्त झाले. महाराष्ट्र

साहित्यपरिषदेंत राजे औंधकर हे अध्यक्ष असतांना त्यांनीं अध्यक्षपदावरून त्याचा गौरव केला. ते कोल्हापूर आर्ट सोसायटीनेंच प्रसिद्ध केले. एकंदर बांधणी, कागद आणि आंतील रंगीत व साधी चित्रें यामुळें ते पुस्तक चांगले वरचा दर्जाचे ठरले. आर्ट स्कूलचे प्रिन्सिपाल रा. ब. धुरंधर यांनीं त्याची प्रशंशा केली व या लिखाणानंतरच माझी महाराष्ट्र चित्रकार संमेलनाच्या अध्यक्षपदासाठीं निवड झाली असावी. रा. ब. पी. सी. पाटील हे कोल्हापूरचे शिक्षणमंत्री असल्यावेळीं हे पुस्तक शाळा खात्यासाठीं मंजूर केले होते.

**नी. गो. पंडितराव.**— आतापर्यंतचे माझे सारे लिखाण राजकीय स्वरुपाचे असो किंवा कला विषयक असो, निबंधवजाच होते. गोष्टी लिहिण्याचा विचारच कधी आला नाहीं. लिहिता येईल कीं नाहीं याचा प्रयत्नही केला नाहीं. पण या वेळीं माझ्यावर अतिशय लोभ करणारे व नेहमी वाङ्मयीन चर्चा करणारे स्नेही नी. गो. पंडितराव यांनी माझ्या प्रचार वाङ्मयाला लघुकथेचं स्वरूप द्या, म्हणून आग्रह केला. जसे नानासाहेब देव यांच्याशी गप्पा मारण्यात मला मोठा आनंद वाटत असें तसा यांच्या सहवासांतही वाटे. मोठा हुषार माणूस! प्रेमळ आणि अगत्याचा आणि दिलदारही. पण पुढे कशामुळे बदलला कोण जाणे. तथापि त्यांनी स्वतःचे नांव घालून माझ्यावर टीका केल्याचे मला आठवत नाहीं. लेखनाच्या पद्धतीमुळें तो लेख त्यांचा हे मी ओळखू शकत होतो एवढेच. तथापि माझ्या मनाचा ओढा यांच्याकडे असें पुनः ठाण्यास भेट पडली. त्यांनी आपल्या जवळची कितीतरी पुस्तकें भेट म्हणून दिली. ठाण्यास, तेथील एका हुतात्म्याच्या स्मारकाच्या उद्घाटनासाठीं मी गेलो होतो. त्यावेळीं माझ्या विषयी प्रास्ताविक बोलण्याचंही काम त्यांनीच केलं. मी त्यांच्या घरीं दोन दिवस राहूनही आलो. दोष असले तरी लोभ करण्याजोगे गुणही आहेत. आज त्यांचं एक पूजास्थान असेल, तर कांही दिवसांनीं त्याच्या इतका वाईट माणूस त्यांना दिसणार नाहीं. प्रेमाचा अतिरेक तसा दुसऱ्या विरुद्ध भावनेचाही अतिरेक.

पंडितरावाच्या सूचनेचा माझ्यावर परिणाम झाला. गोष्टी लिहिण्यापूर्वी कांहीं प्रसिद्ध लेखकांच्या कथा वाचून मग सुरवात केलेली बरं म्हणून

टॉलस्टॉय, शिकोव्ह, मपाँसा, गोर्की, ओ हेन्री वगैरेंच्या गोष्टी वाचल्या. मला शिकोव्ह, मपाँसा व गोर्कीच्या गोष्टी फार आवडल्या जगांतील प्रसिद्ध लघुकथा संग्रह विशेष काळजीनें वाचला बरीच पुस्तकें विकत घेतली. मग गोष्ट लिहिण्याचा प्रयत्न केला. आणि ती गोष्ट पाठवून पहावी, घेतली तर घेतली नाहींतर नाहीं, असं मानून चित्रमयजगत्कडे पाठविली. त्यांत ती छापून आल्यानंतर मला आश्चर्याचा धक्काच बसला. तिला सचित्र प्रसिद्धी मिळाली.

**भरमसाट पसारा.**— झालं! एवढा स्टार्ट मिळाल्यानंतर मग काय? आमची गाडी भरवेगानें सुटली. माझ्या बहुतेक गोष्टी सत्यावरच आधारलेल्या असायच्या. प्रत्यक्ष अनुभवलेल्या किंवा दुसऱ्यांनीं अनुभवलेल्या. निव्वळ कल्पना विलासावर त्या नसायच्या. गोष्टी लिहिण्याचा उद्देश निव्वळ करमणूक असायचा नाहीं. सामाजिक अन्याय, जुलूम, छळ चव्हाट्यावर मांडणें हाच असायचा. वर्तमानपत्र लिखाणामुळें समाजाकडे तशी पाहण्याची दृष्टी आलीच होती. संस्थानीं वातावरणांत मला या दृष्टीनें भरपूर खाद्य मिळे. व तो अन्याय केव्हां चव्हाट्यावर मांडीन असं मला व्हायचं! म्हणून कला, तंत्र, भाषासौष्ठव, कोट्या, काव्याच्या भराऱ्या यांत वेळ घालवणं मला व्हायचं नाहीं. ती गोष्ट केव्हां संपवीन असं होऊन जायचं.

लघुकथाची, माझ्या खोलींत मी गिरणी काढली. दर दोन तीन दिवसाला एक अशी प्रसूति होऊं लागली. ती आमची प्रजा महाराष्ट्रभर पसरली. माझी गोष्ट प्रसिद्ध झाली नाहीं असा आठवडा जायचा नाहीं. कांहीं वेळा तर एकाच आठवड्यांत अनेक पत्रांत निरनिराळ्या गोष्टी यायच्या. दिवाळींत बहुधा कोणचं मासिक शिल्लक रहायचं नाहीं. यामुळें ही संख्या शेंकड्यावर गेली. 'निर्भिड'कार गद्रे यांनीं एकदां लिहिलें 'या आठवड्यांतला चमत्कार.! 'माधवराव बागलांची गोष्ट या आठवड्यांत कुठें दिसत नाहीं.'

या लघुकथांचा वाढलेला पसारा पाहून कृष्णराव मालेपकर म्हणाले, 'यांचे आतां एकीकरण केलं पाहिजे.' 'ते खरं पण ती गोष्ट माझ्या आवाक्याबाहेर आहे.' लिहायला टाक कागद आणि शाई एवढं भांडवल

पुरे होतं, पण पुस्तक प्रकाशन तेवढ्या साधनांवर होत नाहीं' ते म्हणाले ते पाहतो मी.'

सावळाराम यंदे हे मालपेकरांचे स्नेही होते. त्यांनीं शेकडो ग्रंथांचे प्रकाशन आपल्या छापखान्यांतून केले होते. त्यांनीं ती जबाबदारी स्वीकारली, नी. गो. पंडितराव म्हणाले; आपण वि. स. खांडेकरांच्याकडून गोष्टींची निवड करून प्रस्तावना घेऊंया. त्यांनीं भाऊसाहेबांची ओळख करून दिली. भाऊसाहेबांनीं गोष्टी निवडण्याचे व प्रस्तावना लिहून देण्याचे मान्य केले. यानंतर यंद्यानीं लगेच दुसरा कथासंग्रह हाती घेतला. त्या संग्रहाला 'संसार' हे नांव दिले. त्याला वरेरकरांनीं प्रस्तावना लिहून दिली. तिसरा कोल्हापूरचे सत्यशोधक दासराम यांनीं छापला. त्या संग्रहाला 'जुलूम' हे नांव दिले.

पण हा वाङ्मय पसारा इतका वाढला होता कीं तेवढ्या त्या पुस्तकांच्या मर्यादेंत तो आंवरतां आला नाहीं. यंदे व कृष्णराव मालपेकर हे आतां सोडून गेल्यामुळें आतां असा हक्काचा प्रकाशक मिळणें शक्य नाहीं.

माझें बरेचसे वाङ्मय धक्काबुक्कीच्या राजकारणांत पडण्याअगोदर झाले. त्यांतूनही 'खेड्यावरचा प्रचारक' व 'महात्मा फुले आजही मार्ग दर्शक आहेत,' ही पुस्तकें प्रसिद्ध होऊ शकली. महात्मा फुले हे दासरामांनीच प्रसिद्ध केले. 'खेड्यावरचा प्रचारक' ही लेखमाला पुढारीत येत होती. त्याच कंपोज मधून ते पुस्तक छापून घेतले.

राजकीय आयुष्यांत तुरुंग ही हक्काची रजा. सक्त मजुरीचें वेळीं मात्र मला वाचायला मिळू शकले नाहीं. दिवसा काम करावेच लागे. पण स्थानबद्धतेच्या ज्या शिक्षा झाल्या त्या कालांत वाचायला परवानगी मिळाली. विशेषतः पेरींच्यावेळीं पन्हाळ्यावरच्या स्थानबद्धेत पुष्कळच वाचन झाले. टाईम्स् ऑफ इंडियानें बर्नार्ड शॉचे समग्र ग्रंथ प्रस्तावनेसकट छापले होते. ती पुस्तकें टपालानें मागवून सर्व पुरी केली. लॉरेन्स, अलन् पो, वगैरे कथासंग्रह वाचून काढले. लिहलेही खूप. आणखी चारपांच कथासंग्रह छापता येतील इतक्या गोष्टी शिलकीत आहेत. तितकेच निबंध संग्रही आहत. कलाविषयक लेखांचेही

**एक पुस्तक तयार होईल. पैशा अभावी ते आता प्रसिद्ध करण्याची ताकत माझ्यांत उरली नाहीं.**

तुरुंगाच्या बाहेर पडलो कीं कामाचा बोजा पडे. मग वाचायला आणि लिहायला तितकेसे मिळायचे नाहीं. पण पत्रांतून प्रचारात्मक हे चालूच असतं. सवड काढून व कर्तव्य म्हणून 'शाहू महाराजांच्या आठवणी' हे एक पुस्तक लिहले. अनेक लोकांच्या त्यासाठीं गांठी घ्याव्या लागल्या. भास्करराव जाधव यांचेकडे नियमित जात होतो. इतक्या उतार वयांत सुद्धा त्यांची स्मरणशक्ती चांगली होती. पण डोळे काम देत नव्हते. या पुस्तकासाठीं छ. शहाजीराजांनी दोन हजारांची देणगी दिली. ती देणगी व पुस्तकाची मिळणारी प्राप्ती मी 'शाहू एज्युकेशन सोसायटीस' त्याचे मिळणारे उत्पन्नासकट परत वाङ्मय प्रकाशनासाठीच खर्च व्हावे म्हणून स्वाधीन केले. पुस्तक खांडेकर, अत्रे, ठाकरे यांना बरेच आवडले. अखिल भारतीय मराठा परिषदेकडून त्याला ७५ रु. बक्षिस मिळाले.

शेतकरी कामगार पक्षांत गेल्यानंतर मार्क्सवाद व कम्युनिझम याची बहुजन समाजाला समजण्याकरता सोप्या भाषेत व थोडक्यांत त्या तत्वज्ञानाची कल्पना येण्याकरता सहा पॅम्प्लेटस् छापली. 'मार्क्सवाद' 'कम्युनिझम व सोशालिझम' 'लेनिन स्टॅलिन' 'मानवी संहार बंद करा' 'सुलभ समाजवाद' भाग १ व भाग २ अशी आणा दोन आण्याची छापून घेतली. ती मात्र बरीच खपली.

फुरसत मिळेल त्यावेळीं मी माझ्या आठवणी लिहित असें. राजकीय आयुष्यांत प्रत्यक्ष पडण्या अगोदरच्या आठवणी प्रो. य. ग. नाईक यांच्या सहानुभुतीमुळें 'महाराष्ट्र शारदा' या टिकेकरांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या मासिकांत 'बंधनांत' या मथळ्याखाली छापल्या गेल्या. कांहीं अत्रे यांनी 'नवयुगमध्ये' छापल्या, माझ्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या अखंडभारत मधून 'माझी डायरी' या सदराखाली बऱ्याच आल्या. पुनः त्या सर्व आठवणी आलेल्या अनुभवावरून परत लिहिल्या. नवा मजकूर बराच घातला. त्याच या जीवन–प्रवाह म्हणून वाचकासमोर आहेत.

——:०:——

# मला काय वाटले.

## ले०— प्रबोधनकार ठाकरे.



प्रबोधनकार ठाकरे

प्रस्तुत पुस्तकाचा तोंडवळा जरी आत्मवृत्ताचा असला तरी वास्तविक तो एक चालू घडीचा राजकारणी, समाजकारणी इतिहास आहे. गेल्या २५–३० वर्षांचा तो कोल्हापूर संस्थानाचा जिवंत इतिहास श्री. बागलांनी जिवंत-वाणीनें सांगितला आहे. जुन्या इतिहास बखरींची भाषा 'अप्रत्यक्ष.' तर या इतिहासाची भाषा 'प्रत्यक्ष.' छत्रपति शिवाजी-महाराजांनीं अगदीं पाहिली जुन्यांतली जुनी सभासदाची बखर घेतली, तरी ती राजारामाच्या अंमदानींत म्हणजे तिसऱ्या पिढींत लिहिलेली. तीसुद्धां लेखकानें केवळ आठवणींच्या भांडवलावर आणि पौराणिकी थाटानें. तींत शिवशाहीविषयी भक्तिभाव असला, तरी जागती-ज्योत आत्मियता आढळायची नाहीं.

पण बागलांचा हा इतिहास म्हणजे लेखकानें प्रत्यक्ष अनुभवलेल्या, पाहिलेल्या आणि स्वतःच घडवलेल्या नि बिघडवलेल्या शेंकडों घटनांचा क्रमवार बोलका चित्रपटच म्हटला तरी चालेल. त्यांतील अनेक रोमांचकारी घटनांचे साद नि पडसाद त्या त्या घडीला पाहून ऐकून नि वाचून थरारलेली, चिडलेली, संतापलेली, व्याकूळ अथवा हर्षभरित झालेली जनता आज महाराष्ट्रांत हयात आहे. हेन्री फोर्ड इतिहासाला ‘ वारेमाप गप्पांचा गाथागोंधळ ” म्हणतात आणि “ इतिहास म्हणजे बहुसंख्य ( बावळट ) लोकांनीं मान्यता दिलेल्या कल्पित कथांचे भारूड, ” हा नेपोलियन बोनापार्टचा अभिप्राय. पण तसला कांहीं आरोप या पुस्तकाला चुकूनहि कोणाला लावतां येणार नाहीं. अथपासून इतिपर्यंत हे सत्य घटनांचे सत्य कथन आहे आणि त्याचे साक्षीदार सर्वत्र हयात आहेत.

तसें म्हटले तर कोल्हापूरचा साराच इतिहास शेंकडो विचित्र घटनांनी भरगच्च उफळलेला आहे. कितीतरी भयंकर चित्तविदारक आणि प्रक्षोभकारक घटना वींच्या काळी घडल्या. त्यांच्या सत्यनिरूपणा-विषयी संशोधक आणि रसग्राहक आजहि तान्हेलेले आहेत. पण त्यांची ती तहान भागवायची कोणी नि कशी ? संस्थानाचा सारा प्राचीन ( नि अर्वाचीनसुद्धां ) दप्तरखाना मि. पेरी कारभाऱ्याच्या अंमदानीत म्हणे प्रचंड होळी करून जाळण्यात आला. तमाम मऱ्हाठी जनतेच्या हृदयमंदिरांत चिरंजीव बसलेल्या छत्रपति शाहू महाराजांच्या शतमुखी लोकोद्धारी चळवळींचा तपशीलवार इतिहास तरी कोठे आहे ? प्रो. लठ्ठे यांच्या—इंग्रजी मऱ्हाठी— दोन लठ्ठ बाडांत शाहू छत्रपति वावरताना दिसले, तरी जनतेने त्यांना जसे पाहिले नि ते जनतेला दिसले, ते शाहू महाराज त्यांत कोठेहि नाहींत. ही जर अगदीं अलिकडच्या काळांतली अवस्था, तर बर्वेशाहीच्या कुटिल कारस्थानांना हकनाहक बळी पडलेल्या आणि अहमदनगरच्या अंधारकोठडींत एका गोऱ्या गब्रूच्या भालाफेंकींत खून झालेल्या दुर्दैवी तरुण शिवाजी छत्रपतीच्या करुण कहाणीची कथा कालोदरांत आतां कायमचीच गडप झाली नव्हे का ?

पण माधवरावांच्या या पुस्तकाची किंमत फार निराळी आहे. सन १९३८ पासून तो आजदीनतागायतचा करवीरचा राजकारणी,

समाजकारणी, धर्मकारणी–प्रामुख्यानें स्वातंत्र्यप्राप्तीचा–इतिहास जसजसा घडत आणि बिघडत गेला, त्यांचें तपशीलवार कथन यांत आहे. लेखकाची भूमिकाहि त्रयस्थाची नाहीं. पंडिताची नाहीं अथवा संशोधकाची नाहीं. त्या इतिहासाचे नाटक भरघोस रंगत असतांना, तो प्रत्यक्ष रंगभूमीवर एक जबाबदार नेता नट म्हणून नाचला आहे, जाचला नि ठेचला गेला आहे, कधीं गौरविला गेला तर कधीं धि:कारला गेला, कधीं कुरवाळला गेला तर पुष्कळ वेळां मुरगाळला गेला. शाहू महाराजांच्या मृत्यूनंतरचे कोल्हापुरी दरबारचे राजकारण आणि त्याला जनतेचा होत असलेला विरोध, म्हणजे अमेरिकन क्लू क्लक्स क्लान चित्रपटांतल्या घिसाडघाई धांवपळींचा नि कारस्थानी धाडसांचा एक नमुनाच म्हटले तरी चालेल. त्यांत लेखकाला विरोधकाची लोकहितवादी भूमिका घ्यायला परिस्थितीनेच खेचून नेले.

ती भूमिका यथामति, यथाशक्ति किती कसोशीनें त्यांनें पार पाडली, हरएक बऱ्या वाईट मुकाबल्याला तत्वनिष्ठेनें कसें तोंड दिले, लोकांचा संसार सुखाचा व्हावा म्हणून स्वताच्या संसाराला स्वताच आग कशी घातली, त्यांचे जन्मप्राप्त सुखासीन श्रीमंतीचे विलासी जीवन कोल्हापुरी कैदखान्याच्या यमपुरीत किती कठोरतेनें चेचले ठेचले गेले, मित्र अमित्र कुमित्रादिकांना त्याच्या प्रामाणिक तत्वनिष्ठेचे विपर्यासी अर्थानी कसे जाहीर धिंडवडे वाजवले, आणि स्वातंत्र्यप्राप्तीच्या त्या धडाडलेल्या यज्ञकुंडांत या प्रमुख नेत्याच्या देहमनाचे होळकुकडे होत असता, खुद्द कोल्हापुरांत आणि आसपासच्या महाराष्ट्रांत मतलबी राजकारणांचे ढोंगधत्तुरे जनतेच्या लोकशाही महत्वाकांक्षांची जागोजाग कशकशी मुस्कटदाबणी करीत होते, हा सगळा कथासंग्रह या पुस्तकांत ताळेबंद वाचायला मिळतो.

भारतीय स्वातंत्र्याचा नि लोकशाही झगड्याचा इतिहास मध्यवर्ति सरकार लिहवीत आहे म्हणतात. माधवरावांच्या या चित्तवेधक नि रसाळ सत्यनिरुपणाला त्यांत एखादा तरी मानाचा कोपरा अगत्य लाभला पाहिजे. कारण बागलांचा मूळ स्वातंत्र्यवादी झगडा जरी कोल्हापूर दरबारशीं चालू झाला, तरी क्रमश: त्याला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झाले आणि माधवरावजी संस्थानांत आणि संस्थानाबाहेर दलित जनतेचे बोलके प्रतिनिधी म्हणून उभ्या महाराष्ट्रांत चमकू लागले.

माधवरावांचा पिण्ड मूळचा जातिवंत चित्रकाराचा. हातांत सदान्‌कदा पाणरंगाची पेटी नि ब्रशांचें बंडल घेऊन हा असामी निसर्गाची जिवंत प्रतिबिंबें कागदांवर उमटविण्यांत अखंड रममाण. तें पट्टीचें निसर्ग चित्रकार. त्यांची कित्येक रंगकामें पाहिली की. " The canvass glowed beyond even Nature's warmth " हा ऑलिव्हर गोल्डस्मिथचा साक्षात्कार आजहि प्रेक्षकांना घेता येतो. निसर्गाच्याच सौन्दर्याचा अखंड नि आकंठ आस्वाद घेण्यांत कलाधुंद असणारा हा कलावंत कधींकाळीं राजकारणी कटकटींचा म्होरक्या म्हणून तलम रेशमी मखमली वस्त्रप्रावरणांतून धडाड कैदखान्याच्या खरखरींत गोणपाट घोंगडीचा आणि लोखंडी कड्याबेड्यांचा सक्तमजुरी कैदी होईल. असें एकाद्या ज्योतिषानें भविष्य वर्तविलें असतें, तर तोहि मूर्ख ठरला असता.

मग हे असें कसें झाले? माधवरावांचा पिंडच जात्या तीव्र भावनावशतेचा आहे. निसर्गातल्या गुढांशीं एकतातेनं चटकन रमणाऱ्या या कलावंताला आजूबाजूच्या मानवतेच्या सुख-दुःखांच्या, आशा–आकांक्षांच्या आणि हालअपेष्टांच्या वेदना आणि संवेदना टोंचूं बोचूं लागताच, त्यानें ब्रशांच्या बदला कलमाची तलवार उपसली आणि पाणरंगाच्या पेटीच्या जागीं वाग्शैलीचा तोफखाना चालू केला. चित्रकार माधवराव कलम–वाग्बहाद्दर लोकनेता पत्रकार बनला. दरी, डोंगर, वृक्ष, नदी–नाले, किल्ले, मंदिराचे तपशील आपल्या हुकमी कुंचल्यानें चित्रित करणारा हा भावनाप्रधान कलाकार, जनतेच्या हृदयांत खवळणाऱ्या आधीव्याधी, हालअपेष्टा आणि सत्ताधिशांचे अनेकमुखी जुलूम यांची तपशीवार शब्दचित्रें आपल्या बाल–बोध भाषाशैलीनें रेखाटूं लागला. पाणरंगांच्या चित्रांसाठीं मन मानेल त्या धुरोळयांत अथवा टेकाडावर चित्रसमाधीची बैठक मारणारा, आता कोल्हापूर राजधानीतल्या जाहीर व्यासपीठांवर धीट उभा राहून राज्यकर्ता छत्रपति आणि त्यांचे पोटभरू कारभारी नि मसलतगार यांच्यावर वाग्शरांचा मारा करूं लागला. जनतेच्या बऱ्या वाईट जीवनाशी तो एकतान तन्मय झाला. पण दरबारी जनाला तो वेन्यासारखा वाटूं लागला. गारगोटीवर चकमक झाडणाराच तोंवर कोणी

त्यावेळीं मला वारंट दाखवण्यांत आले नव्हते. केस कां घालण्यांत आली ते सांगण्यात आले नव्हते. माझी केस माझे बालपणीचे मित्र नानासाहेब देव वकील चालवीत होते. या खटल्यांत मी खालीलप्रमाणें कैफियत दिली होती.

कैफियत— ता. ४ रोजीं... शिरोळ यैथें जगदाळे यांच्या वाड्यांत सभा भरली ही गोष्ट सर्वथैव खोटी आहे. त्यावेळीं मी कोल्हापुरास होतो. व त्या सुमारास माझे एका आप्तांची बायको वारल्याचे समजल्यामुळें भेटीस गेलो होतो. श्री. श्रेष्ठी वकील यांचे घरीं खासगी वाटाघाटीस गेलो होतो. सभाबंदीचा कायदा मोडण्याचे व सरकारी साराबंदी करण्याचे धोरण मी व माझ्या सहकारीबंधूंनी केव्हांच ठरवले नव्हते. व्यक्तिशः मी गेली १० वर्षे सनदशीरपणें चळवळ करीत आलो आहे. स्वातंत्र्यदाते पुण्यश्लोक शिवछत्रपतींच्या गादीविषयीं माझ्या अंतःकरणांत आत्यंतिक आदर वसत असल्यामुळें व राजर्षि शाहू छत्रपतींचे मजवर व माझे घराण्यांवर उपकार असल्यानें करवीर दरबाराविरुद्ध लोकांच्या हक्काच्या मागणीसाठीं कायदेभंगाचा प्रसंग येऊं नये अशी माझी प्रामाणिक इच्छा होती. म्हणून मी लेख, अनावृत पत्रद्वारें श्रीमन् महाराजसाहेबांकडे माझे विचार, सादर केले. फाळाबंदी करण्याचें मी ठरवले असते तर त्यासाठीं उघड प्रचार करणें भाग होते...अटकेचेवेळींही मी शांततेचा व सनदशीर मार्ग अवलंबण्याचा उपदेश करीत असतांना मजकडून शांतता भंग होईल म्हणून पांच हजाराचा जामीन मागण्यांत आला. अनत्याचार, शांतता व शिस्त राखण्याचा प्रयत्न करणाऱ्या मजवरच १०७ कलम लागू केले आहे. एवढेच माझे सांगणे आहे.

केस चालवावी अशी माझी स्वतःची इच्छा नव्हती. पण माझ्या हितचिंतकांनी ती आपल्या जबाबदारीवरच चालवली होती. केसचा निकाल माझ्या उलट होणार या कल्पनेनें मी तयारी केलीच होती. बायकोला भाड्याचे घर सोडून माहेरी राहण्यास जा म्हणून सांगितले होते.

माझ्या अटकेनंतर पुनः ता. १५ ला मोठा मोर्चा आला. अत्यंत बिकट परिस्थितींत कमालीची शांतता मोर्चेवाल्यांनी राखली. मोर्चाचा पुढाकार त्यावेळचे शिपाई गडी खानदानी मराठे नानासाहेब जगदाळे यांनी घेतला होता व त्यांनी आपले काम चोख रीतीनें बजावले. या मोर्चास

मागण्यांचा विचार करण्याचें व मला सोडण्याबद्दलही सहानुभूतिपूर्वक विचार करण्याचे आश्वासन दिले गेले. त्यामुळें लोक परत गेले.

मला अटकेंत वर्तमानपत्रें वाचायला मिळत असत, त्यामुळें दुसऱ्या मोर्चाची हकीकत वाचून कारागृहांतील शारीरिक त्रासही हलका वाटूं लागला. तसेच माझ्या अटकेमुळें कोल्हापुरांत व कोल्हापुराबाहेरील खेड्यावर पडलेल्या हरताळाच्या बातम्या वाचूनही एक प्रकारचे समाधान वाटत होते. लोक जागे आहेत त्यांनीं कच खाल्ली नाहीं व योग्य मार्ग दाखवल्यास ते पुढाऱ्या-मागें जाऊं लागतील असा विश्वास वाटूं लागला.

**महाराजांची आश्वासनें**–दुसऱ्या मोर्चाचे वेळीं महाराजांकडून खालील आश्वासनें मिळाली होती–१ शेतसारा ब्रिटिश हद्दीइतका करण्यांत येईल. २ भाषण स्वातंत्र्यावरील निर्बंध काढून टाकण्यांत येतील. ३ नागरिक स्वातंत्र्याचे हक्क १५ दिवसांत जाहीर केले जातील व सर्व राजबंदी सोडण्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करण्यांत येईल.

या आश्वासनाला धरून मला प्रथम दिवाणसाहेबांनी आपल्या बंगल्यावर बोलावून घेतले. मी दुसऱ्या बाहेरच्या लोकांच्या तंत्रानें चालतो असा आरोप केला. वस्तुतः मी कोणाच्या तंत्रानें वागणारा नव्हतो. कोणाचे बाहुले झालो नव्हतो. योग्य सल्ला मिळाल्यास घ्यावा मग तो कोणाकडूनही येवो या धोरणानेंच मी वागत होतो. महाराजांची भेट झाल्यावर तुम्हाला जे बोलायचे ते बोला असे सांगून पुनः मला जेलमध्यें पोचवण्यांत आले.

**महाराजांची भेट**— अपेक्षेप्रमाणें दुसरें दिवशीं २३।१।३९ ला मला वाटाघाटीसाठीं म्हणून महाराजांच्याकडे नेण्यांत आले. महाराज दिवाण सुर्वे यांच्याच बंगल्यावर आले होते. बहुतेक कौन्सिलर्सही हजर होते. पोलीस ऑफिसर निंबाळकर हेही हजर होते.

'अहो बागल तुम्ही राजनिष्ठ आहांत कीं नाहीं?' असा महाराजांनीं प्रथमच प्रश्न केला. त्यावर आमची चळवळ केव्हांही महाराजाविरुद्ध नाहीं किंवा महाराजांच्या लौकिकासाठीं व प्रजेच्या कल्याणासाठीं कसलाही त्याग करावा लागला तरी तो करण्याच्या आम्ही आणाशपथा घेतल्या आहेत. हे सांगितल्यावर महाराजांना बरें वाटलें व त्यांनी मोठ्या प्रेमानें माझा हात आपल्या हातांत घेऊन सांगितले, 'माझ्या मनांतली सर्व शंका दूर झाली

हे तुम्ही निश्चित समजा. ही बसलेली मंडळी मी जशी माझी समजतो, तसें तुम्हाला माझ्यापैकींच समजतो. माझी इच्छा तुम्ही म्यु. पालिटीचे अध्यक्ष व्हावे, वाटल्यास मी तुम्हाला इलाखा पंचायतीचे अध्यक्ष करतो. या वेळीं या दोन्ही संस्था सरकारच्याच ताब्यांत होत्या. ती जागा तुम्ही पत्करा. यापुढें तुम्ही बाहेरच्या लोकांचे नादी लागू नका. मी तुमचा राजा आहे. माझ्या प्रजेनें मला लाथांनी मारले तरी चालेल. ती माझी मुलें आहेत; पण बाहेरच्यांनी लुडबुड केलेली मला खपणार नाहीं. 'लाथांनी मारले तरी चालेल' या महाराजांच्या वाक्यानें मला गहिंवरून आले. मी महाराजांना म्हणालो, मला कसल्याही जागेची, मानाची व पगाराची आशा नाहीं. जनतेचा सेवक म्हणूनच मी आजन्म राहूं इच्छितो. लोकांच्या तक्रारी घेऊन आलो म्हणजे महाराजांनी माझी भेट घ्यावी म्हणजे झाले. आज पहिली गोष्ट म्हणजे जनतेला नागरिक हक्क द्यावेत. भाषणबंदी तात्काळ उठवावी.

भाषणबंदी प्रश्नावर एक कौन्सिलरच उलट गेले! त्यांचे म्हणणे कीं, 'आम्ही कोल्हापुरच्या लोकापुरती भाषणबंदी उठवूं पण बाहेरच्या लोकांना परवानगी देणार नाहीं. तें वाटेल ते बरळून जातात. त्यांना पकडणे त्रासाचे होते, ते बेजबाबदार रीतीनें बोलून जातात.' यावर मी त्यांना सांगितलें की, यांने कायदेभंगांचा प्रश्न निकालांत जात नाहीं. या प्रश्नासाठीं बाहेरचे लोक संस्थानांत येऊन कायदेभंग करूं लागतील. असे होणे दरबारलाही बरे नव्हे. तरी सर्हा भाषणबंदी काढून टाकून तो कायदा अजिबात रद्द करावा.

या प्रश्नावर मुलाखत फिसकटून, आमची रवानगी पुनः तुरुंगांत होणार असें मला वाटूं लागलें. पण मला हा हेका सोडून चालण्याजोगे नव्हते. जवळ जवळ वीस वर्षे ही भाषणबंदी उठण्यासाठीं मी धडपडत होतो. सर्व उपाय केले, अर्थात् सगळे सौम्य, सनदशीर व कायदेशीरच उपाय होते ते. ठराव, व्याख्यानें व अर्ज याप्रकारें खेड्यावर जागृति करीत आलो होतो. साऱ्याच्या प्रश्नाहूनहि मी सभा—स्वातंत्र्याला अधिक महत्त्व देत होतो. अगदी प्राथमिक मानवी हक्क मिळवणें हे अत्यंत महत्त्वाचें होतें.

रा. ब. दत्तोबा भोसले यांनीं अगदी वेळींच चर्चेला योग्य अशी कलाटणी दिली व बाहेरच्या लोकांनी गैरवाजवी टीका केल्यास ती तुम्ही आवरूं शकाल काय असें विचारले. मी त्यांना एवढेंच सांगितले कीं,

एखादा सभेंत कोणीही इसम खासगी व्यक्तिविषयक अशी टीका करूं लागला तर ती थांबविण्याचा मी प्रयत्न करीन, एवढेंच आश्वासन मी देऊं शकेन, यापेक्षां मला कांहीं करतां येणार नाहीं. ' कांहीं हरकत नाहीं, अशी शक्य तो खटपट तुम्ही करा म्हणजे झाले ' असें महाराजांनी बोलून मुलाखतीचा शेवट गोड केला.

**सुटकेनंतरचा सत्कार—** अटकेंतून सुटतांच कार्यकर्त्यांना व शिखऱ्यांना भेटण्याकरितां मिरजेस गेलो. मिरजेहून परत शिरोळला जातांना वाटेंत उदगांवच्या लोकांनीं अडवले. त्यांनीं तेथें सत्कार केला. तोपर्यंत शिरोळनें मिरवणुकीची तयारी केली होती. तीही फार धांदलीनें. लोकांना आनंदाचे भरते आले होते. मिरवणुकीसाठीं बैलाची गाडी पुढें आणिली. त्याला बऱ्याच जोड्या जोडल्या होत्या. मिरवणूक सुरू होतांच जोड्या वाढूं लागल्या व अगदीं थोड्या वेळांत त्यांची संख्या साठ सत्तरपुढें गेली. गांवांत स्त्री-पुरुषांचा उत्साह अवर्णनीय होता. घरांघरांतून फुलांचे, कागदांचें, कापडांचे हार घेऊन पुरुष उभे होते. बायका, मुली पंचारती घेऊन ओवाळायला पुढे येत होत्या. गाडीपुढें बैलांचे पायावर बायका पाण्याच्या घागरी ओतीत होत्या. त्यामुळें रस्त्यावर पाणी झाले होते. ओवाळणींत येणाऱ्या नारळ, केळीं, फळें, फुलें व बत्तासे यांनी गाडी भरूं लागली. त्या मिरवणुकींत जनतेच्या प्रेमाचा तो अवर्णनीय प्रकार पाहून कृतज्ञतेनें माझे हृदय भरून येत होते. पुढें पुढें तर प्रत्येक खेडें या प्रकारच्या सत्कारांत चढाओढ करूं लागले. वाजंत्री, बँड, आतषबाजी, तोरणें, माला–पताका यांची त्यांत भर पडूं लागली. प्रत्येक गांव आपले वैशिष्ठ्य दाखवूं लागले. थैल्या मिळूं लागल्या. बैलजोड्यांची संख्या अडीचशेंपर्यंत गेली. शिरोळची सभा आटपून लगेच कोल्हापूर शहरांत आलो. सभेची वेळ टळून गेली होती. तरी हजारो लोक तिष्ठत बसलेच होते. त्या सभेच्या रिपोर्टरचे वर्णन खाली देत आहे. ' आठचे सुमारास श्री. माधवराव बागल सभास्थानी आले. तेव्हां "बागल महाराज कीं जय!" इत्यादि जयघोष नि टाळ्या यांनी सर्व वातावरण दुमदुमून गेले होते. भाई बागल टेबलावर उभे राहतांच त्यांना पांच पन्नास संघ नि चाहते यांनी हार घालून फुलवून काढले. ' नंतर श्री. बागल म्हणाले—

" माझ्या शेतकरीबंधूंनी माझें जे स्वागत केलें त्या ऋणांतून जन्मांतरीही मी मुक्त होणार नाहीं...माझे इतर बंधू तुरुंगांत आहेत तोंपर्यंत माझी सुटका मला अभिनंदनीय वाटत नाहीं. मी राजनिष्ठ राहीन असें महाराजांना वचन दिलें आहे. त्याचा अर्थ मी प्रजाबंधूंशी बेइमान होईन असा मात्र नाहीं. राजा–प्रजा ही दोन्ही एकच आहेत असें मी मानतो. आणि माझी प्रजानिष्ठा हीच राजनिष्ठा आहे. भगवा झेंडा हें स्वातंत्र्य चिन्ह आहे आणि छत्रपतींची गादी हें स्वातंत्र्यस्थान आहे. आमची चळवळ छत्रपतींची कीर्ति आणि लौकिक नि सुख वाढवण्यासाठींच आहे. आम्ही कोणाच्याही ओंजळीनें पाणी पिऊन त्यांच्या आहारीं जाणार नाहीं. आपला कावा साधून कोणी आमच्यावर ' ब्राह्मण्य ' लादूं पाहतील तर त्या क्षणीं त्यांना धक्के मारून बाहेर घालण्यास मी मागेपुढें पाहणार नाहीं. कांहीं थोर काँग्रेस भक्त संघटना आणि सनदशीर चळवळ कशी करावी याचें स्वार्थत्यागपूर्वक शिक्षण देत आहेत, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. कांहीं लोक भगवा झेंडा आणि तिरंगी झेंडा यांच्यांत भेद पाडून, आम्हांत भांडणें लावूं पहात आहेत. पण ही दोन्ही स्वातंत्र्याचीच चिन्हें आहेत. ती दोन्हीही आम्हांस सारखीच पूज्य आहेत. '

सभाबंदी आतां उठलीच होती. अटक होण्यापूर्वींच्या सर्व सभा मला नाइलाजानें संस्थान सरहद्दीबाहेरच कराव्या लागल्या. आंतील खेड्यांना भेट देतां आली नाहीं. म्हणून लागलीच संस्थानभर दौरा काढण्याचें ठरलें. मोठमोठ्या प्रमुख अशा गांवच्या सभांच्या तारखा व वेळां ठरवून प्रोग्राम छापून टाकला. रोज ३।४ ते ७।८ पर्यंत सभा होत. सभेच्या गांवीं जातांना मध्यें जी गांवें लागत त्या गांवचे लोक स्वयंस्फूर्तीनें मिरवणूक, सत्कार, सभा बळजबरीनें पार पाडीत. ही प्रेमाची सक्ती मोडतां येत नसे. मिरवणुकीसारखे प्रकार नकोत असें कितीही सांगितलें व अगावू कळवलें तरी नुसत्या सभेनें त्यांचें समाधान होत नसे.

कोल्हापुरच्या इतिहासांत यापूर्वीं अशा मिरवणुकी, अशी लोकजागृति व उत्साह खात्रीनें दिसून आला नसेल. तुंबून धरलेलें धरण फुटावें त्याप्रमाणें लोकांक्षेचा व आशेचा बांध जणुं फुटला होता. माझी मिरवणूक म्हणजे लोक यशाची मिरवणूक असा त्यांना भास झाला होता. आतांपर्यंतच्या

सभाबंदीमुळें पडलेलें दडपण नाहींसें झाल्यामुळें दावें तुटलेल्या वासराप्रमाणें त्यांना नाचावें बागडावें असें झालें होतें. मी येणार त्या ठराविक वेळेपासून हजारों लोक रस्त्यावर, सगळया लव्याजम्यासकट तिष्ठत बसलेले असत. कोनेंकोपरें, छपरें माणसांनी फुलून गेलेली असत. एखाद्या संतपुरुषासाठीं मेळावा जमावा त्याप्रमाणें स्त्री-पुरुषांचा जमाव भक्तिभावानें सभेस येई. राजे लोकांना हेवा वाटावा अशा मिरवणुकी निघत. कांहीं कांहीं गांवी तर लोक मोटारीच्या आडवे पडून अगदीं हट्टाग्रह करून मला ओढून आपल्या गांवीं नेत. माझ्या नांवाच्या जयजयकारानें तर माझे कान सुंद झाले. मी या मिरवणुकीकडे त्रयस्थाच्या भूमिकेवरूनच पहात होतो. पोलीस पाटील, तलाठी, कारकून, अंमलदार व शिलेदार यांच्या हुकमतीखालीं सदासर्वदा मान खाली घालून राबणारा, नमणारा, हुकमाचा ताबेदार समाज—' मुक्त झाला असें वाटून हुरळला होता. याचमुळें माझ्या विषयींची त्यांची आत्मियता पराकोटीला पोंचली होती. त्यांना मला ' कुठें ठेवूं ' असें झालें होतें. डोक्यावर घेऊन नाचावेंसें झालें होतें. कांहीं ठिकाणीं तसे नाचवलेंही पण. माझ्यामुळें त्यांच्या भावनोद्रेगाला एक वाट मिळाल्यासारखें झालें होतें.

हा एवढा आतापर्यंत कोणालाही न मिळालेला मान जो मला संस्थानी शेतकऱ्यांकडून मिळाला त्या मानाला मी पात्र होतो काय? नाहीं! मुळीच नाहीं! मी काय केलं होतं? विशेष असा कोणता त्याग केला होता? दहा पंधरा वर्षें मनांत तळमळत होतो व थोडाबहुत भीत भीत कांहीं प्रयत्न करीत होतो एवढेच. पुष्कळांना वाटलें कीं या मिरवणुकीनें माझें डोकें भडकले, मला आकाश ठेंगणे झालें! ज्यांना या सत्कीच्या सोहाळ्यांतून जावें लागलें असेल व ज्यांच्या हृदयांत जनतेविषयींची कृतज्ञता बुद्धी जागी असेल, त्यांनाच माझ्या मनःस्थितीची खरी कल्पना येऊं शकेल. जनतेच्या या उपकारानें, भक्तीनें व गौरवानें माझ्या डोक्यावर इतकी जबाबदारी पडली, कीं त्या बोजानें मी चिरडून जातो कीं काय असें मला वाटूं लागलें. त्यांनी मला न झेपेल इतक्या मानाच्या जागी नेऊन बसवलें होतें. सर्व सात्विक गुणाचा आरोप मजवर करून त्यांनी मला शिखरावर बसवलें होतें. माझ्यासारख्या यःकश्चित माणसाला हे निभणार कसें? जनतेच्या माझ्याविषयींच्या अपेक्षा खऱ्या कशा ठरणार? थरकांप होई माझ्या जिवाचा!

खरोखरी हा कांटेरी मुकुटच माझ्या डोक्यावर जनतेनें चढवला होता. जनतेची ही भक्ति पाहून मला घबराट सुटे! कांहीं सुचेनासे होई.

भावनावशतेत ध्येयच्युत झालो नाहीं— या मनःस्थितीचा अतिरेक घोसरवाड या गांवीं झाला! मिरवणुकीनंतर मी व्यासपीठावर चढलो. माझ्या तोंडांतून शब्द फुटेना. काय केले मी म्हणून लोकांनी मला असे डोक्यावर घेऊन नाचवावे! मला देव करावे! मला कृतज्ञतेचे हुंदके आवरतां येईनात. आईला मिठी मारून मनसोक्त रडून घ्यावे, त्याप्रमाणें त्या विराटस्वरुपी मातेला कवटाळून मी ओक्साबोक्सी रडूं लागलो! अश्रूंचा प्रवाह डोळ्यावाटे सारखा वहात होता. हुंदके येत होते. 'सांगा सांगा तुम्ही कां असे मला नाचवतां? काय केले मी तुमचे! कशी झेपूं ही जबाबदारी मी आतां!'

लोकांच्या डोळ्यांतूनही अश्रु वाहू लागले. सेव्य आणि सेवक एकरुप झालो. माझा जीव हलका पडला! या उन्मादाचा भर ओसरल्यानंतर चार शब्द बोललो. पण खरी भाषा अश्रुंचीच होती.

माझ्या स्वभावांतले हे मोठे वैगुण्य आहे. माझ्या अंतःकरणांत उचंबळणाऱ्या भावना मला दडवता येत नाहींत. प्रयत्न केला तरी ते शक्य होत नाहीं. आनंदाच्या भावना आवरता येत नाहींत, दुःखाच्या आवरता येत नाहींत. रागाच्या आवरता येत नाहींत. वर्तमानपत्र वाचतांना आनंदाची बातमी वाचली, कादंबरीतील दुःखाचा प्रसंग वाचला तरी माझे अंतःकरण भरून येते.

एकदा साक्षीचा प्रसंग आला. साक्षीसाठी पन्हाळगडावरील तुरुंगांतून मला करवीरी आणले. मी आलो आहे असे समजतांच मला पाहण्यासाठीं माझा नोकर माझे मुलाला घेऊन आला. पण परवानगी घेतली नसल्यामुळें मुलाला जवळ घेतां आले नाहीं. तो दूरवरून मजकडे पहात होता. त्याला जवळ घ्यावे. त्याला हृदयाशी घट्ट धरावे ही वासना अनिवार झाली. त्यामुळें मन आवरेना. आंतील कालवाकालव मर्यादेबाहेर गेली. मला घेऊन आलेला पोलीस हे पाहून म्हणाला, 'साहेब, तुम्ही कच्च्या दिलाचे दिसता. पुढाऱ्यानें ही सगळी बंधनें, हे मायामोह तोडले पाहिजेत. मन कठोर केले पाहिजे!'

त्याला काय उत्तर देणार मी! मी खजील झालो. हा गूण चांगला कीं वाईट याचा निर्णय मला देतां येणार नाहीं. पण मी जरी असा हळवा

होतो तरी मोहाला वश होऊन कर्तव्यच्युत मात्र झालो नव्हतो. माझ्या क्षयी बायकोला व बाळाला–ज्याचे मीच आईप्रमाणें पालनपोषण केले त्या माझ्या एकुलत्या एक लाडक्या मुलाला व आजारी बायकोला टाकून मी तुरुंगांत पाय टाकला होता. ' माफी मागा व बाहेर चला, आम्ही बाहेर नेतो ' असे आश्वासन देतां येणारे तुरुंगांत आले असतांही त्या मोहाला बळी पडलो नाहीं आणि असेही वाटते कीं जर मी असा भावनामय नसतो तर गरीब शेतकऱ्यांसाठीं घरादाराचा मोह तोडण्यासही तयार झालो नसतो. प्रसंगी कठोर झालो नसतो. कष्ट व त्रास जो थोडाबहुत पडला तो सहन करण्याची ताकद माझ्यांत आली नसती. याच एका वृत्तीमुळें त्यांच्यासाठीं झगडण्यास मी तयार झालो.

**थैल्यांची विल्हेवाट—** आमचा दौरा सर्व संस्थानभर झाला. मी जाईन त्या त्या खेड्यांनीं आपल्याला झेपेल अशा थैल्या अर्पण केल्या! लोकांनीं जरी ती रक्कम व्यक्तिशः मला म्हणून दिली होती तरी, मी लोकांसाठीं म्हणून जें कार्य करीन त्यासाठींच ते खर्च करीन असे जाहीर करीत, मिळालेल्या थैल्या न उघडतां मी तशाच रत्नाप्पा कुंभार यांचे हवाली केल्या. पुढें या पैशाची विल्हेवाट माझ्या सान्निध्यांत तुरुंगांत एका खोलींत असतांहि मला न समजूं देतां त्यांनीं केली व पुढें हिशेब दाखवला.

२५।१।३९ ते १।२।३९ एवढ्या काळांत झालेल्या या जागृतीतून प्रजा–परिषदेचा जन्म झाला.

**दौऱ्यांतले अनुभव—** शिरोळ पेट्यांतील बस्तवाडच्या सभेंतील गोष्ट. मी शेतकऱ्यांना त्यांच्या योग्यतेची जाणीव देत होतो.

' बाबा, दुनियेचा खरा मालक तूंच आहेस. खरा देव तूंच आहेस. राजांचा राजा तूंच आहेस. सर्व दुनिया केवळ तुझ्या श्रमावर जगत आहे. तुझ्या मदतीविना कोणालाही जगतां येणार नाहीं. तूं व्याज दिले तर सावकार जगणार, तूं खंड दिलास तर जमीनदारांची बडदास्त चालणार. तूं कर दिलास तर राज्याचा गाडा सुरळीत चालणार. शिक्षणाचा खर्च तूं चालवतोस. समळ्यांच्या उड्या तुझ्या जिवावर! सर्वांचा दाता, रक्षणकर्ता, अन्नवस्त्र पुरवणारा पोशिंदा, तूंच खरा परमेश्वर! पण तुझी ओळख तुला नाहीं.'

माझ्या या बोलीनें एका मुसलमान श्रोत्याला भावनावेग आवरतां आला नाहीं. तो मोठ्यानें "ओच्यू खुदा! ओच्यू खुदा!" असें म्हणत पायावर येऊन पडला. त्यानें माझ्या पायाला मिठी मारली. माझे पाय अश्रुंनी भिजवून काढले. डोळे अर्धोन्मीलित होते. अश्रुधारा चालल्या होत्या. हात जोडले होते. जणुं समाधीच लागली होती त्याची.

अगदीं या उलट असे कांहीं प्रसंग ओढवले. माझ्यावर प्रेम व भक्ति करणारी जशी जनता होती तशी मला पाण्यांत पाहणाऱ्याही कांहीं—भाडोत्री व्यक्ती होत्या. मला विरोध आणि अडथळा करणें, मला व माझ्या कार्याला हाणून पाडणें व विघ्न उपस्थित करणें हेच त्यांचें काम होतें. 'मोलें घातलें माराया' अशापैकींच व्यक्ती होत्या या. त्यांना पैसा मिळत होता. मोटारी मिळत होत्या. पोटार्थी हरिजन त्यांना पुढें करतां आले. सरकारी बिनसरकारी लोक विरोधकांत डोकावत होते.

**तारदाळ गांवची सभा** — त्या सभेंत मारामारी करावी या हेतूनें मोटार लॉऱ्यांतून १५०।२०० लोक लाठ्या घेऊन आले होते. मी गांवाला पोंचण्यापूर्वीच ही गुणगुण आसपासच्या खेड्यावर पसरली होती. त्यामुळें आजूबाजूच्या खेड्याचे लोक स्वयंस्फूर्तीनें मदतीस धांवून आले. ३।४शें लोक जमायचे त्या ठिकाणीं या बातमीमुळें ३।४ हजारांपुढें जमाव जमला होता. माझ्या बाजूचा जमाव फार मोठा होता. त्यांनी दंगा करण्याकरतां ज्या लोकांनी लाठ्या आणल्या होत्या त्या त्यांच्या हातांतून काढून घेतल्या. त्यांचा ढीग एका गाडीखालीं रचला. त्या लोकांना एका ठिकाणीं बसवून त्यांचे भोंवती आपल्या लोकांचे कडे बनवले.

मी बोलूं लागतांच त्याविरुद्ध बाजूच्या एका गृहस्थांनीं कांहीं तरी विषय काढून विरोध करण्याच्या हेतूनें उठून बोलण्यास सुरवात केली. मी त्यांना प्रतिबंध न करतां भरपूर बोलूं दिले. सर्व शंका दूर केल्या. निरुत्तर झाल्यानें श्री. हजारे यांना गप्प बसावे लागले. उलट मी त्यांचेकडून खादी वापरण्याची कबूली सर्व लोकांसमक्ष घेतली. सभा उधळून लावण्याचा प्रसंग फिसकटून त्यांचेच अंगलट आला!

**मारण्याचा प्रयत्न** — याहून भयंकर प्रकार नवनिहाळ या गांवीं घडला. या गांवांस मी भेट देणार असे समजतांच आमच्या

सभेस एकही माणूस हजर राहता कामा नये असे प्रयत्न झाले होते. गांवच्या लोकांना धमक्या देण्यांत आल्या होत्या. दारु पिऊन किंवा पाजवून कांहीं अस्पृश्यांना फरशा घेऊन गांवांतून हिंडवले होते! मी गांवीं गेलो त्यावेळीं दिवस असूनही अगदीं शुकशुकाट झाला होता. रस्त्यावर कोणी फिरकत नव्हते! सभा होईल, भरवतां येईल असे कांही चिन्ह दिसेना! टेबल खुर्ची मागवून पाहिली. मिळेना! तेथील एक कुलकर्णी तेवढे हजर होते व सभा व्हावी म्हणून खटपट करीत होते. माणसे जमेनात. अंधार पडत चालला. इतक्यांत जवळच्या कापशी जहागिरींतील लाट गांवचे १००।१५० लोक काठ्या वगैरे घेऊन एकजुटीनें आले. वाटले पुनः कांहीं-तरी बाचाबाची होणार! पण ते मला अनुकूल असेच लोक होते. ते मुद्दाम व्याख्यानास आले होते. प्रसंग पडल्यास सहाय्य करण्याचाही त्यांचा इरादा होता. कुलकर्णी यांनी आपल्या घरांतली गॅसची बत्ती आणून झाडास बांधली! टेबल नसल्यामुळें मी मोटारींत उभा राहून व्याख्यान देण्याचे ठरवले. आठाचा सुमार असेल. व्याख्यान संपत आले. इतक्यांत जमावा-मागून माझ्या अंगावर मोठा दगड फेंकला गेला. पण तो माझ्यावर न पडतां गॅसच्या दिव्यावर पडला. दिवा फुटला. माझ्या भाषणानें लोक माझेकडे ओढले गेले होते. त्यांनी हा प्रकार पाहतांच, ज्या दिशेकडून तो दगड आला त्या दिशेकडे ते काठ्या–कुऱ्हाडी घेऊन धावले. तो मारेकरी इनामदारांच्या वाड्यांत जाऊन दडला. आंत जातांच वाड्याचे दार लावले गेले. लोक खवळले होते. त्यांची मजल ते दार फोडून त्या माणसाचा समाचार घेण्यापर्यंत गेली.

त्या लोकांना थोपवून धरून, त्यांना महात्माजींच्या अहिंसा तत्त्वाची, त्यांच्यावर असे प्रसंग आले असतांना त्यांनी दाखवलेल्या अहिंसामय आचरणाची, शांतवृत्तीची ओळख करून दिली व लोकांना शांत केले.

‘ माझ्यावर एका अस्पृश्यानें दगड फेंकला होता. वस्तुतः तो दोष त्याचा नव्हता. त्याच्या दारिद्र्याचा होता. ज्याची माझी जन्मांत ओळख नाहीं, पाहिले नाहीं, वांकडे नाहीं, त्यानें उगाच उठून मला कां मारावें? मारणारा तो खास नव्हता. फक्त त्याचा हात विकला गेला होता. द्वेष

म्हणून नव्हे. द्वेषाचे कारणच नव्हते. त्याच्या दारिद्र्यानें त्याला हे करावें लागले असावे. त्याची मुलेंबाळें उपाशी असतील. त्यांने जगण्यासाठींच हा हात माझ्यावर उगारला असेल ! खरा गुन्हेगार तो नसून त्याचे आड लपलेला कोणीतरी प्रतिष्ठित असेल. म्हणून त्याच्यावर राग करण्यापेक्षां तुम्ही त्याची कींवच केली पाहिजे. द्वेष करतां कामा नये.' असे बोललो.

या भाषणाचा इष्ट तोच परिणाम झाला. ते शांत झाले. मला हार घालण्यासाठीं, त्यांतील एक पुढें झाला. मी त्याला तेथेंच थांबवले व म्हटले " हार घालण्यापूर्वी तुम्ही मला वचन दिले पाहिजे, कीं मी गेल्यावर त्या माणसाला तुम्ही मारणार नाहीं, त्याला लागून बोलणार नाहीं. त्याला वाळींत टाकणार नाहीं. "

या माझ्या विनवणीमुळें त्यांना गहिंवरून आले. " काय सांगता साहेब ! " असे म्हणत त्यांनी मी सांगितल्याप्रमाणें मोठ्या कष्टानें वचन दिले व अशाप्रकारें सभेचा शेवट गोड झाला.

लोकांनी माझे ऐकले नसते तर कोण कहर उसळला असता त्या घटकेला. एखादेवेळीं त्या माणसाचा खूनही पडला असता. दंगा करणाऱ्या, न करणाऱ्या, दोषी-निर्दोषी, बघ्या माणसांचे मागेसुद्धां पोलीसांचा ससेमिरा लागला असता. साक्षीपुराव्यासाठीं सगळ्या गांवांला त्रास झाला असता. उठाठेवी लोकांची पोळी पिकली असती.

संस्थानभरचा दौरा संपवून मी राजधानींत आलो. श्री. हवीरे व गायकवाड हे मजबरोबर तुरुंगांत असलेले राजबंदी मजबरोबरच सुटायला हवे होते. वर्तमानपत्रांची विक्री करतांना खासगी टीकात्मक मथळे ओरडून ती पत्रें त्यांनी वाटूं नयेत असे अधिकाऱ्यांचे म्हणणे होते. ते मान्य केल्यास ते त्यांना सोडण्यास कबूल होते. अधिकाऱ्यांना ते कांहीं वचन देईनात म्हणून अधिकाऱ्यांच्या परवानगीनें मी त्यांची भेट घेतली व असे कबूल करणें कांही चुकीचे नाहीं असे त्यांना पटवून दिले व त्यांची सुटका करून घेतली.

**राजधानीतला सत्कार—** कोल्हापुरच्या इतिहासांत नमूद करून ठेवण्याजोगी मिरवणूक आणि सत्कार होता हा. राजाच्या अवकृपेंतील माणसाचा एवढा गौरव, एवढ्या उत्साहानें खुद्द राजधानींत केव्हांही झाला नसेल. लोकशाहीच्या प्रचंड उत्सवाचे स्वरुप याला आले होते. आमची ही

मिरवणूक शहरच्या लोकांनी काढली होती. ‘मिरवणूक शाहूपुरींतून निघाली. मिरवणुकीच्या गाडीस शृंगारलेलें अडीचशें बैल जोडले होते. सर्व शहर ध्वजा, पताका व तोरणे यांनी शृंगारण्यांत आले होते. ठिकठिकाणीं कमानी उभारण्यांत आल्या होत्या. सायंकाळीं ४ वाजतां मिरवणुकीला सुरवात झाली. बरोबर तीन चार हजार लोक चालले होते. दसऱ्याच्या मिरवणुकीप्रमाणें शहर थाटले होते. मिरवणूक स्टेशनवरून साडेसहा वाजतां खासबागेंत येऊन पोंचली. म्युनिसिपालिटीनें रस्त्यावर पाणी टाकून रस्तें गार केले होते. निरनिराळया संस्थातर्फे पुष्पहार घालण्यांत येत होते. कांहीं ठिकाणीं स्त्रियांनी पंचारती ओवाळल्या. माडीवरून फुलेंबत्तासें उधळण्यांत येत होते. खासबाग मैदानांतील सभास्थान थाटानें शृंगारण्यांत आले होते. व्यासपीठावर तिरंगी व भगवा झेंडा फडकत होता. तेथें अनेक संस्थातर्फे हार घालण्यांत आले. साडेआठचे सुमारास सभा आटपली.’ (ज्ञानप्रकाश)

**शिवाजी पेठ दंगल सभा —** आमच्या अभिनंदनासाठीं शिवाजी पेठ नवा बुधवार येथें सभा भरवण्याचे नक्की झाले होते. मला वाटले, अशा एखाद्या मोठ्या सभेंत खुद्द महाराजांनी येऊन चार गोड शब्द लोकांशी बोलावें. त्यामुळें लोकांना बरे वाटेल. लवकरच प्रजापरिषदेचे अधिवेशनही भरणार होते. त्यांत आम्ही कांहीं मागण्या करणार होतो. त्यापैकीं कांहीं महाराजांनीं आगाऊ देऊं केल्या तर त्या मला अधिवेशनांत जाहीर करतां येतील. यानें राजा–प्रजेंत सलोखा वाढूं शकेल. हा हेतू धरून मी शिवाजी पेठच्या सभेच्या अगोदर थोडा वेळ महाराजांच्या भेटी करतां बावडा बंगल्यावर गेलो. कांहीं अधिकाऱ्यांचीसुद्धां तशी इच्छा होती. मला महाराजांनीं पाहिलें व एकदम भेट न घेतां रावब. बी. आय. पोवार यांना मजकडे पाठवले. महाराजांना बोलावण्यांत पोवारना–त्यांना माझा अत्यंत नीच हेतु दिसूं लागला. महाराजांना सभेंत नेऊन अपमान करावा व कांहींतरी अनिष्ट गोष्टी घडवून आणाव्यात या हेतूनें मी नेत आहे असा आरोप ते धडधडीत तोंडावर करूं लागले. हे गृहस्थ महाराजांच्या अत्यंत कृपेंतले होते. यांचे मत म्हणजे महाराजांचें मत अशी त्यावेळी परिस्थिति होती.

महाराज मोटारींतून आले. माझ्याविषयींचा त्यांचा ग्रह बदललेला दिसत होता. माझें म्हणणें नीटपणें ऐकून घेण्याचीही मनस्थिति दिसेना.

तथापि मी पुढील मागण्या त्यांच्यापुढें ठेवल्या. त्या अशा:—( १ ) फॅक्टरी ॲक्ट लागू करावा. ( २ ) बकऱ्यामागें असलेला कर म्हणजे धनगराची टीप कमी करावी. ( ३ ) सर्वांत अत्यंत महत्वाची गोष्ट म्हणजे शिकारीची पार्कें कमी करावीत. विशेषत: ही मागणी शेतकऱ्यांच्या जीवन मरणाची होती. पण मला उत्तर द्यायचें जणुं काय ठरूनच गेले होते. त्यांनीं मला रागाचींच उत्तरें दिलीं. जन्मापासून हुकमत गाजवणाऱ्या छत्रपतींना तें शोभून गेले. पण त्याचवेळीं महाराजांच्यासमोर उभे राहून पोवारांनीं मजवर जी शब्दांजली वाहिली ती माझ्या आठवणींतून प्रयत्न केल्यासही जाण्याजोगी नव्हती. स्वत: हे गृहस्थ माझे वर्गबंधू होते. गरीब घराण्यांतील होते. पूर्वी माझ्या एका मित्राचे, नानासाहेब देव यांचे हाताखालीं अगदीं कारकुनी पगारावर काम करीत होते. पण सत्ता मनुष्याचें स्वभावांत किती बदल करूं शकते याचा तो एक प्रत्यक्ष अनुभव मिळाला.

महाराजांच्या भेटीनंतर मी सभेला जाण्यापूर्वी घरीं आलो. येथें कांहीं मंडळी आली होती. त्यांनी आज सभेला जाऊं नका, कांहींतरी भयंकर प्रकार होण्याचा संभव दिसतो, दारु प्यालेले बरेच हरिजन मुद्दाम दंगा करण्याकरतां म्हणून सभेस गेले आहेत, तुमच्या जिवावर बेतण्याचा संभव आहे, असे खुद्द सभा भरवणारेही बोलूं लागले. पण कांहींही होवो आजची सभा करायचीच असे माझ्या मनानें घेतले. असे जीवाला भिवून जर साधे निरुपद्रवी कार्यक्रमही आम्ही रहित करूं लागलो तर पुढें एकही सभा होणार नाहीं. प्रत्येक सभेंत विघ्न उपस्थित करण्यांत येईल. कोणी माझ्या जिवावर उठले असतील तर त्यांना भिवून स्वस्थ बसून कसे चालेल ? तेव्हां जे व्हायचे ते होऊं दे या निश्चयानें, पुन: घरीं सभेंतून धडपणें येणार नाहीं असें गृहित धरून मी माझ्या पत्नीचा निरोप घेतला. परत येईन किंवा न येईन म्हणून बोललो. मुलाला अखेरचे म्हणून कडकडून भेटलो. ज्यांचे घरीं मी क्वचितच जात असे अशा भाऊबंदाच्या घरीं गेलो. भावांचा निरोप घेतला. सभा होणार नाहीं असे समजून लोक जाऊं लागले होते. तेव्हां मी, तांबट–हवेरी–गायकवाड यांना मोटारींत कर्णा घेऊन बसवले. गांवभर हिंडवले. सभेची पुन: जाहिरात केली व लोक येईपर्यंत श्रीपती रामजी चव्हाण यांचे माडीवर जाऊन बसलो. पण

तेथें आजची सभा रहित करा म्हणून जिव्हाळयाच्या माणसांनीं माझे पाय धरले. कांहींतरी मोठा जबरदस्त व्यूह माझ्याविरुद्ध रचला गेल्याचे ते बोलत होते. पण मला कोणाचेही म्हणणें मान्य करतां आले नाहीं. माझा अगदीं निश्चय झाला होता. ‘ माझा बळी पडणार असेल तर पडूं दे पण मी माघार घेणार नाहीं इतकें त्यांना निक्षून सांगितले. ’

मी येण्यापूर्वीं दंग्याचा व मारामारीचा एक प्रयोग झाला होता. माझ्या भाषणाच्या परिणामानें म्हणा किंवा कांहीं अन्य कारणामुळें म्हणा व्याख्यानांत अडथळा झाला नाहीं. मी घरीं सुखरुप पोहोंचूं शकलो.

आश्चर्याची गोष्ट कीं, मी जे स्वयंसेवक माझ्या गाडींत, माझ्याबरोबर घेतले होते. त्यांच्यावरच दंग्याला प्रोत्साहन दिल्याचा आरोप घालण्यांत आला. साक्षीपुराव्यानें त्यांच्यावर आरोप सिद्ध होऊन त्यांना शिक्षा झाली.

शिवाजी पेठ दंगल सभेनंतर दुसऱ्याच दिवशीं दंग्याबाबत दहा स्पृश्य लोकच पकडण्यांत आले होते. यांत मीही पकडलो गेलो असेन असें समजून विद्यार्थ्यांनी निषेधार्थ मिरवणूक काढली होती. कांहीं लोक माझ्या संबंधी विचारपूस करण्याकरतां आले होते. त्यांनीं मिरवणुकीची हकीकत सांगितली. तेव्हां लोकांना शांत करावे या हेतूनें मी त्या ठिकाणीं गेलो. मिरवणूक तर चाललीच होती. मला पहातांच त्यांना आनंद झाला. मीं पण त्यांत भाग घेतला.

**प्रजापरिषदेची स्थापना व पुनः अटक—** याच रात्रीं जयसिंगपूरला प्रजापरिषद स्थापनेची पहिली बैठक व्हायची होती. त्या सभेला मला उशीर होऊं लागल्यानें, तारा आल्या. माणसही तेथून आली. तेव्हां जेवण न घेतांच मी मोटारींत बसलो व त्याच रात्रीं शाहूपुरींतच रामराव नागेशकर यांच्या माड्याच्या पहिल्या घरीं जाण्यास बायकोस सांगितले व परत तेथेंच उतरण्यास येईन असे सांगून निघालो.

जयसिंगपूर येथील श्रीरामचंद्र ऑईल मिल्समध्यें तारीख ६ फेब्रुवारी १९३९ रोजीं रात्रीं साडेनऊचे सुमारास, सभेस माझ्या अध्यक्षतेखालीं सुरवात झाली. संस्थानांतले सुमोर दोन हजार शेलके कार्यकर्ते आले होते. गिरणीच्या बंदिस्त भागांत सभा चालू ठेवणें, उकाड्यामुळें व गर्दीमुळें अशक्य झालें म्हणून आम्ही बाहेरच्या मोकळया जागीं आलो. सभेला सुर-

बात होणार इतक्यांत तेथल्या सब्-इन्स्पेक्टरनी मला बोलावून वारंट हाती दिले. लोक एकदम भांबावून जाऊं नयेत म्हणून मी सर्वांना प्रथम शांत बसण्यास सांगितले. कोणताही प्रसंग आल्यास तुम्ही डगमगून जातां कामा नये, अहिंसावृत्ति सोडतां कामा नये असे बजावून, राजद्रोहाचे १२४ अ कलमाखालीं पकडण्यांचें वारंट आले असल्याचे सांगितले.

या बातमीनें लोकांना एकदम धक्का बसल्यासारखें झालें. कांहीं ओक्साबोक्शी रडूं लागले. रत्नापा व दिनकरराव देसाई अश्रुपूर्ण नयनांनी मला कडकडून भेटले. लोक गर्दींवरून येऊन माझें पायावर पडूं लागले. हुंदके देऊं लागले आणि भरलेल्या डोळ्यांनी व जड अंतःकरणांनीं पहात त्यांनीं मला निरोप दिला.

त्यांच्या दुःखानें माझे सुख वाढले! मनुष्य प्रेमाचा भुकेला असतो. इतके लोक माझ्यासाठीं हळहळत आहेत ही जाणीव पुढील संकटाशी टक्कर देण्याला मला समर्थ करीत होती. हेच ते प्रेम! या प्रेमानें मी सर्व संकटां-तून तरून निघालो! कष्टांत आनंद उपभोगूं शकलो?

यावेळीं माझ्या बायकोची मला आठवण झाली. माझ्या शिक्षेची मला खंती नव्हती. पण माझ्या या शिक्षेमुळें तिच्या क्षयानें नाजूक झालेल्या हृदयाला धक्का बसणार, तो तिला कसा सहन होईल? ती आतां या धक्क्यांतून वांचत नाहीं, ४।५ वर्षांची तरी शिक्षा होणार, तोपर्यंत कसची जगते! ती जाणार आणि माझ्या मुलाला आई पारखी होणार, असे विचारच सारखे डोक्यांत खेळूं लागले.

**दडपशाहीस सुरवात**—माझ्या अटकेनंतर दरबारचे धोरण निश्चित ठरलें. दडपशाहीला सुरवात झाली. शिवाजी पेठेंतील दंग्याचे निमित्त पुढें करून शहराला सभाबंदीचे १४४ कलम सुरूं केले. जयसिंगपूर सभेच्या प्रसंगी मला अटक झाली तरी ती सभा बरखास्त न करतां मागील राहिलेल्या लोकांनीं ती चालू ठेवली. सभेत प्रजापरिषदेचें अधिवेशन भरण्याचें ठरलें. कांहीं झाले तरी परिषद ही भरवावयाची असा लोकांचा निश्चय झाला. माझ्या अटकेच्या निषेधार्थ कांहीं खेड्यावर हरताळ पडून तशी निषेधाची निदर्शनेंही झाली.

**राजद्रोहाचा खटला—** सहा फेब्रुवारीस मला अटक झाली. २७ मार्च १९३९ ला खटल्याचा निकाल लागला. माझी केस चालवण्याकरितां पुण्याचे ब्राह्मणेतर पुढारी श्री. बागडे वकील हे मुद्दाम येत होते. त्यांना येथील वकील बगाडे, वर्धमाने व कै. जी. डी. पाटील मदत करीत होते. हातकणंगले पेट्यांतील हेर्ले मुक्कामीं मी जें भाषण केलें तें राजद्रोही होते असा आरोप करून खटला भरण्यांत आला होता. दे. भ. नरीमन यांनीं माझ्या बचावाचें भाषण सहा तास तरी केले असावें.

**नरीमन यांचें भाषण—** ( सारांश )

भाई बागलांवरील हा खटला असाधारण प्रकारचा आहे. कोल्हापुरचा एक नागरिक, विरुद्ध करवीर दरबार, असे या खटल्यांत दोन पक्ष आहेत. सर्वसाधारण खटल्यांत सरकार तटस्थ असते. प्रस्तुत खटल्यांत मात्र करवीर सरकारचें लक्ष असाधारण आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत राजद्रोहाचे खटले नेहमीं ज्यूरीच्या मदतीनें न्यायाधीश चालवीत असतात. येथें संस्थानी राज्यांत ती निःपक्षपाती न्यायदानास सहाय्यभूत होण्याची सोय नाहीं... डि. मॅजिस्ट्रेट या नात्यानें संस्थानचा राज्यकारभार चालविणाऱ्या दरबारी यंत्राचे हे एक भाग किंवा अवयव असल्यानें, सरकारविरुद्ध अप्रिती उत्पन्न करण्याचा आरोप झालेल्या माणसाचा पूर्वग्रह दूषित नसलेल्या मनानें निःपक्षपाती चौकशी करूं शकणें फारच कठीण आहे. फिर्यादीनें आरोपीचें सर्व भाषण विचारांत न घेतां इकडील तिकडील तुटक वाक्येंच निवडून त्यावरच राजद्रोहाच्या खटल्याची इमारत उभारली आहे. भाषण ऐकणाऱ्या हजारों शेतकऱ्यांपैकीं एकासही कोर्टांत साक्ष देण्यास बोलावले नाहीं. आरोपीचें भाषण अशिक्षित शेतकऱ्यांच्या मनावर विशेष वाईट परिणाम करणारे होते असा कांगावा करणाऱ्या फिर्यादी पक्षानें आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ त्या वर्गांतील एकही साक्षीदार दिलेला नाहीं. उलट आरोपीच्या बाजूनें मात्र हेर्ले गांवचा हजर असलेला साक्षीदार रायगोंडा पाटील यानें खरा प्रकार वर्णिला आहे... भाई बागलांनी आपल्या भाषणांत शेतकऱ्यांना "संघटना करा, एक व्हा, भीति सोडा आणि शांतपणे पण निश्चयानें व निर्भयपणानें अन्यायाचा प्रतिकार करा." हाच सर्वमान्य होणारा सत्यपूर्ण आणि अहिंसावादी उपदेश केला आहे. चीड आणणाऱ्या परिस्थितींतही

त्यांनी लोकांस कायदेभंग करण्याचा वा संस्थानी राज्ययंत्राशीं असहकारिता पुकारण्याचा उपदेश केव्हांही केलेला नाहीं. भाषणाचा जो पोलीस रिपोर्ट म्हणून आणलेला आहे तो पक्षपाती माणसांनी बनावट केलेला आहे पोलीस नाईकाचे नांव साक्षीदारांत नमूद केलेलें होते. त्याची साक्ष घेतलेली नाहीं. साक्षीदार भाट पोलीस रिपोर्ट घेण्यास आलेला नव्हता असे सांगतात. पण त्याचीच साक्ष पोलीस रिपोर्टर म्हणून फिर्यादी पक्षानें घेतली आहे. साक्षीदार मोहिते वकील हा येथील दरबारी नोकरीसाठीं धडपड करणारा एक इसम असून सध्यां येथें त्याला ' पॉपर प्लीडरची ' नोकरी सरकारनें दिली आहे. दुसरा साक्षीदार कदम उर्फ लुगडे हाही निमसरकारी नोकर आहे. बागलांच्या भाषणाचा वृत्तांत जो कोर्टापुढें सादर केला आहे तो सर्वस्वी खरा मानला तरीही तो राजद्रोह होत नाहीं. ' शेतकऱ्यांच्या साऱ्यावरच सरकारी वाडे नि मोटारी वगैरेंची चैन चालते, यांत खोटें काय आहे ? बागलांची राजाची कल्पना अगदीं सुधारलेली असून तिचे अधिष्ठान जनतेच्या सार्वभौमत्वावर केलेले आहे.' अशा अर्थाचे बचावाचे भाषण नरीमन यांनी केले.

पण याचा कांहीं उपयोग झाला नाहीं व अपेक्षेप्रमाणें डि. मॅजिस्ट्रेट यांनी मला दोन वर्षें सक्त मजूरी व एक हजार रुपये दंडाची शिक्षा ठोठावली.

शिक्षा सांगितल्याबरोबर सेंट्रल जेलमध्यें नेण्यासाठीं, मोटर पोलीस-पार्टीसह दारांत उभी होती. मला पाहण्यासाठीं व हार घालण्यांसाठीं " कोर्टाबाहेर लोकांची बरीच गर्दी जमली होती. बाहेरही पोलीस बंदोबस्त होता. त्यामुळें गर्दी हवटली जात असे. निकाल ऐकतांच ' बागल...कीं जय ' अशी एकच गर्जना झाली. कोर्ट आवाराबाहेर जमलेल्या करवीर बांधवानी आणलेले सुताचे व फुलाचे हार भाई बागलांना घालण्याची धडपड केली. पण त्यांचा नाईलाज झाला. भाई बागल पोलीसांच्या पाहऱ्यांत मोटारींत येऊन बसतांच जयजयकार झाल्यावर स्वतः भाई बागलांनी सर्व करवीर जनतेला प्रणाम करून ' शेतकरी-कष्टकरी देवाचा विजय असो ' अशी गर्जना केली. त्यानंतर मोटार तुरुंगाकडे जात असतां लोकांकडून पुनःश्च जयजयकार होऊन भाईंच्या गळ्यांत नाहींतरी वर तरी पडो या भावनेनें लोकांनी आणलेले सुताचे हार अखेर मोटारीवर उधळले."

—( ज्ञानप्रकाश )

ही शिक्षेची वार्ता हां हां म्हणतां सर्व शहरभर पसरली, शाहूपुरी व्यापारी असोसिएशननें तीन दिवस कडकडीत हरताळ पाळण्याचें ठरविलें सराफ असोसिएशन, किराणा–भुसारी असोसिएशन, चोळखण व्यापारी संघ वगैरे सर्व व्यापारीसंघानी हरताळ पाळण्याचें ठरवलें.

**सक्तमजूरी व पायांत बेड्या—** शिक्षा सांगितल्यानंतर मला घाईघाईनें तुरुंगांत आणले. बरोबर फौजदार व पोलीस पार्टी लॉरींत होती. माझ्या दोन्ही बाजूला हत्यारी पोलीस होते. तथापि मोटारीमागून कितीतरी सायकलवाले येत होते. जयजयकार, पोलीस बंद करूं शकले नाहींत.

आतां कैदी या दृष्टीनें मी तुरुंगांत इतर कैद्यांत जमा झालो. राजसेवा व लोकसेवा दोन्ही एकाचवेळीं करणें व दोहोंनाहीं खूष ठेवणें कसे अशक्य असतें त्याचा अनुभव आला. खऱ्या लोकशाहींत या गोष्टी साध्य होऊं शकतील. पण जेथें हितविरोध आहे तेथें राजमान्यता व लोकमान्यता एकाचवेळीं मिळूं शकणें दुरापास्त आहे.

तुरुंगांत आणल्यावर नव्या शिक्षेचा यथासांग विधी उरकून घेण्यांत आला. समाजांतील माझा शिष्टाचाराचा औपचारिक पेहेराव उतरण्यांत आला. मला किती शिक्षा झाली हे ऐकण्याला प्रत्येकजण उत्सुक होता. दोन वर्षें सक्तमजुरी व हजार रुपये दंड म्हणून सांगतांच माझ्या खाणाखुणा, कपडे टिपून घेणारा कारकूनच थरथर कांपूं लागला. त्याला अरुं दडवता येईनात. ‘ अरेरे केवढी शिक्षा ही ’ असे शब्द न कळतच त्याच्या तोंडांतून बाहेर पडल्याखेरीज राहिले नाहींत. माझे कपडे उतरतांना त्याला माझेकडे पहावेना. माझी सीलकॅप जाऊन तेथें वानरी टोपी बसली. सूटच्या ठिकाणीं गिंटी कापडाची आंखूड चड्डी–लंगोटी आणि बंडो आली. मोठ्या शिक्षे-वाल्याला हे कपडे नवे मिळतात पण त्याचा खरखरीतपणा त्यामुळें मला जास्तच भासूं लागला. यानंतर पुढच्या सौभाग्य लेण्यासाठीं लोहाराकडे नेले. त्यांनें दोन्ही पायांत लोखंडी वाळे कायमचे फुलवून टाकले. त्या वाळ्यांत मण सव्वा मणाची लोखंडी साखळी अडकवलेली होती. ती सांखळी करदोड्यांत अडकावी लागे. बुटालासुद्धां लोखंडी मोळे मारलेले मला खपत नसत. त्यामुळें एवढा जड पदार्थ कायमचा फुलवून बसवलेला माझ्या सुखलालसी देहयष्टीला कांहीं गोड वाटला नाहीं. हे सर्व घेऊन

चालतांना त्या एकमेकांवर आदळत. रात्रीं पाय हलले कीं आवाज होई. उघड्या अंगाला गार गार लागे. चालतांना पाय पसरून चालावे लागे. लोखंडी वाळा लागून त्याची हाडावर जखम झाली. ती खूण अद्यापही गेलेली नाहीं. बहुतेक कैद्यांना या जखमा बरेच दिवस त्रास देत. लवकर बऱ्याच होत नसत.

ब्रिटिश मुलखांतील तुरुंगांत मी अद्याप गेलो नाहीं पण साध्या गुन्हेगारांना सुद्धां तेथें पायांत बेड्या घालीत नाहींत म्हणतात आणि राजकीय गुन्हेगारांना तर खालसा मुलखांतील कोणत्याही तुरुंगांत किंवा हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोठल्याही संस्थानांत असले सांखळदंड घातल्याचें कोणी बोललें नाहीं. पण हा खास मान करवीर राजबंद्यांना दरबारनें राखून ठेवला होता. त्याला धरून माझी बडदास्त ठेवली गेली. राजकीय गुन्हेगार, खुनी, दरोडेखोर, अट्टल चोर, बदमाश समजलेले, एकाच मापांत मोजण्यांत येत होते.

विद्याविलासचे वृद्ध संपादक त्यावेळीं साधी कैद भोगत होते. ते फार प्रेमानें वागत. स्वत: तयार केलेले जिन्नस चोरून गजांतून आंत टाकत आपली पत्रें वाचायला देत. त्यांचा फार आधार वाटे. चोरून गांठ घेऊन बोलत. तब्येतीची नेहमी विचारपूस करीत.

पण असें कांहीतरी खडतर जिणें आपणाला पतकरावें लागणार, आपले हाल होणार, अशी शिकवण मी मनाला सारखी देत असल्यामुळें देहाची नसली तरी माझी मनाची अगदीं पूर्ण तयारी झाली होती. नव्हें यासाठीं मी हपापलो होतो. जनतेनें माझ्या डोक्यावर उपकाराचे एवढें मोठें ऋण करून ठेवले होते, कीं त्याचा असा कांहीतरी मोबदला दिल्याशिवाय माझ्या मनाचे समाधान झालें नसते. याचमुळें पायांत बेड्या पडतांच माझे मन आनंदानें व अभिमानानें उड्या मारूं लागले. तुरुंगाचे वातावरण त्या पायांतल्या बेड्या, या सर्वांचा मला विसर पडला.

'मला तुरुंगांत जावसं वाटतं. पण!' असं म्हणून वडील दुःखी होत! त्या वडिलांची आज्ञा मी पुरी केली होती. कर्तव्य केल्याचं समाधान कांहीं और असतं. जनतेशी द्रोह करून इमल्यावर इमले चढवणाऱ्या व उंची मोटारींतून हिंडणाऱ्याहून मी सुखी होतो. कष्टांत सुद्धां मनुष्याला एकप्रकारचं सुख भोगतां येतं.

जनतेच्या फुलांच्या हारांनी माझी मान लवत असे. ती फुलें मला खरोखरी जड वाटत. कारण त्याचबरोबर जबाबदारीचा जो बोजा पडे तो झेपण्याजोगा नव्हता. पण या बेड्या मात्र मनाच्या तयारीमुळें हलक्या वाटत होत्या. जनतेसाठीं त्या पायांत पडल्या आहेत ही कल्पना माझ्या अंगात ताकत आणीत होती. माझ्या सुखी जीवाला कणखर बनवीत होती. मला कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. मी माझ्या कोठडींत आनंदानें ओरडतच गेलो, 'झाली बोवा दोन वर्षांची सक्तमजुरी झाली.' पण इतर कैद्यांची मात्र तोंडे उतरली! ते माझ्यावर प्रेम करीत होते. म्हणून त्यांना दुःख झालें.

बेड्यानें मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं हे खरे पण देहाला अवघड वाटत होते. रात्रीं तर झोंप येईना. पाय हालवायला ते जडजोखड त्रास देई. चालतांना कमरेला रग लागे. हाडावर मार बसे. त्या साखळ्या ठेवून चड्डी घालतां येईना. ते शिक्षण घ्यावें लागले.

शिक्षा सक्तमजुरीची. तेव्हां आतां इतरांच्या बरोबर काम करण्यासाठीं मला बाहेर काढले. ज्या रेसच्या नादासाठीं मी महाराजांवर टीका करीत होतो त्याच रेसकोर्सवरचे हमाली काम करण्यासाठीं मला जुंपले होते. शिक्षेच्या दुसरेच दिवशीं मला न्यायचे. पण लोक मला पाहण्याकरतां तुरुंगाच्या दारांत व आसपास जमले होते. तो दिवस चुकवला. तेव्हां आतां मला बाहेर काढणार नाहींत अशी लोकांची समजूत झाली असावी. दुसरे दिवशीं दारांत विशेषसे लोक नव्हते. पण कामावर नेल्याची बातमी लगेच गांवांत समजली. त्यामुळें परतण्याच्यावेळीं मात्र मला पाहण्यासाठीं लोकांचे थवेच्या थवे जागोजाग उभे होते. जसजसा चालूं लागलों तसतसा जमाव वाढू लागला. रस्त्यावर इतकी दाटी होऊं लागली कीं त्यामुळें रहदारीला अडथळा होऊं लागला. वाटेंत उभे राहणारे लोक हात जोडून अत्यंत भक्तिभावानें व हृदय भरून आलेले नमस्कार करीत. रस्त्यावरील व माडीवरील स्त्रिया मला चड्डीबंडी, बेड्या व अंगावर घोळ केलेले घोंगडे पाहून डोळ्याला पदर लावीत. कांहींना तर तो वर्षाव आवरणें अशक्य होई. त्या वाटेला एकप्रकारचे यात्रेचे स्वरूप आले. सुटांबुटांत पाहिलेल्या मला, त्यांना या नव्या स्वरुपांत पाहिल्यानें धक्का बसला. कितीतरी लोक दारापर्यंत जयघोष करीत आले.

जनतेच्या प्रेमाचें हृदय उचंबळून आणणारें हे दृष्य पाहून माझ्या या नव्या आवरणाचा मला अभिमान वाटूं लागला. ज्या कपड्यामुळें व बेड्यामुळें लोकांचे हृदय मला मिळूं शकले. ती बेडी, बंडी आणि चड्डी मला पूज्य वाटूं लागली.

कांहीं वाईट कामासाठीं हा तुरुंग येता व लोकदूषण लागले असते तर त्या धक्क्यानेंच मी मेलो असतो. पण माझा गुन्हा पवित्र होता. जनसेवेचे बक्षीस होते ते. एका परीक्षेंत मी उतरलो होतो. त्या पदवीचा परमपवित्र ' गाऊन ' होता तो. बाहेरच्या लोकांना ज्यामुळें माझी कींव येत होती तेच लेणें मला भाग्याचें वाटूं लागले.

हा जनसत्कार पाहून मला बाहेर पाठवण्याचें रहित केले. कारण कामावर जाण्याची वाट गांवांतूनच होती. शिक्षेमुळें व माझ्या प्रदर्शनामुळें लोकांवर दहशत बसावी हा हेतू पूर्णपूणें निष्फळ झाला. उलट लोकजागृतीला माझ्या नेण्यानें मदतच झाली. तेव्हां मग मला तुरुंगाचें आवारांतच काळे पाण्याचे लोकांबरोबर घोंगड्यांचे सूत गुंडाळायचे काम दिले. कैद्यांकडून आंत खुर्च्या, जाजमे व घोंगडी तयार करून घेत. पण त्याबद्दल त्यांना मेहेनताना मिळत नसे. खालसांत दिला जातो म्हणतात. जेलरच्या ऑफीस-समोर अशोकाच्या झाडाखालीं मला बसायला जागा करून दिली. मजबरोबर पिवळया टोपीचे खुनी व मोठ्या शिक्षेचे गुन्हेगार होते. कामाची माहिती वार्डर करून देई. कैदी मजजवळ असत पण माझ्याबरोबर बोलण्याला त्यांना मनाई होती. त्यांच्यापेक्षां मी मोठा गुन्हेगार ! मी राजद्रोही, माझा संसर्ग त्यांना होऊं न देण्याची खबरदारी अधिकारी घेत. अधिकाऱ्यांना जागृति ही फार वावडी. पूर्वी एकांती विचार करणाऱ्यांनासुद्धां तो क्रांतिकारक असावा असे समजून नव्हत्या कां शिक्षा होत ? तीच वृत्ति सत्ताधाऱ्यांत कमी जास्ती प्रमाणांत आढळायचीच ! पण या आडकाठीमुळेंच त्यांच्यांत माझ्याविषयीं विशेष आपुलकी निर्माण झाली होती.

**कैदी**— कैदी म्हणजे कोणीतरी भयंकर लोक अशी माझी समजूत. पण त्यांच्याजवळ जातांच व ओळख होतांच ते माझे मत पार बदलून गेले ! परिस्थितीची जाणीव नाही, कज्जाची खरी हकीकत माहित नाही त्यांना ते लोक पापी आणि महाभयंकर असेच वाटणार ! समाज तरी

त्यांच्याकडे कुठें भूतदयेनें पाहतो. कायद्याच्या दृष्टींत तरी माणुसकी कोठें आहे ! ' जशास तसें ' याच नात्यानें त्यांच्याकडे चालू कायदा पाहात असतो. त्यानें खून केला म्हणून त्याला प्रायःश्चित्त ! लोकांवर जरब बसावी म्हणून पुनः सरकार तसलीच हत्या करते. पण यानें गुन्ह्याचें प्रमाण कांहीं कमी झालेले नाहीं.

मला तर त्या कैद्यांत दोषी व निर्दोषी, अगदी भिन्न सांचाचे, भिन्न वृत्तीचे व स्वभावाचे असे विशेष कांही दिसले नाहीत ! त्यांतले कांही तर मला पूर्ण निर्दोषी कैदी दिसले. सभ्य व प्रतिष्ठित म्हणून समाजात वावरणाऱ्या दुष्टांच्या कारवाईला बळी पडून तुरुंगांत पडले होते. खरे गुन्हेगार राजरोस प्रतिष्ठितपणें बाहेर हिंडत होते. कांही निर्दोषी पण पुराव्याच्या अभावी तुरुंगांत अडकलेले ! कांही रागाच्या आवेशांत बेभान होऊन घसरलेले, कांही पैशाच्या अडचणींत सांपडून गुन्ह्यास प्रवृत झालेले. कांही दुसऱ्यांच्या चिथावणीने प्रवृत्त झालेले ! अगदी थोडे त्यात बनलेले पण त्याचे मूळ कारण शोधूं लागल्यास, त्याचे खापर विषम सामाजिक व्यवस्थेवरच फोडावे लागेल.

शेवटी जेलरच्या वागणुकींत मला सहृदयता दिसून आली नाहीं. कैद्यांशी कधी चार गोड शब्द बोललेले आढळले नाही. त्यांचे नमस्कारही त्यांनी घ्यायचे नाहीत. पण न केल्यास मात्र त्याला त्रास व्हायचा ! मारहाण, धमकी, जरब यानें ते गोगलगाय बनावे ही दृष्टि. ' त्याला फांशी मैदान दाखवा ' हे तेथील कुप्रसिद्ध वाक्य सर्वांच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न करी. कैद्याची दाद सुपरिंटेंडेंटपर्यंत पोचत नसे. माझ्या डोळ्यादेखत कितीतरीवेळां बेकायदा मारहाण झाली. धुंदरे नांवाचा कैदी मारानें रक्तबंबाळ झाला. त्याबद्दल मी नापसंती व्यक्त केली. पण त्याचा परिणाम झाला नाहीं. उलट बाहेर गेल्यावर काय करायचे ते करा म्हणून जेलरनें अपमानच केला. तेथील अधिकाऱ्यांचीहि वागणूक निष्पाप होती कीं नाहीं कोण जाणें ! कारण मागें बऱ्याच गोष्टी बोलल्या जात. आणि कोणी कैद्यानें कांहीं पाहिले तर ते सांगण्याची छाती कोणांत नव्हती. या सर्वांचा परिणाम पुढे जेलरच्या जिवावर बेतण्यापर्यंत झाला !

मी आणि कैदी— किती म्हणून प्रेम करीत ते माझ्यावर ! किती गोड, कनवाळू, कृपाळू व स्वार्थत्यागी स्वभाव होता त्या कैद्यांचा. कितीतरी बारीकसारीक बाबतींत माझ्या सुखसोईचा ते विचार करीत आणि त्यासाठीं झटत. पण त्या तेवढ्या मर्यादेंत काय करतां येणार त्यांना ! पण वस्तु लाभापेक्षां त्या पाठीमागें जी प्रेम भावना होती, तिचे मोल कसें करतां येणार ? किती गोड आठवणी त्या. वाटतं केवळ त्यांच्या भेटीसाठीं म्हणून पुनःपुनः तुरुंगांत जावं. त्यांना डोळे भरून पहावं, बोलावं, त्यांच्या हितगुजाच्या गोष्टी ऐकाव्यात. त्यांच्या दुःखाची कहाणी ऐकून त्यांना धीर द्यावा. प्रेमानें त्यांच्या पाठीवर हात फिरवावा. त्यांतली कांहीं तर अगदी देव माणसं होती. प्रामाणिक, नेकीची, निश्चयाची आणि अगदी पापभीरू. कांहीं वार्डर तर गरीब व श्रीमंत हा विचार मनांत न येऊ देतां सर्वांबरोबर सारखे वागत. उलट गरीबांचीच बाजू घेत. माझ्यावर मात्र फार भक्ति त्यांची. मी अशोकाच्या झाडांखालीं बसायचा, बसायला एक पटकर असायचे. ते किती मऊ लागणार ? पण ती जागा मऊ करण्याकरतां जेलरची नजर चुकवून आसपासच्या कैद्यांनीं आपली घोंगडी घालून ती बैठक अगदीं मऊ मऊ करायची, तेहि माझ्या गैरहजरींत. मी त्याचा अव्हेर करीन अशी त्यांना भीति वाटे. कोणी मी दमलो असे समजून पाय चेपी. कोणी पाय धरायला संधी मिळणार नाहीं असें समजून पायाला हात लावून जाई. जणुं काय माझ्या स्पर्शानें त्यांचे पाप नाहींसें होणार होते. भावना त्यांची, कीं मी त्यांच्याकरितांच तुरुंगांत पडलो आहे. त्यांच्यासाठींच मला कष्ट पडत आहेत. जी थोडी बहुत सेवा ते करूं शकत ती जर घेतली नाहीं तर त्यांना वाईट वाटे. ते हिरमुसले तोंड करीत. त्यांना अपमान झाला असे वाटे. काय आश्चर्य. त्यांच्याकडून मी सेवा करून घेणें हेंच त्यांना माझे उपकार वाटत. ही गोष्ट जेलरला समजल्यास आपल्यास त्रास होण्याचा संभव आहे हे माहीत असूनही ते धाडस करीत. ते कामाला बागेंत गेल्यावर एखादें फूल किंवा कांहीं मिळाले तर आणून देत. रोज नियमितपणें कोणी तरी कैदी फुलांचा पुडा गजांतून टाकून जाई. आजारी माणसाला केव्हां बडिशेप किंवा खडीसाखर मिळे. त्यांतले मला तो आणून देई. त्यांच्या प्रेमानें पुनीत झालेले ते पदार्थ खातांना मला धन्य वाटे. लाखों रुपयानें असे समाधान मिळालें नसतें.

बासुंदी–पुऱ्याच्या किंवा पुलाव्याच्या मेजवान्याहून त्या जिनसाची चव रुचकर लागे. कारण त्या पदार्थांत प्रेमाचा मसाला भरपूर पडला होता. हृदयाच्या तबकडींत ते जिन्नस घोळलेले होते.

कधीं न विसरण्याजोगी गोष्ट. कोणचा तरी एक सण होता, त्या सणाला प्रत्येक कैद्याला चार-पांच चांगले आंबे दिले होते. मी माझ्या वांटणीचे खाऊन टाकले. त्यांतला मी कांहीं कुणाला दिला नाही. दुसरें दिवशीं मी एका ठराविक ठिकाणीं गेलो. इतक्यांत एक मांग जातीचा, नांव नामदेव असेल, कैदी लगबगीनें आला व त्यानें आपल्या बंडीखाली दडवून ठेवलेला आंबा काढून म्हणाला -' साहेब माझा एवढा आंबा मी मुद्दाम तुमच्यासाठींच राखून ठेवला आहे तेवढा खा.' तुरुंगांत ठराविक 'रासन' पेक्षा कांहींही मिळावयाचे नाहीं. ही नवानवसांनी मिळालेली गोष्ट. मी दोन वर्षांनी सुटणार. हा काळे पाण्याचा कैदी. त्यानें आपल्या तोंडचा घांस काढून मला चारावा! बाहेरच्या लोकांना या त्यागाचें महत्व जाणवणार नाहीं. तेथे राहणाऱ्या कैद्यांनांच त्याची किंमत जाणवणार. घेणें पाप. न घेणें म्हणजे त्यांच्या त्या कोंवळ्या भावनेला, त्यांच्या प्रेमाला तुच्छ मानणे. तेच मला अधिक पापाचें वाटले. नको नको म्हटल्याबरोबर त्यांचा झालेला तो केविलवाणा चेहरा मला पाहवेना. मी तो आंबा स्वीकारला. तुरुंगाच्या नियमाला हे धुटून होते. मला त्यांची जाणीव होती. पण त्याच्या त्या भोळ्या प्रेमाला मारून सत्यनिष्ठेचे प्रदर्शन करणेच मला चुकीचे वाटूं लागले. सत्याची काटेकोर व्याख्या केली तर ही एक कदाचित् चोरीच ठरेल. पण त्यांच्या अंतःकरणाला दुखवून पावित्र्याचा टेंभा मिरवण्यापेक्षां मला पापी म्हटलेलेच आवडेल. पावित्र्याचा सुद्धा माणसाला एक प्रकारचा गर्व चढतो. इतरांहून आपण श्रेष्ठ आहोत असें वाटूं लागते. क्षुल्लक गोष्टीत सत्यनिष्ठेचं फार सोंग करणे मला आवडत नसे. माझे जिणे सुखाचे करण्याची आपल्यापरी त्यांनी जी खटपट केली ती चिरस्मरणीय होऊन राहिली आहे.

**पोलीस**–पाहऱ्याला पोलीस असत. आम्ही बाहेर असतांना आम्हापैकीं कित्येकांना ते शत्रूप्रमाणें वाटत. पण त्यांच्या खडतर आयुष्याची व गुलामगिरीची चांगलीच कल्पना आली. कांहीं बाबतींत त्यांचेपेक्षां कैदीच बरे! अन्न कसले कां असेना पण त्याची त्यांना विवंचना नव्हती.

पोलीसांच्या समोर तो प्रश्न लटकत्या तरवारीसारखा उभा असे. त्यावेळीं पोलीसांचा पगार अकरा रुपये होता. खोलीभाडें, पायताण, आठवड्यांतून दोनवेळां दाढी, कपडे, डोक्याचे केंस वाढता कामा नयेत. हे सर्व अकरा रुपयांत. गिरणी मजूरांचा मेहेनताहि त्यांना पडत नव्हता. आणि जनतेचे शिव्याशाप यांचे डोक्यावर ! कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ, ही शिवी सर्वांनी हसडायची. पगार हा असा ! आणि राज्याची सुरक्षितता ( Law & Order ) कायदा आणि सुव्यस्थितता यांच्या जिवावर ! कामांत कसूर चालायची नाहीं ! रात्रभर निर्जीव वस्तूप्रमाणे तिष्ठत रहायचे. मला तरी यातला अगदी निर्दय अंत:करणाचा असा कोणी आढळला नाहीं. असलाच तर अपवाद ! पोटांसाठी मरायचे, पोटांसाठीच आपल्या गणगोतांच्या अंगावर हात टाकायचा.

नुकत्याच, मला बेड्या घातल्या होत्या. एका पोलीसानें प्रथमच मला या वेषांत पाहिले. त्याला हे नवे दृश्य पाहवेना. हातांत बंदुक होती. ताठ उभा होता. पण डोळ्यांवाटे सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. मलाच ते पाहवेना. मी जवळ जाऊन विचारले. 'काय होत आहे पोलीस बाबा ? बरं कां नाहीं ?' त्यावर तो म्हणाला 'आम्हाला काय धाड होत आहे साहेब ! काय पहायचं आमच्या नशिबी आलं हे !' मुसलमान जातीचा होता. मीच त्याची समजूत करून थांबवलं. कोणी पाहिलं तर नोकरी जाईल. पोलीसानं आपल्या भावना उघड करता कामा नयेत.

**तुरुंगांतील व्यवस्था—** माझ्याबरोबर कैदी फार प्रेमानें वागत. त्याचा अर्थ तुरुंगांतील एकंदर व्यवस्था समाधानकारक होती असे मुळींच नाही. आम्हीं आंत पाऊल टाकल्यानंतर पुढें ज्या कांहीं सुधारणा झाल्या त्या दरम्यानच्या कालांत राजबंदीना व इतर कैद्यांना मोठ्या दिव्यांतून जावें लागलें आहे. मुदतीचे उपवास, प्राणांतिक उपवास, या सारखे खडतर हालांतून त्यांना जावें लागलें. अर्ज, विनंत्या भीक वगैरे कायदेशीर उपायाबाहेर जाण्याचे प्रसंग येऊं नयेत हा माझा प्रयत्न दरबारनें फलद्रुप करूं दिला नाहीं. सत्याग्रहीनीं आपल्या जबाबदारीवर अन्न सत्याग्रह पुकारला व त्याला थोडेबहुत यश आलेही. दरबारनेंच सनदशीर मार्ग चुकीचा ठरवला. कैद्याकडे थोड्या भूतदयेनें पाहण्याचा प्रयत्न पूर्वीचे एक जेलर मेहेरबान

बापूसाहेब इंगळे यांच्या आठवणी कैदी लोक काढीत असतात. त्यांचेवेळीं कैद्यांना अंगांतही घोंगड्याची बंडी असे, तीही अपुरी व लांडी. लाज राखण्याला असमर्थ, कारण त्यावेळीं चड्ड्या नव्हत्या. फक्त लंगोट्याच दिल्या जात. मी तुरुंगांत होतो त्यावेळीं अंगांत एक चड्डी मिळूं लागली होती, पण ती वाळेपर्यंत अर्ध नग्न स्थितीतच रहावे लागे. कापडाला साबण किंवा सोडा मिळत नव्हता. मुक्त झालेल्या कैद्यांचे कपडे भट्टीस वगैरे न देतां तसेच दुसऱ्या कैद्याला दिले जात. त्यामुळें संसर्गजन्य रोग चिकटण्याची भीति वाटे. कपडे रोज धुण्यास परवानगी नव्हती. भर उन्हाळ्यांत काम करावे लागल्यामुळें कपडे अति घामट होत व त्यामुळें त्या कपड्यांत उवा हटकून होत. इंगळे यांनी यांत बरीच सुधारणा केली.

मला पूर्वींपासूनच दातांचा विकार होता. उष्णतेमुळें तो जास्त वाढला. जेल सुपरिंटेंडेंट डॉ. धनवडे यांनी माझे दांत तपासून ते डॉ. काटे डेंटिस्ट यांचेकडून सरकारी खर्चानें काढले व बसवले. यांना महाराजांच्या बरोबर हरहमेश फिरावे लागत असल्यामुळें त्यांना त्यांच्या मनाप्रमाणें जेलकडे लक्ष पुरवता येत नसे. यामुळे जेलरचे व कैद्यांचे नेहमी खटक्याचे प्रसंग येत. डॉ. खाडे, जेल डॉक्टर हे मात्र सर्वांना शक्य तितक्या सहानभूतीनें वागवत.

**माझी खोली—** खोलींतल्या एकलकोंडेपणामुळें मला सुरवातीला त्रास वाटला. पुढें त्याची संवय झाली. पण कांहीं दिवसांनी कैद्यांचे प्रमाण फार वाढले, त्यामुळें मला खोलींत एकटे ठेवणें त्यांनाच अशक्य झाले. ज्या माझ्या खोलींत चार पांच माणसांची सोय, तेथें पंधरा माणसे कोंबली ! त्यामुळें त्यांच्या कपड्यांतल्या उवा माझ्या घोंगडींत व कपड्यांत भरल्या. अंगाला घसटून निजण्याचे प्रसंग आले. दाटणीमुळें हलताही येत नसे. या सर्व माणसांनी कोंपऱ्यांत ठेवलेल्या बारडींत मलमूत्र करावयाचा ! आडपडदा कांहीं नव्हता. तेव्हां त्या तेवढ्या मंडळीत निसर्गाचें बोलावणें आले म्हणजे माझ्यासारख्या माणसाची मनाची काय स्थिति होत असेल त्याची कल्पनाच करावी. तसल्यांत मला डायरिया व डिसेंट्री सुरूं झाली ! दिवसांतून ३०।४० वेळ जाण्याची पाळी आली. पावसाळ्याचे दिवसांत

बहुतेक सर्वांची तीच तक्रार. त्यामुळें खोली म्हणजे संडासच झाली. त्याच दुर्गंधींत रात्र काढावी लागे. केव्हां तर बारडी वाहूं लागे. जेल नियमाप्रमाणें प्रत्येक कैद्याला ठराविक अशी जागा मिळावी लागते पण येथें नियमांचा पूर्ण अभाव होता. जेल कोड मागितलें पण मिळूं शकलें नाहीं.

जेलमध्यें एक निराळेंच राज्य होतें. आणि जेलरला आपण सर्वाधिकारी आहोत असा भास होई. कर्ता करविता सर्व कांहीं जेलर अशी कैद्यांची समजूत झाली होती. आम्ही कांहींनीं सर्व गाऱ्हाणी मांडून वरिष्ठाकडे अर्ज केला. पण या अर्जाचा विचार होईना. म्हणून श्री. हवेरी, गायकवाड, तांबट, भूपाल पंडीत, माधवराव भोसले, अडूरकर, रुपचंद गुजर, वगैरेंनी पन्हाळ्यावर ठेवल्यानंतर अन्नसत्याग्रह सुरुं केला होता. ( भूपाल पंडीत व अडूरकर आम्हाला आतां सोडून गेले आहेत. )

या सत्याग्रहांत श्री. हवेरी यांनी कमालीचा निश्चय दाखवला. त्यांची स्थिति चिंताजनक झाली होती. तेव्हां 'समझोता' करण्यास डॉ. घनवडे दरबारसर्जन आले व माझ्या मध्यस्थीनें कांहीं तडजोड झाली. सर्वांच्या पायांतल्या बेड्या निघाल्या. रेमिशन देण्याचे, हिस्ट्री बुक ठेवण्याचे, काळे पाण्याचे कैदी सुटल्यावर जामिनकी मागण्याची पद्धति कमी करण्याचे, सोडा-साबण देण्याचे वगैरेंचे आश्वासन मिळाले व नंतर उपवास सोडला !

सनदशीर मागणीहून सत्याग्रही उपाय श्रेष्ठ ठरला. माझ्या सनदशीर विचारसरणीला हा धक्काच होता. भीक मागून कांहीं मिळत नसते. त्याला त्यागाचीच तयारी पाहिजे हें खरें !

**खेडुताचा समतावाद**—आणखी एक नमूद करण्याजोगी गोष्ट झाली ती अशी, मी ज्या खोलींत होतो त्या खोलींत एक ब्राह्मण व कुणबी होता. विषय निघाला म्हणजे शेतकरी हा राष्ट्रांतील अत्यंत महत्त्वाचा वर्ग कसा आहे ते मी वर्णन करीत असे. त्यांना त्यामुळें संताप चढे. ते म्हणत, 'शेतकरी म्हणे सर्वांत मोठा ! असे करून तुम्ही त्याला निष्कारण डोक्यावर चढवूं लागला आहांत. त्याला असे काय पाहिजे आहे ? कर्जातून मुक्त झाला, पोटापुरती शेती असली म्हणजे झाले ! झाली त्याची उडी ! काय तुम्ही त्याला राज्यावर नेऊन बसवणार ? श्रीमंतांचे आयुष्य तरी काय सुखाचें असतें. त्यांना काय यातायात कमी ?' मी याला कांहींच उत्तर दिलें नाहीं.

तो शेतकरीच म्हणाला ( नांव—मारुती व्हनाळीकर ) ‘ राज्यावर कशाला बसवाल आमासनी ! पण ह्यो राज्याचा खटारा आमच्याच फाळ्यावर चालतोया नव्हं ? अन् आमची अवस्ता कर्ज नसलं म्हणजे चांगली म्हंता मग ती पतकरा कीं तुम्ही ! आदलाबदल करूंया तुमच्या आणि आमच्या जंगम जिनगीची ? ’

अशाप्रकारची चांगल्या शहाण्यांची तोंडें बंद करणारी वाक्यें, त्या अडाण्याच्या तोंडांतून सहजासहजी बाहेर पडली. वरेरकरांच्या ‘ धांवत्या धोट्यांतील ’ बाबा शिगवणाची मला त्यावेळीं आठवण झाली. समतावादाची वाक्यें शिकवायलासुद्धां नकोत, ती अगदीं अशिक्षितांच्या अनुभवांतून बाहेर पडत असतात. त्यांच्यांत विद्वत्ता, पुस्तकी नसते एवढेच !

**पन्हाळगडावरील बंदिवास —** कोल्हापूरच्या तुरुंगांतून आम्हाला पन्हाळ्यावर हलवलं. शहरांतील व गांवांतील चेहरे येथें पहायला मिळत नसत. ओळखीचे वातावरण. नेहमीचे जातां येता दिसणाऱ्या, इमारतीं, रस्तें दिसत नव्हते. येथें तर आम्हाला परक्या माणसाचे वारेही लागूं देत नसत. आम्ही ज्या ठिकाणीं काम करीत असूं त्या आसपास चार पांच फर्लांगावर कोणा माणसाला फिरकूं देत नसत. कामावर जात असतांना अगदी गुराखी दिसला तरी पोलीस पुढे जाऊन त्याला हांकालून देई.

**निसर्गाच्या गोड सहवासांत —** पण मला ज्या सहवासापासून आनंद होत असे तो सहवास मला पोलीसांच्या डोळ्यादेखत भोगतां आला ! अंत:करणांतली हितगुजें बोलतां आली. हृदय उघडं करतां आलं. मी कैदी होतो पण चित्रकार होतो. कुंचला हातांत नसला तरी हृदय जवळ होतं. डोळं उघडेच होते. लांब क्षितिजापर्यंत एका मागे एक गेलेले व अखेर नीलाकाशांत एक झालेले तें डोंगर, त्या सावल्यांचा चाललेला लपंडाव, हिरकणीच्या कमरपट्ट्याप्रमाणें चकाकणारी नदी, शेतांत सोडलेली खिलारें व गुराख्यांचा अधून मधून ऐकूं येणारा पाव्याचा आवाज, भरभर अंगाला चाटून जाणारा आरोग्यदायक शीतल वारा, दरीखोऱ्यांच्या अडचणींत सांपडलेल्या शत्रुवर अचानकपणें मारा करणाऱ्या पावसाच्या सरी, अशा मिनिटांमिनिटांनीं बदलणाऱ्या दृश्यांनीं बंदिवासी जिण्याचा केव्हांच विसर पडे. सक्तमजुरी, या देखाव्यानें देहालाही पोषकच वाटे.

आम्हाला जेथे ठेवले होते तेथें छत्रपती संभाजी महाराज कैदेंत होते म्हणतात.

**नग्न झडती—** रस्ता झाडणें, सारवणें, जमीन उकरणें, दगड रचणें, पायऱ्या करणें वगैरे सर्व कामें येथें करावी लागत. कोल्हापुरच्या रेसकोर्सवर सुरुंगानें दगड काढणें वगैरे मोठी कामें करावी लागत. पण येथें कामावरून परत आल्यानंतर कैदी कांही तरी बातमीपत्रें किंवा खासगी पत्रें मिळवतील या कल्पनेनें तुरुंगांत जाण्यापूर्वी त्यांची संपूर्णतः नग्न करून झडती घेतली जाई. हा अमानुषी, निर्लज्ज आणि अपमानास्पद प्रकार जन्मांतली कायम आठवण म्हणूनच राहणार.

**माधवराव जगदाळ्यांची मध्यस्ती—** उन्हाळ्याच्या निमित्तानें महाराजसाहेबांचा मुक्काम पन्हाळगडावर पडला. यावेळीं इंदूर दरबारांत असलेले कोल्हापुरचे श्रीमंत माधवराव जगदाळे माझे भेटीस आले. ते माझ्या वडिलांचेहि ओळखीचे होते. ‘ मी राजनिष्ठ राहीन, महाराजांच्या विरुद्ध कांहीं चळवळ करणार नाहीं. ’ असें लिहून देऊन किंवा कबूल करून बाहेर पडावे अशी त्यांची इच्छा दिसली. पण मी कांहीं लिहून द्यावे किंवा कांहीं कबूल करावें असें मला वाटलें नाहीं. आम्हाला सोडण्याला जी भाषा पाहिजे होती ती माझे तोंडून बाहेर पडली नाहीं. सेंट्रल जेलमध्येंही माझे स्नेही कृष्णराव मालपेकर हेही याच हेतूनें आले होते, पण त्यांनाही मला नाराज करावे लागले

पूर्वी एका प्रसंगी लोकटीकेची पर्वा न करतां तोंडांतून गेलेल्या अपशब्दाबद्दल मी माफी मागितली होती. पण आतां माफी मागण्याजोगें कोणतेही कृत्य माझे हातून झाले नव्हते. असे केलें असते तर मनाच्या टोंचणीनेच मी मेलो असतो. माझ्या घरीं बायको-मुलांत व आरामी जीवनांत मला काडीची शांति मिळाली नसती. घर तुरुंगाहून भयानक बनले असते. भपकेबाज ऐश्वर्यांत, सद्सद्विवेक बुद्धीला गाडून लाजिरवाणें जिणें काढण्यांत सुख आहे, असे माणुसकी टाकलेल्या स्वाभिमान शून्य निर्लज्जानाच कदाचित वाटेल ! तुरुंगांतल्या खडतर जिण्यांतही मनाला किती आनंद व समाधान मिळूं शकते याची कल्पना संपत्तीच्या नरकांत लोळणाऱ्या व त्यांतच समाधान मानणाऱ्या किड्यांना येणार नाहीं. ध्येयवादी मनुष्याचें धैर्य तुरुंगानें खचत नाहीं.

उलट त्याच्या ध्येय निश्चितीला तुरुंग सहाय्यच करतो. तो अधिक निर्ढावतो व भावी लढ्याला अधिक लायख होतो. या दृष्टीनें पाहिले तर प्रामाणिकपणें जनसेवा करूं इच्छिणाऱ्या माणसाला तुरुंग स्वागतार्हच ठरेल.

**कार्यकर्त्यांची शाळा—** मी मनानें शेतकऱ्याशी समरस झालो होतो. त्यांच्या कहाण्या ऐकून माझ्या हृदयाला पाझर फुटे, पण त्यांच्या प्रत्यक्ष जीवनाची जी मला ओळख नव्हती ती तुरुंगानें करून दिली. भिकार अन्न जाडेभरडे कपडे, खरखरीत बिछाना, सक्तीची मजूरी व गरीबांशीं निकट सहवास यामुळें मी पूर्वींपेक्षां त्यांच्याजवळ गेलो. सुरवातीला मात्र नुसत्या उन्हाच्या तापानें व पावसानें दोन तीन महिनें अंथरूण धरलें. तुरुंगाचा आणखी फायदा म्हणजे, भिन्न स्वभावाच्या लोकांशी सहकार्यानें कसें रहावें, भाषेवर ताबा कसा ठेवावा, दुसऱ्यांशीं मिळतें कसे घ्यावें वगैरे अनेक गोष्टी तुरुंगवास शिकवतो. समाजसेवक तयार करण्याची ती एक उत्कट शाळा आहे.

**घरची आठवण**–आमची भेट घ्यायला तीन महिन्यांतून एकदां परवानगी मिळे. किती आतुरतेनें त्या दिवसाची आम्ही वाट पहात असूं. तुरुंगाच्या कष्टाच्या जीवनाची पुढें पुढें संवय होते. तथापि घरच्या मंडळींच्या आठवणीनें मात्र मी अस्वस्थ होत असे. विशेषतः माझ्या रोगी व अशक्त बायकोची आणि माझ्या एकुलत्या एका लाडक्या मुलाची आठवण झाली कीं जीव कासावीस होई. याबद्दल माझे स्नेही माझी चेष्टा करीत. काळजी वाटण्याचें कारण घरची व्यवस्था पहायला आम्हांपैकीं असं कोणी नव्हतं. घर नोकरावर अवलंबून. माझे स्नेही डॉ. काटे व बाबूराव रुईकर यांचा मला आधार वाटे व दुसरे एक स्नेही गणपतराव गायकवाड निस्वार्थीपणानें घरची कामें करीत. आपल्या वर कांहीं मंडळी प्रेम करीत आहेत ही कल्पना तुरुंगांत असलेल्या व ज्यांना विशेष आधार नाहीं अशा माणसांना किती समाधान देत असेल याची बाहेरच्या लोकांना कल्पनाच करतां येणार नाहीं. माझ्या घरीं बाहेरच्या कोणी कोणी थोर व्यक्ती भेटून जात. त्यानें मनाला किती पण समाधान वाटे.

**लोकनिश्चय—** बाहेरची चळवळ वर्तमानपत्रांतील बातम्यावरून समजे. दंड, शिक्षा, फटके वगैरे दडपशाहीचे प्रकार सारखे कानावर येत. विपट नांवाच्या फौजदारानें कांहीं कार्यकर्त्यांना बाजार पेठेंत उघडे करून पायताणानें फटके मारले व दहशत बसवण्याचा प्रयत्न केला.

माझ्या शिक्षेनंतर प्रजापरिषदेला बंदी करण्यांत आली. राजसत्ता आणि प्रजा यांच्यांत हितविरोध आला असता राजसत्तेनें आतांपर्यंत जगांत जे केले तेंच कोल्हापूर दरबारनें केलें. लोकांना समजूत घालून शांत करता आले नाहीं म्हणजे दडपशाहीचा मार्ग अवलंब करणें हा स्वार्थी सत्ताधिशांचा चालत आलेला 'राजमार्ग'च आहे. आणि नेहमीं ही दडपशाहीच अखेर स्वातंत्र्याला कारणीभूत होते. स्वातंत्र्य जवळ आणते. या दडपशाहीनें लोकांचा जोम कमी झाला नव्हता. प्रजापरिषदेचे अधिवेशन संस्थानाबाहेर भरवण्याचे ठरवलें. पोलीसांची मारहाणीची भीति असतांहि व प्रजापरिषदेंत या वेळीं भाग घेणें म्हणजे सरकारशी उघड शत्रूत्व करण्यासारखे असूनही परिषदेला हजारोंनी लोक आले होते. ते डोळे झांकून आले नव्हते. ती कांहीं लग्नाची मेजवानी नव्हती. त्यांच्या अंगीं निर्भयता आली होती. अहिंसा व सत्याग्रह याची शिकवण मी प्रत्येक व्याख्यानांत त्यांना दिली होती. घरादाराला, बायकापोरांना व जिवालाही मुकावे लागेल म्हणून त्यांना बजावले होते. दोन्ही मोर्चाचे वेळीं शांतपणा कसा राखावा याचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव आला होता. पोलीसांची, लष्कराची, रिसाल्याची, इन्फंट्रीची, संगिनी व बंदुकीची भीति कमी झाली होती. त्यालाही त्यांनी तोंड दिले होते. तेव्हां या वेळीं कायदेभंगाचा ठराव झाला असता तर प्रजापरिषदेवर व सभाचालकावर घाईचा व गैरमुत्सद्देगिरीचा कोणीही आरोप केला नसता. कायदेभंग जाहीर केला असता तरी शेंकड्यांनी लोक पुढे झाले असते. लोकांना लढ्याचा अनुभव आला असता. कष्टांतून तुरुंगाच्या दिव्यांतून कणखर व कसलेले वीर बाहेर पडले असते. कायदेभंगाचा ठराव पास होणार असे गृहित धरूनच मी चाललो होतो. मी देहानें तुरुंगांत होतो पण माझे मन परिषदेच्या अधिवेशनांत घुटमळून होते. जणु व्यासपीठावरून कायदे-भंगाचा ठराव मांडीत होतो.

पण माझा विरस झाला! परिषदेनें लढा पुकारला नाहीं. मी तुरुंगांत त्रागा करून घेतला. बाहेर असतो तर असें करूं दिले नसते, असे स्वतःशीच बोलत होतो.

प्रजापरिषदेनें पडते घेतले! त्याचा दरबारवर जसा इष्ट परिणाम व्हायला पाहिजे होता तसा झाला नाहीं. प्रतिकार नसताहि लोकांचा त्रास

होऊं लागला ? या अत्याचाराच्या बातम्यांनी वर्तमानपत्रें भरत असत. पुणें-मुंबईच्या पत्रांत कोल्हापूर दरबारवर टीकेचे रकानेच्या रकानें भरूं लागले. आतांपर्यंत कुठल्याही संस्थानवर टीका झाली नसेल अशी टीका होऊं लागली.

**महाराणी ताराबाईची राजवट**— माझ्या दोन वर्षांच्या शिक्षेची मुदत संपत आली होती, पंधरा वीस दिवस उरले असतील.

अगदी अनपेक्षितरीत्या माझी व इतर सर्व राजबंदींची सुटका करण्यांत आली. व्यक्तिशः या सुटकेचा फायदा मला जरी विशेषसा मिळाला नाहीं तरी माझ्याबरोबर इतर सर्व राजबंदी सुटल्यामुळें या धोरणानें थोडी-बहुत आशा उत्पन्न झाली. सुटकेमुळें अर्थातच आमच्यावरील राजद्रोहाचा छाप दूर झाला. सुटकेचे श्रेय महाराणी ताराबाईसाहेब यांचे पदरीं पडले. त्यांच्या धोरणामुळें प्रजेला सलोख्यानेंच सुधारणा मिळूं शकतील अशी आशा उत्पन्न झाली.

**सुटका**— १८ डिसेंबर १९४० ला आमची सुटका झाली. त्याच दिवशीं महाराजांच्या निधनानिमित्त दुखवट्याची सभा भरवली. दोन वर्षांच्या कारावासानंतर ही पहिलीच सभा. लोकांत उत्सुकता होती. मलाही जनसमुदायाला केव्हां पाहीनसे झाले होते. सभा जाहीर करायला पुरेसा वेळही मिळाला नाहीं. पण तास दोन तासाच्या अवधींत हजारो लोक गंगावेस मैदानांत जमा झाले. सभा नि मिरवणूक बंदी असतांहि परवानगी न घेतांच सभा भरवली. कारण या सभेला बंदी झाल्यास दरबारचीच नाचक्की होणार होती. सभेची हकीकत खालीलप्रमाणें वर्तमानपत्रांत आली होती.

सभेस सुमारे दहा हजार लोक खेचाखेच करून आले होते. सभेचे काम सुरूं करतांना भाई बागल म्हणाले —

‘ दोन वर्षें कारागृहांतील जीवन काढून आज जनताजनार्दनाच्या भेटीला आलो आहे. परमपूज्य छत्रपतींच्या गादीचा सुलौकिक वाढावा म्हणूनच आम्ही सर्वांनी तुरुंगांतील सक्तमजूरीची शिक्षा आनंदानें पतकरली... कारागृहांतील कष्टांनीं व हालअपेष्टांनी आमच्या लोकसेवेचा दृढनिश्चय काडीमात्रही कमी झालेला नाहीं व कदापि होणार नाहीं. जनतेच्या कल्याणासाठीं व गादीच्या कीर्तीसाठीं यापुढेंहि कारावासच काय पण फांशी देखील मोठ्या आनंदानें हांसत नाचत पतकरूं.’

सुटकेनंतर मी कांहीं स्वस्थ बसलो नाहीं. दोन वर्षांच्या कारावासामुळें जनतेपासून मी दुरावलो होतो. त्यांची संघटना करणे, त्यांच्यांतील भीति काढून टाकणें. प्रजापरिषदेचे बळ वाढवणें या गोष्टी मला करावयाच्या होत्या. राणीसाहेबांनीं आम्हाला सोडल्यामुळें गांवच्या पाटील लोकांना व पूर्वीच्या सरकार कच्छपी गुंडांना आम्हाला राजरोस विरोध करता येण्याजोगा नव्हता. म्हणून दौरा काढण्याचे तात्काळ ठरवले. या दौऱ्याचा उद्देश जनतेशी संबंध जोडणें हा होताच व आमची दाद लागण्याकरतां यावेळीं कोणीतरी जबाबदार व्यक्ति राज्यावर हवी होती. कौन्सिलकडे दाद मागितली तर ते म्हणायचे राजकीय सुधारणा देण्याचे काम आमचे नव्हे, रेसिडेंट म्हणणार अंतर्गत व्यवस्थेत आम्ही ढवळाढवळ करूं इच्छित नाहीं. तेव्हां ही सबब काढून टाकता यावी हाही एक हेतू या सभेमागे होता.

**लट्ठे विरुद्ध गुंडगिरी**— दौऱ्यानंतर पुनः आमच्या सर्व मागण्या (प्रजापरिषदेची बंदी अद्याप उठलेली नसल्यामुळें) संस्थानांतील कार्यकर्त्यांचा विचार घेऊन तज्ञांच्या सल्ल्यानें इंग्रज सरकारकडे पाठवण्याचे ठरले. बऱ्याच कार्यकर्त्यांना माझ्या सहीची खासगी आमंत्रणें पाठविली. कांहींनीं मी लट्ठे यांना ॲडमिनिस्ट्रेटर म्हणून आणण्याची खटपट करीत आहे असा ग्रह करून घेतला व त्यांनी सभेप्रसंगीं दंगा करण्याचें ठरवलें. कांहीं बेळगांवचे भाडोत्रीही आणले गेले. सर्व महाराष्ट्रीय वर्तमानपत्रांतून या दंगलीची हकीकत सविस्तर आली होती.

प्रमुख कार्यकर्ते व रावब. लट्ठे सभेंत येणाऱ्या ठरावाबद्दल माझे घरींच चर्चा करीत होते. तेथें राधाकृष्ण मंदिरांत ( सभेच्या जागीं ) दंगल सुरू झाल्याचें कळलें म्हणून ती जागा बदलून श्री. बाबूराव रुईकर यांच्या घरीं खासगी जागेत सभा भरवण्याचे ठरवले. तेथेहि तसाच प्रकार घडूं लागला. रामभाऊ शेटे यांच्या मोटारीवर दगडफेक झाली. हा सर्व प्रकार पोलीस वगैरे असतां कसा होतो याचा सर्वांना अचंबा वाटूं लागला. राजधानींत सर्व जबाबदार अधिकारी असतांना या दंग्याकडे दुर्लक्ष केलें जात होते. राधाकृष्ण मंदिर व रुईकरांच्या बंगल्यानंतर, दंगेवाले माझे घराकडे वळले.

" प्रारंभी एका छकड्यास काळी निशाणें बांधून दोन तीन मुलें आली. नंतर पांचदहा मिनिटांच्या अवधींत मोर्चातील गुंडांचा जमावच्या

जमाव बागल यांचे घरासमोर येऊन ठेपला व त्यानें बागल यांच्या घरांस चारी बाजूंनी वेढा दिला. त्यांच्याकडून ' लट्ठे यांना बाहेर काढा ' अशी एकसारखी ओरडून मागणी करण्यांत येत होती. मोर्चेवाले कांहीं हटण्याची चिन्हें दिसेनात. सात वाजले. इतक्यांत डी. आय्. जी. रावसाहेब निंबाळकर व एका फौजदाराचे नेतृत्वाखालीं एक छोटीशी पोलीसपार्टी आली. गुंडांची गर्दी हटवल्यानंतर रावसो. निंबाळकर यांनी श्री. माधवराव बागल यांना ' तुम्हाला पोलीसांचे संरक्षण हवे काय ? ' असा प्रश्न विचारला असतां श्री. माधवराव बागल यांनी उत्तर दिले. ' मुळींच नको. माझ्या जिवाच्या संरक्षणासाठीं मला पोलीसांची मदत मुळीच नको. मी करवीर प्रजेचा सेवक आहे...त्यांना माझ्या जिवाचे जे कांहीं बरे वाईट करायचे असेल ते खुशाल करूं द्या—' मी जमवास म्हणालो,

' लट्ठे माझे पाहुणे आहेत. सभा खासगी आहे. त्यांना मी बाहेर काढणार नाहीं. तुम्हाला माझे जे करायचे असेल ते करा.'

मी गर्दीत गेलो पण त्यांनी माझ्या अंगावर हात टाकला नाहीं.

आमच्या या सभेतील दंगल एक महिनाभर तरी सर्व महाराष्ट्रभर चर्चेचा विषय होऊन बसला होता. पण या बाबत पोलीस खात्याकडून कोणी गुन्हेगार पकडल्याचे समजले नाहीं. तसेच यापूर्वी श्री. हवेरी यांना गुंडांनी मरेपर्यंत मारून, तो मेला असे समजून कोंडाळ्यांत फेकून दिले होते. मार देण्याअगोदर, आपल्याला धमकी दिल्याचे हवेरींनीं कळवले व वर्तमानपत्रांतून प्रसिद्धहि झाले होते. त्यांनी आपला वहिमही बोलून दाखवला होता. पण पोलीसांना गुन्हेगार सापडूं शकला नाहीं. यामुळें आमच्या जिवाचीहि आम्हाला शाश्वती वाटेना !

**स्थानिक स्वराज्याचा संस्मरणीय लढा**— कोल्हापूर संस्थानांत लोकसत्तेला वाव देणारी अशी कोणतीही राजकीय सुधारणा अद्याप झाली नव्हती. इलाखा पंचायतींत सरकारचेच हमखास बहुमत होते. अध्यक्ष सरकारनियुक्त. उपाध्यक्षही सरकार नियुक्त. म्युनिसिपालिटींत मात्र लोकांचे बहुमत होऊं शकण्याजोगे होते. जेवढ्या गोष्टी ताब्यांत आहेत त्या बहुमत मिळवून राबवण्यासारख्या होत्या. या वेळपर्यंत बहुमत करता येत असूनहि लोकपक्षाचे बहुमत होऊं शकले नाहीं. बहुतेक सरकारच्या कांखेतलेच लोक

येत. अध्यक्ष नांवचाच लोकनियुक्त होता. पण खऱ्या लोकमताच्या पाठिंब्यावर आतांपर्यंत तरी कोणी आले नव्हते. अध्यक्षाच्या निवडणुकीच्या वेळीं सारखी तारायंत्रे चालू व्हायची. सांगावे यायचे. म्यु. पालिटींत चाळीस सभासदांत २५ लोकनियुक्त व १५ सरकारनियुक्त असत. पंधरा जणांचा गट मात्र अभेद्य असायचा व लोकनियुक्त २५ ची मात्र एकजूट असायची नाहीं. कोणत्याहि पक्षातर्फे म्हणून आतांपर्यंत निवडणुका लढवल्या गेल्या नव्हत्या. तेव्हां ही संस्था संपूर्णतः लोकांच्या ताब्यांत घ्यावी म्हणून आम्ही 'करवीर स्थानिक स्वराज्य संघ' नांवाची संस्था स्थापन केली. संस्थेचा प्रचार पुरस्कार आम्ही राजकीय कार्यकर्तेच करणार होतो. पण सधन व सुशिक्षित, राजकीय म्हटलें कीं दचकत. म्हणून सर्वांना घेऊन कार्य करतां येण्याजोगी संस्था असावी व या वर्गाचे सहकार्य मिळेल तेवढे घ्यावे व एक लोकपक्ष उभा करावा हाच आमचा मुख्य हेतू होता. तुरुंगांतून नुकताच सुटलो होतो, लगेच राजकीय चळवळ हाती घ्यायची नाहीं असे ठरवलें. स्थानिक स्वराज्य संघांत काम करावयाचे ठरवले. सिव्हिक बोर्डचा अध्यक्ष मीच होतो.

विरोधांतूनच आम्हाला मार्ग काढावयाचा होता. चोहोंकडचा विरोध असतांना आम्हाला अपेक्षेप्रमाणें यश मिळू शकेल असें मला मुळींच वाटत नव्हते. तथापि अपेक्षेप्रमाणें फळ मिळाले नसेल तरी प्रयत्न हा केव्हांही फुकट जात नसतो. प्रयत्न हेही फळच आहे. त्या कार्यातला तो एक टप्पा आहे या बुद्धीनें आम्ही शहरांत प्रचारकार्याला लागलो. अविश्रांत श्रम करून सभा भरवल्या, पत्रकें काढलीं. स्वयंसेवकांनीं 'स्लोगन्स' म्हणून, ओरडून गांव जागे केले. गल्लोगल्लीं व नाक्यानाक्यावर सभा भरवल्या. रोज रात्रीं बारा साडेबारापर्यंत सभा चालत. आश्चर्य हे कीं लोकांनासुद्धां या सभांची इतकी गोडी लागून राहिली होती कीं अगदीं नाटकाच्या प्रोग्रामप्रमाणें अगदी शांतपणें मन लावून ते ऐकत बसत. निवडणुकीची आम्ही तयार केलेली घोषवाक्यें 'स्लोगन्स' इतकी लोकप्रिय झाली होती कीं लहान लहान मुलें ती ओरडत गल्लींतून फिरत. आम्ही लोकांत फक्त संघाला मते द्या हाच प्रचार केला. व्यक्तिमहत्त्व अजिबात काढून टाकले. आमच्या सभांना एक हजारपासून दहा हजार समाज जमत असे. 'संघ' एकी, लोकशाहीच्या, कल्पना अगदी

अडाणी वर्गांतसुद्धां बिंबवण्याचा आमचा प्रयत्न पुष्कळच यशस्वी झाला. वसंतराव बागलांचा या वेळी प्रचारक म्हणून फारच उपयोग झाला.

पंचवीसपैकीं निदान १५।१६ जागा तरी आम्हाला मिळतील. अशी आमची अपेक्षा होती. मी स्वत: मात्र त्याचा विचारहि केला नाही. अशी लोकजागृति, यापूर्वीं झालेली लोकांनीं पाहिली नसेल. हेच यश मानून निकाल लागण्याचें रात्री मी स्वस्थ झोंपलो होतो. तों रात्रीं साडे आकराचे सुमारास आमच्या पैकीं कांहीं लोक दार ठोठावत हांका मारूं लागले. त्यांनीं मोटार आणली होती. ' आम्हाला पूर्णपणें यश मिळालें. आमचे हमखास बहुमत झाले. चला लोक तुमची वाट पहात आहेत. म्हणून त्यांनीं म्यु. पालिटी समोरील चौकांत नेले. तेथें हजरों लोक त्यावेळींहीं जमले होते. आनंदानें बेहोष झाले होते. तो लोकसमुदाय पाहून व लोकशाहीचा हा पहिला जय पाहून मला आनंदाचे भरते आलें. सत्ताधिशांचा विरोध असतांही लोकांना मिळालेला हा पहिलाच प्रचंड विजय होय.

लोकांचें अभिनंदन करतांना मी म्हणालो " लोकशाहीचे हे मूल आतां जन्माला आहे ते अद्याप मोठें व्हायचे आहे. म्हणून जनतेनें सदैव जागृत राहून शत्रुपासून त्याचे संरक्षण केले पाहिजे. जातिभावना, जातिस्वार्थ हाच या मुलाचा शत्रू होय. संघांतील व्यक्ति जातील पण संघ जगला पाहिजे. आमच्या ऐक्यांत फूट होईल अशी कोणतीही गोष्ट आपण करतां कामा नये. "

लोकनियुक्त २५ पैकीं आम्ही २२ जागा मिळवल्या. एकंदर जागा ४० आमच्यांत एकी राहिली म्हणजे आम्हाला अपयश येण्याचे कारणच नव्हते.

**अध्यक्षांची निवड व मनाचा गोंधळ**— म्यु. पालिटी अखेर पूर्णपणें आमच्या ताब्यांत आली. कोणत्या जागेवर कोणाला घालायचें हे काम सिव्हिक बोर्डाचा अध्यक्ष या नात्यानें मजवर पडले होते. पण अशी डिक्टेटरशिप गाजवायची काय, हा पुन: एक प्रश्न माझ्यासमोर पडला. अध्यक्ष म्हणून माझा निकाल आमच्या पार्टीच्या सर्व कौन्सिलर्सनीं ऐकायचा, असे जरी ठरले होते, तरी हा अधिकार आम्ही भोगावा काय? लोकशाहीविरोधी ही वागणूक होईल काय? लोकसत्ता स्थापन व्हावी ही तर

माझ्या आयुष्याची महत्त्वाकांक्षा. या निवडणुका सर्वस्वी त्यांच्यावर सोपवल्या तर काय होईल? बहुमतानें जे ठरेल ते ठरेल. मला हा अधिकार घेऊन काय करायचा? डिक्टेटरशिप गाजवावी तर दुसरी एक गोष्ट अवघड दिसूं लागली. निवडून आलेल्या कौन्सिलर्समध्यें वसंतराव हा माझा सख्खा भाऊ होता. त्यानें म्युनिसिपालिटींत एक तप घालवलें होतें. पूर्वी चेअरमनशिपचें काम त्यानें केले होते. तो चांगल्यापैकीं वकील होता. आम्हाला प्रचाराच्यावेळीं तो उत्कृष्ट वक्ता असल्यामुळें त्याची फारच मदत झाली होती. अध्यक्षाच्या जाग्याला माझ्यामतें तोच लायख होता. पण तो माझा भाऊ होता. यामुळें माझी परिस्थिति फार अवघड होऊन. बसली. टीकाकार म्हणणार आपला भाऊ होता म्हणून त्याला अध्यक्ष केले. स्वार्थ साधून घेतला पुनः दुसरा विचार येई.

असा बोल येईल म्हणून, त्याला भिऊन योग्य माणसाची निवड, तो केवळ माझा भाऊ म्हणून न करणें हेंही मला अन्यायाचें वाटूं लागलें. माझी ही भीरुता आहे असें वाटूं लागलें. भाऊ झाला हा काय त्याचा अपराध, आणि टीका करतील म्हणून त्याला न निवडणें हा माझा व्यक्तिविषयक स्वार्थच ठरेल. वस्तुतः आम्ही विभक्त झालो होतो. विभक्त होण्यापूर्वीची स्थिती प्रेमाची असतेच असे नाही तथापी भाऊबंदकी किंवा बंधुप्रेमाची ही जागा नव्हती. योग्य माणसाला योग्य जागा देणें एवढेंच माझें कर्तव्य होतें. ही एक पवित्र जबाबदारी माझ्यावर पडली होती. बहुमतावर सोपवले असते तर टीकेपासून माझी सुटका होणार होती व तो निवडून येतही होता. पण बहुमतावर सोंपवावें तर एखादेवेळीं, गटबाजी व्हायची. आमच्याच पार्टींत दुफळी पडायची. जागेची हांव उत्पन्न होऊन परस्परांत चुरस उत्पन्न व्हायची व आमच्या संघांत पार्ट्या पडायच्या.

मला एक मार्ग सुचला. लोकशाही व सर्वाधिकारशाही या दोन्ही-मधला एक मार्ग काढला. लोकशाही विस्खलित होत असेल, फाटाफुटीनें ती नष्ट होत असेल तर तिचें संरक्षण करण्याकरतां जर डिक्टेटरशिपचा उपयोग केला तर ते कृत्य लोकशाहीला मारक न होतां तारकच ठरेल. तेव्हां मी सर्वाधिकारशाही गाजवतो असे तर त्यांना वाटूं नये. त्यांच्या मतालाही वाव मिळावा पण त्यांच्यांत कंपू निर्माण होऊं नये, म्हणून एकेका कौन्सिलरला

मी माझ्या घरीं बोलवून घेतले व अध्यक्ष कोण निवडावा याबद्दल त्यांची मतें घेतली— तसेच पार्टी लीडर व चेअरमन याबद्दल त्यांची मतें समजून घेतली. व अखेरचा निर्णय मात्र मी प्रत्येकाला सिव्हिक बोर्डचा अध्यक्ष म्हणून कळवला. बोर्डाचा अध्यक्ष मी असलो तरी इतर सभासदही होतेच. पण लोकांपुढे तेवढे माझेच नांव. चांगलेपणा किंवा बोल चिकटणार मला. अखेर वसंतराव बागल यांचे अध्यक्षांचे जागेसाठीं निवड केली.

तीन वर्षांची अध्याक्षाची जागा आम्ही आपापल्यांत ठरवून एक वर्षाची केली. दुसरे वर्षी बंबवाकडून राजिनामा घेऊन त्या ठिकाणीं दुसऱ्या माणसाची निवड केली. श्री. श्रेष्ठी वकीलांना अध्यक्ष केले.

याही वेळीं शाहूपुरीतील दोन व्यक्तींनीं त्रास दिलाच. त्यांना संभाळून घेण्यांत मी माझ्या मनाचा कमकुवतपणाच दाखवला असे मला वाटते. संकटाच्या भीतीनें मी यांचे लाड पुरवले, ते पुरवायला नको होते. अशांना योग्य वेळींच बाजूस सारणे हेच दूरदर्शीपणाचे ठरेल. एकीचे सोंग पुढे टिकत नाहीं. त्यापेक्षां थोडेच निष्ठावंत कार्यकर्ते पुरवले! कच्च्या दिलाची मोटकुळी अंती घात करते. हे अनुभव पुढे फार आले.

**दे. भ. ल. मा. पाटील**— आम्ही लोकशाहीच्या मार्गावरचे पहिले पाऊल टाकले होते. म्युनिसिपल निवडणुकीबाबत मनाप्रमाणें यश मिळून स्थिरस्थावर झाले होते. आतां राजकीय संघटनेबाबतींतील कुचंबणा काढून टाकावी व प्रचारास वाव मिळावा म्हणून आम्ही प्रजापरिषदेच्या कार्यकर्त्यांनी 'कार्यकर्त्यांचें संमेलन' पुनः भरवण्याचें ठरवलें.

मुंबई इलाख्याचे एक माजी कॉंग्रेस मंत्री दे. भ. एल्. एम्. पाटील यांना सन्मान्य पाहुणे व सल्लागार म्हणून आणले होते. कोरगांवकरांच्या गिरणीतील खुल्या जागेंत पण बंदिस्त आवारांत संमेलन भरले. माझ्या अध्यक्षीय भाषणांत ठराविक गाऱ्हाणी व जबाबदार राज्यपद्धतीची मागणी केलीच होती. परिषद बंदी उठवावी ही मागणी संमेलनानंतर एकदोन दिवसांतच मान्य झाली.

**दे. भ. बाळासाहेब खेर**— या परिषदेचे अध्यक्षपद दे. भ. बाळ गंगाधर खेर यांनी स्वीकारले. आतां या वेळीं परिषदेला दरबारचा प्रत्यक्ष विरोध नसल्यानें मागे राहून मदत करणारे धनिक व पांढरपेशे उघड

सहकार्य देऊं लागले. सराफ, कापड व्यापारी, शाहूपुरीतील व्यापारी व इतर मदत करीत होते. शेट लक्ष्मणराव कोरगांवकर पुढें होऊन खटपट करीत होते. म्यु. पालिटी आमच्याच म्हणजे स्थानिक स्वराज्य संघाच्याच ताब्यांत असल्यामुळें संघाचे बरेच म्यु. पल मेंबर अहोरात्र राबत होते.

पहिल्या अधिवेशनांतील जागेवरून "पहिल्या परिषदेची ज्योत मिरवणुकीनें सांगलीहून थाटामाटानें आणली." तिचे स्वागत सांगलीतील लोकांनी व वाटेवरील खेड्यांनी केली. ही मिरवणूक अगदीं वेळेवर सभेसाठीं निघणाऱ्या अध्यक्षाच्या मिरवणुकीत येऊन दाखल झाली. मिरवणुकीच्या शृंगारलेल्या गाडींत अध्यक्ष खेर, मुंबई शहरचे मेयर मेहेरअली, दे. भ. न. वि. गाडगीळ व स्वागताध्यक्ष इतके होते.

"परिषदेंत माझी कार्याध्यक्ष म्हणून पुनः निवड झाली."

**प्रतिष्ठितांचा समावेश—** घटनेप्रमाणें सभासद होऊन निवड होईपर्यंत 'मीच कार्यकारी मंडळ निवडावयाचे होते.' मी जी निवड केली. तीही प्रमुख कार्यकर्त्यांच्या विचारानेंच केली. फक्त एक दोन गृहस्थ माझ्या विचारानें निवडले. कांहीं पूर्वीच्या लढ्यांत भाग घेऊन माझ्या बरोबर तुरुंगांत आलेले, कांहीं शक्य ती मदत करीत आलेले, कांहीं कायदा जाणणारे, कांहीं धनिक वर्गातले, एक विद्यार्थ्यांपैकीं व एक मराठा समाजांत ज्यांचे वजन आहे असे. निव्वळ तुरुंगांत गेलेले हा एकच गूण संस्थेला स्थाईक स्वरूप येऊं लागल्यानंतर पुरा पडणार नाहीं म्हणून अशी निवड केली.

आतापर्यंत कोल्हापूरच्या या अलिकडच्या राजकीय लढाऊ सत्याग्रही चळवळींत वकीलवर्गानें फार थोडा भाग घेतला होता. त्यांतील बऱ्याच लोकांची सहानुभूति असे. पण ती मागे राहून. सरकारी रोष पत्करून राजकीय चळवळींत भाग घेण्याचे कोणी धाडस केले नव्हते. कायदेशीर आणि सनदशीर मर्यादेपर्यंतच त्यांची मजल जाई. म्हणून वकील वर्गाबद्दल मी साशंक होतो. पहिल्या अधिवेशनाअगोदर एका वकीलांनी मोठ्या उत्साहानें भाग घेतला होता पण परिषद बेकायदा ठरतांच त्यांनीं कच खाल्ली. तथापि आतां पूर्वीची परिस्थिती बदलली होती. कायदेभंगाचा प्रश्न लवकर उत्पन्न होणार नाहीं असे वाटत होते. लढाऊ कार्यक्रमापेक्षां कायदेशीर व घटनात्मक चर्चेचा काल आला होता. म्हणून कायदा समजणाऱ्या सल्लागारांची

अवश्यकता भासूं लागली होती. म्हणून कार्यकारी मंडळांत वकील मंडळींचा समावेश करणें अगत्याचें वाटूं लागले. धोका पत्करूनही या लोकांना मला घेणें अवश्य वाटलें.

खेड्यावर शेतकऱ्यापुढें व्याख्यान देतांना त्यांच्या दारिद्र्याचे मूळ सावकारशाही व भांडवलशाहींत कसे आहे हे दाखवण्यास मी कधीही विसरलो नाहीं. पण कांहीं सावकार–जमीनदार व भांडवलवाले सदिच्छनें सहकार्य देत असतांना ते टाकावे असे मात्र मला वाटत नव्हते. यापैकीं कांहीं लोक मनापासून सहाय्य देतही होते. कष्टकरी आणि शेतकरी यांच्या प्रतिनिधींच्या हातीं सत्ता आल्याखेरीज त्यांचे दुःख कमी होणार नाहीं, म्हणून त्यांनी संघटित झाले पाहिजे हे सांगत होतो. सोशालिस्ट व राजनिष्ठ या गोष्टी संस्थानाबाहेरच्या लोकांना विसंगतच वाटतील पण त्या राजनिष्ठेच्या व्याख्येंतून गुलामगिरीची कल्पना काढून टाकीत होतो. राजनिष्ठा व लोकनिष्ठा परस्परावलंबी असल्याचे दाखवत होतो. राजानें वाटेल ते करावे, वाटेल ते सांगावे, वाटेल ते कायदे करावे व ते मुकाट्यानें प्रजेनें ऐकावे ही भावना काढून टाकीत होतो. कॉंग्रेसनेंही ‘ राजाच्या अधिपत्याखालीं ’ या शब्द प्रयोगाला मान्यता दिलीच होती. चालू परिस्थितींत ते इष्टही होते.

**महाराणी ताराबाईना मानपत्र**—परिषदेनंतर थोड्याच दिवसांनी महाराणी ताराबाईसाहेबांना रीजन्सी कौन्सिलचे अध्यक्ष या नात्यानें कांहीं अधिकार मिळाले. त्यांना मानपत्र द्यावे असे माझ्या मनानें घेतले. आमच्या पैकीं कांहींना ही गोष्ट परिषदेच्या ध्येयाला सुटून होत आहे असें वाटले.

मानपत्र देण्यांत मला ध्येयच्युतीचे असे कांहींच वाटले नाहीं, त्यांचा लोकजागृतीकडेच मी फायदा पाहून घेण्याचे ठरवले. खेड्यावरच्या दौऱ्यांत मला जो अनुभव आला होता त्यावरून मला दिसून आले होते कीं प्रजापरिषदेंत भाग घ्यायला लोक अद्याप दचकत होते. पाटील, तलाठी व गांवगुंड त्यांना भीति दाखवत होते. मानपत्रामुळें त्यांचें तोंड बंद करता येण्याजोगे होते व आम्हाला संघटना करणें पुष्कळ सोपे जाण्याजोगे होते. मानपत्रानंतर लोकांना अशी भीति दाखवता येणार नव्हती. आमच्या मागण्या, आमचा प्रचार व प्रचारांतील तीच भाषा ठेवून ध्येयाला बाध न आणतां–जर मानपत्र समारंभ घडवून आणता आला असता तर त्यानें प्रजापरिषदेचें

कांहीं नुकसान होण्याजोगे नव्हते. त्यानें प्रजापरिषदेची ताकत वाढणारच होती. या दृष्टीनें माझे धोरण चुकीचे आहे असे मला मुळींच वाटत नव्हते.

मानपत्र मीच लिहून काढलें. ते मीच वाचून दाखवणार होतो. आतांपर्यंत चालत आलेला सर्व परिपाठ मी बाजूस सारला होता. मानपत्र म्हणजे नसलेल्या गुणांची खेच करून आरती ओवाळायची, राजाची आपल्या गुणाविषयीं पूर्ण दिशाभूल करून त्याला अतिमाणूस *Superman* बनवायचे हाच रूढ प्रकार चालत आलेला होता. मी ' राणीसाहेबांच्या स्तुतीचा त्यांत एक शब्दही घातला नाहीं. ' कसलेच गूण लादले नव्हते. फक्त श्रीशिवाजी महाराज व श्रीशाहू महाराज यांच्या थोर गुणांची, अनुकरणीय कृतीची त्यांना आठवण करून दिली. ' प्रजापरिषदेच्या ठरावांतल्या महत्त्वाच्या सर्व मागण्या त्या मानपत्रांत सारांशाने घातल्या होत्या. ' त्या समारंभाला अधिवेशनाचेच स्वरूप आले होते. राणीला साक्षी ठेवून सर्व अधिकाऱ्यांचे देखत, अधिवेशनाच्याच भाषेंत लोकांची गाऱ्हाणी त्यांचे पुढें ठेवली होती. ' नोकरी संबंधींचा ठराव अगदी स्पष्ट भाषेंत मी घातला होता.'

मे. पेरी दिवाण आल्यापासून कोल्हापूर ' संस्थानाबाहेरच्या लोकांचाच भरणा विशेष होत चालला होता. व संस्थानांतील, विशेषतः सारा भरणाऱ्या बहुसंख्य समाजांतील लोकांना *Preference* अगोदर निवडावे अशा अर्थाचा मजकूर मी मानपत्रांत घातला होता. '

**भिकार घटना—** याच वेळीं आमच्यावर एका ' भिकार कायदेमंडळाची घटना ' त्रेतायुगांतल्या राजवटीला शोभण्याजोगी आम्हांवर लादली होती. आमच्या विरुद्ध असलेल्या सरकारपक्षीय व मवाळ लोकांनीही तिचा धिःकार केला होता. आमच्या कार्यकारी मंडळानेंही ती विचार करण्याजोगीही नाहीं असा शेरा मारून निषेध केला होता व हा जनतेचा उपमर्द आहे असे आम्ही मानले. तीच ठरावांतील भाषा मी त्या घटनेचा उल्लेख करतांना मानपत्रांत घातली होती.

खुद्द महाराणीसाहेबांनी मात्र मानपत्राबाबत मला कसलीच सूचना केली नाहीं. अमका शब्द गाळा किंवा घाला असे जराही दर्शविले नाहीं. इतकेंच नव्हे तर राजबंदींचा दंड परत करण्याची माझी खासगी सूचनाही त्यांनीं इतर कोणाची सल्ला न घेतां मान्य केली व ते आश्वासन पुढें पारही पाडले.

**जप्त झालेल्या पुतळ्याचा अनावरण समारंभः—** मानपत्र समारंभानंतर एक दुसरा दरबारी थाटाचा समारंभ माझ्या एका गोष्टीमुळें घडून आला. राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत मला दोन वर्षें सक्तमजूरी व हजार रुपये दंड अशी शिक्षा झाली होती. हजार रुपये दंड वसुलीसाठीं कोण्या शाहण्या अधिकाऱ्यानें माझ्या घरी मी तयार केलेला श्री शाहु महाराजांचा अर्ध पुतळा जप्त करून नेला. पण मला १०।१५ दिवस अगोदरच सोडल्यामुळें दंड वाचला. तो पुतळा कोठल्यातरी संस्थेला देण्याची माझी इच्छा होती. तेव्हां आठवणीकरितां म्हणून हा ' पुतळा मी म्युनिसिपालिटीला बक्षीस देण्याचे ठरविले.' राणीसाहेबांनीं बेबी महाराजांचे हस्तें पुतळा अनावरण करण्यास परवानगी दिली. त्या स्वतःही हजर राहिल्या. मंत्रिमंडळ व सर्व अधिकारी आले होते. तेथें भाषणही झाले. ' दरबारनें जप्त केलेला पुतळा पुनः शाहू महाराजांच्या नातीकडून अनावरण केला गेला. '

**रणक्षेत्राकडे—** रेसवेटिंगशॉप्सवर पिकेटिंगचा कार्यक्रम आंखला जात होता. तयारी चालू होती. या प्रश्नावर तुरुंगांत जाण्याचा मी निश्चय केला होता. पिकेटिंगनें भागले नाहीं तर सामुदायिक सत्याग्रहाची उठावणी द्यायची, दिवाण ऑफिससमोर मोर्चा नेऊन तेथें सत्याग्रह चालू करायचा व सरकारवरच दडपण आणायचे असा माझ्या मनांत मी कार्यक्रम ठरवला होता. ' व्यक्तिविषयक सत्याग्रहानें सामुदायिक जागृति व्हावी तशी होणार नाहीं असें मला वाटत होते. ' पण अगदीं याचवेळीं अखिल भारतीय संस्थानी सभेच्या चिटणिसांकडून बिर्ला हौसमध्यें हजर राहण्याचे आमंत्रण आल्याचे समजले. नेहरूच अध्यक्ष असलेनें व ही वेळ हिंदुस्थानच्या इतिहासांत अत्यंत आणीबाणीची अशी असल्यानें संस्थानचा हा कार्यक्रम आल्यावर पाहूं म्हणून ही खासगी बैठक, तशीच ऑल इंडिया कॉंग्रेस बैठक, या दोन्हीसही हजर राहण्याचे निश्चित केले. वाटेंत एक दिवस मुद्दाम पुण्यांत काढला. संस्थानीं परिस्थितीचा विचार करण्याकरतां आम्हां प्रजापरिषदेच्या अध्यक्षांना पाचारण केले होते.

**माझे सुरवातीचे विचार—** लढा सुरू होणार. त्याला अखिल भारतीय स्वरुप येणार. त्यांत यावेळीं संस्थानानांहीं भाग घ्यावा लागणार

याबद्दल मला कसलाच संदेह नव्हता. याचबाबत आम्हाला सूचना देण्याकरितां व आमचे विचार ऐकण्याकरतां आम्हाला आमंत्रणें आली होती. मी माझे विचार व्यवस्थित मांडता यावेत म्हणून माझ्या पुण्याच्या मुक्कामांत इंग्रजींत लिहून काढले.

यावेळीं लढ्यांत तर भाग घ्यायचाच पण त्याला चालना कशी द्यावयाची हीच गोष्ट माझ्यापुढें होती. कोल्हापूर प्रजापरिषदेची नियमाप्रमाणें अद्याप संघटना व्हायची होती. अद्याप परिषदेचे सभासद करून घ्यावयाचे होते. लढ्याची सुरवात अखिल भारतीय प्रश्नावर केल्यास अपेक्षेप्रमाणें उठाव मिळणार नाहीं अशी शंका येत होती. म्हणून स्थानिक प्रश्नावर तोंड फोडायचे व त्यांतून त्याचे स्वरूप वाढवत त्या चळवळीला नेऊन भिडवायचे, हेच आम्हाला सोपे जाईल व शक्य होईल अशी माझी विचारसरणी होती. याचवेळीं आमच्या सुदैवानें व अधिकाऱ्यांच्या गैरमुत्सद्देगिरीमुळें बेटिंगशॉप्स व पार्कं हा प्रश्न आयताच मिळाला होता. तो नैतिक होता तसा आर्थिक होता. याला शहरांतील सर्व सुबुद्ध लोकांची सहानुभूति मिळाली होती. पार्कांचा प्रश्न शेतकऱ्यांच्या जिव्हाळ्याचा होता.

**बिर्ला हौसमध्यें**— मुंबईंत पुढाऱ्यांच्या अगदीं खासगी बैठकींत भाग घेण्याचा लाभ दोन तीन दिवस सारखा मिळाला. म० गांधीजींचे व नेहरूंचे हास्यविनोद आणि विचार अगदीं जवळून ऐकायला मिळाले. हिंदुस्थानांतील प्रमुख नररत्नें तेथें जमली होती. हिंदी भाषेच्या अज्ञानामुळें चर्चेंत भाग घेण्याचे धाडस झाले नाहीं. पण सेक्रेटरींना, पट्टाभींना व बाळासाहेब खेरांना माझे विचार समजून दिले. त्यांना ते पटले होते.

कॉंग्रेस वर्किंग कमिटीला व आम्हां प्रजापरिषदेच्या अध्यक्षांनाही परत जाण्यापूर्वींच अटक होण्याचा संभव आहे असे भाकीत जवाहरलालजींनीं केलेच होते. ‘आपापल्या राजे लोकांचे पुढे कोणचे विचार ठेवावेत याची कल्पना आम्हां संस्थानी कार्यकर्त्यांना महात्माजींनीं करून दिली होती. तेच विचार पुढें मी जाहीर सभेंत व राणीसाहेबांच्या खासगी भेटींत स्पष्टपणें मांडले.’

**ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींतील भाषणें**— त्या वेळची कमिटींतील भाषणें एकाहून एक अशी ओजस्वी व स्फूर्तिदायी झाली.

**नेहरू**— नेहरू चिडले म्हणजे त्यांचे भाषण फारच प्रभावी व

परिणामकारक होई. त्याचे सर्व पडसाद त्यांच्या शरीरावर व चेहऱ्यावर उठत. राष्ट्राची प्रज्वलित ज्योत, त्यांच्या स्वरुपांत डोळ्यांसमोर नाचत होती. तरुणांच्या उसळत्या रक्ताची लाली त्यांच्या गालावर उमटत होती. अस्तन्या सारून बोलतांना जणुं काय आमचा नेता लढाईला निघाला आहे व शत्रूवर चाल करण्याकरतां लोकांना उठावणी देत आहे. जागृत भारताचे जणुं ते मूर्तिमंत स्वरुप ! !

**महात्माजी** — शांत सागराच्या विचारपूर्वक आदळणाऱ्या लाटा प्रमाणें महात्माजींच्या शब्दांचा जनसमुदायावर आघात होत होता. धैर्य, गांभीर्य व निश्चय त्यांत ओतप्रोत भरला होता. शेंकडो वर्षांच्या हिंदमातेच्या सहनशीलतेचे सीमोल्लंघन झाले होते. भावनांचा खेळ मात्र जसा नेहरूंच्या आकृतीवर पाहता येई तसा तो महात्माजींच्यावर दिसत नव्हता. जणुं ध्यानस्थ मुनीच्या तोंडून निघालेली ती भविष्यवाणी होती.

**आझाद** — यांचा चेहरा संतापानें लाल झाला होता. ज्वालामुखींच्या तोंडांतून पडणाऱ्या अग्निस्फुलिंगाप्रमाणें त्यांचे शब्द बाहेर पडत होते. त्यांचा रुबाब, कांति आणि तेज रोमन बादशहाला शोभण्याजोगे होते.

**वल्लभभाई** — सर्व समाजाला आपल्या मुठींत धरून गदगदा हलवत होते व शत्रुवर सारखे घांव घालून त्याला नामोहरम करीत होते. त्यांचा मारा मोठा अचुक व जिव्हारी बसत होता. सापाला उलथा पालथा करून ठेचावा त्याप्रमाणें ते शत्रूवर प्रहार करीत होते.

**महात्माजींना अटक व माझे परत प्रयाण** — बैठक संपली. दुसरें दिवशीं सकाळीं उठून चहा घेतो तों महात्माजींच्या अटकेची बातमी कानावर पडली. महात्माजींची अटक म्हणजे युद्धाचे आव्हानच ! भावी लढ्याचे रणशिंग फुंकले गेले. युद्धाला तोंड लागले ! सरकारनेंच त्याला तोंड फोडलें ! ब्रिटिश साम्राज्याच्या इतिहासांत इंग्रजांच्या मुत्सद्देगिरीचे पूर्ण दिवाळे निघाल्याचे निदर्शक अशी ही घोडचूकच ठरेल ! आतां ज्यांनी त्यांनी आपले कर्तव्य पार पाडले पाहिजे.

महात्माजींनी तर हा आपल्या आयुष्यांतला अखेरचा लढा म्हणून जाहिर केले होते. महात्माजी म्हणजे हिंदुस्थानचा प्राण. तो पणाला लागल्यावर आतां बाकीच्यांनी आपल्या जिवाची फिकीर बाळगणे म्हणजे

आपल्या आत्म्याशी, देशाशी व सद्‌सद्‌विवेक बुद्धीशी प्रतारणा करण्यासारखेंच होते. ' करेंगे या मरेंगे ' या आवाजानें जणु दशदिशा भारून गेल्या होत्या. कानांत सारखा तोच आवाज. हृदयावर तोच पडसाद, बाहेर तीच घोषणा ! रक्त सारखं उसळत होतं ! जीव थरारत होता.

मी माझी वळकटी लागलीच गुंडाळली. सुदैवानें त्याचवेळीं कोल्हापुरला थेट जाणारी गाडीही होती ती गांठली. मला अटक व्हायची ती कोल्हापुरांतच व्हायला पाहिजे. कारण माझ्या अटकेचा परिणाम कोल्हापूर संस्थानवर जसा होईल तसा दुसरीकडे होणार नाहीं, म्हणून मी कोल्हापूर हद्दींत केव्हां पाय टाकीन असे मला झाले होते. मी कोल्हापुरास निघालो. रत्नापा मुंबईस मागे राहिले. त्यांची पुन: भेट झाली नाहीं.

**लोकचैतन्य** — सकाळी उठल्याबरोबर प्रथम प्रजापरिषदेच्या कार्यकारीं मंडळांस तांतडीची पत्रें टाकली. बैठकीनंतर आपले धोरण जाहीर करण्याचे ठरवले. अगदी पहाटेपासून प्रभात फेऱ्यांना सुरवात झाली होती. महात्माजींच्या अटकेची बातमी गांवभर केव्हांच पसरली होती. प्रभात फेऱ्यातील मुलांची ' इंग्रजानो चालते व्हा ' ही घोषणा राहून राहून कानावर पडत होती. मी मिरवणुकींत भाग घ्यावा म्हणून भल्या पहाटेपासून मुलें दाराला धडक्या देऊन जात होती. पण इतक्यांत घाई करायची नाहीं असें मी ठरवले होते. वर्किंग कमिटीची वाट पहात होतो. पण सकाळी सातचे सुमारास गिरणीचे मजूर आम्ही गिरणी बंद ठेवाली काय म्हणून विचारायला आले. मला नाहीं म्हणवेना व प्रजापरिषदेच्या निर्णयाखेरीज अधिकृतरित्या कांहीही सांगणे बरें वाटेना. म्हणून ' तुमच्या इच्छेप्रमाणें करा. मी कांहीं आडकाठी करूं इच्छित नाहीं ' असें सांगितले.

विद्यार्थ्यांनी खूप उठाव दिला होता. मिरवणुका, सभा, फेऱ्या व घोषवाक्यें यांनी सारे कोल्हापूर दणाणून गेले होते. मी घराबाहेर पडलो तर मला राहवणार नाहीं व मग मला लोकही सोडणार नाहींत याची खात्री असल्यामुळें त्या दिवशी मी घरांतून बाहेरच पडलो नाहीं. पण माझा निश्चय लोकांनी पार पाडू दिला नाहीं. संध्याकाळीं पांचच्या पुढें चार पांच हजार लोकांचा जमाव गांवांतून मैल दोन मैल चालून राजारामपुरींत माझ्या घरापुढें येऊन उभा राहिला. तुम्ही आज सभेंत कां भाग घेतला नाहीं ते

आम्हाला सांगा म्हणून हट्ट धरून बसला. तेव्हां मग घरचे टेबल रस्त्यावर ठेऊन त्यावर उभे राहून भाग न घेण्याचे कारण त्यांना समजावून दिले.

'आमच्या कार्यकारी मंडळाचा विचार घेऊनच काय करायचे तें ठरवले जाईल. सभासद परवांचे दिवशी येतील. बैठकीनंतर मी परिषदेचा निर्णय जाहीर करीन. प्रजापरिषदेचा निर्णय तुमच्या अपेक्षेप्रमाणेंच लागेल, तो सर्वांच्या अपेक्षेच्या उलट गेला तर मी तुमचाच आहे.' असे सांगितल्यावर मंडळी शांत झाली व घोषणा करीत परत गेली.

**पूर्वीचे विचार बदलले—** चळवळ कशी चालू करावी या विषयीं मुंबईस जाताना जे विचार होते ते आतां कोल्हापुरांतील एकंदर परिस्थिति पाहून बदलले. विद्यार्थ्यांच्यात अवर्णनीय उत्साह दिसून येत होता. शहरांत यापूर्वी कधीही दिसून न आलेली जागृती व एकंदर जनतेची लढ्याची उत्सुकता, लहानापासून थोरापर्यंत, आपण कांहीतरी केले पाहिजे ही भावना, अगदी नेभळटालाही वीर बनवणारी होती. येथून तेथून सर्व वातावरण बदलून गेले होते. जनता जणुं काय मांडीवर थाप मारून युद्धाला सज्ज झाली होती. घोडा भरधांव सुटण्यापूर्वी जसा थयथय नाचत सुटतो तसें झाले होते सर्वांचे. जिवाची खैरात करण्याकरता जणुं चढाओढ चालली होती. हे सर्व दृश्य पाहून, स्थानिक प्रश्नावर प्रथम जागृति करावी हा विचार पार बदलून गेला. जागृति करण्यासाठींच स्थानिक प्रश्नावर सुरवात करावयाची होती. ती तर आता झालीच होती.

लोकांत एवढा उत्साह व एवढी जागृति निर्माण होईल असें मुंबईला जाण्यापूर्वी मला वाटले नव्हते. कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांतही त्यावेळीं साशंकता निर्माण झाली होती. पण महात्माजी हिंदी जनतेशी इतके समरूप झाले होते, कीं जनतेची नाडी बरोबर समजणारे महात्माजींच्यासारखे फक्त महात्माजी हेच होत. वीजेचे बटन दाबतांच लख्खन् प्रकाश पडावा त्याप्रमाणें महात्माजींना अटक होतांच देश एकदम खडबडून जागा झाला. एका क्षणात हिंदी मनाने सारी भीति आणि गुलामगिरी झुगारून दिली. महात्माजींच्यावरून प्राण ओवाळून टाकायला जो तो पुढें होऊ लागला. बेफाम सुटलेल्या वारुंचे लगाम खेचणारे फक्त तेच होते. चाळीस कोटी हिंदी जनतेला थोपवण्याची शक्ति साम्राज्य सरकारच्या हाती नव्हती.

**भूमिका तयार होती—** महात्माजींच्या अटकेमुळे जे प्रयत्नानें करायचे ते अगोदरच झाले होते. लोकक्षोभाला उकळी फुटली होती. आतां फक्त तिचा फायदाच तेवढा पदरांत पाडून घ्यावयाचे आमचे काम होते.

प्रजापरिषदेचे सभासद झाले भरपूर नव्हते. गांवोगांवी तिच्या कमिट्या स्थापन झाल्या नव्हत्या. या सबबीवर हात आंखडून बसण्याची ही वेळ नव्हती. होत्या त्या व मिळतील त्या साधनांनी राष्ट्रीय लढ्यास सहाय्य करायचे व त्यांत भाग घ्यावयाचा एवढेच ठरवणे भाग होते. मी हाच निर्णय मनाशी ठरवून ठेवला होता.

बैठक भरली. प्रजापरिषदेच्या कार्यकारी सभासदांत मतभेद दिसून आले. आपली संघटना अद्याप नाहीं. सभासद नाहींत. ते प्रथम करूंया व परिषदेचा निर्णय घेऊन काय ते करूंया ही विचारसरणी कांहींनी मांडली. या विचाराचे सभासद मुख्यत: वकील होते. पण अखेर लढा देण्याचा व तारीख जाहीर करण्याचा ठराव बहुमतानें मंजूर झाला.

**लढ्याबाबत माझी विचारसरणी**—कॉंग्रेसने लढा पुकारला होता. आतापर्यंतच्या लढ्याहून हा फार निराळा होता. हिंदुस्थाननें बंड पुकारले होते. अशावेळीं संस्थानें व खालसामुलुख हा भेद करणे चुकीचे आहे. त्याने कॉंग्रेसची ताकत कमी होईल. जी असेल ती शक्ती यावेळीं पणास लावली पाहिजे. कारण कॉंग्रेसच्या लढ्याबरोबरच आता संस्थानांचाहि प्रश्न सुटणार होता. संस्थानांना आता कॉंग्रेसला वगळता येणार नव्हते. म्हणून संघटना नाहीं अशी समजूत करून घेऊन स्वस्थ बसण्यानें तितकी ताकत कमी पडेली असती. विधायक कार्यक्रम व लढाऊ कार्यक्रम या गोष्टी माझ्या मतें निराळ्या आहेत. दोन्ही गोष्टी परस्परास पोषक असतात पण या एकमेकावर अवलंबूनच असतात असें मात्र नाहीं. सामुदायिक उठाव हा पुष्कळ अंशी भावनेवरच अवलंबून असतो केवळ विधायक कार्यक्रमावर ही गोष्ट अवलंबून असते असें नाहीं.

मनुष्याचे तसे समाजाच्याही भावनेचे आंदोलन विविक्षितकाली, विवक्षित परिस्थितीमुळेंच होत असते. ते अगदी मोठ्यांतला मोठा पुढारीहि हुकमी करूं शकत नाहीं. आजची ही प्रचंड जागृति व मरणाविषयीची बेफिकीरी महात्माजींच्याच इच्छेमुळें सर्वस्वी झाली असे म्हणता येणार नाहीं. एकंदर

जागतिक परिस्थिती, त्यामुळें लोकशाहीच्या व स्वातंत्र्याच्या उसळलेल्या लाटा, त्यासाठीं क्षणोक्षणी मानवी जीविताची पडणारी आहुति, रोज रोज अंग थरारून सोडणाऱ्या, कानावर आदळणाऱ्या रशियनांच्या वीरकथा व त्यांचे स्वातंत्र्यप्रेम, पत्रांतल्या बातम्या, इंग्रजांच्या धोरणामुळें येणारी चीड, याचा समुच्चय परिणाम म्हणजे ही जागृति होय. राष्ट्रधुरीणांचें व पुढाऱ्यांचे खरे काम म्हणजे राष्ट्राच्या या आंदोलनाचे व महत्वाकांक्षेचे व परिस्थितीचे बरोबर आकलन करून धाडसाने पाऊल टाकणे व जनतेला दिशा दाखवणे हे होय. अशी चालून आलेली वेळ गमावणे हे चळवळीला फार घातक असते. ही पारख महात्माजी इतकी अचुक कोणी करू शकले नाही. याच त्याच्या वैशिष्ठ्यामुळें ते सर्वश्रेष्ठ राष्ट्रधुरीण झाले.

हिंदुस्थानांत क्रांतीचे कोठार, कांठोकांठ भरत चालले होते. नुसत्या ठिणगीचेच निमित्त पाहिजे होते. ते इंग्रज सरकारनें करून दिले! महात्माजींच्या अटकेमुळें हिंदुस्थाननें एकदम पेट घेतला. निव्वळ विधायक कार्यक्रमाच्या जोरावर देशाला ही चालना मिळाली नसती. विधायक कार्यक्रमांत कसलेल्या लोकांनी फक्त या मिळालेल्या चालनेला दिशा दाखवण्याचे काम तेवढें करावयाचे असते.

तेव्हां या अशा वेळीं प्रजापरिषदेचे सभासद नाहीत व संघटना नाहीं या सबबीवर कालहरण करणे जनमनाचा विचार करता घोडचुकीचे ठरले असते. शिजत आलेल्या भातावर एकदम गार पाणी ओतल्यासारखे झाले असते. समाजाच्या भावनेला नेहमी महापूर येत नसतो. तो आला म्हणजे त्या महापुरांत ठिकठिकाणीं भोवरे निर्माण होतात व तेवढ्या तेवढ्या जल संचयावर ते आपला ताबा ठेवूं लागतात. मानवी महापुरांत पण अशाच गोष्टी घडत असतात. त्या त्या गटापुरते छोटे छोटे पुढारी आपोआप निर्माण होतात. तेवढा तो समाज आपल्या आटोक्यांत ठेवू लागतात. दिशा दाखवतात. केव्हांही न चमकलेल्या व्यक्ती यावेळीं आश्चर्याची कामें करतात. अशा वेळीं संघटना नाहीं म्हणून हातपाय गाळून बसण्याचे कारण नसते. निव्वळ सभासदांच्या आंकड्यावरून व लिस्टावरून लोक जागृतीचे माप करणे चुकीचे आहे.

कार्याच्या दिशेंत विसंगति निर्माण होण्याचेही कारण नव्हते.

महात्माजींनी चळवळीची साधारण रूपरेखा आंखून दिली होती. प्रजापरिषदेचे कार्यकर्ते खेड्यावर पसरले होते व संघटना करणारे मागे राहिले होते. समाजाला उठाव देऊन सतत जागे ठेवणारे व खेड्यावर संघटना करणारे अशाप्रकारचे दोन्ही वृत्तीचे कार्यकर्ते आपल्यांत होते. या सर्व गोष्टीचा विचार करून तारीख देऊन निर्णय जाहीर करणे व त्यासाठीं ज्याचा परिणाम होईल अशा व्यक्तिनें तुरुंगाचा मार्ग स्वीकारणे चळवळीच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक होते. त्यानें लोक जागृतिला अधिक चालना मिळणार होती.

माझ्या दृष्टीने मला यावेळीं एकच गोष्ट सयुक्तिक अशी दिसत होती ती ही, कीं समाजांत जी एक अद्भुत अशी चेतना निर्माण झाली होती तिला मागे न खेचता, प्रतिबंध न करता, जनता न बहकेल असें तिला फक्त वळण द्यायचे व चढलेला पारा खाली उतरू न देता शक्य तितका तसाच ठेवायचा व त्याचा उपयोग करून घ्यायचा. कांहींचा उपयोग त्याला शिस्त लावण्याकडे करायचा. कांहींनी तो तसाच गरम ठेवायचा. याकरितां देशाच्या व संस्थेच्या प्रमुखांनी आपला जीव वेचूनच कार्य केलें पाहिजे. सर्व नाशाच्या तयारीस सज्ज झाले पाहिजे. तरच त्याचा परिणाम इतरावर होईल. आपणच येताना त्याग करून त्यागाचे सोंग करण्याचा हा काल नव्हे.

समाजाच्या भावनांनी यावेळीं खूप उचल खाल्ली आहे. ते मारून टाकता कामा नये भरधांव सुटलेल्या घोड्याला मागे खेचलें तर तो व स्वार दोन्हीही दगावतात. समाजाच्या भावना इतक्या उद्दीपित झाल्यानंतर त्यांना निरुत्साह केल्यास, समाज तुमचे न ऐकता भलत्या मार्गाला जाण्याचाच संभव अधिक असतो. तो तुम्हाला झुगारून देतो.

कांहीं वेळा अशा असतात कीं त्यावेळी कांहीं व्यक्तीनी मागे राहण्यापेक्षा धाडसानें पुढे होऊन समाजाला संदेश देणे, त्यांची मनोभूमिका तयार करणे, ध्येयाची कल्पना करून देणें व त्यामुळें येईल तो प्रसंग सहन करणें भाग असते. अशा वेळीं त्या व्यक्तीचा बळी जरी गेला तरी त्यानें कार्यहानी न होता चळवळीला पुढेच ढकलले जाते.

म्हणून यावेळीं मी कांहीही होवो धोका पत्करून भाषण केले पाहिजे व परिणाम होईल तो भोगला पाहिजे असे मनाने ठरवले. मंडळाच्या ठरावाचा पाठिंबा घेऊनच मी व्यासपीठावर चढलो. सभेला वीस–पंचवीस

हजारपर्यंत समाज जमला असेल. सभेनंतर मला तेथेच अटक होणार या जाणीवेने माझ्या मित्र मंडळींना भेटलो होतो. तुरुंगाची वळकटी बांधून ठेवली होती. वाचण्यासाठीं कांही आवडीची पुस्तके हॅंड बॅगमध्यें टाकली होती. बायको व माझा बाळ दौलत पुनः लवकर भेटूं शकणार नाहीं म्हणून तेहि सभेस आले होते.

लढाईला जातांना सैनिक ज्या भावनेने घर सोडीत असेल त्या बेडर भावनेने मी नखशिखांत भारून गेलो होतो. राजरोस बंडाची भाषा बोलणार होतो. काळ्या–पाण्याच्या तयारीने मी व्यासपीठावर पाऊल टाकले होते. देशासाठीं मरण्याच्या गोड गोड कल्पनेंत मी आधली रात्र काढली होती. प्रेमवेड्याला प्रियकरणीच्या बाहुपाशांत पडल्याची स्वप्नें पडावीत त्याप्रमाणें स्वातंत्र्याच्या जयघोषांत रोमरोमांतून जयनाद उठत असतांना मी देशासाठीं फांसावर चढत आहे अशा स्वप्नांतून जागा झालो होतो. माझे मी पण नाहींसे झाले होते. जणुं लोकमनाशी मी एकरूप झालो होतो. लोकांची त्यावेळची भावना माझ्या मुखावाटे बाहेर पडत होती. सभा चिक्कार भरली होती. समोर बंदुकीची गोळी रोखली असतांना तिकडे हंसत पहात बोलावे अशा मनःस्थितीतून माझे शब्द बाहेर पडत होते. माझ्या आयुष्यांत अशा अवस्थेंत मी अगदी थोड्याचवेळीं गेलो असेन. उदात्त सृष्टि सौंदर्याचा परिणाम असा माझ्या मनावर एक दोन वेळां झाला होता. जिला समाधी अवस्था म्हणतात ती अशीच असेल कीं काय कोण जाणे ! जड सृष्टीचा त्यावेळीं विसर पडत असेल. ज्याबद्दल मी सारखा विचार करीत होतो तेच विचार बाहेर पडत होते. भाषणाचा सारांश दुसरे दिवशी ता. १४ ऑगस्ट १९४२ च्या विद्याविलासांत आला तो असा:—

‘ मी प्रजापरिषदेचा बंदा असल्यानें मला गेल्या चार दिवसांत ... माझ्या मनांत उचंबळत असलेल्या भावना आपणांस सांगता आल्या नाहींत त्याबद्दल मला फार वाईट वाटतें...मला म. गांधी, नेहरू यांच्यासारखे भारताचे नेते पकडले गेल्यानंतर निष्क्रिय राहून स्वतंत्र वावरणे बरोबर दिसत नाहीं...आज आपल्या म. गांधीनी स्वातंत्र्याचा लढा पुकारला आहे. आपण आपल्या अखंड भारताचे घटक आहोत. भारतीय संग्रामाचेवेळीं आपण अलिप्त राहूं शकत नाहीं. कोल्हापूर संस्थानवर असलेली ब्रिटिश सरकारची

साम्राज्यसत्ता जाऊन ती सत्ता जनतेच्या हाती आली पाहिजे. जनतेला अधिराजसत्तेचे अधिकार मिळाले पाहिजेत. राजाने लोकशाहीचा रक्षक व सेवक म्हणून राहिले पाहिजे. यावेळीं मला अभिमानानें श्रीमहाराणीसाहेबांना नम्र विनंति करावयाची आहे कीं, महाराणीसाहेब आपण जनतेच्या इच्छा आणि आकांक्षा ओळखा. काळाची हांक ऐका......आपण त्या शिवछत्रपतींच्या गादीचे वंशज आहात! आमच्या शिवछत्रपतीनीं सम्राट बादशहाची सत्ता झुगारून देऊन महाराष्ट्र स्वतंत्र केला. बादशहाला कुर्वान केला नाहीं. प्रसंगी तुरुंगवास पत्करून प्राणाची पर्वाही केली नाहीं. त्या शिवछत्रपतींच्या वंशज म्हणून आम्ही तुम्हाला ओळखतो. म्हणूनच तुम्हाला मानाचा मुजरा करतो. नुसत्या हाडामांसाचा एक पुतळा म्हणून मुजरा करीत नाहीं. यासाठीं म० गांधीजींच्या मताचा अंगिकार करा...अशावेळीं मराठ्यांनो खरे राजनिष्ठ व्हा. राजनिष्ठेच्या खोट्या अभिनिवेशानें थोतांड माजवूं नका. शिवछत्रपतींच्या गादीचा संदेश ध्यानी ठेवा. आणि लढ्यांत भाग घ्या. स्वातंत्र्यासाठीं प्राणार्पण करून अमर होतो तोच खरा मराठा! मराठ्यांनो मागे राहूं नका. हजारोंनी पुढें या. महाराणीसाहेब तुम्हीही जनतेच्या आकांक्षेनुसार त्यांचे मागोमाग या. पाहूं काय होते ते. स्वातंत्र्य–संग्रामांत जनतेशी सहमताने वागल्याबद्दल ब्रिटिश सत्तेने तुम्हाला तुरुंगांत घातल्यास आमच्याबरोबर तुरुंगांत या. पाहूं या सरकारची हिंमत! आपल्या तुरुंगवासाची वार्ता कळतांच संबंध महाराष्ट्र खवळून जाईल! आपल्या मुक्ततेसाठीं खडा टाकेल! महाराणीसाहेब ही आमची आशा आहे. जनतेत मिसळून जा आणि स्वातंत्र्यदात्या ताराबाई म्हणून अमर व्हा. नामी संधी आहे.'

**तुरुंगाच्या वाटेवर—** भाषणानंतर दुसरे दिवशीं तीनचे सुमारास महाराणी साहेबांचेकडून वाड्यावर बोलावणे आले. मी सभेत बोललो तेच सारे विचार पुनः त्यांच्यासमोर मांडले. महात्माजींची इच्छाहि पण तीच होती.

महाराणीसाहेबांनी माझे भाषण शांतपणे ऐकून घेतले. त्या मुळींसुद्धां रागावल्या नाहींत... त्यांच्या असहाय्यतेबद्दल राग येण्याएवजीं वाईटच वाटले! जन्मापासून एका विवक्षित साच्यांतून बाहेर पडलेल्या, स्वतत्र वृत्तींना खच्ची करणाऱ्या वातावरणांत वाढलेल्या, स्वार्थलोलुपांनी व स्तुतिपाठकांनी वेष्टिलेल्या जीवापासून मी तरी भलती अपेक्षा करणे चूकच नव्हे काय?

रात्री आठाच्या सुमारास मला अटक होणार असल्याची बातमी कोणी तरी घेऊन आले. मला अटक होणार. मला घर बरेंच दिवस मुकणार म्हणून सौभाग्यवतीनें आवडतें जिन्नस तयार केले होते. त्या दिवशीं एक दोन जिव्हाळ्याचे स्नेहीहि ताटाला आले होते. माझे परमस्नेही डॉ. काटे येऊन गेले होते. शाहूमिलचे कांहीं मजूर आज रात्री अटक होणार असे समजल्यामुळें घरींच बसून राहिले होते. तें परत जाईचनात. आज आम्ही येथेंच रात्र जागून काढणार म्हणून बसले. रात्रीचे बारा वाजून गेले. आम्ही जागेच होतो. बायकोच्या मनाची तयारी झाली होती. मुलालाही वाईट वाटूं नये म्हणून त्याच्याही मनाची तयारी करीत होतो. मी कां जात आहे ते त्याला समजावून देण्याचा प्रयत्न करीत होतो. त्याची किती तयारी झाली आहे हे पाहण्यासाठीं मी एकदां दुपारी बाहेरून येऊन दडून बसलो. व माझ्या स्नेह्यानें त्याला 'आबांना अटक झाली त्यांना धरून नेले' म्हणून सांगितले. त्याबरोबर त्याला गुदमरल्यासारखे झाले. त्यानें तोंड वर केलें नाहीं. आपल्याला वाईट वाटल्याचे दिसेल म्हणून खाली मान घालून बसला. डोळयांतून टिपें टाकली नाहींत. मी गेल्यानंतर त्याला वाईट वाटूं नये व त्याच्या मनाची तयारी करावी म्हणून मी प्रयत्न करीत होतो पण त्याला वाईट वाटले म्हणून मला आनंद वाटला ! काय मनाची विचित्र घटना ही ! आपल्यासाठीं दुसऱ्यांना दुःख होते ही कल्पना सुद्धां सुख देते ! माझ्या गेल्या दोन वर्षांच्या कारावासांत, बेड्या, वाईट अन्न व त्रास यांचे मला विशेष वाटत नसे. पण मुलाच्या आठवणीनें मात्र जीव कासावीस होई. माझी ही दुर्बलता अद्याप गेलेली नाहीं.

**पोलीस पार्टी पकडण्यास आली—** बाराला दिवे कमी व्हायचे, पण ते आज चालून होते. तेव्हां वाटले कोणी तरी आता इतक्यांत येतील. केव्हां येतीलसे झाले होते मला. माझ्यासाठीं सगळे तिष्ठत बसले होते. एकाच्या सुमारास फौजदार पोलीस पार्टी घेऊन घरीं आले. मी तर कपडे करूनच बसलो होतो. त्यांना थांबावे लागले नाहीं. उलट मीच त्यांना म्हणालो—' किती उशीर वाट पहात बसलो आहोत आम्ही.'

बायकोने झोंपलेल्या बाबाला उठवून आणला. त्याला जवळ घेऊन त्याचा निरोप घेतला. सासुबाईही बातमी ऐकल्यानें येऊन बसल्याच होत्या.

रडारडीचा कसलाहि प्रकार न होता सर्वांनी शांतपणें निरोप दिला. बायको माझ्याहून धीराची होती. गिरणी कामगार कडकडून भेटले. आम्ही कांहीं झाले तरी गिरणी बंद ठेवणार म्हणून बोलले.

फौजदार कचेरींत आणखी कांहींना अटक करून आणले होते. प्रजापरिषदेपैकीं रामभाऊ शेटे, माधवराव भोसले व विद्यार्थ्यांपैकीं चार जण होते. आम्हां सगळयांना पन्हाळयावर आणून ठेवले. प्रथम दोन तीन दिवस मामलेदार कचेरीतील तुरुंगाच्या कोठडींत टाकले व नंतर गेल्या खेपेस ज्या वाड्यांत ठेवले होते तेथेच नेले.

पन्हाळ्यावर पुनः— या खेपेस आम्हाला केस चालून शिक्षा झालेली नव्हती. स्थानबद्ध म्हणूनच आणून ठेवले होते. बेड्या नव्हत्या गुन्हेगाराचे ठराविक कपडे नव्हते, घरचेच वापरत होतो. पहिले चार दिवस आम्हाला चांगले जेवण मिळाले नाहीं. पण येथील मामलेदार श्री. जाधव यांनीं पेरींची गांठ घेऊन विचारता रोज बारा आणे भत्ता सुरू केला. गेल्या खेपेस जेवण कैद्यानांच करावे लागे. खोल विहिरीतून पाणी काढावे लागे. न झेपणारे मजुराचे डोइजड काम करावे लागे. या खेपेस हा सर्व त्रास चुकला. घरांतून खाण्याचे जिन्नस आल्यास भर टाकण्याची परवानगी होती. पुस्तकें घरची व लायब्ररीची मिळत होती. भेटीलाहि ठराविक कालाची मुदत नव्हती. आम्हाला मंडळीचा सहवास नव्हता एवढेच. नाहीं तर व्यवस्था घरच्या सारखीच होती. तथापी मला मानसिक यातना होत. या निष्क्रिय जिण्याचा कंटाळा येई.

वाचनांत मात्र चांगली वेळ जाई. रोज आठ नऊ तास वाचनांत जात. बाहेर असतांना असा वेळच मिळत नसे. विचार करायला भरपूर वेळ मिळे. आपण आतापर्यंत जे केले त्यात कोणत्या चुका झाल्या, बाहेर पडल्यानंतर काय केले पाहिजे, याचा विचार करीत बसता येत होते.

पिंपरीचे झाड— एका जुनाट वाड्यांत आम्हाला डांबून ठेवलें होतें. माझ्या बसल्या जागेवरून मला एक झाड दिसत असे सभोवार भिंतीच असल्यामुळे वाऱ्यावर डुलणाऱ्या पानांवर सहजींच माझी नजर ठरत असे. कां कोण जाणें, त्याच झाडाच्या पानांचा आवाज नेहमीं विशेष ऐकू येई. रात्रीं इतर स्थानबद्धांच्या बरोबर त्या जुन्या वाड्याच्या

सोप्यांत झोंपलो होतों. त्या दिवशीं खूप सोसाट्याचा वारा सुरू झाला. पांघरूणहि विस्कटलें. समोर दिसणाऱ्या पिंपरीच्या झाडाचा तर मला भयंकर राग आला. त्याचीं पानें इतका आवाज करूं लागलीं कीं, मला झोंप येणें अगदीं अशक्य झालें. पानांची फडफड सारखी चालू होती.

थकून थकून मला अखेर झोंप लागली. पहाटे सहजींच झाडाकडे दृष्टि गेली. तों काय ! अगदीं आश्चर्याची गोष्ट ! ज्यांनीं मला रात्रभर झोंप पडूं दिली नव्हती, ती सर्व पानें झाडावरून गळून पडलीं होतीं. एकहि पान शिल्लक नव्हतें. झाडाचा बुंधा आणि बारीकसारीक ढाप्या तेवढ्या दिसत होत्या ! पालवींचा आक्रोश बंद पडला होता.

या दृश्यानें त्या झाडावरचा माझा राग कमी झाला. त्याची कींव आली मला. सुंदर इमारत जळून नुसते खांब तेवढे शिल्लक राहावेत, तसें दिसत होतें त्याचें सर्वच ऐश्वर्य लयाला गेलें होतें. हालचाल बंद पडली होती. जीव तरी होता कीं नाहीं कोण जाणें ! डोळ्याला नुसत्या काठ्या भेडसावीत होत्या.

रात्रीं कसला त्रास झाला नाहीं, आवाज झाला नाहीं. पण त्यामुळें मनाला मात्र समाधान झालें नाहीं. स्मशानशांततेचा भास झाला. भरलेल्या बाजारांतील गोंगाट ओसरतांच उदास वाटतें तसें मला झालें.

दुसरा दिवस उजाडला. आज त्याहूनहि आश्चर्याचें, पण आल्हाददायक दृश्य दिसलें. तें आश्चर्य आनन्दाचें व कुतूहलाचें होतें. माझ्या चेहऱ्यावर आपोआपच हास्य उमटलें. पाळण्यांत बालजिवांच्या गोंडस हातपायांनी व कोमल पायाच्या चाळ्यानीं अंतःकरणाला गुदगुल्या व्हाव्यातना तसे झाले मला ! एकाच रात्री त्या फांद्यांना कोंवळीं पालवी फुटली होती. त्यांची हालचाल ! जणुं काय गोजिरवाणी मुलें हंसऱ्या हावभावांनी मला बोलावीत आहेत. मुलांच्या इवल्याशा हाताप्रमाणें ती पण लाल दिसत होती. त्यांची वाढ किती झपाट्यानें होत होती !

तिसऱ्या दिवशीं झाड पानांनीं फुलून गेले. त्यांचे तें लाल नाजुक ओठ, बोबडे बोल बोलूं लागले. मला मोह आवरला नाहीं. तेथून मी त्या प्रत्येकांची पटापट चुंबनें घेऊ लागलो. स्पर्शाशिवायही आनंद भोगता येतो. सर्वत्र हास्य ध्वनि उमटला. सर्व झाड जड जवाहिरांनी भरून गेलें.

बारशाचा थाटमाट चालू झाला. पक्षिगणांनीं सुस्वर सनया सुरू केल्या, आया बायांचे भरजरी शालू चमकूं लागले. सर्वत्र आनंदी आनंद !

गळलेल्या पानांचे दुःख विसरले गेले. तेथे नवी पालवी फुटली होती. गेल्या पिढीच्या जागी नवी पिढी आली होती. डोळ्यासमोरच वाळलेली जुनी पानें गळून पडली होती. तेथे त्यांतून सरस जोमदार पालवी फुटली होती. जुनी खोडे गेली. कीं नवी रोपे उगवणारच ! नव्या जुन्याच्या झगड्यांत जुनें नाहींसें होणार !

माणूस मर्त्य असला तरी मानववंश अमरच नाहीं कां ? तो कुठें नाश पावतो ! एक गेला त्याच्या ठिकाणीं दुसरा येतो. एक पिढी गेली दुसरी पिढी येते. तिचे राहिलेले काम करून पुढें जाते. पुढचें पाऊल टाकते. आम्ही पण हेच नाहीं कां करीत ? जीवन प्रवाह सारखा पुढे जात आहे. मध्यें खडक उभे राहतात. दऱ्या येतात. पण तो सर्व विरोध बाजूस सारून तो पुढे जात आहे. प्रवाह ! कुठें खडक फोडतो. कुठें वळणे घेतो. प्रसंगी कड्यावरून उडी घेतो पण तो थांबत नाहीं.

**शांतता कमेटी—** तुरुंगाबाहेर असलेल्या आमच्यांतील कांही वकील कार्यकर्त्यांनी एक शांतता कमेटी नेमली. सरकारशी सहकार्याचा हात पुढे केला. ही गोष्ट लोकांना कांही आवडली नाहीं. हा कांही हिंदु मुसलमानांचा दंगा नव्हता. लोकांकडून कसलाच अत्याचार घडला नव्हता. सरकार आणि लोकपक्षांत ही शांतता कमेटी कसले काम करणार ? मला भावनाप्रधान व स्वतःला व्यवहारी म्हणवून घेणाऱ्यांची ही कमेटी होती.

मला तरी असा अनुभव आला आहे कीं, ज्यांच्या अंगी धाडस नाही, व ज्यांना कोणत्यातरी सबबीवर आपली कातडी शाबूत राखून पुनः मोठेपणा मिरवायचा असतो अशा लोकांना ‘ व्यवहारी धोरण ’ हें एक पांघरुण आहे. पुढें पुढें करायला पाहिजे, देशभक्त म्हणवून मिरवायला पाहिजे पण घस सोसायला नको. यांना लोकांत व सरकारांत मोठेपणा भोगायला हवा. स्वतःच्या दुर्बलतेचे समर्थन करण्याचा हा एक कावेबाजपणा आहे.

**पेरींची इच्छा—** मी तुरुंगांत रहावे अशी नव्हती. सर्व मिनिस्टर्स व राणीसाहेब यांनी १७–३–४३ ला आमची तुरुंगांत येऊन भेट घेतली. ‘ गादीशी स्वामिनिष्ठ राहू व युद्ध प्रयत्नास विरोध करणार

नाहीं, एवढें लिहून द्या आणि बाहेर चला,' असें त्यांनी आग्रहानें सांगितलें. युद्धाला विरोध ही तर आमची भूमिका नव्हतीच. घटनेंत राजाला स्थान असल्यामुळें गादीची निष्ठा त्यांत अंतर्भूत होती. तथापी लिहून देणे अपमानास्पद वाटले. ‘ तुम्ही चोरी करीत नाहीना ? मग चोरी करणार नाही असे लिहून द्या ’ म्हटले तर ते नाहीं का अपमानास्पद वाटणार ! तेंव्हा आम्ही लिहून देणार नाहीं असे मी अधिकाऱ्यांस सांगितले. इतर स्थान-बद्धानींही— माधवराव म्हणतील तेच आम्हाला मान्य असें सांगितले. चळवळीच्या दृष्टीनें विद्यार्थ्यांनी ही फार चांगली गोष्ट केली. यामुळें आम्ही सर्व एक आहोत अशी त्यांची खात्री झाली. यानंतर बरेच दिवस वाटाघाटी बंद पडल्या. आम्हीही सुटकेचा विचार मनांतून काढून टाकला. आमची सुटका झाली तर ती कॉंग्रेसच्या तडजोडीनंतरच होणार असें आम्ही ग्रहीत धरून चाललो.

**तुरुंगांतील व्यवस्था, व आम्हा कांहींची वागणूक—** आम्हां स्थानबद्धांची व्यवस्था पूर्वी भोगलेल्या तुरुंगवासाच्या मानानें फारच चांगली ठेवली होती. आम्हां प्रत्येक स्थानबद्धावर महिना वीस बावीस रुपये खर्चले जात होतें. आमचें जेवण करणाऱ्या स्वयंपाक्याला दरमहा सहा रुपये पगार होता. घरदार, कपडेलत्ते सर्व कांहीं सहा रुपयांत ! त्याच्या घरीं त्याच्यावर अवलंबून असणारी चार माणसें होती. माणूस म्हातारा, अशक्त, रोगी, पेन्शनीच्या काळांत आलेला ! सहा रुपयांत त्यानें इतकी माणसें पोसायची ! माणसी महिन्याला दीड रुपयाहि पडत नव्हता. दिवस महागाईचें. त्याच्या हातून पाप घडले असेल कदाचित्. तो धान्यांतील कांहीं अपहार करीत असल्याचा त्यावर आरोप आला. आम्हां सर्वांच्या भत्त्यांतून फार तर रोज मूठभर तांदूळ, थोडे पीठ, दोन चार कांदे थोडी चटणी नेली असेल! पण त्यानें आमच्या जेवणावर कांहीं परिणाम होत होता, कांहीं कमी पडत होते. असें मला तरी वाटत नव्हते. पण हे विद्यार्थ्यांना सहन झाले नाहीं, त्यांनी ते चव्हाट्यावर आणले ! सारखा तो विषय आणि पुनः हुडकून काढण्याविषयीं क्लुप्त्या ! त्याचा सारखा खल. त्यासाठीं डोके इतके चालू लागले कीं, चोरीचा माल वगळला तर दोघांच्याहि मनाची अधोगति तेवढीच झाली होती. यामुळें मी चोराला प्रोत्साहन देतो असा मजकूर ते आरोप करीत. त्यांच्या दृष्टीनें ते बरोबरच होते.

किती प्राप्तीच्या माणसाने चोरी केली आणि कोणती केली व त्यानें आमचे काय नुकसान झालें व तशी चालू राहिली असती तर त्याचा परिणाम काय झाला असता, याचा विचार करता मला अद्यापही असेच वाटतें कीं त्यांच्या अपराधाकडे दुर्लक्ष करणें आम्हाला कमीपणा आणणारे झाले नसते. जोपर्यंत त्याचा पगार दरमहा सहा आहे, आणि जोपर्यंत त्याच्यावर अवलंबून राहणारी माणसें चार आहेत, तोपर्यंत त्याच्या वर्तणुकींत सुधारणेची अपेक्षा मला तरी करता येत नव्हती. माझे मन सांगे, चोरी पदरांत घालण्यापेक्षां अपराध पोटांत घेणेच बरे. गरीब लोकांच्या या अशा गुन्ह्याकडे समाज सेवकांनीं दयार्द्रतेनेच पाहिले पाहिजे असें मला वाटतें. इतराप्रमाणें कांहीं केल्या मला त्याचा राग येत नसे. हा माझ्या मनाचा कमकुवतपणाहि असूं शकेल.

**पन्हाळ्यावरून सुटका—** तारीख ३१ एप्रिल १९४३ रोजी पेरी दिवाण यांचेकडून एकजण पत्र घेऊन आले होते. त्यांत ' मला आठ दिवस विनशर्त सोडण्यांत आले आहे व त्या मुदतींत मी वर्किंग कमिटीची बैठक बोलवावी ' अशी इच्छा प्रदर्शित केली होती. मला त्या पत्राचा बरोबर अर्थबोध होईना. म्हणून पेरींचा हेतु समजून घेण्याकरिता मला त्यांनाच प्रत्यक्ष भेटावे लागेल व त्यांच्याशीच वाटाघाटी कराव्या लागतील असा निरोप देऊन मी त्याना परत पेरींच्याकडे पाठवले.

दोन तीन तासांनी पेरी दिवाणसाहेब कोल्हापुरांहून आपल्या गाडीनें पन्हाळ्यास आले आपल्याबरोबर कोल्हापुरास चला म्हणूं लागले. पण ' माझा उपयोग निव्वळ मी एकटा बाहेर येण्यानें तुम्हाला कांहीं होणार नाहीं. कांहींही बोलायचे झाले तर मी वर्किंग कमिटीच्या सभासदांशी वाटाघाट केल्याशिवाय बोलणार नाहीं. बागल व्यक्ति म्हणून मी कांहीं बोलूं इच्छित नाहीं. तेव्हां त्या मंडळींना आपण सोडत असल्यास मला न्या ' असे मी सांगितले.

' ते पाहूं तुम्ही अगोदर आपले सामान तयार करा. मी अर्ध्या तासांत येतो ' असे म्हणून ते गेले. अर्ध्या तासाने ते आले. पण मी माझी वळकटी वगैरे बांधली नव्हती. मी पुनः त्याना तेच सांगितले, कीं, ' तुम्हीं वर्किंग कमिटीच्या मंडळीशी भेट घालून देत असल्यास मी येतो नाहीं तर मला यावेसे वाटत नाहीं. '

'तुम्ही अगोदर गाडींत बसा मग काय ते पाहूं' असे सांगितले. नोकराला माझी वळकटी बांधण्यास सांगितले व सामान आपल्याच गाडींत टाकले. आणि त्यांनी स्वतःच मला माझ्या घरीं आणून सोडले. व बायकोला म्हणाले, 'आतां बाहेर सोडूं नका यांना. बसूं देत कांहीं दिवस घरांत स्वस्थ'.

सॅबोटेजचा मी निषेध करावा अशी त्यांची फार इच्छा होती. पण व्यक्तिशः तशी घोषणा करण्याचे मी टाळत होतो. त्यांतही तशी घोषणा व निषेध करण्याची मला अवश्यकता भासली नाहीं. प्रजापरिषदेचे धोरण अहिंसेच्या मार्गानें जाण्याचेच ठरले होते. माझ्या स्वभावालाही जाळपोळ, नासधूस व दडून कार्यक्रम करणें, भीतीमुळें नव्हे तर वृत्तीमुळेंच जमण्याजोगें नव्हते. या सर्व गोष्टींचा विचार करून मी तटस्थाचीच भूमिका स्वीकारली. हिंसा मार्ग तर मी केव्हांच स्वीकारला नाहीं. दुसऱ्यास स्वीकारण्यास सांगितला नाहीं पण निषेधही केला नाहीं.

**टाकाऊ राज्यघटना—** पेरीनीं मला सोडून दिले तरी राजकीय धोरणांत बदल झाला नाहीं. आम्ही त्याज्य ठरवून झिडकारलेली राज्यघटनाच प्रजेवर लादण्याचा दरबारचा विचार होता. या घटनेंत ५१ सभासदांपैकीं २६ सरकारचें, २५ लोकांचें, पैकीं १३ अप्रत्यक्ष म्हणजे इलाखा पंचायत व म्युनिसिपालिटी वगैरे संस्थेतर्फे! अशा घटनेंत लोकांचें काय चालणार? हुकमी बहुमत सरकारचे! अशी ही घटना स्वीकारायची म्हणजे प्रजापरिषदेच्या लौकिकाला काळे फांसण्यासारखेच होते. कांहीं मवाळांची त्यालाही तयारी होती! यामुळें सरकारला– कॉंग्रेसपासून आम्हाला अलग पाडता आले असते. आज ना उद्या केव्हां तरी कॉंग्रेसशी ब्रिटिश सरकारला समेट करावा लागणारच होता. त्यावेळीं कॉंग्रेसच्या प्रश्नाबरोबर संस्थानचाही प्रश्न सुटेल हे जाणून कॉंग्रेसच्या यशापयशाबरोबर आपलेही भवितव्य गोंवले गेले आहे असें समजून वागणे हे योग्य ठरेल म्हणून या योजनेवर आम्ही बहिष्कार टाकला.

यावेळीं प्रचाराला आमच्याजवळ पत्राचें साधन नव्हते. त्यामुळें बरीच अडचण भासत होती. तथापी खूप प्रचार केला. शहरांत म्यु. पालिटीचे

निवडणुकीवेळीं पंधरा हजार मतापैकीं आम्ही १४००० मिळवली होती. आतां बहिष्कार टाकलेल्या असेंब्लीच्या उमेदवारांना १६००० पैकीं फक्त २५०० च पडूं शकली.

**अखंड–भारत अनपेक्षित सहाय्य**— ज्यांची 'जानपछान' नाहीं; कधी संबंध आले नाहींत, हस्तिदंती चमत्कारही कधी झाले नाहीत, माझ्या घरीं ही व्यक्ती येईल अशी मी कधी अपेक्षाही केली नाहीं, अशी व्यक्ती रात्रीं नऊच्या सुमाराला माझ्या घरीं आली. प्रभाकरपंत कोरगांवकर ही ती व्यक्ति.

काय बोलावे याची त्यांना अडचण पडली असावी. आपण कां आलो ते त्यांना बरोबर सांगता येईना. शब्द घुटमळत असावेत असे दिसूं लागले. पण कांही तरी विषय काढावा म्हणून काढला व कांहीं वेळानें त्यांनी माझ्या हातावर दोन हजारांच्या नोटांचे पुडकें ठेवले व त्यानंतर ते म्हणाले— ' आपण हे स्वीकारावे अशी माझी इच्छा आहे ' मी मोठ्या बुचकळ्यांत पडलो. मला याचा अर्थच समजेना ! मला पैसा कां ? मी यांचे काय काम करणार ? मी पैसा खाणारा आहे काय ? यांनी माझ्याविषयीं कल्पना तरी काय करून घेतली आहे ? लाच ? काय मला विकत घ्यायचा डाव तरी नसेल ! माझ्या अंगावर शहारे आले ! काय, मी इतका ध्येयच्युत आहे असे यांना वाटले ? माझी इतकी कां अधोगती झाली आहे ? मग यांना मला पैसे देण्याची बुद्धी कां सुचावी ? हा कांहीं सत्ताधिशांचा खेळ तरीं नसेल ? राग, भीति, शंका या भावनांचा गोंधळ उडून गेला ! सर्व वाईटच कल्पना त्यांच्यावर लादूं लागलो ! अपमान करण्याचं धाडसहीं होईना.

माझ्या खर्चाची कशीबशी तोंडमिळवणी होत असे. पैशावांचून माझं नडलं नव्हतं. स्वतःसाठी मला गरजही नव्हती. म्हणून मी त्यांना म्हणालो—

" आज मला जरुरी नाहीं. जरुरी लागलीच तर मी अवश्य येईन" पण हे बोलल्यामुळें ते दुखवले गेले. मलाही वाईट वाटले. पण उगाच पैसे घेणे मला बरं वाटले नाही. जरुर नसता पैसे घेऊं लागल्यास ही वृत्ती बळावून माझा अधःपात होईल ही मला भीति वाटत होती. या मोहाची मजवर पकड बसली तर आतापर्यंतचे माझे आयुष्य नरकांतच नाहीं कां मी ढकलणार ? माझ्या मनाला हा पैसा कधी विसांवा देईल काय ?

अंतःकरणाच्या टोचणींनेच मी मरून जाईन. याचमुळे मी तो पैसा घेऊं शकलो नाहीं. मी नाराज करून त्यांना परत पाठवलं.

यानंतर कांहीं काल लोटला. देणगी मागें सत्ताधिशांचा किंवा कांही स्वार्थाचा डाव असेल असे कांहींच दिसले नाही. राहुन राहुन विचार येत. निस्वार्थबुद्धीनें, ज्या देणगीचा गाजावाजा होत नाहीं, हे जाणून गुप्तदान देणारे लोक खरोखरीं जगांत असतात काय ? नसतील तरी कशावरून ? कांही दिवस गेल्यानंतर त्यांनी मला आपल्या घरीं बोलावून घेतलं व प्रश्न काढला. " आपण कांही तरी गैरसमज करून घेतला असावा. मी ती रक्कम आपल्यास उघड देऊं शकत नाहीं. त्याची कारणें आपणही जाणू शकाल. त्यानें मीच संकटांत पडेन. मला नांवानें प्रकट होता येत नाहीं. आपण राजकीय चळवळ करणारे आहांत. माझे व दरबारचे संबंध नेहमी येतात. म्हणून मला तसें करता येणार नाहीं. पण मनाचा ओढा आपल्याकडे आहे. आपण जी जनसेवा करीत आहात तिच्याच कारणी ही रक्कम लागावी अशी माझी इच्छा आहे. त्या करता ती रक्कम अद्याप तशीच बाजूस ठेवली आहे. आपण ती स्वीकारल्यास मला बरें वाटेल. "

या देणगी मागें देणाऱ्याचा व्यक्तिस्वार्थ नाही हें मला दिसून आले. कारण आज ही व्यक्ति सरकारी नोकरींत नव्हती, यांत मला विकत घेण्याचा डाव नव्हता. पैशाभावी वर्तमानपत्र काढण्याची माझी इच्छा सफल होणें अवघड होऊन बसले होते. प्रचाराचें साधन हातीं नव्हते. तेव्हां यांतून पत्र काढण्याची इच्छा मी त्यांना बोलून दाखवली. तें म्हणाले, ' पैसे तुमचे आहेत तुम्ही त्याचे कांहींही करूं शकता. '

अशा प्रकारें दुसऱ्याची देणगी स्वीकारण्याचा माझ्या आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग. अर्थात ती देणगी मी सार्वजनिक सेवेलाच लावली. पत्र निव्वळ प्रचाराच्या हेतूसाठींच काढले. नांव ' अखंड भारत ' हे दिले. वर्गणीदारांचा विचार न करता खेडोंपाडीच्या कार्यकर्त्यांना दीड हजार अंक सुरवातीस चालू केले. पुढें पुढें पत्रास येणारी तूटही प्रभाकरपंत भरून काढीत. पत्राच्या धोरणाविषयीं त्यांनी कधीही कसली सूचना केली नाहीं. धोरण अमके असावे असें कधीही सुचवले नाहीं. त्याबाबत मला पूर्ण स्वातंत्र्य होते.

**वि. स. खांडेकर—** पत्र काढायचे ठरल्यानंतर खांडेकर यांचेकडे जाऊन त्यांना एकंदर परिस्थिति निवेदन केली. त्यांचे सहाय्य मागितले व पत्राचे सहाय्यक म्हणून राहण्याची विनंति केली. त्यांनीं तिला लगेच मान्यता दिली. भाऊसाहेबांचे बहुमोल लिखाण पत्राला सतत आणि विनामूल्य मिळाले. पैसे देऊनही अनेकांना त्यांचे लेख मिळूं शकले नाहींत. पण आजारीपणातूनहीं त्रास घेऊन भाऊसाहेब मला लेख देत. अखंड—भारतांतले त्यांचे लिखाण वैशिष्ठयपूर्ण होते. माझ्या पत्राचे धोरण आणि विचार यांशी ते सहमत होतेच असे नाहीं. पण त्याचा त्यांनी कधी विचारही केला नाहीं. हा लेख असा कां असे कधी विचारले नाहीं. ब्राह्मण्यावरती मी नेहमी हल्ला करीत असें पण त्यामुळें ते कधी नाराज झाले नाहीत कीं, वागण्यांत बदल केला नाही. माझे विचार न जुळणारे असतील, चुकीचेही असतील, पण माझ्या प्रामाणिकपणावर त्यांचा विश्वास होता. याचमुळें त्यांच्याविषयी आदर व प्रेम उत्पन्न झाले. मित्र म्हणूनही त्यांचा लोभ जडला आहे. स्फटिकासारखं निर्मळ अंत:करण, आंत बाहेर एकाच जिव्हाळ्यानें ओथंबलेली ती वाणी, किती प्रेमळ आणि ज्ञानपूर्ण असते. हे आमचे संबंध आजपर्यंत टिकले आहेत व वाढले आहेत. अनेक अडचणीच्या प्रसंगी मी त्यांची सल्ला घेत आलो आहे; सुखदु:खाच्या गोष्टी मोकळ्या मनानें बोललो आहे. त्यांची बहुमोल वेळ मी माझ्या करमणुकीसाठी वाया दवडली आहे.

**आचार्य शंकरराव जावडेकर—** आचार्य शंकरराव जावडेकर यांचाही मला लाभ झाला. त्यांच्या योग्यतेचे वर्णन मी येथें करण्याचे कारण नाहीं. असा एक जाडा विद्वान्, गांधी वादावरील ज्यांचे लिखाण अधिकृत समजले जातें व ज्यांचे लिखाण विचारवंतांना मार्गदर्शन करूं शकते असे सहाय्यक मिळाले. पण आता त्यांच्या माझ्या विचारांत पूर्वीची एक-वाक्यता उरली नाहीं. पूर्वीं मी कट्टर गांधीवादी होतो; आतां गांधीवादी उरलो नाहीं. अनुभवानें व वाचनानें माझे विचार बदलेले आहेत. आत्मविकासाच्या दृष्टीनें मला गांधीवाद अध्यापही मान्य आहे, पण जनतासंघटनेला तो तसा उपयोगी नाहीं असें माझे मत बनले आहे. ही मतभिन्नता असली तरी त्यांचे विचार अद्यापही वाचावेसे वाटतात. त्यांच्या गाढ विद्वत्तेबद्दलचा

माझा आदर कांही कमी होणे शक्य नाहीं. पण मार्क्सवादाचा परिणाम माझ्यावर फार झाला आहे. पूर्वी त्यांच्या भेटीस इस्लामपूरला जात असे. आज कोरगांवकर ट्रस्टमुळें पुनः गांठी भेटी पडतात.

सहसंपादक म्हणून महाबळ नंतर शेख नंतर कारखानीस असे घेतले. त्यांना कांही मेहेनताना देत होतो.

**हिंदुसभेवाल्याचा मजवर अत्याचार—** दे. भ. हरिभाऊ जोशी स्थानबद्धतेतून मुक्त होऊन कोल्हापूरास आले. विद्यार्थ्यांनी त्यांचे व्याख्यान कपिलतीर्थात ठेवले. मी अध्यक्षस्थानी होतो. व्याख्यानाचा विषय महात्माजींची मुक्तता असा होता. व्याख्यान रात्रीं साडेनऊ वाजतां संपले असेल. सभेनंतर परत निघालो. जागेपासून फर्लांगावर, जगदंबेच्या समोरील दिवा व ग्रंथभांडार याच्या दरम्यान, दोन्ही दिव्याच्या मधील जागी, माझ्यावर मागाहून अचानकपणें हल्ला झाला. माझ्या हातांत सायकल होती. मी पायीच चाललो होतो. सभेंत कसलाच वादग्रस्त प्रश्न आलेला नव्हता. कसलेच मतभेद दर्शविले गेलेले नव्हते. त्यामुळें असा कांहीं प्रसंग गुदरेल याची अंधुकही कल्पना नव्हती. मी पूर्णपणें बेसावध होतो. त्यामुळें मी आश्चर्यानें गोंधळून गेलो. कोठून हल्ला होत आहे हें समजण्यापूर्वीच माझ्या अंगावर २–३ बोटेजाडीची कांठी आघातानें मोडली गेलीं. मी मागें वळून पाहतो तो हल्ला करणाऱ्या माणसाला लोकांनीं पकडले होते व त्याला मारण्याच्या बेतांत होते. पण त्याला सोडवून मोकळे केले. त्याचे अंगाला हात न लावण्याची ताकीद दिली व त्याला ' मारण्याची इच्छा अपुरी राहिली असल्यास ती उगवून घे याबद्दल तुला कोणी मारणार नाहींत याची काळजी घेतो ' असे म्हणालो. पण तो समाजाला पाहून म्हणा वा आपल्या कृत्यामुळें म्हणा खजिल झाला होता. ' आता मला मारावयाचे नाहीं ' असे म्हणाला. मारतांना अखंड–भारतांतील लेखासाठीं मारतो आहे असे म्हणाला होता.

हा माणूस हिंदूसभावाला होता. यानें पूर्वी अशीच धमकीचीं पत्रें पाठवली होती. म्हणजे हल्ला निव्वळ भावनाप्रधान नव्हता. चिडण्याला तात्कालिक कारण नव्हतें. सभेंत हिंदु व मुसलमान, सावरकर व जिना हे शब्दही उच्चारले गेले नव्हते. म्हणून हा हल्ला पूर्व तयारीनें, व्यवस्थितपणें ठरवून, आंखून केला होता असे दिसले. हिंदुसभावाल्यांकडून आतापर्यंत जे हल्ले केले गेले

ते मुसलमानावर केले गेले नाहीत हे विशेष. अहिंसावादी कॉंग्रेसवाल्यावरच ते केले गेले. मिरजेंत व पंढरपुरांत माझ्या सभेंत हेच प्रयोग झाले. म्हणून या गोष्टी कांहीं व्यक्तिच्या नसून त्यामागें विशिष्ट विचारसरणी आहे असे मानण्याइतका सबळ पुरावा बाहेर पडला. मला मारल्यानंतर त्या रात्रीं त्यालाहीं कोणी मारल्याचे सकाळीं मला समजले. म्हणून मी त्याचें भेटीस गेलो. तो भेटला नाही. बाहेर गेला होता. पण मी आल्याचे समजल्यानें तो परत भेटीस माझे घरी आला व आपली चूक त्यानें कबूल केली.

ही जी वागणूक झाली त्याचे कारण माझ्या हातून घडलेली अहिंसेचीं वागणूकच असावी असे मानण्यास कांहींच हरकत नाही. या वागणुकीनें माझ्याविषयीं लोकांत पूर्वींहून सहानुभूति अधिक वाढली. शेंकडों लोक भेटायला घरीं आले. मजूरांच्या तर झुंडी आल्या. यामुळे माराचा विसर पडला. व अगदी थोड्या चांगल्या कृत्याचा भलता मोबदला मिळाला असे वाटूं लागले. पण हा व्यक्तिविषयक प्रेमाचा ओढा, अहिंसावादाकडे न्यावा म्हणून सभा बोलवली. या प्रसंगामुळें सभाहि मोठी झाली. नुसत्या अहिंसावादाच्या व्याख्यानाला इतके लोक आले नसेत. या मनोभूमिकेचा फायदा घेऊन तत्वाचा प्रचार करणे हे मला प्रचारक या दृष्टीनें अत्यंत अगत्याचे वाटेल. कांहीं मित्रांचा व माझा या बाबतीत मतभेद झाला. प्रचाराचें त्यांना इतके महत्व वाटले नाहीं. स्वतःचा थोरपणा मला मिरवायचा होता असे टीका करणारे जरी असले तरी त्याचा विचार करून ही संधी गमवणे प्रचारक या दृष्टीनें चुकीचे होते. कुत्सित निदान करणारे ते केव्हांही करणारच. या हल्यानंतर हल्ला करणाऱ्यांच्या चारिष्टाचे कौतुक करणारे व हा हल्ला शूराचा म्हणणारे निघालेच. इतकेच नव्हे तर मारलेली कांठी ही चिंबलेलीच होती असे अविचारी विधान टीकेच्या भरांत करून आपण या विधानामुळें कटांत असल्याचा संशय लोकांना येईल याचाही विचार त्यांना आला नाही. ती कांठी चिंबलेली होती हे यांना कसे माहीत? यावरून हल्ला करणारा एकटाच नव्हता तर त्या मागे कट होता असे कोणालाही अनुमान काढता येईल.

———

# ताराबाई महाराणीसाहेबांच्यावर गंडातर

बातमी कानावर येऊन थडकली ! छ. ताराबाई महाराणीसाहेब यांची मन:स्थिती ठीक नाहीं. कोल्हापुरला लवकरच ॲडमिनिस्ट्रेटर नेमला जाणार ! तेथें बागवे येणार !

सर्वच बुचकळयात पडले. बातमीनें कोणालाच समाधान होण्याजोगें नव्हते. धड राजशाही नव्हे, धड लोकशाही नव्हे ! तर्क कुतर्क मात्र गांवभर चालू झाले. सर्वत्र हाच चर्चेचा विषय ! याचा अर्थ प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारचा अंमल सुरू होणार !

छ. ताराबाई महाराणीसाहेब या रीजंट होत्या. पण राज्याची सर्व सूत्रें पंतप्रधान बागवे हेच हलवीत होते. हे मोठे महत्वाकांक्षी राजकारणपटु आणि मुत्सद्दी म्हणून समजले जात होते. फारसे बोलत नसत. त्यांच्या अंतरंगाचा ठाव कोणाला लागणार नाही. राणीसाहेबांहून त्यांचे व रेसिडेंट हार्वे यांचेच संबंध अधिक प्रेमाचे व विश्वासाचे होते. हार्वे त्यांचाच सल्ला विशेष घेत.

राणीसाहेब पूर्वी आजारी असल्याचे कांहीच कळले नव्हते ! म्हणून आम्हाला ही बातमी संशयास्पद आणि रहस्यमय वाटली. कोल्हापूर सरकार विरुद्ध आमचा लढा चालू असला तरी व्यक्ती म्हणून राणीसाहेबांविषयीं माझ्या मनांत वांकुडपणा नव्हता. राजाराम महाराजांच्या कांहीं अधिकाऱ्याप्रमाणें माझ्याशी त्या सूड बुद्धिनें वागल्या नव्हत्या. त्यांचेवर संकट आलं असताना स्वस्थ बसणं बरं वाटेना. स्त्री माता आणि नागरिक म्हणून आणि छत्रपतींच्या घराण्यांतील एक स्त्री म्हणून आम्हास आदर वाटत होता. म्हणून या प्रकरणांत मी मन घालण्याचं ठरवलं. माझ्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या अखंड भारत साप्ताहिकांतून रीजन्सी कौन्सिलला विचारणा केली.

' रीजन्सी कौन्सिल मुग्ध कां ? त्यांनी राणीसाहेबांबाबत जनतेला अज्ञानांत कां ठेवलं ? राणीसाहेबांना वेडे ठरवणारे कोण ? अर्ज कोणी केला ! कोणाची ही कारवाई ? ॲडमिनिस्ट्रेटर कशासाठीं ? त्यांची प्रकृती ठीक नसल्यास धाकट्या राणीसाहेब नाहीत काय ? ' यावेळीं सत्यवादीत शिरगूरकर पाटील यांनी एक लेख लिहिला होता. त्यानीही शंका प्रदर्शित केली होती.

व्यक्ती म्हणून राणीसाहेबांच्यावर जर अन्याय होत असेल तर तिकडे डोळेझांक करणे मला होईना. ॲडमिनिस्ट्रेटर नेमला गेला तर इंग्रज सरकारला आयतीच सवड मिळेल ! राजा नाही म्हणून जनतेच्या मागण्यांचा विचार करता येत नाही असं म्हणण्याचा फार संभव होता ! त्यामुळें राजकीय लढाही अवघड होऊन बसला असता. म्हणून या विरुद्ध चळवळ करण्याचे ठरवले. ता. २३-६-४५ ला शिरोळ व कोल्हापुरला सभा घेतल्या. ' कोणत्या डॉक्टरने तपासले आहे, त्याचा रिपोर्ट समजावा व आमच्या डेप्युटेशनला भेटण्याची परवानगी मिळावी.' अशा मागण्या केल्या.

**आमचे सोडवणुकीचे प्रयत्न व तकलुबी राजनिष्ठ—** यानंतर मुंबईस गेलो. श्री. बाळ गंगाधर खेर यांना सारी हकीकत सांगितली. बरोबर डॉ. अप्पामहाराज होते. खेरांनी बॅ. जयकर यांना भेटण्याची सल्ला दिली. त्यानीच जयकरना फोन केला. जयकरांचेकडून बऱ्याच गोष्टीवर प्रकाश पडला. ' राणीसाहेब आपल्याला भेटल्या होत्या व चांगल्या माणसाप्रमाणेंच बोलल्या ' असें त्यांनी सांगितले. त्यांनाही या प्रकरणांत कांही काळेबेरें असल्याचा संशय आला होता. वकीलाखेरीज त्यांची गांठ किंवा माहिती मिळणार नव्हती. म्हणून ॲड. दौंडकर व जयकरांचेचपैकीं त्या आडनांवांचे एक बॅ. जयकर यांना वकील म्हणून नेमले. राणीसाहेबांना योग्य तो सल्ला देण्याची कामगिरी त्यांचेवर सोपवली. खर्चासाठीं मी माझ्या मित्रमंडळीकडून कांही रक्कम जमवूं शकलो. श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर व डॉ. अप्पामहाराज श्री. अप्पासाहेब पंत यांचे सहाय्य झाले. पण ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट यावेळीं राजनिष्ठ म्हणून मिरवणाऱ्या कोणा इनामदार, सरदार किंवा त्यावेळच्या कोणी अधिकाऱ्याचे आम्हास सहाय्य मिळाले नाही. स्वतंत्रपणे कोणी कांही सहाय्य करीत असल्याचेही कळले नाही. या लोकांची राजनिष्ठा निव्वळ नाटकी होती. हे लोक राजनिष्ठ नव्हते, जातिनिष्ठ नव्हते, हे

कशाचेच अभिमानी नव्हते! लोकशाही चळवळीला तर यांचा विरोधच होता. हे होते फक्त व्यक्तिनिष्ठ! स्वतःचे आसन शाबूत ठेवून हातपाय पसरणे हे यांचे ध्येय. राणीसाहेबांची गांठ घेऊन प्रत्यक्ष वस्तुस्थिती पाहण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला. पण त्यांची गांठ पडूं नये अशीच व्यवस्था केली होती. मात्र डॉ. धनवडे यांनी डॉ. तिरोडकर यांना दिलेल्या पत्राचा थोडा फायदा झाला. त्या स्थानबद्ध असल्यासारख्याच होत्या. यामुळें या घटनेमागें कांहीं कारस्थान आहे अशी सबळ शंका आली.

**य. ना. देशपांडे**— मुंबईहून परत आल्यावर प्रजापरिषदेची बैठक घेतली 'आजाराबाबत अधिकृत खुलासा झाला पाहिजे. प्रत्यक्ष गांठ घेऊ दिली पाहिजे असे ठराव पास केले. गुप्ततेबद्दलही निषेधाचा ठराव पास केला. कार्यकारी मंडळांत श्री. य. ना. देशपांडे यांनी ठराव पास करण्याबद्दल फार जोरानें बाजू मांडली. पुढें प्रजापरिषदेंत, विलीनीकरणाची घाई होतां कामा नये व व्हायचे तर ते लोकसंमत्तीने व्हावे म्हणणाऱ्यापैकीं य. ना. देशपांडे हे होते. कोल्हापुरचे ते नगराध्यक्ष असतांना अशा अर्थाचा ठराव त्यांचे अध्यक्षतेखालीं पास झाला. त्याबद्दल ते नंजाप्पाच्या रोषास कारणीभूत झाले. त्याबद्दल त्यांना कांही काल तुरुंगवासही भोगावा लागला. संयुक्त महाराष्ट्र निर्माण होईपर्यंत कोल्हापूर विलीन होऊं नये अशा मताचे ते होते. प्रजापरिषदेंत झालेल्या दुसऱ्या गटांत ते केव्हांही गेले नाहीत. जी थोडी मंडळी अखेरपर्यंत नेकीने राहिली त्यात देशपांड्याचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागतो. पुढें प्रजा-परिषदेंत जी फूट पडली त्यातले बहुतेक सर्व वरील ठरावाला संमती देण्यास कुरकुरत होते. पण उघड विरोध करण्याची मात्र छाती झाली नाही.

**अखंड-भारत बंद पाडले**— यानंतर मी अखंड भारतांतून बागवे व रीजन्सी कौन्सिलवर सारखी टीका करूं लागलो. दौरा काढून अनेक सभा घेतल्या. याचा अन्यप्रकारें बागव्यांनीं सूड उगवला. पेपर कंट्रोलचे निमित्त पुढें करून अखंड-भारत साप्ताहिक बंद पाडले. २ ऑगष्ट ते ११ ऑक्टोबर १९४५ पर्यंत म्हणजे मिचेल पंतप्रधान येईपर्यंत तें बंद होते. त्यांच्या परवानगीनें ते पुनः सुरूं झाले.

राणीसाहेब या गंडांतरांतून पार पडल्या, याचे मुख्य श्रेय प्रजापरिषदेच्या ठरावालाच द्यावे लागेल व कायदेशीर झगडा देऊन व हा आपलाच प्रश्न

समजून त्यांची सुटका करण्यासाठीं व कारस्थानी लोकांचे डाव त्यांच्यावर उलटून पाडण्याचेसाठीं ॲड. दौंडकरांनी खूपच परिश्रम घेतले. नाहींतर त्यांची वेड्याच्या इस्पितळांत पाठवण्याची सर्व तयारी झालीच होती.

राणीसाहेब या कारस्थानी लोकांच्या पकडीतून निसटल्या. पण त्या लोकांना चव्हाट्यावर आणण्याचे व शासन करण्याचे धारिष्ट्य त्यांनीं दाखवले नाहीं.

× × ×

**माझी व्याख्यानें व माझी जात—** अखंड भारत बंद केल्या-मुदतींत मुंबईचे एक प्रसिद्ध पुढारी, दे. भ. स. का. पाटील यांचे मुंबई कॉंग्रेस कमेटीतर्फे गणेशोत्सवांत व्याख्यानें देण्यासाठीं मला आमंत्रण आले. व्याख्यान हा माझ्या आवडीचा विषय. माझी सर्व व्याख्यानें मजूर वस्तीतच ठेवली होती. रोज चार पांच अशी पंधरा दिवस व्याख्यानें दिली. पुढें घसा बसला. शेजारच्या माणसाबरोबर बोलायचे तर त्याचा कान जवळ ओढूनच बोलावे लागे. अशी स्थिती झाल्यावर मी कोल्हापुरला परतलो.

माझी भाषा सोपी. मी मजुरांच्याच जातीचा. त्यामुळें त्यांना मजबद्दल आपुलकी वाटे. आग्रहामुळें पूर्वी ठरलेल्या कार्यक्रमाला सुटूनही बरीच व्याख्याने द्यावी लागली. मला कितीही शीण आला आणि घसा बसला तरी व्याख्यानावेळीं तो बरोबर काम देई. याचे मला आश्चर्य वाटे. मी मी व्याख्याने दिली ती देवाच्या उलटच दिली. ‘खरा देव शेतकरी कामगार हाच होय, तोच आपल्याला पोसतो, त्याची सेवा करा’ हाच उपदेश मी करीत असे. माझी व्याख्याने धर्मसमजुतीला धक्का देणारीच असायची. पण ती पचायची. मला कोणीही विरोध केला नाहीं. हा मनुष्य आपला आहे. आपल्या जातीचा आहे. टीका करतो ते आपल्या हितासाठीच करतो, अशी त्यांची खात्री होती. मलाही याचमुळें कटु बोलण्याचे धाडस होत होते. दुसऱ्या जातीच्या विद्वानांची त्यांच्यावर अशी छाप पडली नसती. भिन्न जातीमुळें त्यांच्याबद्दल असा जिव्हाळा वाटला नसता.

**पांढरपेशे धर्माला धक्का देणार नाहींत—** पांढरपेशा वर्गातला कोणीही पुढारी असो तो कॉंग्रेसवाला असो, सोशालिस्ट असो किंवा कोणी असो, त्याच्या तोंडून देवाधर्मावर क्वचितच हल्ला होई. सावकारशाही,

सरंजामदारशाही, राजशाही, भांडवलशाही आणि साम्राज्यशाही यावर कडाडणारे, भटशाहीवर तसा हल्ला करीत नसत ! सत्यशोधक कार्यकर्ता मात्र सर्वांचीच हजेरी घेई. पांढरपेशावर्ग आपले प्रभुत्व राखण्याकरतां जाणून बुजून देवाधर्मावर टीका करीत नाहीं असे मला आढळून आले ! माझी ही शंका मी बोलूनही दाखवली.

**काकासाहेब गाडगीळ**—यांच्या अध्यक्षतेखाली २७-१२-४५ ला म. फुले यांच्या पुण्यतिथीनिमित्त पुण्यास फुले मार्केटमध्यें सभा झाली. मुख्य व्याख्याता मीच होतो. माझ्या व्याख्यानांत मी ही शंका उघड बोलून दाखवली. उत्तरादाखल काकासाहेब म्हणाले, ‘ आजचा मुख्य लढा साम्राज्यसरकार विरुद्ध आहे. तो संपल्यानंतर इकडे जरूर लक्ष देऊ.’ पण अनुभव उलट आला. कॉंग्रेसचा हाती सत्ता आल्यानंतर सोमनाथच्या जीर्णोद्धार करून पुनः धार्मिक गुलामगिरी राखण्याचाच कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं प्रयत्न केला.

मुंबईच्या व्याख्यानाचेच सुमारास मजूर शेतकरी परिषद जि. नाशिकचे मला अध्यक्षपद देण्यांत आले. परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. भाऊसाहेब हिरे हे होते. गोविंदराव देशपांडे यांनी आमंत्रण दिलें. व नेण्याची व्यवस्था स्वतः केली.

**दे. भ. भाऊसाहेब हिरे**— हिरे मितभाषी पण विचारी अन् महत्वाकांक्षी वाटले. बहुजन समाजाविषयीची कळकळ त्यांच्यांत होती. त्यावेळी त्यांची राजकीय कुचंबणा झाली असल्याचे दिसून आले. भावनाप्रधान फारच कमी असावेत. अस्तकदम व ध्येय गांठण्याचा धिमेपणा दिसला. यानंतर त्यांचे माझे संबंध ते प्रांताध्यक्ष झाल्यानंतर आले. ते मुत्सद्दी आहेत. लोकसंग्राहक-वृत्ती आहे. मी दुसऱ्या पक्षांत गेलो तरी त्यांनी माझे संबंध तोडले नाहींत. नंजाप्पा ॲडमिनिस्ट्रेटरने स्थानबद्ध केल्यावेळीं त्यांनी मला सोडवण्याचा प्रयत्न केला. मी कॉंग्रेसमध्ये रहावे अशी खटपट केली. धान्यभाव वाढीचा निषेध करण्याकरता मी तुरुंगांत गेलो. त्यावेळीं त्यांनीं माझ्या पत्राचें मंत्रिपदावर असतानाही सहानुभूतिपूर्वक उत्तर दिलं. मंत्रिपदावर जाताच त्यांचे डोके फिरले नाही. ते मला भेटायला घरी येत व येतात. मराठ्याबद्दल त्यांना अभिमान आहे. त्यांच्या शिक्षणासाठीं झटत असताना कोणी जातिवादाचा

आरोप केला तरी ते न भिता काम करतात. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर त्यानी बरीच निर्भयता दाखवली आहे. मात्र इतर मराठे आमदार त्यांना अपेक्षेप्रमाणें पाठिंबा देत असावेत असे दिसत नाहीं. कोल्हापुरांत येऊन त्यांनीं अनेकांचा लोभ संपादन केला.

× × ×

**कोल्हापूर नगरपालिकेवर तिरंगी झेंडाः—** मुंबईचा कार्यक्रम आटोपल्यानंतर कोल्हापुरच्या दृष्टीनें त्यावेळीं उल्लेखनीय व अभिमानास्पद वाटणारी गोष्ट म्हणजे कोल्हापुर नगरपालिकेवर गांधीजयंतीदिवशीं ( ऑक्टो. १९४५ ) तिरंगी झेंडा प्रथमच समारंभाने लावण्यात आला. आमच्या चळवळीचे व वाढत्या शक्तीचे ते एक स्पष्ट चिन्ह होय. हीच गोष्ट कांहीं दिवसापूर्वी राजद्रोहात्मक गणली गेली असती. पूर्वी झेंडा मिरवणुकीवर हल्लाही झाला होता. यावेळीं म्युनिसिपालिटीचा कारभार आमच्या हातीं असल्यामुळें करवीर सरकारला कांहीं करता आले नाहीं. कारण ही गोष्ट सर्वस्वी आमच्या अधिकारातलीच होती. मात्र तिरंगी झेंडा लावून आम्ही भगवाझेंडा काढून टाकला नाहीं. मराठा व्यतिरिक्त आमच्यातील कांहीना भगवाझेंड्याबद्दल आदर वाटत नव्हता. पण मला दोन्हीही झेंडे प्रियच होते. शिवछत्रपतींचा भगवा झेंडा महाराष्ट्राभिमानी मराठ्याला नावडता कसा होईल! तो तर महाराष्ट्राच्या मराठ्यांच्या वैभवाचा व उज्वल इतिहासाचा झेंडा! कांहीं दिवसापूर्वी याही झेंड्यासाठी माझ्या जिवाची कुर्बानी करायला मी तयार झालो होतो. घोड्याच्या टापा अंगावर घेण्यासाठीं पुढें झालो होतो.

**संघटना स्वातंत्र्यावर गदा—** बागल्यांच्या तात्पुरत्या दिवाण-पदानंतर मिचेल हे त्या जागीं आले. याच सुमारास ‘ पब्लिक सोसायटीज ॲक्ट ’ १९४५ बिल पास केल्याचे पुढारी पत्रांतून जाहीर झाले. या कायद्यानें कोल्हापूर संस्थानांतील संघटनास्वातंत्र्य नाहीसें होणार होते. कोणत्याही कार्याकरतां स्थापन झालेल्या किंवा कार्य करीत असलेल्या सर्व संस्थांचे ध्येय कार्यक्रम व उद्देश व घटना याची माहिती दरबारला दिली पाहिजे व अशा संस्था रजिस्टर करून घेतल्या पाहिजेत. अशी कायद्याची सक्ती होती. कायदा पास झाल्यापासून तीस दिवसाच्या आंत दरबारच्या परवानगीशिवाय नवीन संस्था स्थापन करता येणार नाहीं. व त्यापूर्वी

अस्तित्वांत असलेल्यानी संस्था यापुढें चालवण्यासाठीं परवानगी घेतली पाहिजे. न घेतल्यास ती संस्था बेकायदेशीर ठरली जाईल. व तिला सहाय्य करणाऱ्यास सहा महिने कैद व ६०० रु. दंड व प्रत्यक्ष व्यवस्थेत भाग घेणाऱ्यास ३ वर्षे कैद व २००० रु. दंड अशी शिक्षा दिली जाईल.

या कायद्यामुळें प्रजापरिषदेच्या अस्तित्वावरच गदा येण्याचा संभव होता. शेतकरी मजूर संघटना बनवणें अवघड होणार होते. जनतेची संघटना करता आली नसती. तेव्हां मी या कायद्याला तात्काळ विरोध करून कायदेभंग करण्याचा निश्चय केला. अनेक प्रमुख संस्थांच्या अध्यक्षांच्या सह्या घेऊन ( १५ नोव्हें. १९४५ ) ला बिंदुचौकांत बिलाच्या निषेधाची सभा बोलावली. कायदेभंगाला अनेक लोक तयार झाले. अखंड भारत साप्ताहिकांतून लोकांना तयारीचा आदेश दिला. या सर्वांचा इष्ट तोच परिणाम झाला.

**पंतप्रधान मिचेल व पेरीः—** पंतप्रधान मिचेल सत्तेच्या अहंकाराला बळी पडले नाहींत. हे बिल वस्तुत: करवीर दरबारकडून आलेले नव्हते. ब्रिटीश सरकारकडूनच यांना आदेश आला होता. कारण यावेळीं असेच बिल मुधोळ संस्थानने पास केले होते. तथापि मिचेलनी एकंदर परिस्थितीचा विचार करून स्वतःच्या जबाबदारीवर बिल मागें घेतले. मागें घेण्यांत जी नेकी, धैर्य व लोकशाहीवृत्ती दाखवली ती निःसंशय प्रशंसनीय होय. मोठी आनंदाची आणि मिचेलना अभिमानास्पद गोष्ट म्हणजे दरबारच्या निषेधासाठीं बोलावलेल्या सभेचे रुपांतर मिचेलच्या अभिनंदनांत झाले.

पेरींच्या लोकप्रिय कारकीर्दीनंतर मिचेलचीही कारकीर्द त्या मानानें वाईट गेली नाहीं.

पेरीच्यावेळीं मला जरी स्थानबद्धता आली असली आणि मिचेलवेळी शाहूमिलसंपाची वेळ येत होती; तथापी हे दोन्हीं मंत्री तुलनेच्या दृष्टीनें आमच्या येथील मंत्र्याहून लोकशाहीला मानणारेच वाटले. दोघांचेही पुढें खाजगी संबंध आले. खाजगी पत्रव्यवहारही चालू ठेवले. चहालाही बोलवत. मिचेलची लोकप्रियता त्यांना पुढे नडली असावी मिचेल तसे मानी असल्यामुळें त्यांचे व रेसिडेंट हार्वे यांचे जमले नसावे. कारण त्यांची अगदी अनपेक्षितरित्या बदली करण्यांत आली. त्यांना त्याचा सुगावाही लागूं दिला

नाहीं. मिचेलनी मला पाठविलेल्या पत्रावरून ते मला कळूं शकले. पेरी व मिचेल दोघेही युरोपियन पण त्यांनी मागें गोड आठवणीं ठेवल्या. त्यांनी खासगी सूडबुद्धी केव्हांही ठेवली नाहीं. अशा प्रकारची नेकी मला आमच्या मंत्र्यांत दिसून आली नाहीं. माझा पहिला तुरुंगवास म्हणजे निव्वळ राक्षसी सूडबुद्धीचा होता. मला सक्तमजूरी झाल्यानंतर मला कामावर नेतात कीं नाहीं व मी काम करतो कीं नाही हे पाहण्याकरतां राजाराम महाराजांचे लाडके अधिकारी मुद्दाम येऊन पहात.

× × ×

कॉंग्रेससाठी दौरा:— कोल्हापुरचे राजकारण हा माझ्या आयुष्यातील जरी अत्यंत महत्वाचा आणि जिव्हाळयाचा प्रश्न असला तरी त्या बाहेर पहायचं नाहीं हे माझे धोरण कधीच नव्हते. आजचे हिंदराष्ट्र ही माझी भावना केव्हांच कमी झालेली नव्हती. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नांत कोल्हापुरच्या राजकारणाचा प्रश्न निगडीत आहे याचा मला कधीच विसर पडला नव्हता. कोल्हापुरचा राजकीय लढा हाही राष्ट्रलढ्यातलाच एक भाग आहे ही भावना सदैव जागृत होती. म्हणून खालसा मुलखांतले आमंत्रण मी कधींच टाळले नाहीं.

खेडुत समाजावर माझ्या व्याख्यानाचा परिणाम बरा होई. म्हणून कॉंग्रेसच्या निवडणूक प्रचारासाठीं मला आसपासच्या जिल्ह्यांतून आमंत्रणें येत. यासाठीं २।३ महिने मी ब्रिटिश मुलखांतच हिंडलो. सातारा, पुणें, नाशिक, सोलापूर, रत्नागिरी या जिल्ह्यांत माझा दौरा झाला. रोज पांच सहा तर केव्हां दिवसांतून नऊ पर्यंत व्याख्यानें दिली. व्याख्यानानंतर मी इतका थकून जाई कीं, मला बसताहि येत नसे. अंथरुणावर पडावे लागे. यांत सावंतवाडीच्या शिरोडकरांनी सावंतवाडीचा दौराही घुसटला. या दौऱ्यांत मी इतका थकलो कीं मला बसून व्याख्यान देणेही अशक्य झाले, तेव्हां तेथील डॉक्टर श्री. परुळेकर यांनीं मला ग्लुकोजचे इंजेक्शन देऊन हुषारी आणली आणि जाहिर झालेले व्याख्यान तडीस नेले. या निवडणुकींत यशस्वी झालेल्या आमदारांना ते यश मिळवून देण्यात माझा भाग आहे हें त्यांनाही कबूल करावे लागेल. अद्याप खालच्या समाजांतील जातिभेद गेला

नसल्यामुळें ब्राह्मण वक्त्याहून मराठा जातीच्या वक्त्याचा त्यांच्यावर सहाजिकच परिणाम होतो. मी जात न पहातां कॉंग्रेसच्या उमेदवारासाठीं प्रामाणिकपणें प्रचार केला.

**बाळासाहेब मोरे**— पंढरपुरला माझे एक जिवलग स्नेही बाळासाहेब मोरे कॉंग्रेसच्या विरूद्ध म्हणून उभे होते. मी गांवीं येताच प्रथम त्यांचे भेटीस गेलो. व म्हणालो, ' बाळासाहेब माफ करा. कटुकर्तव्य म्हणून मला हे करावे लागत आहे. नाइलाजानें मला तुमच्या विरुद्ध बोलावे लागत आहे. पण यामुळें तुमचे माझे खासगी संबंध बिघडले आहेत असे समजू नका. ' त्यांच्याविरुद्ध प्रचार करताना मला वाईट वाटल्याखेरीज राहिले नाही. मोरे हे खरोखरीच त्या भागांत लोकप्रिय होते. बहुजनसमाज आणि मराठा त्यांचें मागें होता. कांही गांवी कॉंग्रेसच्या माणसाला पायही ठेवण्याजोगी स्थिति नव्हती. मी मराठा म्हणूनच त्या गांवी बोलूं शकलो. गादेगांव हे तर सर्व बागलांचे. त्यांनी माझा फार गौरव केला.

मी प्रचारांत जात गोत पाहिली नाहीं. जिव्हाळ्याच्या संबंधाचा विचार केला नाहीं. केवळ कॉंग्रेसला यश मिळावं म्हणून कायावाचामनें सेवा केली. शक्ती असेपर्यंत राबलो. जातिवाद मारून टाकण्याचा प्रामाणिकपणें प्रयत्न केला. पण याच लोकांनीं पुढें माझ्यावर जातिवादाचा आरोप करायला कमी केलं नाहीं. जे बाळासाहेब मोरे यावेळी पडले तेच पुढे स्वातंत्र्यानंतरच्या निवडणुकींत कॉंग्रेसचा पराभव करून निवडून आले. यावेळी मी मोऱ्यांच्या बाजूनें (शे. का. पक्षातर्फे) प्रचार केला. या वेळच्या दौऱ्यांत मी सावकारशाही, सरंजामदारशाही, भांडवलशाही व भटशाहीविरुद्ध बोलत होतो. कॉंग्रेस सोडल्यानंतरही तेच बोलत आलो. पण नंतरच्या भाषणाबद्दल माझ्यावर जातिवादाचा आरोप करण्यात आला !

सोलापुरच्या दौऱ्यांत अंत्रोळीकर, छन्नुसिंग, बबनराव बडवे व तुळशीदास जाधव, रत्नागिरी जिल्ह्यांत करमळकर वराडकर, आप्पासाहेब पटवर्धन, पुणं जिल्ह्यांत गुप्ते, पोपटलाल शाह, बू साठे, मेमाणे वगैरे असत. प्रत्येक जिल्ह्यांत त्या त्या जिल्ह्यांतली प्रमुख मंडळी बरोबर असत. शेंकडों मैलांचा प्रवास झाला. निसर्ग सौंदर्यही कांहीं ठिकाणीं मनमुराद भोगता आलं.

मी खेडुतांना त्यांच्या शक्तीची जाणीव करून देत असे. मी भावनाप्रधान असल्यामुळे माझ्याबरोबर त्यांच्याही भावना उसळून येत. ते आनंदानें गहिंवरून येत. माझी जात हे त्यातले एक कारण असू शकेल. याचकरता कॉंग्रेसने माझा दौरा आंखला होता यात शंका नाहीं. मला हे दिसून आले कीं त्या त्या भागांतली जात बघूनही उमेदवाराला उभे करण्यांत येत होते. वस्तुतः कॉंग्रेसची शक्ती महाराष्ट्रापुरती तरी मराठापुढाऱ्यांनींच वाढवली व त्याचे फार मोठे श्रेय दे. भ. केशवराव जेधे व कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांचेकडे जाते. त्यांत नाना पाटील वगैरे मंडळींनी पुढे भर घातली आहे.

**जुन्या मराठ्या पुढाऱ्यांचा दृष्टीकोनः—** मराठ्यानीं कॉंग्रेसशी समरस होऊ नये अशा मताचे भास्करराव जाधव, दिनमित्रकार मुकुंदराव पाटील, राष्ट्रवीरकार शामराव देसाई, विजयी मराठाकार श्रीपतराव शिंदे ही मंडळी होती. यांनीं बहुजनसमाजांतील जागृतीचे काम फार केले. पण देशस्वातंत्र्याच्या लढ्यांत त्यांनी तसा भाग घेतला नाहीं. बाळासाहेब मोरे हेही याच मताचे आहेत. कॉंग्रेस ही विशिष्ट कंपूच्या व जातीच्या आहेरी गेलेली संस्था आहे. त्याचे गुलाम झाला तरच तुम्हाला तीत स्थान आहे असे ते म्हणत. यांच्या म्हणण्यातही पुष्कळ सत्य होते. याचा अनुभव पुढें आम्हालाही सर्वांना आला व त्यांतून आम्ही सर्व लोक, जेधे, नाना पाटील, तुळशीदास जाधव, शंकरराव मोरे व पुढे मी अशी मंडळी बाहेर पडलो.

**निसर्ग सौंदर्य—** या दौऱ्यात मोठा लाभ झाला तो म्हणजे निसर्ग सौंदर्याचा. शिरोडा, मालवण, चिपळूण हा भाग मला फार आवडला. एके ठिकाणीं तर मी इतका मंत्रमुग्ध झालो कीं ते ठिकाण सोडून मला पुढे जाववेना. मी ड्रायव्हरला गाडी थांबवायला सांगितली. गाडीतून उतरलो आणि सौंदर्याची भूक मनसोक्त भागवून घेतली. या दोन ठिकाणीं सौंदर्याचे परस्पर विरोधी नमुने आहेत. पहिल्याला मी भिषण सौंदर्य म्हणीन. एकानें छातीत धडकी भरत होती तर दुसऱ्यानें आनंदाच्या रोमांच लहरी उठत!

कांहीं आठवणी आयुष्यांत कायमच्या राहतात. त्याचपैकीं या होत. पाटण सोडून कांही मैल गेल्यावर रस्त्याच्या बाजूलाच कोयनेचा प्रवाह लागतो. तो सारखा दहा पंधरा मैल रस्त्याला समांतर असा चालू लागतो. दुतर्फा गार झाडी. खाली सापाप्रमाणें वळसे घालत पाठीमागें लागलेली

कोयना नदी. हेळवाकपर्यंत ही पाठशिवण चालते. हेळवाकनंतर घाटमाथा सुरू होतो. कोयनेचे मोहक दृश्य नाहीसें होऊन छातींत धडकी भरणारा देखावा लागतो. समुद्राच्या खवळलेल्या लाटाप्रमाणें एकाहून एक मोठे डोंगर राक्षसाप्रमाणें सर्वस्वाचा स्वाहा करण्याकरतां जणु पुढे येऊ लागतात. एका बाजूस समंधाप्रमाणें अक्राळविक्राळ, कडेलोट करण्यास उभा राहिलेला गगनभेदी उंच कडा, तर त्याच खालीं जबडा पसरून पाताळांत गडप करणारी महामाया, भयंकर दरी ! पाहून अंगावर भीतीचा कांटा उभा राही.

रस्त्याचे वळसे म्हणजे ड्रायव्हरच्या अखेरच्या परिक्षेचे धडे ! ९–१० मैलाच्या अंतरांत एक पळभरही जर ड्रायव्हर गाफील राहिला तर सर्वांची शंभरवर्षें भरलीच म्हणून समजावी. मी एकदां विमानांत बसलो होतो त्यावेळीसुद्धां मला अशी भीती वाटली नाहीं. इन्शुरन्स करून आत्महत्येचा आरोप न येतां पैसा मिळवायचा असेल तर हा प्रवास करावा. कच्च्या दिलाचा धडकी बसून राम म्हणायचा. संवयीमुळें ही भीती जाईल खरी पण नवख्याचें मात्र मरण. निसर्गाची भव्यता व उदात्तता जाऊन नुसती भयानकताच तेवढीं येथे डोळ्यासमोर उभी राहते. नेहमीच्या मनुष्याला हे वर्णन अतिशयोक्तीचे वाटेल पण नवख्याला मात्र याची सत्यताच पटेल.

चिपळूण सोडून खेड तालुक्यांत शिरल्याबरोबर निराळाच चित्रपट दिसूं लागतो. चिपळूण सोडून कांहीं मैल गेल्यावर गाडी टेकडीवर येते. येथून स्वर्गीय सौंदर्य दिसूं लागतं. जणु देवलोकीच आलो आहोत. किल्ल्याच्या भोंवतालचा प्रदेश. जणु काय सौंदर्याचे हे अमोल भांडार रक्षण करण्याचंच काम या किल्ल्यावर सोपवलं होतं ! या रक्षकाची दृष्टी चोहोंकडे सारखी फिरत होती. किल्ल्यानं रक्षण केलेल्या या रत्नभांडाराची शोभा कांहीं औरच होती. नेहमीं दिसणारा हा दागिना नव्हता. याची वाण अन् खाण निळकीच होती. जणु या ठिकाणाहून निसर्गाला जीवनसौंदर्य व शक्ती येथूनच पुरवली जात होती. म्हणूनच सभोंवतालच्या पर्वतश्रेणींनी ही संपत्ती सांठवण्याकरता तटबंदी उभी केली होती. कराड तें चिपळूणपर्यंत कधी न संपणाऱ्या पर्वतांची ही धांवपळ आपल्या हृदयाला मिठी मारण्याकरता चालली होती. त्या रुक्ष पर्वत श्रेणींना आपल्या रांकटपणाचा वीट आला होता. म्हणूनच त्या सर्वांना त्या किल्ल्यानें आपल्या तटबंदींत ठेवलेल्या हृदयाच्या ओलाव्याची ओढ लागली होती.

टेकडीवरून खाली पाहिलं कीं मर्त्यलोकींचा संसर्ग सुटल्याचा भास होई. जणुं अमर लोकांतून मी विश्वाकडें पहात होतो. पर्वताचें गांभीर्य व रुक्षता खालच्या देखाव्यानें नाहीशी केली होती. तें पर्वत जड आणि जीव हा भेद न करता पायथ्याशी असलेल्या सर्वांशी पोटाशी धरून गोंजारत होते. त्यांनीं आपली फोलार शुभ्र शाल सर्वांवर टाकली होती. एखाद दुसरी होडी आपली तजेलदार पंखे पसरून अंतराळांत वाहूं लागली होती. पिताजींच्या या आधारामुळें निर्धास्त झालेली जनता आपआपल्या चिमुकल्या घरट्यांतून अद्याप बाहेर पडूं इच्छित नव्हती. उन्हाची तिरीप लागूं नये म्हणून सूर्याआड धुक्यानें आपला शुभ्र लोंकरी पडदा सोडून दिला होता. रामपाऱ्याची गोड झोंप टाकून बाहेर पडण्याचा त्यांना कंटाळा आला असावा पृथ्वी, आप, तेज, वायू आणि जीवसृष्टि यांचा हा गोड मिलाफ वेदांत्यांना तल्लीन करणारा आणि कलावंतांना वेड लावणारा होता. निसर्गाच्या या भव्य आणि उदात्त स्वरुपापुढें, पर्वताची ही उत्तुंग शिखरें खालच्या जलाशयांत नम्र झाली होती. शरण आली होती. व तो जलाशय त्यांना प्रेमानें झोकें देत होता. भोंवतालच्या वसाहतीनींही यांत भाग घेतला होता. प्रेमाच्या जादूनें ऐक्यभाव व एकतानता निर्माण केली होती. त्या आनंदाच्या भरांत जललहरी किनाऱ्यावर नाजुक साथ देत होत्या !

निसर्गानें झोंप फेंकून दिली. कोंबड्यानें अरवून उठण्याचा इषारा दिला ! सौंदर्याची नवी दालनें उघडूं लागली. प्रत्येक क्षणाला त्याची नवी नवलाई नटून सजून पुढे येई.

निसर्गात मानवी कृतीनेही आपली भर टाकली होती. खाली पाण्याचे सपाटी बरोबर निरनिराळ्या आकाराचें व रंगाचें गालीचें पसरून दिले होतें. त्यावर मालकीच्या बांधाची किनारी गोवली होती. मध्येच एकादी झोंपडी डोकं वर काढी. सोन्यारुप्याची तारें अधून मधून चमकत होती. एखादा वडिलधारा वृक्ष ती दडवण्याचा प्रयत्न करी. पण अवखळ पानांच्या व नाचऱ्या फांद्यांच्या फटींतून त्याची चमक बाहेर पडेच ! वाटेल त्या जागी बसावं आणि आकंठ जेवून घ्यावं. मला जागा सोडवेना. कितीतरी वर्षांनी राजकारणांत चिरडून आणि दबून गेलेला माझ्यांतील कलावंत जागा झाला होता. गाडी चालू झाली. मी परपरतून पहात होतो. जणुं मातेच्या प्रेमळ

मिठीतून मी दूर जात होतो. · चित्रपट डोळ्यासमोरून गेला पण आठवणी जिवंत आहे. या मोलाच्या क्षणानं माझं जीवन समृद्ध झालं ! मी ओळखी विसरतो, गांवे विसरतो पण हा प्रसंग सदैव ताजाच आहे.

× × ×

एस्. व्ही. केळकर— हाही असाच प्रसंग ! निराळा प्रकार ! पण न विसरण्या जोगा ! भावनेचा आणि जिव्हाळ्याचा. जुन्नरची ती आठवण. एका जिवलग मित्राची व शिवरायांची आठवण, या गांवामुळें सारखी येत होती. गांव जवळ येऊ लागले. तसे माझे मित्र श्री. एस् . व्ही. केळकर ( बी. ए.; एल.एलबी., ॲडव्होकेट, सॉलिसिटर व माजी सबजज्ज) यांची सारखी आठवण होऊं लागली. केवढी योग्यता, पण निगर्वी, प्रेमळ साधा-भोळा जीव ! खरा जिव्हाळ्याचा मित्र. एका व्यसनाच्या मोहांत सांपडल्यानें आयुष्याचा सर्व नाश झाला होता. त्यांत कौटुंबिक आपत्तीची भर पडली ! ! जुन्नर जवळ येईल तसं हृदयाला भरती येऊं लागली. अनेक आठवणी जाग्या होऊ लागल्या. जणु हद्दपार झालेला प्रेमळ आणि एकनिष्ठ भाऊ भेटणार ! सख्खे भाऊ इमानी आणि एकनिष्ठ असतातच असं नाही ! केळकरला मी पाहणार ! प्रेमळ जिवाच्या भेटीसाठी बाहु स्फुरूं लागले. गाडी सरळ केळ-करांच्याकडे न्या म्हणून बोललो. केळकर घरीं होते. एक तपानं मी त्यांना पाहिलं. आम्हा दोघांचीं पन्नाशी उलटली होती. काल आणि अंतर यानें प्रेमाचा ओलावा आटला नव्हता. पाहून आनंद झाला. भेटीनें जीव हलका पडला. प्रियकरणीच्या आलिंगनांत उन्मादसुख असेल पण या आलिंगनांतले पावित्र्य त्यात मिळणार नाहीं. भेटीनें आनंदाश्रू वाहू लागले. सभेला दोघेही पतिपत्नी आले होते. अकालीं सोडून गेलेल्या मुलांमुळें त्या दांपत्यांतील प्राण जणु गेला होता ! या प्रसंगानंतर पुनः माझी भेट झाली नाहीं ! कोणजाणे होणारही नाहीं.

शिवस्मृति— शिवनेरी हे शिवरायांचे जन्मस्थान. दूरवरूनच पाहिले. देव न मानणाऱ्या माझे हात न कळत जोडले गेले ! भक्तिभावानं मस्तक नम्र झालं. पवित्र क्षेत्री आल्याप्रमाणं वाटूं लागलं. जणु मी शिवराया बरोबर बोलूं लागलो. बेळगांवचे माझे एक मित्र वामनराव जोगळेकर यांच्या छोट्या मुलीनं म्हटलेलं गाणं आठवलं !

शिवबा येरे ये । राष्ट्र रणीं । व्हावयास सेनानी ।
शिवबा येरे ये ॥

तो शौर्यशाली महाराष्ट्राच्या उज्वल वैभवाचा इतिहास डोळ्यापुढें उभा राहिला ! एक एक सेनानी डोळ्यासमोर नाचूं लागले ! तानाजी, येसाजी, बाजी जिवंत होऊन उभे राहिले. हृदय स्फुरण पावूं लागले, अंगावर कांटे उभे राहिले. तोंडांतून सहजच बोल निघूं लागले.

शिवराया ! शिवबा ! शिवबा ! शिवबा !

सभेंत शिवरायांच्या नामाचा गजर चालूं झाला ! मी काय बोललो कोण जाणे ! व्याख्यान कॉंग्रेस निवडणुकीऐवजीं शिवचरित्रावर झालें असावें ! शिवरायांचीच आठवण व्याख्यानाला स्फूर्ति देत होती.

**काकासाहेबांची अखेरची भेट—** १९-२-४६ जुन्नरहून पुण्यास आलो. पुण्यास माझे भेटण्याचें पवित्र ठिकाण म्हणजे माझ्या राजकीय आयुष्याला सतत प्रोत्साहन देणारे राजकीय पिताजी गुरुवर्य काकासाहेब लिमये. यांची भेट म्हणजे एक पवित्र कर्तव्य मानत आलो. दुर्दैव ! यावेळीं काकासाहेब अंथरुणाला खिळून होते. त्यांना अर्धांग झाला होता. अनेक कार्यकर्त्यांचे स्फूर्तिदाते आज असहाय्य स्थितींत बिछान्याशीं जखडले गेले होते. बोलतां येत नव्हतं. पण बोलण्याची इच्छा डोळ्यात स्पष्ट दिसत होती. जीभ वळत नव्हती. मला पाहून झालेला आनंद चेहऱ्यावर दिसत दोता. मला तीच आशिर्वचनें वाटली ! मला फार वेळ बसवेना. डोळ्याचा पूर आवरता आवरेना. म्हणून काकासाहेबांच्या पवित्र चरणाला स्पर्श करून गुदमरलेल्या अंतःकरणानें बाहेर पडलो. जातिवादाचा वासही त्यांना कधीं चिकटला नव्हता. इतर बरेच पांढरपेशे पुढारी अनुभवानें जातिवादीच आढळले. पण काकांचे विषयींचा माझा आदर अखेरपर्यंत तसाच राहिला.

× × ×

**सामान्य माणूस आणि थोर व्यक्ति—** वाचन लेखन आणि व्याख्यान हे माझ्या आयुष्यांतील उद्योग. कोणत्यातरी एका कामांत गुंतलेला असायचा ! मी यंग इंडियाचा अगदी सुरवातीपासूनचा वाचक. राजकीय पुढारी व तत्वज्ञानी म्हणून गांधीजी या वेळची माझी पूजनीय व्यक्ति ! त्यांच्या विचाराचा मी अभ्यास केला होता. या काली मी त्यांच्या विचारांचा

प्रत्यक्ष अनुयायीही होतो. खादी व अहिंसा या विषयावर लिहिले. प्रचार केला! महात्माजी हे माझे एक आदर्श होते. त्यांच्या विचारानें माझे आपोआप मार्गदर्शन होई. प्रत्यक्ष सहवास नसला तरी वैचारिकदृष्ट्या जवळ होतो.

१९४२ साल. मी पन्हाळगडावर स्थानबद्ध होतो. बाहेर घातपाती चळवळ जोरांत होती. महात्माजीही यावेळीं तुरुंगांतच होते. पण त्यांचे अनुयायी म्हणून घेणाऱ्या कांहीं मोठ्या व्यक्तींनी सॅबोटेज चळवळ ही महात्माजींना मान्य आहे असा प्रचार चालू केला होता. मला ते पटले नाही व स्थानबद्धतेतून सुटतांच 'महात्माजींना ही चळवळ मान्य होणार नाही' म्हणून मी अप्रियता पतकरूनही मला प्रामाणिकपणें वाटलें ते बोललो. कारण माझ्यामतें महात्माजींच्या आतापर्यंतच्या विचारसरणीला ही चळवळ सुटून होती. पण महात्माजींचे कांही अनुयायी, अच्युतराव पटवर्धन वगैरे, ही चळवळ अहिंसातत्वांत बसते म्हणून प्रतिपादन करीत. ही गीतेच्या अहिंसावादांत बसेल पण महात्माजींच्या अहिंसेच्या विचारसरणींत बसणार नाहीं असें माझें मत होते. तुरुंगांत असतांनाही मी तसे तेथील मित्रमंडळींत बोललो व नंतर जाहीरपणें बोललों. हे लिहिण्याचें कारण दौऱ्याहून परत आल्यावर खुद्द महात्माजींचे हरिजनमध्यें आलेले विचार वाचनांत आले. हा खुलासा वाचून मी आनंदानें व अभिमानानें नाचूं लागलो. महात्माजी म्हणतात.

'प्राणिहत्या ज्यांत नाही, ते ते सर्व अहिंसात्मक असे लोकांनी मानले, पण ते चूक आहे' हेच ते वाक्य. विचार करता मला हे दिसून आले. कोणीही एकादा सामान्य माणूस विशिष्ट विचाराशी तन्मय झाला. त्या एका विषयाचा सारखा चिंतन मनन व अभ्यास करूं लागला कीं त्या व्यक्तीचे विचार आणि त्या तत्वज्ञानाच्या जनकाचे विचारांत साम्यता येऊं लागते. हे अनुभव प्रत्येक विचारी आणि अभ्यासू माणसाला आल्याशिवाय रहाणार नाहींत. एकाच दृष्टिकोनांतून विचाराला सुरवात झाली कीं त्या त्या विचारवंतांच्यात साम्यता येऊ लागते. अति मोठी माणसें झाली तरी ती माणसेंच असतात. मोठ्या माणसांची बीजें प्रत्येक माणसांत असतात. परिस्थिती मिळेल त्या प्रमाणें त्या गुणांची वाढ होत असते.

**समाजवादी भूमिका व प्रजापरिषद्**— जबाबदार राज्यपद्धती हे जरी प्रजापरिषदेचं जवळचं उद्दिष्ट असलं तरीं शेतकरी—कामकरी राज्य

हे नेहमी माझ्या डोळ्यासमोर असे. त्या ध्येयाची, व ते मिळवणेच्या मार्गाची आणि शेतकऱ्यांच्या शक्तीची मी त्यांना पुरेपूर जाणीव करून देत असे. देवधर्मानें कसे नाडले जाते हेहि उदाहरणांनीं पटवून देत असे, काँग्रेसचे कांहीं पुढारी व प्रजापरिषदेतील कांहीं, हा प्रचार करूं नका म्हणून मला इषारा देत, पण मी माझ्या व्याख्यानाला त्यांना सोइस्कर अशी कधीही कलाटणी दिली नाहीं. आंत माझ्याविरुद्ध धुसपुस चाले. पण सभेंत विरोध करण्याइतकं धारिष्टय कोणांत नव्हतं ! कोल्हापुरांत विलिनीकरणापूर्वी व पुढें मी शेतकरी–कामगार पक्षांत जाण्यापूर्वीच खेडुतांच्यांत समाजवादी भूमिका तयार करून ठेविली होती.

ग्रामपंचायती— वैचारिक भूमिपलिकडे खेडुतांनीं पाऊल टाकावें व त्यांच्यांत आत्मविश्वास वाढावा, जबाबदारी स्वीकारण्याची संवय लागावी म्हणून मी माझ्या अधिकारांत सरकारमान्यतेची किंवा विरोधाची पर्वा न करितां गांवचे लोक बोलावून त्या सभेंतच सर्वानुमतें प्रत्येक जातीचे लोक-पुढारी बहुमतानें निवडून घेऊन पंचायती स्थापन केल्या. कागल जहागिरींत अनेक स्थापन केल्या. यांतून गुंडगिरी निर्माण होऊ नये म्हणून अहिंसा व अत्याचाराचे महत्व त्यांना पटवून देत होतो. कारण अत्याचार झाले असते तर सरकारनें लगेच हात घातला असतां. पंचायती मागें शक्ति उभारावी म्हणून गांधी-दलें स्थापन केली. या पंचायती किरकोळ न्यायनिवाडा देऊं लागल्या. गांवची साफसुफही त्यांच्यावरच सोंपविली. निवाडा न ऐकणाऱ्यावर बहिष्कार घातला जाई. बानगे या गांवीं पंचायतीचें काम सुरूं झाल्यावर त्या गांवचा सावकार गांव सोडून कागलला येऊन राहिला ! गांव त्याच्या त्रासांतून मुक्त झालं ! माझ्या पंचायती दहशतवादावर अवलंबून नव्हत्या ! त्या गांवच्या एकजुटीवर अवलंबून होत्या ! हे वारं इतकं पसरलं कीं मला पंचायत स्थापन करण्याबद्दल सारखी आमंत्रणें येत. न्याय-अन्यायाचा निवाडा लोक उघड करूं लागले. अनेक खेड्यांवर अशा पंचायती स्थापन झाल्या. त्या फक्त लवादाचीच भूमिका घेत. एकतर्फी निकाल द्यायचा नाहीं. दोन्ही बाजू खुषीनें आल्या तरच निकाल द्यावयाचा ! अशा रीतीनें सर्वांना बजावून पंचायत माझ्या देखरेखीखालीं स्थापन करण्यांत येत होती. गांवांत प्रामाणिक सत्शील म्हणून पत असलेला, मग तो गरीब

व अशिक्षित असला तरी पंचायतींत घेतला जाई. निवडणुकी वेळीं सावकार, इनामदार, गांवगुंड यांना घेऊं नका म्हणून स्वच्छ बजावत असे. सावकार व व्यापारी न्यायदानांतही काळाबाजार करतील म्हणून बजावत असे. तसेंच शिकलेला पण उचापती करणारा निवडूं नका. फुकट मान्यतेचे इनामदार नकोत असे बजावून मगच निवड केली जाई. यामुळें पूर्वीच्या शिष्ट आणि वजनदार म्हणून समजलेल्यांचा बोज गेला व गरीबांना मान्यता आली. गुंडावर दहशत बसली. यामुळें ज्यांचा बोज कमी झाला त्या सर्व व्यक्ती माझ्यावर उलटल्या व वर्तमानपत्राकडे धांव घेऊं लागल्या! त्यांना वर्तमानपत्रांचें सहाय्य मिळूं लागले.

**मिरासदारांचे शत्रुत्व—** प्रजापरिषदेचे नेतृत्व यापुढें माझ्या-कडे राहिले तर आपल्याला हे मारक होणार असें वाटूं लागल्यानें या व्यक्तींची माझ्याविरुद्ध एकजूट होऊ लागली. कार्यकारी मंडळांतील, या लोकांचे साथीदार माझ्या उलट होऊं लागले. त्यांची चर्चा सुरू झाली. मी जातिवादी आहे हा ठराविक आरोप सुरू झाला.

माझ्या पंचायतीनी गांवांतील सावकार, दुकानदार, लेखणी बहाद्दर, पांढरपेशा आणि इनामदार या वर्गांचा बोज घालवला. इनामदार आळशी, व्यसनी, बेमुर्वतखोर व सुखासीन असल्यामुळें ते पंचायतीची फारशी पर्वा करीत नसत. पण सावकार, दुकानदार व धर्मभोळेपणावर व लेखणीवर जगणारा भटजी आणि पांढरपेशा व्यक्तींची माझ्याविरुद्ध एकी होऊं लागली लिंगायत व जैन या वर्गांत दुकानदारी व सावकारी करणाऱ्या व्यक्तींनी व ब्राह्मणाकडे पुढारीपण असल्यामुळें या जातीतील पुढाऱ्यांनी निव्वळ आपल्या जमातींत द्वेषाची पेरणी केली. त्या वस्तुतः या द्वेषाचं स्वरुप वार्गिकच होतं. पण मुद्दाम जातिवादी दिलं.

अंधश्रद्धेवर, व देवाधर्मावर माझा सारखा आघात होत असल्यानें भट आणि ब्राह्मण दुखावले. न्यायनिवाड्यामुळें सावकार व गुंड दुखावले गेले. काळा बाजार करूं नका म्हणून बजावल्यानें दुकानदार दुखावले. श्रेष्ठतेला धक्का बसल्यामुळें, व एकीमुळें खंडकपात होईल या भीतीमुळें बडे जमीनदार दुखावले. पंचायतीचा परिणाम वकिली धंद्यावर होणार म्हणून गांवांतील वकील वर्ग यांना अनुकूल झाला. अशी ही एक स्वच्छ वर्गवारी पडली!

एकीकडे गरीब, अज्ञानी खेडूत व दुसरीकडे त्यावर जगणारे परोपजीवी पुढारी व त्यांच्या छापाखालचा अज्ञ समाज ! पण मला बदनाम करण्या-करतां मजवर मात्र आरोप जातिवादाचा ! यापुढें प्रजापरिषदेतहीं असे दोन तट पडूं लागले, तेथेंही अशाच प्रकारचे भेद पडूं लागले ! अंतर्गत यादवीला सुरवात झाली.

प्रजापरिषदेतील एक सच्चा निर्मळ ब्राह्मण, प्रजापरिषदेचा त्यावेळचा सेक्रेटरी, य. ना. देशपांडे यांनी राधानगरी पेट्यांतील धामोड या गांवी शेतकरी परिषद बोलावली होती. मीच अध्यक्ष होतो. तो सर्व भाग मराठा जातीचाच होता. म्हणून मी त्यांना म्हणालो. 'या भागांतील बहुसंख्य जनता मराठा जातीची आहे. त्यांना आपुलकीच्या भावनेने मी सांगतो कीं आपल्याला राजकीय बाबतीत जातिसंघटना करण्याचे कारण नाही. शेतकरी-मजूर संघटना म्हणजेच मराठा संघटना होय. असे महाराष्ट्राबाबत तरी म्हणता येईल. म्हणून जातिसंघटनेचे वेड काढून टाका ... स्वतः प्रजा-परिषदेशी आणि कॉंग्रेसशी इमानी रहा !'

कोल्हापुरच्या विद्याविलासचे संपादक बाबुराव गोखले यांनी बरोबर विपर्यास करून 'माधवराव बागल यांनी मराठा संघटना करण्यास प्रोत्साहन दिले' म्हणून टीका केली. विपर्यस्त बातमी आहे म्हणून कळवले तर ती दुरुस्ती केली नाहीं. यापुढें या गृहस्थांनी सतत आणि पद्धतशीरपणें, उलट प्रचार चालू केला. लोकशक्तीकार हरिभाऊ जोशी यांनी हेच धोरण स्वीकारले. या पत्रांनी आमच्या विरुद्ध गटाला पुढे सारखे उचलून धरले. जेवढा गैरसमज पसरवता येईल तेवढा पसरवला.

पंचायत प्रकरणापासून प्रजापरिषदेंत दोन तट पडले होते. धनिक आणि पांढरपेशा विरुद्ध बहुजन समाज असें त्याचे स्वरुप राहिले. वरील पत्रांनी धनिक आणि पांढरपेशांची बाजू घेतली. वस्तुतः मी पंचायतीस दिलेला कार्यक्रम जराही आक्षेपार्ह नव्हता. मी मुद्दाम तो खाली देत आहे. पंचांनी काय करावे याबद्दल मी खालील सूचना केल्या होत्या.

'प्रथम विधायक कार्यक्रम हातीं घ्यावे, शहर साफ सफाई व आरोग्याची काळजी घ्यावी. सेवादल कार्यकर्त्यांकडून नियमित फेरी, व झेंडा वंदन. वर्तमानपत्रें रोज अर्धातास नियमित शेतकऱ्यांना वाचून दाखवावी.

अमलयास सामुदायिक शेती, सहकारी तत्वावर खरेदी विक्री, न्यायदानांत फक्त लवादाची भूमिका घ्यावी. कोणत्याही बाबतीत धाक—दपटशा दाखवूं नये. जमीनी पतकरतांना असते असते खंड कपात करावी. धमकी देऊन न्यायदान करीत असतील त्या गुंडांना पोलीसांचे स्वाधीन करावे.'

हा कार्यक्रम पंचायतीस दिला होता. तथापि याला ठराविक वर्गा-कडून विरोध होत होता. कार्यकारी मंडळांतील एक व्यापारी जातीतील वकील हे पंचायतीला सारखे विरोध करीत होते. त्यानंतर इतर वकील व धनिक साथ देऊं लागले. खरेदी-विक्री संघ चालू झाल्यास वाणी—उदमी-वर्गावर परिणाम होणार, तंटे आपसांत भागल्यावर वकीलवर्गावर परिणाम होणार. अंधश्रद्धा गेली तर भट पुरोहितांची प्राप्ति बुडणार, म्हणूनच हे वर्ग आणि या वर्गांतील जाति पंचायतीच्या विरुद्ध होत्या. कारण या पंचायतीमुळें खेड्यांतील सत्ता खालच्या श्रमजीवी समाजाकडे जात होती. हा श्रमजीवी वर्ग बव्हंशी मराठा जातीचा होता. यामुळें याविरुद्ध इतर वर्गांची म्हणजे पर्यायानें इतर अल्पसंख्य व्यापारी व धनिक जातींची संघटना बनूं लागली. हेच वर्गीय राजकारण प्रजापरिषदेंतही दिसूं लागले. तेथेंही याच तत्वावर गट पडले. व पुढें याला मोठे स्वरूप प्राप्त झाले.

असेच तट म्युनिसिपालिटीच्या पदाधिकाऱ्यांच्या निवडणुकीबाबत सिव्हिक बोर्डांत व प्रजापरिषदेच्या कार्यकारी मंडळांत पडले.

सिव्हिक बोर्डाचा अध्यक्ष व प्रजापरिषदेचा कार्याध्यक्ष मीच होतो. बहुमताच्या निर्णयाला मान द्यावा असा माझा आग्रह होता. इतरांचा आग्रह बहुमताच्या निर्णयाला बोर्डानें मानण्याची जरूरी नाहीं असा होता. म्हणून मी दोन्ही अध्यक्षपदांचे राजिनामे देऊन टाकले. (२८—३—४६) आमच्यांतील मतभेदांना मुद्दामच वाच्यता दिली नाहीं. कारण अद्याप राजकीय लढा थांबलेला नव्हता. तेव्हां या फुटीला फार मोठें स्वरुप येऊं नये म्हणून त्यांचे अंतरंग उघडे केले नाहीं. तथापि राजिनाम्यांतील इच्छा मात्र माझी खरीच होती ती :—

'पक्ष सेवक या नात्यानें शेतकरी व मजूर यांनाच मुख्यतः जागं करावं व शेतकरी—मजूर राज्याची त्यांना कल्पना द्यावी म्हणून मी आतापर्यंत काम करीत आलो. पण बऱ्याच संस्थांच्या अध्यक्षपदांची जबाबदारी

पडल्यामुळें हे काम माझ्या मनाजोगें होईनासे झाले आहे. म्हणून या सर्व अधिकारांच्या जागेवरून हळू हळू मुक्त होऊन केवळ प्रचारक म्हणून पुढील आयुष्य घालवण्याचा माझा विचार ठरला आहे. या विचाराला धरून मी आज प्रथम सिव्हिक बोर्डाच्या अध्यक्षपदाचा राजिनामा देत आहे.'

प्रचारकाची भूमिका मात्र सुरवातीला होती ती या कालपर्यंत टिकली आहे. व अधिकारापेक्षां यावेळेंपर्यंत मी त्याचाच स्वीकार आनंदानें केला आहे.

पुढे १–८–४६ ला कार्यकारी मंडळाच्या बैठकीनंतर कार्याध्यक्ष-पदाचाही राजिनामा देऊन टाकला.

मी राजिनामा दिल्यानंतर म्यु. पालिटीतील बहुसंख्य उमेदवारांनीही राजिनामे दिले. त्यांतही मराठा–मराठेतर असे भेद पडलेच. यापुढें प्रजापरिषदेच्या जन्मा अगोदरची ऐक्य भावना नाहींशी झाली. निश्चित स्वरुपाचे दोन गट पडले. श्रमजीवी जात व परोपजीवी जाती असेच त्याचे स्वरुप होते. पण आमच्या विरोधीपत्रांनी तिला जातिवादी स्वरुप आम्हांला बदनाम करण्याकरताच द्वेषबुद्धीने दिले. ते या वेळेंपावेतों चालू आहे. शेतकरी–कामगार पक्षावरही याच वृत्तीतून आरोप केले जातात.

**चळवळीचे पहिले स्वरुप—** प्रजापरिषदेच्या जन्मा अगोदरची चळवळ ही प्रथम निव्वळ पांढरपेशा ब्राह्मणवर्गाचीच चळवळ होती. मराठा राजवटींत आपल्याला फारसं स्थान नाहीं व मिळणार नाहीं. आपल्या राजकीय महत्वाकांक्षा पुऱ्या होणार नाहीत म्हणून सहाजिकच असंतुष्ट असलेल्या वर्गानें ही चळवळ चालवली होती. पण हा वर्ग फार अल्पसंख्य. बहुसंख्यवर्गात राजकीय जागृतीचा अभाव. यामुळें सरकारविरूद्‌ लढा द्यायला त्यांची शक्ती फार अपुरी पडली. चळवळीचें पुढारीपणही ब्राह्मणांच्याकडे असल्यानें मराठा बहुसंख्य वर्ग त्यांच्यामागें आला नाहीं. इतर भांडवलवाला अल्पसंख्यही भीतीमुळें बाजूसच राहिला ! यामुळें चळवळीचे पहिले स्वरुप दहशतवादी होते. बहुजनसमाजाची शक्ती मागे नसल्यामुळें चळवळीची दिशा साहजिकच दहशतवादाकडें झुकली. ब्रिटिश मुलखांतही चळवळीचें प्राथमिक स्वरुप असेच होते. या चळवळीचा दुसरा दोष म्हणजे या चळवळीचा पाया आर्थिक नव्हता. त्यामुळेंही चळवळ वाढू शकली नाही.

**शिरोळ पेट्यांतील चळवळीचे स्वरुप—** माझ्या अध्यक्षतेखाली शिरोळ पेट्यांत जन्म पावलेली चळवळ ही शेतकऱ्यांच्या पोटापाण्याच्या प्रश्नांतून पुढें आली. फाळा कमी करा ही तिची घोषणा होती. बहुसंख्य शेतकरी हा मराठा होता. मी आणि माझे त्यावेळचे साथीदार पुढारी हे पण मराठा जातीचे होते. यामुळें मराठा राजाच्या द्वेषानें ही चळवळ चालवली आहे असा पूर्वीच्या चळवळीवर जसा आरोप शाबीत केला जात होता, तसा आरोप आमच्यावर करणे शक्य नव्हते. अद्याप राजकीय लढ्याची पूर्तता व्हायची होती. म्हणून पुढारी मराठाच असणं अवश्यक होतं. इतर जातीच्या पुढाऱ्यांवर बहुसंख्य मराठ्यांचा विश्वास बसला नसता. म्हणून माझा द्वेष करणाऱ्यानाही चळवळीच्या यशस्वितेसाठीं अद्याप माझी अवश्यकता भासत होती. कॉंग्रेसचा हस्तक्षेप अद्याप नसल्यामुळें करवीर जनतेच्याच जोरावर चळवळ चालवणे भाग होते. केवळ ब्राह्मण लिंगायत आणि जैनाच्या संख्याबळावर सरकारला नमवणे शक्य नव्हतें म्हणून मी वस्तुतः नको असलेल्या लोकांनाहीं माझी अद्याप म्हणजे जबाबदार राज्यपद्धती हाती पडेपर्यंत म्हणजे सत्ता हाती पडेपर्यंत अवश्यकता होती. म्हणूनच त्यांच्याकडून तडजोडीचा प्रयत्न झाला.

ता. २४–८–४६ रोजीं कोरगांवकर मिलमध्यें माझ्या व्यतिरिक्त प्रजापरिषदेच्या कार्यकर्त्यांची बैठक भरून अधिवेशनापर्यंत मी दोन्ही राजीनामे परत घ्यावेत तोपर्यंत वादग्रस्त मुद्दे बाजूस ठेवावेत असा ठराव केला. मीही प्रजापरिषदेची ताकत लढा यशस्वी होईपर्यंत कमी होऊ नये म्हणून सभेच्या विनंतीस मान दिला.

प्रजापरिषदेंत डोकावूं लागलेल्या जातिवादाला पायबंद घालावा म्हणून मी एक पत्रक काढले. मी प्रजापरिषदेंत जातिवादाला थारा दिला नव्हता. ज्यांच्या विरुद्ध प्रजापरिषद लढा देत होती तो राजा मराठाच होता. मोठे अधिकारी मराठेच होते व मी मराठाच होतो. आणि मराठा जात संस्थानांत इतकीं मोठी होती कीं, तिला जातिवादी संघटनेची अवश्यकताच नव्हती. श्रमजीवींची संघटना म्हणजे मराठा जातीची संघटना असाच अर्थ होता. जातिवाद डोकावत होता तो अल्पसंख्य जमातीत !

माझे पत्रक ' सारांश:—ज्या जातिवादी संघटना खरोखरीच गरीबांच्या हितासाठीं म्हणून तयार केल्या असतील त्यांनीं त्या मोडून टाकाव्यात. '

**दक्षिणी संस्थान महाराष्ट्र व कर्नाटक विभागाचे अध्यक्षपद—** दक्षिणी संस्थानांत कोल्हापूरच्या चळवळीचे आणि प्रजापरिषदेचें स्थान हे अनन्य साधारण होते. त्यागाची एवढी थोर परंपरा कोणत्याही संस्थानाला दाखवतां येणार नाहीं. स्वामी, वारके, इंगळे वगैरेनीं आत्मबलिदान केले. शेंकडोंनी तुरुंगवास भोगला, कष्ट खाल्ले, घरेंदारें धुळीला मिळालीं. यामुळें इतर प्रजापरिषदांचे अध्यक्षपदही मजकडे चालून आले. भोर, मिरज, सांगली, सावंतवाडी, जत, अक्कलकोट यांचे अध्यक्षपदही आले. या सर्व प्रजापरिषदांत मला भोरचे प्रजापरिषदेंत विशेष जिवंतपणा दिसून आला. तिचें पुढारी गोपिनाथपंत पोतनीस यांनी ती खेड्यांत आणि खेडुतांत नेऊन पोचवली होती. मला ती निव्वळ पांढरपेशा पुढाऱ्यांची चळवळ वाटली नाहीं. गोपिनाथपंतांची राहणी, वाणी, स्वभाव, पेशा आणि पेहेराव खेडुत पुढाऱ्यास शोभण्याजोगाच होता. त्यांची लोकप्रियता व वजन मला प्रत्यक्ष दिसून आली जत, अक्कलकोट व मिरज या परिषदा मला बलवान दिसल्या नाहींत. प्रभावी आणि लोकप्रिय पुढारी तसा चमकला नाहीं. माझे आणि या संस्थानी जनतेचे संबंध अध्यक्षीय भाषणापुरतेच आले. सावंतवाडीच्या परिषदेचा तर मी पहिलाच अध्यक्ष. परिषदेचे चालकानी मात्र मला भरपूर राबवून घेतलं. बहुतेक प्रमुख गांवी व खेड्यावर प्रचाराकरता नेलं. यामुळें सुरवातीपासूनच प्रजापरिषदेची पकड लोकांवर बसूं शकली. शिरोडकरांची चिकाटी आणि तळमळ फार मोठी. स्वभावांतील नम्रता आणि गोडव्यामुळें अद्यापही मजबरोबरचे संबंध टिकवूं शकले. मिरजेची कांहीं खेडीं केली. तथापी परिषदेनंतर फारसा संबंध उरला नाहीं. सांगलीच्या परिषदेचे अस्तित्व मी जाण्यापूर्वीं नामधारीच होते. ती जवळ जवळ पांढरपेशांची बैठक होती. तिचे बूड बहुजनसमाजांत मुळीच पोचले नव्हते. प्रचार झाला नव्हता. त्या मंडळींनी मात्र मला बऱ्याच गांवीं नेले. अनेक व्याख्यानें देवविली. याचवेळीं कायदे मंडळाच्या निवडणुकी होणार होत्या. परिषदेने ही जबाबदारी पार्लमेंटरी बोर्ड निवडून त्यावर सोंपवली. मला अध्यक्षपद दिलें. बोर्डानें परिस्थितीचा विचार करून उमेदवार निवडले. व

आम्हाला चांगलेच यश आले. बोर्डानेच कोरी मंत्रिमंडळ अस्तित्वांत आणले. यानंतर सांगलीचे माझे संबंध फारसे राहिले नाहींत. सर्व संस्थानी प्रजापरिषदांचे, दक्षिणीसंस्थान रीजनल कौन्सिलमध्यें एकीकरण झाल्यानंतर त्या कौन्सिलचा अध्यक्ष म्हणून पुनः संबंध आले. ही निवड ता. ८।९।४६ ला झाली. यातूनच संघराज्याची कल्पना जन्मास आली. शंकरराव देव यांनीं याला विशेष जोर दिला होता.

**संघराज्य—** बाल छत्रपति सहावे शिवाजी महाराज हे या सुमारास निधन पावले. गादी मोकळी पडली. ' कोल्हापुरला आज सज्ञान राजा नसलेनें, राजा नाहीं या सबबीवर कोल्हापुरला संघराज्यांतून बाजूस ठेवण्याचा डाव खेळला जात होता. सांगलीकरांना कोल्हापूर संघराज्यांत यायला नको होते कारण त्यामुळें त्यांना दुय्यमदर्जा प्राप्त होणार होता. याच करता कोल्हापुरला सज्ञान राजाची जरूरी आहे. तो गादीवर बसतांच त्यानें संपूर्ण सत्तादानाची घोषणा व संघराज्यास अनुमती द्यावी, म्हणजे संघराज्याला चालना देणाऱ्यांचा प्रामाणिकपणा लगेच कळाला लागेल ' या अर्थाचा लेख मी ७–१०–४६ ला ' अखंड–भारतां'त लिहिला.

या संघराज्याचा विचार करण्याकरता ता. ८–१०–४६ रोजीं दक्षिणी संस्थानचे सर्व राजे लोक व रीजनल कौन्सिलचे सभासद यांची बैठक पुण्यास सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे हॉलमध्यें भरली. बैठकींत सांगली, फलटण, भोर, जत, मिरज सिनियर व ज्युनियर, कुरुंद्वाड ज्यु., रामदुर्ग, जमखिंडी या संस्थानाचे राजे हजर होते. त्यांचे मंत्रीही होते. औंधचे अप्पासाहेब पंत व दुसरे बाजूस आम्ही रीजनल कौन्सिलचे सभासद होतो. दे. भ. शंकरराव देव हे मुद्दाम उपस्थित होते.

सुरवातीला संस्थानिकांच्या वतीनें फलटणचे राजेसाहेबांचे थोडेसे भाषण झाले. त्यांनी सदिच्छा प्रकट करून, अशा भेटीनें गैरसमज दूर होतील आपण जवळ येऊ व देशाची सेवा करूं अशा अर्थाचे भाषण केले.

यानंतर दक्षिणी संस्थान रीजनल कौन्सिलचा अध्यक्ष या नात्यानें माझे भाषण झाले. मी म्हणालो,

' दक्षिणी संस्थानच्या इतिहासांत आजची सभा ही अभूतपूर्व अशीच ठरेल. आज संस्थानिक व संस्थानी प्रजेचे सेवक बरोबरच्या नात्यानें एकमेका-

समोर एकाच तऱ्हेच्या बैठकीवर बसलो आहोत. मानसिकदृष्ट्या तरी आपण एका पातळींत येण्याचा प्रयत्न करीत आहोत. ही समतेची आणि प्रजेच्या सेवेची दृष्टी जर वाटाघाटींत राखली गेली तर आपल्याला यश मिळाल्याखेरीज राहणार नाही. ज्या मानानें राजेलोक स्वार्थीदृष्टी टाकून देतील व आपण सर्व, आज ना उद्या अखंड–भारतांतच एकरूप होणार आहोत या जाणीवेने संस्थानचे धोरण आखूं लागतील व सेवाभावानें प्रजेशीं वागूं लागतील तर त्यांचा मानमरातब, त्यांचा दर्जा प्रजा सांभाळल्याखेरीज राहणार नाही. त्यांच्या अपेक्षेहूनही प्रजा त्यांच्या सेवेची परत फेड करील.'

यानंतर शंकरराव देव यांचे भाषण झाले. व बैठकींत संघराज्यास पूर्ण अनुकूल असे वातावरण निर्माण झाले होते.

पण या कल्पनेला मूर्त स्वरूप येण्याअगोदरच जमखिंडीकर, फलटण-कर वगैरेनीं विलिनीकरणालाच मान्यता दिल्यानें ही कल्पना बारगळली गेली व हा मधला टप्पा नाहींसा झाला.

**प्रजापरिषदेच्या निवडणुकींतले डावपेंच**— नवीन घटनेप्रमाणें कोल्हापूर प्रजापरिषदेच्या निवडणुका व्हावयाच्या होत्या. ती जबाबदारी कोणाकडे तरी सोपवणे भाग होते. १९४२ च्या आंदोलनांत भूमिगत; झालेले कांहीं कार्यकर्ते यावेळीं बाहेर होते. त्यापैकीं तुकदेव कुलकर्णी, शंकरराव माने वगैरे तिघांची कमेटी नेमून त्यांचेवर हे काम सोपविलें. पण भूमिगत तंत्र स्वीकारता स्वीकारता तेच दुर्गुण स्वभावाला चिकटतात तोच अनुभव या कमिटीचा आला. त्यांनीं विश्वासाचा भरपूर दुरुपयोग केला. निवडणुकीं सरळ निःपक्षपातबुद्धीनें न करतां आपला भूमिगत आणि त्यांतहि जेजुरी गट प्रामुख्यानें निवडून येईल व मध्यवर्ती आपल्या ताब्यांत राहील अशा रीतीनें आपल्या अधिकाराचा वापर केला. कित्येक ठिकाणीं यांनीं व रिटर्निंग ऑफिसरनीच कोणाला निवडावें याचा प्रचार केला. याबाबत उघड तक्रारी आल्या व पत्रांतून टीका झाल्या. मला स्वतःलाच कटु अनुभव आला.

शाहूमिल मजूर संघाचा मी अध्यक्ष होतो. त्यामुळें बहुतेक काम-गारांना मी प्रजापरिषदेचे सभासद करून घेतले होते. शाहुपुरींतीत कित्येक हमालांनाही करून घेतले होते. यामुळें शाहुपुरीभागांत मजूरांचे प्रतिनिधीच

खात्रीनें येत होते. पण या कमेटीने कारवाई करून यांचे मतदान बुडवले व व्यापारी गटाला निवडून आणले. हे लोक पुढें सरळ सरळ भांडवलदार वर्गालाच सामील झाले. दीड दोन हजारांचे मतदान बुडवल्यानें मीही रागावून मध्यवर्तीतील माझी उमेदवारी काढून घेतली. मजूर संघाचे सेक्रेटरी विश्वास पाटील यांनींही काढून घेतली. पण याचा परिणाम त्यांच्यावर होण्याइतके ते मऊ कातडीचे नव्हते. या उपायांनी त्यांनी मध्यवर्तींत आपले बहुमत करून घेतले.

प्रजापरिषदेचे सभासद झाल्या नंतर श्री. खांडेकर वकील हे मध्यवर्तीच्या निवडणुकीस उभे राहिले असतांना ते पूर्वी असेंब्लीला उभे होते या सबबीवर, आपल्याच अधिकारांत त्यांची उमेदवारी या भूमिगतवाल्या कमेटीनें रद्द केली. असा कमेटीला अधिकार नाहीं असे कार्याध्यक्ष या नात्यानें मी कमेटीस बजावले असता माझा आदेशही धुडकावून दिला. अशा प्रकारें उघड विरोधाला सुरवात झाली. व या कृत्याला कार्यकारी मंडळांतील मराठेतर वकीलांनी साथ दिली.

मध्यवर्तीच्या निवडणुका पुऱ्या झाल्या. यानंतर त्यांतून कार्याध्यक्षानें लगेच कार्यकारी मंडळ बनवायचे असें घटनेतच कलम होते, त्यानुसार मी प्रत्येक विभागांतील अध्यक्ष किंवा सेक्रेटरी या अधिकृत प्रतिनिधीनांच निवडून नवें कार्यकारी मंडळ बनवले. मुसलमानाला प्रतिनिधित्व मिळावे म्हणून तो सेक्रेटरी किंवा अध्यक्ष नसतांनाही घेतले. श्रेष्ठी वकील यांचा कल माझे बाजूचा नव्हता. ते सेक्रेटरी किंवा अध्यक्षही नव्हते. तथापीही त्यांना घेतले. अशा रीतीनें कार्यकारी मंडळ हे विभाग प्रमुखाचे बनवले. त्यांत बहुतेक जातींचा समावेश झाला होता. तथापी माझ्यावर जातिवादाचा आरोप करण्यास ते कचरले नाहीत.

प्रजापरिषद आंत अशी जरी पोखरली गेली होती व तींत वार्गिक दुफळी जरी पडली होती तरी—राजकीय सत्ता अद्याप पदरीं न पडल्यामुळें सरकारविरोधी एकजूट ही टिकवणे भाग होते. व्यक्तिस्वार्थांच्या व वार्गिक स्वार्थांच्या लढ्याला अद्याप विलंब होता. आम्ही प्रजापरिषदेच्या मागणीसाठीं लढा देण्याचे ठरवलेच होते. तसें पंतप्रधानांना ठरावाद्वारें कळवले होते. २५–१२–४६ ला पंतप्रधानाकडून त्यांचें उत्तर आले. अपेक्षेप्रमाणेच ते

होतें, ' लवकरच सज्ञान राजा येईल. तो येतांच त्यापुढें राजकीय सुधारणेची मागणी ठेवण्यांत येईल. अज्ञान आल्यास हल्लींचे कारभारी मंडळ हा प्रश्न हातीं घेईल. पण याचवेळीं दूरगामी परिणाम करणारी सुधारणा हातीं घेणे योग्य होणार नाही. '

या उत्तरानें आमचा निर्णय कांहीं बदलला नाही. १६–१२–४६ रोजी मध्यवर्ती भरून तीत लढ्याचा निर्णय घेतला. मात्र अखिल भारतीय प्रजापरिषदेची संमती मिळाल्यानंतर मगच लढा पुकारावा असें ठरले. पण तिकडून सबूरीचाच आदेश आला. कॉंग्रेसच्या मंडळींचें हे धोरण चळवळीच्या सुरवातीपासून ते आतापर्यंत असेच होते. आम्ही उठाव घ्यायचा आणि त्यांनी आवरायचे !

× × ×

**नोकर लोकांचा अभूतपूर्व संप—** कोल्हापुरांत राजकीय लढ्याच्या घोषणेमुळें वातावरण तंग झालं होतं. अशाच वेळीं सरकारी नोकर संघानें संपाचा निश्चय जाहीर केला. नोकर लोकांची संघटना फार मजबूत झाली होती. लढा निश्चयानें तडीस नेण्याइतका त्यांचा आत्मविश्वास जागा झाला होता. नोकर लोकांची संघटना होणं ही मोठी अवघड आणि धोक्याची गोष्ट. कारण सरकारी यंत्रणेवरच त्याचा परिणाम होणार होता. पण या संपानें फार मोठी मजल गांठली होती. कोल्हापुरच्याच काय पण हिंदुस्थानच्या इतिहासांत नामनिर्देश करण्याजोगा हा संप होता. ही संघटना मजबूत करण्याचं काम नवजीवन संघटनेनं केलं होतं. असा संप या पूर्वी कधीच झाला नव्हता. हिंदुस्थानांत सुद्धां इतरत्र कुठें झाला असेल असं मला वाटत नाहीं. या संपामुळें राज्याच्या कारभारालाच खीळ पडली होती. सरकारचा बोज खलास झाला होता. या संपकालीं सरकारचे राज्ययंत्र जवळ जवळ स्थगित होऊन बसले होते. मोठ मोठ्या ऑफिसना टाळे पडले होते. टेबलावरची धूळ पुसण्याचा प्रसंग अंमलदारावरच आला ! जेथून ऑर्डर सुटायच्या त्या ऑफिसमध्यें ऑर्डर लिहायला आणि ती पोचवायला कोणी नव्हतं. नेहमी पंचगंगेवर जाणारा शुक्रवारचा (छत्रीनापालखी ) लवाजमा जाऊं शकला नाहीं. हत्तीवर बसायला माहूत मिळाला नाहीं. शहरांतील राजसत्ता नाहीशीं झाली होती. दरबारची स्थिती

केविलवाणी झाली होती. इतक्या थराला गेलेला संप माझ्या सांगण्यावरून मागें घेण्यात आला. कारण मी राजकीय संस्थेचा प्रमुख होतो. त्या राजकीय संस्थेनें लढ्याची तारीख जाहीर केली होती. म्हणूनच माझ्या शब्दाला मान देऊन संप मागें घेतला! मी किंवा प्रजापरिषदेनें ही संघटना बनवली नव्हती. यांत आम्ही प्रत्यक्ष असा भाग घेतला नव्हता. मात्र संपवाल्याकडे माझी आणि प्रजापरिषदेची सहानुभूती होती. यामुळें प्रजापरिषदेच्या लढ्याची शक्ती वाढणार होती.

पण गांवांतील पाणी, दिवाबत्ती वगैरे बंद झाल्यास नागरिकांची फारच कुचंबणा होणार म्हणून संपवाले व नागरीक या दोन्हीसाठीं म्हणून मी मध्यस्थांची भूमिका घेतली. संपाचे पुढारीपण घेऊन श्रेय उपटण्याचा अश्लाघ्य प्रयत्न नव्हता. या संघटनेकडे मी लक्ष दिलेही नव्हते. मी दौऱ्यावर होतो. ( ११–१–४७ ) पन्हाळ पेट्यांतील माले या गांवीं गेलो होतो. व्याख्यानानंतर माल्याहून साडेतीन वाजतां करविरी आलो. शहरांत हिंडून संपाची परिस्थिती पाहिली. घरीं साडेचारला आलो. घरीं बरीच मंडळीं भेटण्यास आली होती. माझा आणि संपाचा कांहीही संबंध नव्हता.

आश्चर्याची गोष्ट. अगदी अनपेक्षित. जाधव फौजदार एकदम घरीं आले. पोलीसांची पिंजऱ्याची गाडी दारांत उभी! मला बरोबर चलण्यास सांगितले. पोलीस चौकींत नेले. या सर्व प्रकारामुळें मी थक्कच झालो. तेथे श्री. नारायणराव सरनाईकनाही आणले होते. ही अटक शेतकरी कामकरी संघानें १४४ कलम मोडून गुळाबाबत आणलेल्या मोर्चाबद्दल होती. त्यावेळीं मी आशिर्वादात्मक भाषण केले होते. त्यासाठीं ही अटक असल्यास कोण जाणें.

याच सुमारास संध्याकाळीं ६ वाजता बिंदुचौकांत संपासंबधी सभा होती.

सिटी पोलीस ऑफिसमध्यें मला बसवण्यात आले होते. फौजदार श्री. जाधव माझ्या जवळ येऊन म्हणाले, ' तुम्हांस ५।६ दिवस अटकेंत रहावे लागेल. वाटल्यास पन्नास रुपये भरा आणि जा ' त्यांना मी सांगितले, ' मी पैसे भरत नाही आणि जामीनही पण देत नाही. ' मला मागाहून समजले कीं मला सोडून देण्याचा हुकूम आला असतानाच हे गृहस्थ अशा

प्रकारें माझ्याबरोबर बोलत होतें. ' पुढारी ' पत्राचे श्री. कामत यांना ती माहिती मिळाली असावी. त्यांनी विचारतांच ते म्हणाले, ' जामीनाची अट वगैरे कांहीं नाही, तुम्ही जाऊ शकता ' पोलीस अधिकाऱ्याच्या या बेजबाबदार वागणुकीचे मला आश्चर्य वाटले.

सुटताच मी तेथून सरळच बिंदुचौकांत गेलो. १०।१२ हजार जमाव जमला होता. माझ्या अटकेचा व सुटकेचा हा एक मूर्खपणाचा व गैरमुत्सद्दी-पणाचाच खेळ होता.

सभेंत सोमवारीं सकाळी अकरा वाजता कारकून आणि इतर नोकर वर्गाच्या मागण्यासाठीं मोर्चा नेण्याचे ठरले. त्यापूर्वी कार्यकारी मंडळाची बैठक घेऊन मागण्या नक्की केल्या.

मोर्चा शालिनी पॅलेसवर निघाला. मोर्चाचें स्वरुप फार मोठें होते. मोर्चा बरोबर वसंतराव बागल, गोविंदराव उपळेकर, नारायणराव सरनाईक वगैरे डेप्युटेशनची सर्व मंडळी होती. पॅलेस समोरील बागेंत १०।१५ हजारावर समाज बसून राहिला होता. लाऊड स्पीकरची व्यवस्था आम्हा मंडळींनी केली होती.

आमच्या मागण्या बऱ्याच वाटाघाटीनंतर मान्य झाल्या. मुंबई प्रमाणें पगारवाढ व भत्ता वगैरे देण्यात येईल असें ठरले. यावेळचे पंत प्रधान मि. ऑस्टिन हे होते. दरबारनें लवकरच सरकारी पत्रक काढून कोणत्या मागण्या व कशा मान्य केल्या ते जाहीर केले. ' मुंबई सरकारनें आपल्या सरकारी नोकरांच्या मागण्यांना ज्या पद्धतीवर व तत्वावर मान्यता दिली असेल त्याच तत्वावर येथील सरकारी नोकरांच्या संघांना सरकार मान्यता देईल ' अशी ती घोषणा होती.

दरबारनें मागण्या मान्य केल्या या समजुतीनें लोक कामावर गेले. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून संप मागें घेण्यात आला. यामुळें माझ्या मनावर फार मोठा बोजा पडला. यांच्या पदरीं मागण्या पडल्या नाहीत तर कारकूनवर्ग मला काय म्हणेल, त्यांचा विश्वासघात केल्यासारखे होईल. जनतेचा माझ्यावर केवढा बोल येईल ? या विचारानें मी इतका बेचैन झालों कीं मला निवांत झोंप लागेना. झोंपल्यानंतर तीच स्वप्नें, जागे झाल्यावर तेच विचार !

मला जी भीती वाटत होती तीच अखेर खरी झाली. इंग्रज लोक असंतोष शमवण्याकरितां त्यावेळीं वचनें देत आणि त्याचा अर्थ वाटेल तसा लावून ती मोडत. तो प्रकार याही ऑस्टिन मंत्रिमंडळानें केला.

मंत्रिमंडळानें मागण्या मान्य केल्या या समजुतीनें लोक कामावर गेले. पण कामावर गेल्यानंतर मंत्र्यांनीं शाब्दिक कसरत करून आमचा विश्वासघात केला. शब्दाची फिरवा फिरव चालू केली. आम्ही मुंबईच्या धर्तीवर On the lines असें म्हणालो मुंबईप्रमाणें as it is असें म्हणालों नाहीं, येथील परिस्थितीचा विचार करणे आम्हाला भाग आहे म्हणून मागण्या पदरांत टाकण्यास चुकवाचुकव चालू केली.

दरबारच्या म्हणजे ऑस्टिनच्या या चकवण्यानें माझ्या मनाला जबरदस्त धक्का बसला. मी लोकांना तोंड कसें दाखवूं? त्यांची समजूत कशी घालूं! पोटासाठीं चालू केलेल्या लढ्याला पोकळ शब्दानें कसे स्वस्थ बसवूं! केवळ या प्रश्नावर प्रजापरिषदेचा लढा चालू करणे शक्य नव्हते. हा सर्व जनतेचा राजकीय प्रश्न नव्हता! पण नोकर लोकांनी माझ्यावर विश्वास टाकला होता! या अपराधाबद्दल मी स्वतःला शासन करून घ्यायचे ठरवले. माझ्याहातीं फक्त एकच शस्त्र होते! प्राणांतिक उपोषण! निकाल अनुकूल लागेपर्यंत उपोषण! मी या प्रश्नावर प्राण देण्याचा निश्चय केला.

**माझा उपवास**— प्रजापरिषदेच्या जन्मदिनीं ता. ६–२–४७ रोजीं उपवास करण्याचा निश्चय जाहीर केला. सरकारला विचारासाठीं १५ दिवसांची मुदत दिली. मुदतीचा उपयोग झाला नाहीं. अखेर २२-२-४७ला सकाळीं साडेआठ वाजतां उपवास सुरू केला.

यावेळेपर्यंत मी म. गांधीजींच्या तत्वज्ञानाचा अभ्यासू, उपासक व महात्माजींना मार्गदर्शक मानणारा होतो. त्या धोरणाला अनुसरून आतापर्यंत प्रजापरिषदेचे कार्यक्रम आंखीत गेलो. त्यांच्या मार्गानुसार मलाही उपवासाचा प्रसंग कधीं काळीं येईल असे वाटले नव्हते. मी धार्मिक एकादशी व उपवासही कधी केलेला नव्हता. उपवासाचे तंत्र माहित नव्हते. पण मनाची टोचणी, लोकांचें बोल मुडदारपणानें सहन करण्याची अपात्रता. प्रतिकाराच्या दुसऱ्या कसल्याही साधनाचा अभाव, यामुळें मला दुसरा मार्ग सुचेना!

अंतरीची मनस्वी तळमळ, मनाचा दांडगा निश्चय, मरणाची प्रामाणिक-पणाची तयारी, यामुळें हा मार्ग पतकरला ! मला आग्रह होईल व मग मला उपवास सोडावा लागेल ही भावना मनांतून काढून टाकली व आरंभ केला ! यामुळेंच मला उपवासाचा त्रास झाला नाहीं. भुकेनें मी व्याकूळ झालो नाहीं. मी फक्त मरणाची वाट पहात दिवस काढीत होतो.

या उपोषणामुळें सर्व कोल्हापूर जनतेची आणि महाराष्ट्राची मला सहानुभूती मिळाली. अनेक कॉंग्रेस कमेट्यांनी बहुतेक संस्थानच्या प्रजा-परिषदांनी आणि कॉंग्रेसच्या कित्येक पुढाऱ्यांनी ठराव, पत्रें, तारा पाठवल्या. त्यांचा ढीग पडला. डॉ. पट्टाभी सितारामय्या, शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, पंतप्रधान खेर, इतर मंत्री, आमदार, पुढारी, मित्रगण आणि ओळखीची मंडळी यांच्या पत्रांचा वर्षाव झाला. पट्टाभींचे प्रेमळ पत्र उल्लेखनीय होते. काकासाहेब गाडगीळांनीही लक्ष घातले होते.

माझे मित्र डॉ. धनवडे रोज एक दोनवेळां येऊन प्रकृती तपासून जात. त्यांनी फार काळजी घेतली. उपवासाचे पहिले तीन दिवस फार त्रास होतो म्हणतात. पण मला कांही तसा झाला नाही. उपवास सुटेपर्यंत भूक, तहान, मळमळ, ओकारी वगैरे कांहीं नव्हती. मी फक्त पाणी तेवढे घेत होतो, त्यांत लिंबवाचे थेंब टाकत. थकवा वाढत होता. पण बोलणे बंद नव्हते. रोज दोन पौंड वजन घटत असे.

उपवास सुरू झाल्यापासून करवीर जनतेने मात्र माझ्यावर प्रेमाचा जणु संतत अभिषेक चालवला होता जनतेच्या पवित्र पदधूलीनें माझी खोली आणि व्हरांडा भरून जाई. प्रेमभरानें वाहिलेल्या फुलांचा ढीग पडे. कोणी भेटायला नाहीं असा क्षण नव्हता. श्रीमंत, गरीब, सर्व जातीच्या स्त्री पुरुषांनी गल्लीला यात्रेचे स्वरुप आणले होते. त्यांना पाण्याची व बसण्याची सोय व्हावी म्हणून मातंगगुरु आणि मंडळींनी, तात्पुरता मंडप बांधला होता. माझी स्थिती पाहून स्त्रिया डोळ्याला पदर लावत. येई तो पायाला हात लावून जाई. फुलांनी व अश्रूंच्या सिंचनांनी आणि आशिर्वचनांनीं खोलीचें वातावरण भरून गेले होते. प्रत्यक्ष खोलींत येऊन मला गोंजारण्यात व माझे गालावरून प्रेमानें हात फिरवण्यात खेडूतांना व म्हाताऱ्या स्त्रियांना आनंद वाटे ! मांगवाड्याच्या लोकांनी लोकांची बाहेर बसण्याची सोय केली

होती. कारकून आणि नोकरवर्गाची तरी रोज नियमित भेट असे. पुढे पुढे परगांवचे मोर्चे मी उपवास सोडावा म्हणून आले. येणाऱ्या सर्वांना नमस्कार करून करून हात इतके थकले कीं ते पुढे उचलेनात. कारण भेटायसाठीं बाहेर बारी लागायची. महादेव गायकवाड, कारखानीस वगैरे कांहीं मंडळी तर घरीं रात्रंदिवस पडून राहिली होती. ताराबाई राणीसाहेबही फोननें सारखी चौकशी करीत. या जनतेच्या उपकाराच्या ऋणाने मला गहिंवरून येई. क्षुल्लक त्यागाची ही हजारोपटीनें झालेली चीज पाहून अंतःकरण भरून येत होते! अश्रुंचा लोट आवरता येत नव्हता! शहरांत बाहेरच्या लोकांची गर्दी होऊं लागली. कांही अत्याचाराची भाषाही बोलूं लागले पण मी त्यांना शांत राहण्याची ताकीत दिली. हा मिळालेला मोठेपणा पाहून मन उलट खजील होई. किती मोठं केलं लोकांनी मला!

फक्त परिणाम झाला नाही तो मंत्रिमंडळावर. कोणीही मिनिस्टर मला भेटायला किंवा पहायला आले नाहींत.

आचार्य जावडेकरांचे पत्रक— याचवेळीं मला पाठिंबा देण्याकरता गांधीतत्वज्ञानी आचार्य शंकरराव जावडेकर यांनीं मुद्दाम एक खास पत्रक काढले होते.

‘ कोल्हापुरांत भाई माधवराव बागल यांनीं दरबारच्या वचनभंगाविरुद्ध प्रायोपवेशन सुरूं केलें आहे. कोल्हापूर हें महाराष्ट्रांतील महत्वाचें संस्थान आहे. शिवछत्रपतींच्या स्मृतीशीं कोल्हापूरचें नांव निगडित झालेलें आहे. कोल्हापुरांतील दरबारच्या अन्यायाविरुद्ध टीका केल्यामुळें आधुनिक महाराष्ट्रांचे जनक अशा टिळक–आगरकरांना प्रथम कारावास सोसावा लागला. ब्राह्मणेतरांच्या सत्यशोधक चळवळींचें आश्रयस्थान कोल्हापूर होतें. सातारा जिल्ह्यांतील शेतकरी वर्गाच्या जागृतींत कोल्हापूर संस्थानचा फार मोठा संबंध आहे! कोल्हापूरच्या प्रजापरिषदेला सत्याग्रही दीक्षा देण्यांत भाई माधवराव बागल यांनीं महत्त्वाचें कार्य केलेलें आहे. खरा सत्यशोधक हा सत्याग्रही असला पाहिजे. या निष्ठेनें भाई बागल यांनीं कोल्हापूरांत एक नवजीवन निर्माण केलें. १९४२ च्या लढ्यांत भाई माधवराव बागल आणि प्रजापरिषद यांनीं धडाडीनें भाग घेतला आणि कोल्हापुरांत क्रांतीची प्रचंड लाट उठली.

अशा कोल्हापूर प्रजापरिषदेच्या नेत्यांनं आज कोल्हापूर दरबारच्या अधिकाऱ्यांवर म्हणजे मंत्रिमंडळावर वचनभंगाचा उघड आरोप केला असून प्रजापरिषदेच्या या नेत्याशीं समेट करण्याची सद्बुद्धि दरबारला झाली नाहीं तर कोल्हापूर संस्थानचा राज्यकारभार भंग पावून तेथील अनियंत्रित सत्तेचा पूर्ण अंत झाल्यावांचून राहणार नाहीं. प्रजापरिषद हीच राज्याची खरी मालक आहे व तिच्याशीं तडजोड करण्यासच नव्हे तर तिच्यापुढे मान लवविण्यास कोणाहि अधिकाऱ्याला किंवा दिवाणाला कमीपणा वाटण्याचें कारण नाहीं. भाई माधवराव बागल यांच्याशीं बोलणें करून आपल्यावरील वचनभंगाचा आरोप नाशाबीत करण्यास आणि आपलें वचन प्रत्यक्ष कृतींत उतरविण्यास दरबारच्या अधिकाऱ्यांनीं पुढें आले पाहिजे.

आज हिंदुस्थानांत क्रांतीचा काळ प्राप्त झाला आहे. दीडशें वर्षं सर्व देशावर व संस्थानिकांवर नाचणारी ब्रिटिश सार्वभौम सत्ता नामशेष होऊं लागली आहे. अखिल हिंदुस्थानची प्रजा आपलें सार्वभौमत्व प्रस्थापित करण्यास पुढें सरसावली आहे. ब्रिटिश पंतप्रधान जगाला ओरडून सांगत आहेत कीं, पुढील सालीं आम्ही हिंदुस्थानांतून चालते होणार. अशावेळीं प्रजापरिषदेच्या नेत्याशीं सन्मान्य समेट घडवून आपलें धोरण खरें लोकहिताचें आहे अशी प्रजापरिषदेची खात्री करणें हेंच दरबारच्या दिवाणांचे आद्य कर्तव्य आहे. गेल्याच महिन्यांत कोल्हापूरचा सर्व राज्यकारभार थंडावला होता. तो पुन: सुरू झाला असला तरी ज्या शक्तीनें तो कारभार बंद पाडला ती शक्ति नष्ट झालेली नाहीं. तशी आपली समजूत करून घेणें हा मोठाच भ्रम आहे. तेंव्हा दरबारनें तावडतोब प्रजापरिषदेचे नेते भाई माधवराव बागल यांचें प्रायोपवेशन थांबवावें आणि प्रजापरिषदेच्या मताप्रमाणें राज्यकारभार करूं लागावें हेंच योग्य. सर्व महाराष्ट्र आजच्या प्रकरणाकडे चिंतातूर वृत्तीनें व प्रजापरिषदेशीं सहानुभूतीनें पहात आहे.

**वाटाघाटी—** अखेर दिल्लीहून अखिल भारतीय प्रजापरिषदेतर्फे कमल नयन बजाज आले. त्यांनीच दरबारशी वाटाघाटी केल्या. त्यांनी कांही तडजोड केली. व अखिल भारतीय प्रजापरिषदेचा आदेश म्हणून मला उपवास सोडणे भाग पाडले. नऊ दिवसानंतर ता. २२-२-४७ रोजीं सकाळीं

आठ पस्तीसला मोसंब्याच्या रसानें उपवास सोडला. गोविंदराव उपळेकर वगैरे मंडळींनीं मागण्या प्रमाणें तडजोड व्हावी म्हणून बराच त्रास घेतला.

तडजोडीनें माझ्या मनाचे मात्र समाधान झाले नाहीं. संस्थेचा आदेश म्हणून मला नमावे लागले. बजाज आले नसते तर याहून चांगली तडजोड झाली असती !

उपवासानें मला मोठे केले ! जनतेच्या प्रेमसागरांत मी डुबून गेलो, ते प्रेम कायावाचामनें मी अनुभवूं शकलो.

एका हातानें दिलं ते हजारो हातांनी आणि सहस्त्र पटीनें परत मिळालं ! विराटस्वरुपी दयावंत परमेशाचं प्रत्यक्ष दर्शन घडलं !

उपवास सोडल्यानंतर मात्र एकदम थकवा आला, मनाची शक्ती व निर्धार याचा जोम उपवास सोडल्यानंतर कमी पडला, उपवास सोडल्यानंतर हुषारी वाटण्याऐवजीं एकदम गलित झालो, यापुढें थकव्यामुळें बरेच दिवस घरांत अडकून पडावें लागले, उपवासांत खरा मानसिक त्रास कोणाला झाला असेल तर तो माझ्या पत्नीला, माझ्या मुलाला व मजवर प्रेम करणाऱ्या कांही मित्रांना.

**उपवासाचा परिणाम**— २२-२-४७ ला उपवास सोडला. आज मी लिहीत आहे हे साल १९५३. या पांच वर्षानंतर मी परत माझ्या उपवासाकडें निराळ्या दृष्टीनें पाहूं शकतो, ही उपवासाची पद्धत जनता संघटनेला उपयोगी पडली कीं नाही ? या उपवासानें मी काय साधूं शकलो ? शेतकरी-कामगारांच्या संघटनेला हा मार्ग चांगला काय ? अनुभव आला त्यावरून मला वाटतं हा मार्ग जनता संघटनेच्या दृष्टीनं चुकीचा आहे, उलट यामुळें त्यांची शक्ती कमी होण्याचाच संभव अधिक. लोकशाहीला तो उपकारक वाटत नाही, यातून सामुदायिक सत्याग्रह किंवा कायदेभंगाला उठाव दिला गेला तरच तो समाजाला पुढे नेऊं शकेल.

माझ्या उपावासानें काय झाले ? माझा भाव भयंकर वाढला ! माझी लोकप्रियता वाढली ! जनतेची आणि संघटनेची दृष्टी माझ्याचकडे खेचली गेली. नोकरलोकांच्या मागण्यावर सर्व दृष्टि केंद्रित होण्याऐवजीं मी जगतो कीं मरतो याकडें त्यांचे लक्ष लागले. त्यांच्या संघशक्तीच्या जोरावर मागण्या-पदरांत पाडून घेण्याऐवजीं ते परावलंबी बनले. आपला प्रश्न माधवरावच

सोडवतील असें वाटून त्यांची स्वतःची उमेद व प्रयत्न कमी झाला. अशा-रीतीनें संघटनेची शक्ती खची झाली. एका मनुष्याच्या अशा त्यागानें त्याची हुकमत त्या मंडळींवर चालते. पण तो एक प्रकारें हुकुमशहा बनतो. त्याच्या त्यागापुढें संघसभासद लुले पडतात. माझ्या उपवासाचा परिणामा हा झाला. माझ्या उपवासामुळें नोकर संघटनेचं महत्व कमी झालं. पुढं त्यांना तितकी संघटना बनवणं अशक्य झालं ! म्हणून मानसिक अगर शारिरीक शुद्धतेच्या आणि स्वच्छतेच्या दृष्टीनं किंवा आत्मविकासाच्या दृष्टीनं हा मार्ग उपयोगी असू शकेल पण लोक संघटनेला तो मारक आहे असे आता माझे मत बनले आहे. मार्ग भिन्न असले तरी उपवास आणि सॅबोटेज चळवळ दोन्हीही लोकशाहीला मारक आहेत.

**सॅबोटेज चळवळ**— उपवासानें आत्मोन्नती होऊ शकेल ती गोष्ट सॅबोटेज चळवळीने होणार नाहीं. कारण या चोरट्या कालांतल्या चोरट्या अजब गोष्टीनें लोकांत कुतुहल उत्पन्न होते. त्या माणसाबद्दल अचंबा आणि दचका वाटतो. पण त्याला त्या चोरट्या मार्गाच्या संवयी चिकटण्याचा संभव फार असतो आणि त्यामुळें त्यांच्या स्वभावांतील पावित्र्य, नेकी, सचेपणा टिकू शकत नाहीं. प्रकट आयुष्यांतही त्याच संवयी त्याला चिकटतात. तो राजकारणांत, लोकव्यवहारांत, व्यक्तिविषयक संबंधांत सॅबोटेजचेच तंत्र वापरतो. स्वतःच्या महत्वाकांक्षेसाठीं व स्वार्थासाठीं ध्येय बाजूस सारील, समाजाला चकवील, मित्रांना फसवील, नीतीचे सर्व मान्य नियम धाब्यावर बसवील. कोणत्याही उपायानें पैसा मिळवील. स्थान टिकवील व आपले घोडें पुढें दामटील. भूमिगत राहिलेल्या अनेक कार्य कर्त्यांनी याच प्रकारें आपले स्थान टिकवल्याचे ठिकठिकाणीं अनुभवाला आले आहे. आज काँग्रेसमध्यें असलेल्या अनेकांची चरित्रें अशी बरबटलेली आढळतील. ही अंडर ग्राऊंड चळवळ समाजाला उपकारक ठरली नाहीं. यांतले, बरेच पुढारी संधिसाधू, गटबाज, अप्रामाणिक अन् हुकूमशहा वृत्तीचेच निघाले. यांच्या पुढारीपणाला तात्विक अधिष्ठानापेक्षां, गुंडगिरी आणि गटबाजी हीच वापरली गेली. लोकांपासून सुटलेल्या व दडलेल्या या कार्यकर्त्यांचा एकाकी पडल्यामुळें नैतिक ऱ्हासही झालेला आहे. अनीतीच्या मार्गाकडें तें झुकले आहेत. गांधीवादी सात्विक हुकुमशहा असेल, दुसरा हिटलरी धर्तीचा असेल !

सद्गुणी राजा असला तरी राजशाही ही वाईटच ! एकांत पावित्र्याचा ताठा उत्पन्न होतो तर दुसऱ्यांत धाडशीपणानें केलेल्याचा ताठा येतो. दोन्हींत गांधीवादी केव्हाही चांगला पण लोकशाहीदृष्ट्या हा चांगुलपणाही अनिष्ट होय ! यामुळें सर्व समाज वरच्या थराला येत नाहीं. तो खालीच राहतो.

× × ×

रीजनल कौन्सिलमधील कारवाया— ता. २८-२-४७ रोजीं रीजनल कौन्सिलच्या सभासदांची बैठक मी उपवासानंतर अंथरुणावर असतांनाच माझ्या शेजारच्या घरीं भरवली. इतर संस्थानांतील प्रतिनिधीही आले होते. पुन: यासालीं माझीच निवड करण्यांत आली...

या निवडणुकी पूर्वीच्या बैठकींत ठरल्या नियमाप्रमाणें झाल्या होत्या. कोल्हापूर प्रजापरिषदेच्या घटनेप्रमाणें निवड तालुका प्रतिनिधीतून झाली होती. त्या पूर्वीच्या ठरावाची हस्तलिखित प्रत मजकडे होतीं. त्याबरहुकूम निवडणुकी झाल्या होत्या. पण गेल्या रीजनल कौन्सिलचे जनरल सेक्रेटरी श्री. वर्धमाने यांनीं अखिल भारतीय प्रजापरिषदेकडे मंजुरीला जी ठरावाची प्रत टाइप करून पाठविली त्यांत त्यांनीं तालुका प्रतिनिधी हा शब्द बदलून तेथें मध्यवर्ती सभासदांतून हा शब्द घुसडून दिला. याचें कारण मध्यवर्तींत कारवाया करून निवडणूक समितीनें विरोधी गट आणला होता. त्यांनीं तेथें आपले निश्चित बहुमत केलें होते. हें सेक्रेटरी प्रजापरिषदेतील आमच्या विरोधी गटालाच सामील होते. त्यांनीं अ. भारतीयकडें पाठविलेली खोटी प्रत मंजूर होऊन आली: तिचा आधार घेऊन आमची नवी निवडणूक रद्द करण्याचा विरोधी कंपूनें प्रयत्न केला !

आमची मंडळी खरी हकीकत डॉ, पट्टाभीना समजून देण्याकरता पाठवली, पट्टाभींना खरी बाजू पटली. व निवड तालुका प्रतिनिधीनीच केली पाहिजे असा निर्णय दिला. मच्छलीपट्टमहून ता, १३ मे १९४९ ला डॉ. पट्टाभींचे पत्र आले. ते, ' ...रीजनल कौन्सिलनें २५-१-४७ रोजीं निवडणुकी संबंधीं जो मूळ ठराव पास केला तो अखिल भारतीय प्रजापरिषदेनें ठरवून दिलेल्या नियमांशी सुसंगत होता. पण त्यांत ' मध्यवर्ती समिती '

हे दोन शब्द घुसडून तो मूळ ठराव सेक्रेटरी ( वर्धमाने ) यांनी जाणून बुजून बदलून टाकला ' आहे असा डॉ. पट्टाभीनी अभिप्राय दिला.

अशा रीतीनें आम्ही स्वीकारलेली पद्धती मान्य केली पण त्याच पद्धतीनें फेर निवडणुका सांगली व कोल्हापूर दोन्हीच्याही करणेचा आदेश दिला!

यावरून हे दिसून येईल कीं, उपवासानें मी जनतेचे प्रेम जरी संपादन करू शकलो तरी स्वार्थासाठीं निर्माण झालेल्या गटांतील वितुष्ट आणि कारवाया कमी करूं शकलो नाहीं, रीजनल कौन्सिलच्या निवडणुका होईपर्यंतच्या मध्यंतरीच्या कालांत पुष्कळ गोष्टी घडून आल्या.

— — —

# शहाजी छत्रपती गादीवर आले.

राजा सज्ञानच असावा ही प्रजापरिषदेचीही मागणी होती. कारण मग त्याच्याबरोबर झगडा देता येतो. अज्ञान असल्यास ब्रि. सरकारला पळवाट मिळते. म्हणून तशी मागणी केली होती. आमच्या मागणीप्रमाणें अज्ञानाऐवजीं सज्ञान राजालाच मान्यता मिळाली. त्यानुसार देवासचे महाराज विक्रमसिंह यांना मान्यता मिळाली.

आता लढा देता येईल. काय तो सोक्षमोक्ष करून घेणे शक्य होईल. राजालाही, आमच्या हातीं कांहीं नाही म्हणून रीजन्सी कौन्सिलला जे कालहरण करणे शक्य झाले होते, ते आता होणार नाही, म्हणून मला आनंद झाला. राजा पाहिजे होता आणि तो आला म्हणून मला आनंद झाला असें मुळीच नव्हे. मी राजशाहीचा केव्हांच उपासक नव्हतो, आता प्रजापरिषदेला निर्णायक लढा देता येणार होता. छत्रपती येतांच मी त्यांना माझ्या ‘ अखंड भारत ’ साप्ताहिकांतून खालीलप्रमाणें विनंती केली.

‘ या आणि अजरामर व्हा ! ’

पारतंत्र्यांत ठेचलेल्या प्रजेला शिवबांनीं सोडवून घेतले. गरीब, दरिद्री अज्ञानी मावळ्यांत स्वातंत्र्य ज्योत पेटविली...म्हणून शिवबांचा जयजयकार होत आहे...शिवछत्रपति म्हणजे स्वातंत्र्य, पावित्र्य, स्वार्थत्याग, लोकसंग्रह. शिवछत्रपति म्हणजे उपभोगशून्य स्वामी. नव्या छत्रपतींना प्रणाम करताना आम्ही त्या प्रतीकाला प्रणाम करतो......सर्वस्व जनतेपायीं अर्पण करून लोकपुढारी म्हणून राज्य चालवा. केवळ जनहितरक्षक संरक्षक म्हणून रहा. आपली सत्ता सरंजामदार, इनामदार, सावकार आणि भांडवलदार यांचेकडे जाता कामा नये. व्यापारी दलाल व धार्मिक दलाल यांच्या मगरमिठींतून

सोडवणारी नवी समाज रचना, नवी राज्य व्यवस्था घालून द्या. आपण केवळ कोल्हापूर संस्थान पुरतेच न पाहता महाराष्ट्रांतील श्रमजीवी समाजाला आर्थिक दास्यांतून वर काढण्याकरितां आपली सत्ता, संपत्ती व पुण्याई खर्च करा.

या लेखानंतर ता. १ मे १९४७ ला प्रजापरिषदेच्या खालील मागण्या सारांशानें पुढें मांडल्या

" जनतेची सार्वभौमसत्ता मान्य करावी. प्रौढ मतदानांतून घटना समिती स्थापन करावी. मध्यंतरीच्या कालांत प्रजापरिषदेचे हमखास बहुमत असलेले हंगामी मंत्रिमंडळ नेमावे."

**गारगोटी अधिवेशनांतील समझोता—** या मागण्या अधिवेशन भरवूनच केल्या म्हणजे त्याला अधिकृत स्वरुप येईल व सर्वांना या मागण्या समजावून देऊन संघटना बनवता येईल व लढ्याची तयारीही करता येईल म्हणून गारगोटी या गांवी दे. भ. काकासाहेब गाडगीळ यांचे अध्यक्षतेखाली अधिवेशन भरवण्याचे नक्की केले.

ता. २४ व २५ मे १९४७ रोजीं या अधिवेशनाचें उद्घाटन दे. भ. केशवराव जेधे यांनीं केले.

प्रजापरिषदेंत दुही होतीच. हे अधिवेशन यशस्वी होऊं नये म्हणून भरपूर प्रयत्न झाला. विरोधी गटानें स्वागत सभासदांचीही तिकीटें घेतली नाहींत. व्यापारी वर्गाकडून कांहीही मदत मिळाली नाहीं. यामुळें कोणता वर्ग कोणाकडे हे स्पष्ट झाले.

काकासाहेब गाडगीळनी दुही मिटवण्यासाठीं दुसऱ्या गटांतले निम्मे व आमच्या गटांतले निम्मे असे कार्यकारी मंडळ स्थापण्याबद्दल मला सुचवले. घटनेप्रमाणें कार्यकारी मंडळांत कोण घ्यावेत हा अधिकार कार्याध्यक्ष म्हणून सर्वस्वी माझाच होता. तथापि लढ्याचे वेळे पुरते तरी ऐक्य असावे म्हणून त्या सूचनेला मी मान्यता दिली व त्या गटापैकीं सात व आमच्या गटांतले सात असे सभासद घेऊन कार्यकारी मंडळ बनवले. व ही तात्पुरती दिलजमाई झाली.

अधिवेशनांत मुख्य ठराव खालील प्रमाणें झाला.

'ही प्रजापरिषद संपूर्ण प्रजासत्ताक राज्यपद्धती असावी अशा मताची असली तरी तूर्त तावडतोबीची म्हणून ही प्रजापरिषद असें जाहीर

करीत आहे कीं, खालील गोष्टी छत्रपतींनी ताबडतोब द्याव्यात– लोकप्रतिनिधिक संपूर्ण व सर्वश: हंगामी सरकार स्थापन करावे. त्या संबंधीची जबाबदारी प्रजापरिषद ही संस्थानांतील खरीखुरी प्रातिनिधिक संस्था असल्यामुळें तिजवर सोंपवावी. संपूर्ण जबाबदार राज्यपद्धती देण्याची घोषणा करावी व ही अंमलांत आणण्याचे दृष्टीनें जरूर तो घटनाविषयक कायदा करण्यासाठीं प्रजापरिषदेचे संमतीनें व सल्ल्यानें घटनासमिती नेमून व्यवस्था करावी... घटनेंत प्रौढमतदान व सार्वत्रिक मतदार संघ व प्रत्यक्ष निवडणूक या तत्वांचा समावेश केलेला असावा...घटना परिषदेंत जाण्याचा निर्णयही ताबडतोब घ्यावा.'

आम्हांमध्यें अंत:करणाची दिलजमाई झाली नव्हती. पण सरकारशी लढा देतांना हे सर्व विसरून काम करण्याचा मी निश्चय केला होता.

**असमाधानकारक सुधारणा—** लढा अटळ आहे अशी परिस्थितीहि निर्माण झाली. छत्रपतींनी सुधारणा जाहीर केल्या. त्या पूर्णपणें असमाधानकारक होत्या.

घटनेंत प्रजेचे सार्वभौमत्व मान्य केले नव्हते. एका विधिमंडळाऐवजी दोन विधिमंडळें निर्माण करून बहुजन समाजाच्या विरोधी असें मंडळ तयार केले. घटना करणेचा जनतेचा हक्क हिरावून घेतला. प्रौढ मतदान केले नाहीं. मतदार संघ अनेक, मत एक, यामुळें जातिवाचक गट, पक्षाचे गट, धंदेवाल्यांचे गट अशा अनेक फाटाफुटीस वाव दिला. विधिमंडळांत एकवाक्यता होणें अवघड करून टाकले. हंगामी मंत्रिमंडळांत दोन सरकारचे व तीन लोकनियुक्त असें ठेवले. तीन लोकनियुक्तांत निवडणुकीशिवाय हरिजन मंत्री घेण्यांत आला. यामुळें तिला नेमणुकीचें स्वरुप आलें. उरले दोन मंत्री ते तर इनामदारच घेतले. यामुळें ही घटना स्वीकारणे अशक्य झाले.

**माझी भूमिका—** मला ही राजशाही नकोच होती. पण त्याचवेळीं भांडवलवाल्यांची झब्बूशाहीही नको होती. धार्मिक गुलामगिरीविरुद्ध तर माझ्या वडिलांच्या वेळेपासूनच झगडा चालू होता. ते आम्हाला बाळकडूच लागलं होतं. वडील हे सत्यशोधक होते. म्हणून मी ५-६-४७ च्या 'अखंडभारतांतून' माझी भूमिका स्पष्ट केली.

' आतापर्यंत माझे आयुष्य लोकशाहीसाठींच झगडण्यांत गेले. राजा कोणत्याही जातीचा असो त्याचें हातीं अनियंत्रित सत्ता असता कामा नये हे माझे ठाम मत आहे. पण राजा घालवून त्या ठिकाणी विशिष्ट वर्गाची किंवा विशिष्ट कंपूची सत्ता स्थापण्याची जी धडपड चालू राहील तिलाही निर्भयतेनें विरोध करणे यापुढें मला भाग पडेल. माझं आतापर्यंतचे आयुष्य शेतकरी–मजूराचे हातीं राजसत्ता यावी म्हणून मी घालवलं आहे. पण त्यांच्या शक्तीचा व त्यागाचा फायदा घेऊन त्यांना लुबाडणाऱ्यानांच जर सत्ता मिळूं लागली तर ते मी सहन करणार नाहीं. राज्याची सत्ता ती खेडुतांच्या म्हणजे श्रमजीवी समाजाच्या हातीच पडली पाहिजे. आणि ती ग्रामपंचायत आणि ग्रामराज्यें यानेच पडणार आहे. याला विरोध म्हणजे खालच्या लोकांशी प्रतारणा होय. हे मी सहन करणार नाहीं. मग मी एकाकी राहिलो तरी हरकत नाहीं.' ही माझी भूमिका मी पुनः कार्याध्यक्षपद स्वीकारल्यानंतर व त्या गटांतील सात लोकांना घेऊन समसमान शक्ती केल्यानंतरही पुनः जाहीर केली.

निव्वळ आपले मंत्री येण्यानें सुद्धा लोकशाही रुजणार नाहीं त्यांचा कारभार त्यांनाच करता आला पाहिजे. हा तर माझा पूर्वीपासूनचा आग्रह त्याला अनुसरून मी अनेक पंचायती स्थापन केल्या होत्या! प्रजापरिषदेंत जे गट पडले तें याच कारणामुळें.

× × ×

**प्रतिगामी राज्यघटना**— प्रतिगामी स्वरुपाची लेखकृत घटना प्रजेच्या पदरीं बांधणार असें वाटतांच लोकमताचें निदर्शन करण्याकरता ता. २३-६-४७ रोजीं, घटना निषेधदिन पाळण्यासाठीं मोठी सभा भरवण्याचे ठरवले. सर्व संस्थानभर हा दिवस पाळण्याचा आदेश दिला. याचा परिमाण महाराजांच्यावर झाला. त्यांनीं मला बोलावून घेतले. व ' घटनेंत विचारविनिमय करून बदल करता येईल. ती कायम आहे असें समजूं नका' असें मला सांगितले. त्यामुळें पत्रक काढून निषेधाची सभा रहित केली!

या कृत्याचा विरोधी गटानें जेवढा कांहीं विपर्यास करायचा तेवढा केला! या कृत्याबद्दल मी राजीनामा द्यावा अशी वर्धमाने व श्रेष्ठी यांनी इच्छा प्रदर्शित केली. माझा राजीनामा मागायचा तर त्यासाठीं अधिवेशन

बोलवावे लागले असते पण मला त्या अध्यक्षपदाचं महत्व इतकसं नव्हतं. मला व्यक्ती म्हणून जनतेची सेवा करता आलीच असती. म्हणून मी राजिनामा त्यांच्या तोंडावर फेंकून देऊन मोकळा झालो. पण मध्यवर्तीची सभा होऊन त्यांत जरी विरोधीगटाची मंडळी बहुमतानें होती तरी श्रेष्ठींच्या इच्छेविरुद्ध मी राजीनामा परत घ्यावा म्हणून विनंती केली गेली. हे माझ्या प्रेमानें नव्हे तर अद्याप त्यांना माझी जरुरी होती हेच एक त्याचे खरे कारण होते. त्या त्यांच्या विनंतीस मी मान दिला कारण अद्याप प्रजापरिषदेचे ध्येय साध्य व्हायचे होते.

**उगाच भूमिगत—** या विरोधी गटाचें प्रमुख श्री. कुंभार यावेळेपावेतो कांहीही कारण नसतांना भूमिगत होते. जेजुरी प्रकरणानें यांची महाराष्ट्राला चांगली ओळख झाली आहे. आता अधिकार भोगण्याचा मोका जवळ येत आहे असे पाहतांच हे गृहस्थ प्रकट झाले. विरोधी गटाच्या कारवायांना यांच्या आगमनानें बहर चढला! सत्ता आणि संपत्तीसाठीं यांनी केलेले प्रकार कोल्हापुरच्या लोकांना महशूर आहेत.

**लढ्याची पुनः तयारी--** कोल्हापुरचा प्रश्न हा सुटायचा होता. महाराजांनीं विचार-विनिमयानें घटना बदलण्याचें आश्वासन दिल्यामुळें निषेधाची निदर्शनें बंद केली होती. त्यानंतर वाटाघाटी केल्या. त्या पुनः फिसकटल्या. म्हणून लढ्याची जय्यत तयारी केली. लढा सुरू झाला तर जनतेनें कोणता कार्यक्रम हातीं घ्यावा हेही २९-१०-४७ ला पत्रक काढून जाहीर केले. ‘ सार्वत्रिक हरताळ, सभा, मिरवणुकी, निषेध—प्रदर्शनें, दारूबंदी, ताडीबंदी यांतून वाढत जाऊन साराबंदी व पूर्ण असहकार ’ असा कार्यक्रम आंखला. शेतकरी मजूर व नोकरवर्ग यांची अनुकूलता होती. पोलिसांतही असंतोष होता. संस्थानाबाहेरची आणि एकंदर देशांतली परिस्थिती लढ्याला अनुकूलच होती. कार्यकर्ते सर्वत्र पाठविले होतें. मी तुरुंगांत गेल्यानंतर कृतिसमिती कशी नेमायची तिचा विचार करून बंद पाकीट व त्याची नक्कल एक दोन मित्राकडे ठेविली होती. सरकारला आमच्या तयारीची व बाहेरील स्थितीची जाणीव होतीच. यामुळें—

**छ. शहाजी महाराजाशीं समेट—** ता. २-११-४७ ला हुजुर चिटणीसांकडून मला आकस्मिक पत्र आले. ‘ घटनेचा प्रश्न शक्य तो वाटा-

घाटीनें सुटावा अशी महाराजांची इच्छा आहे. आपलीही तीच असल्याचें दिसत आहे. तरी तसें असल्यास आपण आज रोजीं दोनप्रहरीं सव्वातीन वाजतां हुजुरास भेटण्यास आपणाबरोबर जरूर ते प्रजापरिषदेचे पुढारी घेऊन यावे.'

पत्र पोचल्यानंतर शहरांत त्यावेळीं असलेल्या सर्व कार्यकारी मंडळाच्या सभासदांस बोलावले. अगोदर वाटाघाट केली. व मी, खांडेकर वकील, श्रेष्ठी वकील, वसंतराव बागल वकील व नारायणराव सरनाईक अशीं मंडळीं बरोबर घेऊन गेलो.

सुरवाती पासून अखेरपर्यंत महाराजांची वागणूक सौजन्याची व दिलदारपणाची होती. वाटाघाटींत अटीतटीला आलेल्या शस्त्रूमधील वाटाघाटीचें स्वरुप नव्हते. महाराज स्वतःच आमच्याशी वाटाघाटी करीत. त्यावेळीं त्यांचेसाठीं म्हणून बोलणारे व कायदेशीर सल्लागार म्हणून कोणी असत नव्हते. दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचा अध्यक्ष म्हणून इतर राजेलोकांचे व माझे थोडेसे संबंध आले होते, पण शहाजीमहाराज इतरांशी तुलना करता फार सरस वाटले. त्यांना राजकीय खांचाखोचा चांगल्या समजत. हुषार, मुत्सद्दी व राजकारणी दिसले. ते बोलतांना रागावल्याचे किंवा चिडल्याचे मला कधीं आढळले नाहीं. शिष्टाचार कधीही टाकला नाहीं. पूर्वीच्या राखीव बाबींबद्दल आमचे व महाराजांचे खटकले त्या गोष्टींचाही विचार केला व ते प्रश्नही समाधानकारकपणें सोडवून घेतले. आम्हा शिष्टमंडळाचे त्यानें समाधान झाले. माझ्या आयुष्यांतील हा एक मोठा टप्पा गांठल्यामुळें मला कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. आपली सत्ता आमच्या हातीं देतावेळीं त्यांच्या चेहऱ्यावर नैराश्याची किंवा पराभवाची छटा दिसत नव्हती.

**गांधी पुतळ्यासाठीं शहाजीराजांची देणगी—** मी शब्द टाकयची फुरसत महाराजांनी मोठ्या आनंदानें इतर कोणालाही न विचारतां महात्माजींचा पुतळा उभारण्यासाठीं २५००० रु. चे मला वचन दिले व त्या प्रमाणें रक्कम पोचती केली. महाराजांचे जीवन कसेही असो लोकांच्या पदरीं सत्ता टाकणारा छत्रपती म्हणून त्यांचे स्थान इतिहासांत राहणारच आहे. गेल्या दोन राजवटीतील झगड्यांचा गोड

शेवट यांच्या अमदानींत लागला. माझी एक महत्वाकांक्षा तरी यांचेच अमदानींत पार पडली. म्हणून माझ्या आयुष्यांतही त्यांचें स्थान महत्वाचेंच राहील. आता राजा म्हणून असलेला राजकीय झगडा वस्तुतः संपला होता. मी राजशाहीचा द्वेष्टा असलो तरी शिवछत्रपतींचा अखेरचा अवशेष म्हणून शहाजी महाराजांविषयीची माझी आपुलकी नष्ट झाली नव्हती. व्यक्ती म्हणून त्यांच्याबद्दल मला प्रेमच वाटे. याच भावनेनें वाटाघाटी पुऱ्या झाल्यानंतर मी महाराजांना कडकडून भेटलो आणि जातेवेळीं लवून मुजरा केला ! महाराजही बोलल्याचें आठवते, ' माधवराव, राजकीय मतभेद कांहींही असोत पण तुम्ही मला मित्र समजा. ' राजा मित्र होत नाहीं म्हणतात. माझी ती अपेक्षाही नव्हती. पण शब्दाचा विसर कसा पडणार ! ते मैत्रीप्रमाणें चिकटलेच ! सत्तांतरानंतरही माझ्याशी महाराजांची वागणूक प्रेमाची आणि विश्वासाची होती. त्यांच्या व्यसनाबद्दल मी महाराजांना कटु बोललो पण त्यांना तो लहानतोंडी मोठा घांस वाटला नाहीं. रा. ब. गुरुवर्य लठ्ठे माझ्या घरीं केंव्हा केंव्हा येत. ते एकदा म्हणाले, ' माधवराव, तुम्हाला आनंदाची गोष्ट सांगतो. महाराजांनी व्यसन टाकलं. ' मला इतका आनंद झाला कीं मी त्यांना तेथेच बसवले आणि त्या गोष्टीबद्दल त्यांना पेढे दिले. पण !!! महाराज त्यांतून मुक्त झाले तर अद्याप नांव काढूं शकतील.

**माझी मोठी महत्वाकांक्षा पुरी झाली—** भरपूर शक्ती असूनही ती न वापरता जवळ जवळ ८० टक्के महत्वाकांक्षा तडजोडीनें साध्य झाली. नव्या युगाला सुरवात झाली. जवळ जवळ पंचवीस वर्षे ज्या साठीं झगडलो ती प्रथम केवळ स्वप्नमय वाटणारी गोष्ट प्रत्यक्ष पदरांत पडली. गेल्या पंचवीस वर्षांतील कोल्हापुरच्या राजकारणाचा इतिहास हा माझ्या जीवनाशी निगडीत झाला होता. प्रत्येक लढ्यांत मी भाग घेतला होता आणि त्याला चालना दिली होती. तोंड उघडण्याची परवानगी मागण्यापासून तो समाजसत्ताक राज्यपद्धतीचा उघड प्रचार करण्यापर्यंतच्या सर्व अवस्था पाहिल्या. राजकीय गाऱ्हाणीं मागणेही राजद्रोहासारखे मानले जात होते. अर्ज करणेंही धोक्याचे होते. बोलणे अशक्य होते. मिरवणुकीं काढता येत नव्हत्या. राजकीय चळवळ्या म्हणून माझ्या घरच्या रक्तसंबंधीनी, आप्तांनी व

पूर्वीच्या अनेक मित्रांनी महारोग्याप्रमाणें वाळीत टाकले होते. माझा संबंध समजल्यास राजाची अवकृपा होईल म्हणून अंतःकरणाची ओढ असूनही माझ्याशी फारकत केली होती. अगदी, अगदी जवळच्या रक्तसंबंधींनी तुरुंगांत असतांनाही माझी भेट घेतली नाहीं. घरच्या मंडळींना, बायकोला व मुलालाही भेटण्याचे धारिष्टय केले नाही! मला अस्पृश्य समजून दूर केले. हद्दपारी, अटक, बेड्यांची सक्तमजुरी, स्थानबद्धता, दंड हे शिक्षेचे सर्व प्रकार झाले. आणि त्याच माझ्या हातीं प्रजापरिषदेचा अध्यक्ष या नात्यानें संस्थानची राज्यसत्ता पडत आहे!!

करवीर जनतेनें या पंचवीस वर्षांच्या कालांत राजकीय उत्क्रांतीचे व क्रांतीचे सर्व टप्पे पार पाडले. अर्ज, विनंत्या, ठराव, कायदेभंग, राजद्रोह, राजकीय बंडखोरी, क्रांती आणि जिवाचा बळी या सर्व मार्गांतून ही चळवळ गेली आणि जे मिळवले तें आम्हीं आमच्या त्यागाच्या आणि संघशक्तीच्या बळावर मिळवले. आमच्या लढ्यांत इतरांनी कोणी प्रत्यक्ष भाग घेतला नव्हता. दुरून चार हिताच्या गोष्टी सांगण्यापलीकडे व पुढारीपण मिळवण्याच्या प्रयत्नाखेरीज कोणी कांही केले नाहीं.

माझ्यापुरतेच बोलायचे तर करवीर संस्थानचा कारभार करवीर जनतेच्या हातीं आला पाहिजे हे प्रजापरिषदेचे ध्येय अखेर गांठल्याचे डोळ्यांनी पाहिले. शेतकरी–कामगार राज्य हे जरी अंतिम ध्येय असले तरी त्याकडे जाणारा मोठा टप्पा गांठला.

न्याय, महसूल, फायनान्स, सप्लाय ही खातीं लोकमंत्र्याचे हातीं देण्याचे निश्चित झाले. हंगामी मंत्रिमंडळांत प्रजापरिषदेचे बहुमत राखण्यात आले. लोकमंत्र्यांतूनच चीफ मिनिस्टर हा निवडला जाणार होता.

वस्तुतः माझ्या आयुष्यांतला मोठा टप्पा गांठला.

× × ×

**विरोधी गटाच्या कारवाया :—** मी मंत्रीपद स्वीकारण्याची व मंत्रीपद बनवण्याची लादलेली जबाबदारी स्वीकारली. मंत्र्यांची निवड करताना परस्परांतील वांकुडपणाचा मी विचार केला नाही. डोळ्यापुढें व्यक्तीपेक्षां संस्थाच होती. श्री व कुंभार हे प्रजापरिषदेंत पडलेल्या विरोधीगटांतले. लिंगायत जात ही संस्थानांत अल्पसंख्यांक म्हणजे ८०।९० हजार व मराठा ७।८ लाखपर्यंत. पण मी मराठ्यांतला फक्त एकच मंत्री घेतला. लिंगायतां-

पैकीं २ मंत्री घेतले. ते ही माझे त्यांचे संबंध यावेळीं प्रेमाचे नसताना. श्रेष्ठींना कार्यकारी मंडळाच्या बैठकींत त्याची जाणीवही दिली. ' श्रेष्ठी तुमचे माझे संबंध आज चांगले नाहीत तथापि ते विसरून तुम्हाला मंत्रिमंडळांत घेत आहे. मी, श्रेष्ठी, कुंभार व खांडेकर असे मंत्रिमंडळ बनवले. मंत्री झालो तरी मोटार वापरायची नाही असें मनानें ठरवून माझे मित्र प्रभाकरपंत कोरगांवकर यांचेकडून ऑफिसला जाण्याकरता एक सायकल घेतली.

माझा इरादा होता कीं, इतर कोणत्याही संस्थानापेक्षां मी व माझे सहकारी कोल्हापुरांत समाजवादी राजवट लवकर आणूं. शेतकरी–कामगार राज्याला लवकर सुरवात करूं. पण वार्गीक आणि मुख्यत: व्यक्तिविषयक महत्वाकांक्षेच्या अतिरेकामुळें, कुंभारनी होममिनिस्टरची महत्वाची जागा आपल्याच हातांत घेण्याचा आग्रह धरला आणि मी मात्र नाममात्र Minister without Portfolio रहावे ही इच्छा. त्यासाठीं सर्व नाटकी प्रकार केले. आळवणें, रडणें, त्रागा करणें झाले. अखेर कायमचे संबंध तुटतील म्हणून धमकी दिली. यावेळेंपावेतों माझ्यावर कुरघोडी करण्याचा, खाली ढकलण्याचा, दुखवण्याचा, अनादरानें वागवण्याचा, बाजूस करून पुढें सरकण्याचा त्यांनी कधीही प्रयत्न केला नव्हता. मला वडिलाप्रमाणें मान दिला. प्रकट होताच शेंकडो मंडळी समोर पायावर डोकं ठेवले. यांत भक्तीहून मुत्सद्दीगिरीच होती. आम्ही मनाने एक आहोत ही कल्पना लोकांत असणे यावेळीं अवश्य होते. पुढील व्यूह रचनेला त्याची अवश्यकता होती. तुरुंगांत असताना मला जपण्याची काळजी घेतली. मान राखण्याची, बारिक सारिक बाबतींत मन घालून खूष करण्याची शिकस्त केली. मीही पण सख्ख्याभावाहून रत्नाप्पावर प्रेम केलं. मुलालाही हेवा वाटायचा. रुईकरांच्या घरीं हे आजारी पडले असता कमीपणा समजून ज्या गोष्टी जन्मांत केल्या नाहींत त्या कमीपणा पतकरून आजाऱ्यासाठीं केल्या. सत्तेच्या अभिलाषेमुळें रत्नाप्पा शत्रु बनेल असं यापूर्वी कोणी सांगितलं असतं तर माझा जराही विश्वास बसला नसता. पण आता विचार करूं लागलो म्हणजे हे नम्रतेचे, प्रेमाचे आणि आदराचे नाटक, पुढच्या सत्तेवर दृष्टी ठेवून केले होते हे स्पष्ट समजून येते. स्वत:ला स्थान प्राप्त होईपर्यंत माझा उपयोग करून घ्यावयाचा हा अगदी पूर्व योजित डाव होता. याची खात्री मला अखेर अखेर झाली. पूर्ण विश्वास टाकल्यामुळें त्यावेळीं त्यांचेकडे

पाहण्याची ती दृष्टीच नव्हती. सार्वजनिक पैसा जो मिळेल तो सर्व आपल्या हाती ठेवायचा, आर्थिक नाड्या आपल्या हाती राखायच्या. आपणच तो खर्च करायचा ही वृत्ती अगदी पूर्वीपासूनचीच होती. प्रकट झाल्यानंतर रिपोर्टर-कडून आपल्याला प्रामुख्य मिळेल असे रिपोर्ट तयार करायचे. दौऱ्यांत स्वतःच्या नांवची घोषणा ' अरेंज ' करायची हे मला स्वच्छ दिसू लागले. रत्नापा व रत्नापाचा गट मला विशिष्ट हेतूनेच पुढारी म्हणून कां मानत होता व ढकलत होता याचा आता उलगडा होतो !

रत्नापा अत्यंत परिश्रम करणारे, दांडगे संघटक. त्या गटांतली मंडळीही पदवीधर आणि सुशिक्षित. पण कोल्हापुरांतल्या राजकीय चळवळींचं पुढारी-पण मराठ्यांचेकडे नसते तर यांच्या कोणत्याही गुणांना वाव मिळाला नसता. मला या मंडळींनी फुलासारखं झेललं होतं तरी पुढें योग्य कालीं चिरडून टाकण्याकरता ! रत्नापा शिरोळ पेट्यांतले. पण शिरोळ पेट्यांत नानासाहेब जगदाळे, दिनकरराव देसाई, भिणचे ही मराठा मंडळी पुढें झाली नसती तर रत्नापांना संघटना करता आली नसती. चळवळीच्या या अवस्थेत मराठाव्यतिरिक्त पुढाऱ्याला लोकांचे पाठबळ मिळाले नसते म्हणून या वेळेपावेतो माझ्यावर प्रेमाचा आणि मानाचा वर्षाव जो या गटाकडून झाला तो अपरिहार्य म्हणून. सत्तेच्या अभिलाषेमुळें त्यांचे या वेळेपावेतो दडून राहिलेले आणि दाबून टाकलेले धोरण आणि मनोगत बाहेर पडले. सुरवातीची माझी ही दृष्टी नव्हती. ही अनुभवानें आली. पुण्याच्या पत्रांनी माझा उदोउदो केला तो पण याचमुळें. पण सत्तेचा मोका मिळताच रत्नापा आणि त्यांच्या गटाचे वार्गिक आणि जातिवादी स्वरुप उघडे झाले ! त्या सर्व गटानें राजीनामें देऊन मला अडचणीत पाडले ! रत्नापा प्रकट झाल्यापासून त्यांच्या डावपेचाला जो रंग चढत चालला होता तो या मंत्रि-पदावेळीं उघडा पडला. राजीनामें देण्यानें मी एकदम गोंधळून जाईन व आपल्यास जागा मिळेल अशी त्यांची कल्पना होती.

**समझोता संपला—** राजीनामें दिल्यानंतर हे सर्व एका वकीलाच्या घरीं जमले होते. कर्मधर्मसंयोगानें त्यांच्याच घरामागें द. भा. साळोखे यांचे घरीं आम्ही उरलेले कार्यकारी सभासद जमलो होतो. कोरम इतकी संख्या होती. विरोधी गटाची बैठक ज्या घरीं जमली होती त्या

घराजवळच माधवराव भोसले यांच्या नातेवाइकांचे घर आहे. माधवराव तेथे सहजी पाणी पिण्यास गेले असतां त्या बैठकीतील भाषणें त्यांचे कानावर पडली. मला बोलावून त्यांनी ती ऐकवली. यामुळें खरे स्वरुप आणखी स्वच्छ प्रकट झाले. यामुळें समझोत्याचे सर्व विचार बदलले. दुसरे दिवशीं उरलेल्या कार्यकारी मंडळाची बैठक घेतली. आनंदाची गोष्ट उरलेल्यांची संख्या ‘ कोरम ’ इतकी होती. नव्या मंत्र्यांची नांवें नक्की केली. मी स्वतः मंत्रिपद स्वीकारायचे नाहीं असें ठरवले. बैठक संपतांच तसाच महाराजांच्या-कडे गेलो. सगळी हकीकत कळवून नव्या मंत्र्यांची नांवें पुढें ठेवली. त्यांत माझें नांव नाहीं असें दिसतांच महाराजांना फार वाईट वाटले पण माझ्याच आग्रहावरून तोंडी मान्यता दिली व घरी परततांच हुजूर चिटणीसा-मार्फत महाराजांचे पत्र आले. ते खालील प्रमाणें.

My dear Madhavrao Bagal,

As decided His Highness will make the appointments of the four ministers on your recommendation. I am therefore directed to request you to recommend the names of persons who may be appointed as ministers by H. H. An early reply will be appreciated.

by order of. H. H.

प्रिय माधवराव बागल,

ठरल्याप्रमाणें हिज हायनेस तुमच्या शिफारशी प्रमाणें चार मंत्र्यांची नेमणूक करतील. म्हणून ज्यांची नेमणूक व्हावयाची त्यांची नांवे कळवावी अशी आपल्यास सूचना करावी म्हणून मला आज्ञा झाली आहे. उत्तर सत्वर आल्यास बरें.

महाराजांच्या आज्ञेवरून
हुजूर चिटणीस
आर. वाय. चव्हाण

महाराजांची मान्यता लगेच मिळाली. ती मिळतांच त्याच रात्रीं मी पुढारी ऑफिसमध्यें जाऊन बातमी दिली. हा सर्व प्रकार चार पांच तासांत झाला विरोधी गटाला आम्ही इतक्या तांतडीनें हे निर्णय घेऊं अशी कल्पनाही नव्हती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं लोकमंत्र्यांचीं नांवें सर्वांना कळली. वसंतराव

बागल चीफ मिनिस्टर, डी. एस्. खांडेकर रेव्हिन्यू मिनिस्टर, नारायणराव सरनाईक सप्लाय, कारखानीस फायनान्स असे मंत्रिमंडळ बनवले गेले.

**पूर्वीच्यांची सेवा**—कोणत्याहि हेतूने का असेना पण रत्नापा आणि इतर मंडळीचा प्रजापरिषदेच्या सुरवातीला पुष्कळच उपयोग झाला हे खरे. माझ्या प्रचारानें अनुकूल झालेल्या वातावरणाला रत्नापानी संघटित केले. हेतू निराळे असले तरी आज विरोधी असलेल्या या व्यक्तींनी तुरुंगवास, कष्ट, त्याग, दंड हे सर्व प्रकार सोसले आहेत. या त्यागानें परिषदेची शक्ती वाढली हे केंव्हाही नाकारता येणार नाहीं. श्रेष्ठी, चगाडे वगैरे मंडळीची कायद्याच्या दृष्टीनें परिषदेला मदत झाली आहे. श्रेष्ठींचा थंडपणा, सौजन्य, चिकाटी आणि पार्लमेंटरीवृत्ती कांहीं कांही वेळां उपयोगी ठरली. ही राजिनाम्याची घाई त्यांना कदाचित आवडलीही नसेल. पण या गटाचा चळवळीकडे पाहण्याचा दृष्टीकोन बहुजनसमाजापासून भिन्न होता म्हणून आम्ही एकजीव होऊ शकलो नाहीं. यानंतर रत्नापानी जी विलीनीकरणाची भूमिका घेतली त्यामागें मात्र तात्विक बैठक अशी मुळीच नव्हती. कारण या गृहस्थांना हवे ते मंत्रीपद मिळाले असते तर यांनी विलीनीकरणाची भूमिका खास घेतली नसती. मंत्रिपदासाठी धडपड आणि त्रागा करण्याचे मग कारणच नव्हते. सरळ विलीनीकरणाचीच चळवळ करायला हवी होती. विलीनीकरणाच्या मागें यांच्या व या गटाच्या चळवळींत निव्वळ सूडबुद्धी होती. ध्येयनिष्ठा नव्हती. रत्नापा हे संघटक होते. पण त्यांच्या संघटनेचं तंत्र वैचारिक कधींच नव्हतं. बहुतेक सहकारी, पैशाने बांधलेले होते. ध्येयाने बांधलेले फार थोडे वादविवादात कधी वैचारिक उंची अशी आढळली नाही. रत्नापा भूमिगत राहिले. पुढे कांहींही अवश्यकता नसता राहिले. ते कोठे होते काय करत होते याचा मला काडीचाही सुगावा लागूं दिला नाहीं. वर्तमानपत्रांतल्या टीकेतून त्यांच्या जीवनाची कल्पना पुढे आली. रत्नापांच्या जीवनाकडे दृष्टी टाकली म्हणजे मला प्रामुख्याने व्यक्तिनिष्ठेखेरीज कांही दिसत नाहीं. ध्येयनिष्ठा कशांत आहे ती मला तरी समजूं शकत नव्हती. पक्षनिष्ठा नव्हती, मित्रप्रेम नव्हते, कृतज्ञताबुद्धी नव्हती, जातिप्रेम म्हणावे तर तेही मला दिसले नाहीं. बांकुडपणांत तात्विक भूमिका नव्हती.

× × ×

**विजय दिन**— लोकमंत्र्याचे हाती कारभार येऊन नव्या लोकशाही राजवटीला सुरवात झाली म्हणून त्या आनंदाप्रीत्यर्थ करवीर संस्थान विजयदिन संस्थानभर साजरा करण्याचे ठरवले. तारीख ३०-११-४७ ही ठरवली. तशी पत्रकें सर्वत्र वाटली.

हा विजयदिन कोणा व्यक्तीच्या हातीं राजसत्ता पडली म्हणून नव्हता. तर कोल्हापूर जनतेच्या पदरीं जबाबदार राज्यपद्धती पडली म्हणून होता. शहरांत सर्वत्र गुढ्या, तोरणें, कमानीं, निशाणें उभारली होती. दसरादिवाळी-प्रमाणें हा सण साजरा झाला. विरोधी गटांना व त्यांच्या अनुयायांना अर्थात हा सण शुभ वाटला नाहीं. व यांत त्यांनी भाग घेतला नाहीं. त्यांच्या हाती सत्ता पडली नाहीं म्हणून त्यांना या सोहाळ्याचे महत्व वाटले नाहीं! जणुं काय प्रजापरिषदेचा लढा हा कांही व्यक्तींच्या हातीं सत्ता देण्यासाठींच होता! मला मात्र आयुष्यांतले एक मोठें कार्य तडीस झाल्याचा आनंद झाला होता. इतरांना या आनंदाची कल्पनाही करता येणार नाहीं.

सकाळीं ८॥ वाजता स्टेशनवरून विजयदिनाची मिरवणूक निघाली. आघाडीला तिरंगी नवराष्ट्रध्वज व शिवरायाचा भगवाझेंडा हत्तीवर डौलानें फडकत होता. त्याच्यामागें तालिम संघाचं दल, राजाराम रायफलचा बँड, त्यामागें मंत्री व कार्याध्यक्ष, त्यामागें सरकारी लवाजमा, सशस्त्र पोलीस फोर्स व जनता अशी खूप मोठी मिरवणूक चालू होती. आम्हांस ठिकठिकाणीं हारतुरें घालण्यांत येत होते. अनेक कमानीं उभारल्या होत्या. मिरवणुक शिवछत्रपतींच्या स्मारकाला वंदन करून गांवांतून वळसे घेत खासबागेंत आली. तेथे माझें भाषण झाले. या शुभ दिनाची आठवण म्हणून मी महाराजांच्याकडून महात्मा गांधींच्या पुतळ्यासाठीं २५००० रुपयाची रक्कम सभेंत जाहीर केली.

रात्रीं सर्वत्र रोषनाई करण्यात आली. करवीर निवासिनी जगदंबा, जुना राजवाडा, नवा राजवाडा, पॅलेस थिएटर, नगरपालिका वगैरे सर्व सरकारी व निमसरकारी इमारतीवर रोषनाई, कमानी, पताका उभारल्या होता! जनतेच्या चळवळीचा हा विजयदिन थाटानें साजरा झाला. माझ्या आयुष्यांतील एक उद्दिष्ट गांठले गेले!

---

# सत्ता आल्यानंतर

आमच्या हातीं सत्ता आल्यानंतर मंत्र्यांची पहिली कामगिरी म्हणजे राजकीय चळवळींत लढत असतांना कामास आलेल्या स्वामी, वारके, इंगळे वगैरे २१ हुतात्म्यांच्या कुटुंबियांना प्रत्येकीं दरमहा ४० रुपये प्रमाणें सतत २० वर्षे मानधन देण्याचे ठरवले. राजकीय गुन्ह्याची सर्व वॉरंटे परत घेतली. जप्त जमिनी ज्यांचे त्यांचे पुनः ताब्यांत देण्याचें ठरवले. एक वर्ष शिक्षा भोगलेल्या सर्व कैद्यांची शिक्षा चार महिन्यांनी कमी करण्यात आली व ज्यांच्याविषयीं जेलरचा रिपोर्ट चांगला दिसला अशा कांहीं मोठ्या शिक्षेवाल्यांनाही सोडण्यात आले. राधानगरी, गारगोटी, बावडा वगैरे भागांतील गरीब, धनगर, हरिजन व बेकार यांना २५००० एकर जमिनी नाममात्र फळा आकारून लागवडीस दिल्या. सर्व संस्थानांत चालू असलेली दशांशानें होणारी धान्य वसूली बंद केली. सरकारी नोकर लोकांचा संप कालांतील राहिलेला पगार ५५००० रुपये त्यांना देण्याचा ठराव केला. कला, वाङ्मय, शाहीर व कुस्त्या यांचे उत्तेजनार्थ प्रत्येक विषयास एक हजारप्रमाणें पांच हजार रुपये मंजूर करण्यात आले. रेसब्रेटिंग शॉप्स मुदत संपताच बंद करण्याचें ठरवले. अशारीतीनें आम्ही धडाडीनें आपल्या कारभारास सुरवात केली होती. या गोष्टी आम्ही सहजासहजी करूं शकलो त्या संस्थान यावेळीं विलीन झालेले असते तर शक्य झाल्या नसत्या. आम्हाला आमचे धोरण ठरवता आले तसे संस्थानचा जिल्हा झाल्यानंतर ते कलेक्टरला ठरवता आले नसते. त्यावर वादाची रणें माजून राहिली असती. म्हणून कॉंग्रेसची राजवट समाजवादी होईपर्यंत संस्थान विलीन होऊ नये अशी आमची इच्छा होती.

पण ही आमची राजवट विरोधी गटाला आणि वर्गाला खपली नाहीं. लोकशाही आली पण राजसत्ता बहुजनसमाजाचे हाती पडलेली पाहवले नाहीं.

संस्थानच्या व बाहेरच्या बहुजनसमाज द्वेष्टयांनी हातांत हात घातले. वर्तमान-पत्रेंही भांडवलवाले आणि पांढरपेशे यांच्या हातीं असल्यामुळें, त्यांनी पद्धतशीर अप्रचार आणि बदनामी चालू केली! ऐतिहासिक संघर्षाची पुनरावृत्ती चालू झाली.

**ऐतिहासिक सूडबुद्धीचा अवशेष**— राजांची राजवट नाम-धारी राहून ती सत्ता बहुजनसमाजाच्या हाती येताच विशेषतः ब्राह्मण संपादकांच्या लेखण्या आमच्यावर एकजुटीनें सरसावल्या. ज्यांनी पूर्वी माझ्या-वर स्तुतिपाठाचे अनेक अग्रलेख लिहिले. ते बहुतेक ब्राह्मण पत्रकार उलटले. संस्थानच्या व बाहेरच्या— आमच्या द्वेष्टयांनी हातांत हात घातले.

आपल्या जातीचे कल्याण माधवरावांच्यामुळें साध्य होईल असें वाटून मला पुढे ढकलणारे, गौरव करणारे, मैत्रीचा आभास निर्माण करणारे ज्यांना मी जिवश्च कंठश्च मानत आलो असे माझे एक ब्राह्मण स्नेही कट्टर वैरी बनले! चळवळीच्या सुरवातीला आपण एकमेव स्नेही आहोत असा यांनी आभास निर्माण केला. त्यांनी वर्तमानपत्रांत आम्हाला अनुकूल असा उठाव दिल्यानें त्यांच्यावर विश्वास बसणे साहजिकच होते. असा उठाव देण्यात राजसत्तेची अवकृपाही त्यांनी ओढवून घेतली होती. धोक्यांत जीव घालून त्यांनी त्यावेळीं आमच्या चळवळीला उचलून धरले होते हे कबूल करणे भाग आहे. व्यक्ती म्हणून ते जिव्हाळ्याचे वाटत होते. त्यावेळच्या सरकारविरोधी चळवळीला पाठिंबा म्हणूनही त्यांनी माझे प्रेम आणि आदर संपादन केला होता. ते एक घरोब्यांतले होते. ते इतके कीं, घरीं कांही खारे गोडे पक्वान्न झाले कीं त्यांना बोलावल्याशिवाय घश्याखालीं घांस उतरायचा नाहीं. आठवड्यांतून दोनचारवेळां भेटल्याशिवाय करमायचे नाहीं. मी पन्हाळ्यावर तुरुंगांत होतो. त्यावेळीं मुलाचा वाढदिवस आला. घरचे पत्र आले. 'तुम्ही तुरुंगांत असल्यामुळें बाबाचा वाढ दिवस करायला बरें वाटत नाहीं.' मी उत्तर पाठवले, 'मी नसलो म्हणून काय झाले! मित्रांना जेवायला बोलवा, त्यांचा आशिर्वाद घ्या म्हणजे झाले.' याच मित्र मंडळींत आज माझा कमालीचा द्वेष करणाऱ्या, त्या मित्राचे नांव होते. पण या प्रेमाआड मराठा जातीचा द्वेष दडून होता, हे प्रेम म्हणजे पूतनेचे प्रेम होते. यांत परंपरागत चालत आलेली मराठा

जाती विषयीची द्वेष भावना होती यांची मला अंधुकही कल्पना नव्हती! या गृहस्थांना माझा मराठा सत्तेविरुद्ध फक्त उपयोग करून घ्यायचा होता! ही व्यक्ती म्हणजे बहुजनसमाजाविषयी, त्यातही मराठा जातीविषयीं वाटणाऱ्या सूड बुद्धीचा एक अवशेष होय! मराठा पुढारी म्हटलं कीं या गृहस्थाचे पित्त खवळते. आणि तो त्यांच्यावर हीन आरोप करूं लागतो. बहुजनसमाजावर आपलं प्रभुत्व राखयचं, त्यासाठीं बहुजन समाजांतील प्यादीं खेळवायची. तसे ते प्यादे खेळत नाहीं असें दिसतांच त्याला त्या जागेवरून उडवून आपल्या हातचे बाहुले तेथे ठेवायचे हा प्रयत्न पूर्वापार चालत आलेला आहे. निःक्षत्रीय पृथ्वी करण्याच्या घोषणेमागील परशुरामाची वृत्ती, नंदाचा नाश करून चंद्रगुप्ताला चक्रवर्ती बनवणारी चाणक्य नीति, छत्रपतींना नामधारी बनवून ती सत्ता बळकवण्याची कारवाई, हे वर्गविग्रहाचें ठळक नमुनें आहेत. छ. शाहू महाराज हे खेळणे बनले नाहींत म्हणून त्यांना सार्वजनिक जीवनांतून उठवण्याकरता समाजद्रोही अन् देशद्रोही असा शिक्का मारण्यात आला. फुल्यांना बाटगे, बाटग्यांचे हस्तक ठरवण्यात आले. माझ्या या मित्राच्या हृदयांतून याच द्वेषाच्या ज्वाला सतत बाहेर पडत असतात. माधवराव हे आपलं बाहुलं रहात नाहीं अशी खात्री पडताच त्यांचे अंतरंग बाहेर पडले! व हे अव्याहतपणें फुत्कार सोडूं लागले.

रत्नापा कुंभार यांच्या द्वेषांत व या व्यक्तीच्या द्वेषांत फार अंतर! या मित्राच्या द्वेषामागें माझ्या व्यक्तिविषयक द्वेषाहून माझ्या जातीचा द्वेष हेच प्रबळ कारण होतं! या द्वेषाचा उगम जातिभावनेतून होता. कारण या गृहस्थांनी व्यक्ती म्हणून द्वेष करण्याजोगं असं कोणतच कारण मी दिलं नव्हतं. खासगी भांडण तंडण झालं नव्हतं! माझी जागा त्यांना पटकावयाची नव्हती. त्यांची मला पटकावयाची नव्हती. रत्नापाचं जीवन केवळ व्यक्तिविषयक स्वार्थ आणि व्यक्तिविषयक महत्वाकांक्षेनं भारलेलं तर या दोस्ताचं जीवन जातिस्वार्थानें आणि मराठाजातीच्या द्वेषानं ओथंबलेलं! हे गृहस्थ एकदा कुरुंदवाडला गेले होते. ज्या ठिकाणी ते बोलत होते त्या ठिकाणीं मराठा कोणी नाहीं असं त्यांना वाटलं व ते मोकळया मनानें म्हणाले, '......हे पहा... साहेब! तुम्ही या शेंबलेवाल्याना ठेचून टाकलं पाहिजे' दुर्दैवानें हे ऐकायला त्यावेळचे कुरुंदवाडचे दिवाण घोरपडे हेच तेथे होते.

आमची चळवळ लोकशाहीची होती. वरील वृत्तीच्या लोकांची मनीषा मराठा गादी नष्ट करण्याची होती. मराठा राजाच्या ठिकाणीं मराठा बहुजन समाजाची सत्ता येताच ते भडकले. कोल्हापुरला निव्वळ लोकशाही स्थापन व्हावी हा या परंपरेतील व्यक्तींचा हेतू नव्हता.

माझी भूमिका जातिवादी असती तर मला मराठा राजशाही विरुद्ध चळवळ करण्याचे कारण नव्हते. मला व माझ्या कुटुंबियांना उलट यामुळें फायदाच झाला असता ! मी मराठा, राजा ओळखीचा, मंत्री मराठे. मला चळवळ करण्याचे मग कारणच नव्हते. त्यावेळींतर मराठे अधिकारी मी चळवळ करतो म्हणून मला पाण्यांतच पहात होते. 'कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ' म्हणून त्यांनी मला हे विशेषण लावलं होतं !

माझी दृष्टी फक्त एकच होती. कोल्हापुरचं राज्य कोल्हापुरच्या जनतेच्या हाती यावं.

पण कोल्हापूर संस्थानांतील बहुसंख्य जमात मराठा असल्यामुळें ती सत्ता बहुसंख्य मराठा समाजाच्याच हातांत पडणार ! पण ही गोष्ट जात्यांधांना कशी रुचेल ! प्रजापरिषदेच्या हातीं सत्ता पडण्याच्या सुमारास कार्याध्यक्ष या नात्यानें मी घोषणा केली कीं, 'आमच्या हातीं राज्यसत्ता पडल्यावर आमच्याकडून कोणत्याही जातीवर अन्याय होणार नाहीं. प्रत्येक जातीच्या लोकसंख्येचा विचार करून त्यांतील योग्य माणसांना जागा दिल्या जातील.'

हा मजकूर प्रसिद्ध होतांच यांच्या जातिवृत्तीला धक्का बसला. कारण हे तत्व मान्य केले तर आतापर्यंत अधिकाराच्या जागांत मक्तेदारी भोगावयास आलेल्या ब्राह्मणांना चरायला कुरण मिळणार नाहीं. त्यामुळें माझ्याच घोषणेंत या जात्यंधांना जातिवाद दिसला.

लायकीच्या नांवाखाली पुढारलेल्यांचा जातिवाद कांही दिवस टिकेल पण बहुसंख्यसमाज असाच अशिक्षित कायमपणें कसा राहिल. जेथे जी जात बहुसंख्य आहे ती वर्ग जागृती होईपर्यंत संख्याबलावर पुढें येणारच. वर्ग जागृती झाली तरीही हा मराठा समाजच कष्टकरी अन् कामगार असल्यानें तोच अखेर अधिकारावर येणार !

कांहीं संस्थानांत मराठा बहुसंख्य असेल तर दुसरीकडे एखादी दुसरी जात असेल. जतमध्यें लिंगायत बहुसंख्य आहेत. म्हणून मी जत संस्थान प्रजापरिषदेच्या अधिवेशनांत अध्यक्ष नात्यानें भाषण केले त्यावेळीं हेच म्हणालो. १४–९–४६ ला हे भाषण झाले.

' आपल्या संस्थानांत एखादी जात बहुसंख्य असेल व इतर अल्पसंख्य असणार. येथे जर लिंगायत जास्ती असतील तर त्या जातीतील लोक सार्वजनिक संस्थेमध्यें किंवा सरकारी नोकरीमध्यें प्रमाणानें अधिक येणार. या गोष्टी कांहीं केल्या चुकवता येणार नाहीत. एखाद्या अल्पसंख्य जमातीतील व्यक्तींनी कुटिल कारस्थान करून कांही काल जरी यश मिळवले तर त्याचा परिणाम जातिद्वेषांत होऊन अखेर जे बहुसंख्य असतील तेच प्रबल होणार. येथे राजा मराठा आहे. कदाचित राजसत्तेच्या जोरावर मराठ्यांना अधिक जागा दिल्या गेल्यास इतर वर्गांत असंतोष माजणे साहजिक आहे.' जतमध्यें लिंगायत संख्या जास्त असल्यानें त्यांना अधिक जागा मिळणे क्रमप्राप्त आहे. पण हेच धोरण मी कोल्हापुरांत जाहीर केल्यानें आमचे ब्राह्मण जातीतील जिगरदोस्त आणि स्तुतिपाठक बेफाम झाले व त्यावेळेंपासून आजतागायत अव्याहतपणें ते मजवर जातिवादाचा आरोप करीत आले.

—याच वृत्तीमुळें बहुजनसमाजांत ब्राह्मणजातीनें आपल्याविषयीं द्वेष निर्माण केला. या धोरणावर म. फुल्यानींही याच जातीच्या मक्तेदारीवर टीका केली होती. ही जाणीव आता कांहीं ब्राह्मणांना होऊं लागली आहे व ते आपल्या जातीला इषारा देऊं लागले आहेत.

हरिभाऊ जोशी यांच्या संपादकत्वातून सुटलेल्या लोकशक्तींत तारीख २७–५–५३ च्या अग्रलेखांतच हा इशारा दिला आहे. बहुजनसमाजांत प्रतिकाराची किंवा द्वेषाची विकृति कां होते त्याचे त्यांनी विश्लेषण केले आहे. ' त्याचा दोष शिक्षण आणि विद्वत्तेची दालनें केवळ पुढारलेल्या जातीच्यासाठीं राखून ठेवणाऱ्याकडे येतो, हे विसरता कामा नयें, पुढारलेल्या जातीनीं केवळ शिक्षणाचेच काम केले असें नव्हें तर सत्तास्पर्धेतही भाग घेतला. बहुजनसमाजांतील प्यादी आपल्या बुद्धिमत्तेनें खेळवण्याचा यशस्वी प्रयत्न केला. जेव्हां त्या प्याद्यांना हा मागचा हात कळूं लागला, तेव्हां त्यांची पहिली प्रतिक्रिया प्रक्षोभक झाली. '

कोल्हापुरांतल्या कांहीं व्यक्ती ही प्रक्षोभक परिस्थिती जतन करीत आहेत. त्यामुळें कोल्हापुरचे विशेषत: ब्राह्मण समाजाचे त्यांनी फार नुकसान केले आहे व करीत आहेत.

बेळगांवचें एक सत्‌शील पुढारी कै. केशवराव गोखले एका ठिकाणीं लिहितात, ‘ ब्राह्मणांनीच ब्राह्मणेतर वाद माजवले व अद्यापतीच अहंकारवृत्ती हा वाद चेतवीत आहे. पण युगलक्षणें ओळखणारे ब्राह्मण जास्त निघतील तर पुन: राष्ट्राचा गाडा सुसूत्र चालेल. ’

अशीं युगलक्षणें ओळखणारें व अंतर्बाह्य शुद्धवृत्तीच्या आणि आचरणाच्या व्यक्तींत ज्ञानप्रकाशचे पूज्य संपादक काकासाहेब लिमये यांचा मला आदरानें उल्लेख करणे भाग आहे. या व्यक्तींत मला जातिवादाचा कधीही वास लागला नाहीं व यांच्यामुळें ज्ञानप्रकाशमध्यें कधीही कुत्सित मजकूर येऊ शकला नाहीं. प्रजापरिषदेच्या चळवळीला ज्ञानप्रकाशनें—काकासाहेबांच्या ज्ञानप्रकाशनें–निरपेक्षरीतीनें जेवढे सहाय्य केले तेवढे महाराष्ट्रांतील एकाही पत्रानें केले नाहीं.

ब्राह्मण समाजांतील कांही थोर व्यक्तींनीं बहुजन समाजाचे प्रेम आणि विश्वास संपादन केला आहे. धनंजयराव गाडगीळ, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वि. स. खांडेकर अशा कांहीं व्यक्ती मराठा–ब्राह्मण ऐक्य वाढवण्यास पोषक होत आहेत.

मराठ्यांशी मिळते न घेता आपली जहरी आणि कुजकी लेखणी सतत चालवणारे संपादक आपल्या जातीचेही भयंकर नुकसान करीत आहेत पण द्वेषाच्या मदिरेनें धुंद झाल्यामुळें त्यांना आपल्या जातीचेही हित समजत नाहीं.

महाराष्ट्रांत ब्राह्मण–मराठा हे ऐक्यानें राहिले तरच महाराष्ट्राचे व ब्राह्मण जातीचे कल्याण साधणार आहे. या दृष्टीनें प्रयत्न झाला नाहीं तर अल्पसंख्य जमातीचेच नुकसान होईल. जाणत्यांनीच त्यागाची आणि सलोख्याची भूमिका घेतल्याखेरीज हे वीष जाणार नाहीं.

येथील एका ब्राह्मण दोस्तानें माझा द्वेष करण्यात इतका उच्चांक गांठला आहे कीं त्याचे कौतुक केल्याखेरीज रहावत नाहीं.

इतकी अहर्निष द्वेष करण्याची शक्ती त्यांनी आपल्या या वयांतही शाबूत ठेवली आहे. ' सफा केला पाहिजे, खलास केला पाहिजे, व मुडदा पाडला पाहिजे ' या त्यांच्या ठराविक घोषणेला धरून तें आपली लेखणी चालवतात. व ही लेखणी चालवतांना मराठाजातीव्यतिरिक्त ते बहुधा कोणाला निवडणार नाहीत ! त्यांच्या पत्रांतून तात्विक गोष्टीचा खल झालेला फारसा वाचायला मिळणार नाहीं. कॉंग्रेस राज्यांतील व्यक्तिस्वातंत्र्याचा फायदा कोणातरी मराठा व्यक्तीला त्यांच्या दृष्टीनें नामशेष करण्यात ते खर्चत असतात. त्यांना जातिवाद दिसतो तो मराठा व्यक्तींत आणि मराठा पुढाऱ्यात म्हणून बहुधा त्यांची लेखणी जी चालते ती मराठ्यांच्या विरुद्ध ती ब्राम्हणा-विरुद्ध तशी चाललेली मी तरी पाहिलेली नाहीं.

**तिकडे जेध्यांच्या विरुद्ध—** इकडे माझ्याविरुद्ध जसे हे कट चालले होते तसचे केशवराव जेध्यांच्या विरुद्धही चालले होते. महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रस कमेटीतही जेध्यांच्या विरुद्ध एक गट तयार होत चालला होता. ठराविक साचांत न बसणाऱ्या, विशिष्ट घोरणाप्रमाणे न चालणाऱ्यांना उडवण्याचा बेत रंगास चढला होता.

ता. ७-३-४८ रोजीं मुंबईस भरलेल्या प्रांतिकच्या बैठकींत दुफळीला मूर्त स्वरुप आलं. महाराष्ट्राच्या राजकारणांत बदल घडवून आणणारी व महाराष्ट्राच्या राजकारणाला वार्गिक वळण देणारी अशी ही बैठक ठरली. या बैठकीला कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेचा कार्यध्यक्ष म्हणून मला आमंत्रण होते. माझेही भाषण ठराविक गटाला न आवडणारेच झाले. शंकरराव देवनी ते आटोपते घ्यावे म्हणून प्रांतिकचे अध्यक्ष केशवराव जेधे यांना सूचना केली. त्यांनी ती मानली नाहीं. मला भरपूर बोलू दिले. जाळपोळीनंतरची ती बैठक होती. त्यामुळें त्यांतील ब्रह्मवृंद आम्हांकडे एका दूषित दृष्टिकोनांतूनच पहात होता. आमच्या विरोधी गटानें रंगवलेल्या बातमीला गृहीत धरून आमच्याकडें पहात होता. कुत्सितपणें त्यांची पत्रें आमच्यावर टीका करीत. तेव्हां मी म्हणालो कीं, ' ही व या वृत्तीची पत्रें महाराष्ट्रांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद माजवत आहेत. वस्तुस्थिती माहित असूनही जाणूनबुजून विपर्यास करीत आहेत. मला अनुभवच आला कीं, माझ्यावर टीकेचा अग्रलेख लिहायचा असल्यास त्याला पोषक अशी एक

बातमी तयार करून अगोदर छापायची आणि मग तो आधार घेऊन त्या मजकुरावर अग्रलेख लिहायचा. याच व अशा बातम्या वाचून विरोधी गटानें केलेला प्रचार खरा मानून मंत्र्यांनीही आमच्याविषयीं मन दूषित करून घेतले होते. ' मी या गोष्टी प्रांतिक समोर मांडल्या.. त्या सभेतले एकंदर वातावरण गरमागरम झाले होते. प्रांतिकमध्यें स्वच्छ दोन गट दिसू लागले होते. याचें धागेदोरें दिल्लीपर्यंत पोंचले होते. या एकंदर वातावरणाचा परिणाम म्हणजे केशवराव जेधे, मोरे, जाधव, राऊत वगैरे मंडळीं पुढे कॉंग्रेसमधून बाहेर पडण्यात झाला. ज्यांच्या वजनामुळें, त्यागामुळें, कार्यामुळें, सहानुभूतीमुळें कॉंग्रेसचे पाय महाराष्ट्रांत रुजले गेले, व बहुजनसमाज कॉंग्रेसच्या मागे गेला तें केशवराव बाहेर पडले. व त्यांतून शेतकरी–कामगार पक्षाची पुढें स्थापना झाली.

× × ×

**मुंबईत सत्कार—** याच सुमारास कोल्हापूर-सातारा-रत्नागिरीच्या मुंबईतील कामगार व इतर कांहीं संस्थानी, प्रजा–परिषदेच्या कार्याध्यक्षाचा व कोल्हापुरच्या लोकमंत्र्यांचा सत्कार करण्याचा व मानपत्र देण्याचा समारंभ घडवून आणला. चाळीस पन्नास संस्थांनी या सत्कारांत भाग घेतला होता. स्वागतासाठी बरीच मंडळीं बोरिबंदरवर आली होती. ताराबाई राणीसाहेब मुंबईसच होत्या, त्यांनी आमच्यासाठीं आपली खास मोटार पाठवून दिली होती व मुद्दाम बंगल्यांतच ठेवून घेतले. आमच्या मंत्रिपदामुळें बहुजनसमाजाला किती आनंद झाला होता ते सत्कारप्रसंगीं दिसून आले. श्री. दोंदे यांच्या हस्तें मानपत्र करंडक देण्यात आले. वर्तमानपत्रांना कोल्हापुरची खरी हकीकत कळावी म्हणून प्रेस कॉन्फरन्सही घेण्यात आली. आ. सु. राणे, वामनराव राणे, श्रीपतराव पाटील या मंडळींनी समारंभांत प्रामुख्यानें पुढाकार घेतला होता. ४–१–४८ ला हा समारंभ झाला.

**पन्हाळा अधिवेशन व विलीनीकरण—** यानंतर कोल्हापुर प्रजापरिषदेची विलीनीकरणासंबधीची भूमिका स्पष्ट करण्याकरता पन्हाळ्यास प्रजापरिषदेचे अधिवेशन घेतले. अधिवेशन श्री. शंकरराव मोरे यांचे अध्यक्षतेखाली ९-३–४८ ला पार पडले. उद्घाटक श्री. केशवराव जेधे

होते. परिषदेतील ठराव कॉंग्रेसच्या बऱ्या श्रेष्ठींना नावडणारेच झाले. पण ते लोकशाहीला पूर्णपणें धरूनच झाले. परिषदेचे ठराव आतापर्यंतच्या ध्येय धोरणाला सुसंगत असेच झाले.

गेल्या पंचवीस वर्षांचा प्रजापरिषदेचा लढा हा जबाबदार राज्य-पद्धतीचा होता. डॉ. पट्टाभी, बाळासाहेब खेर, काकासाहेब गाडगीळ या पूर्वीच्या प्रजापरिषदेच्या अध्यक्षांनी या ध्येयाला धरूनच ठराव केले होते. शंकरराव देवांनीही ही भूमिका कधी सोडली नव्हती. संघराज्याच्या पुरस्काराचे ते तर अध्वैर्यु होते. त्या त्यांच्या पूर्वीच्या ठरावांना विसंगत असा आमचा ठराव नव्हता. जी थोडीं संस्थानें मोठी म्हणून बाजूस काढली होती त्यांत हिंद सरकारनें कोल्हापुरचाही समावेश केला होता. मात्र हैद्राबादप्रमाणें हिंदसरकारपासून अजिबात स्वतंत्र राहण्याची कल्पना ही आम्हाला शिवली नव्हती.

अध्यक्ष शंकरराव मोरे यांचे भाषण पूर्वीच्या धोरणाला सुटून कांहीं झाले नाहीं. ते म्हणाले,

‘ राज्य कोणाचे हवे हे ठरविण्याचा अधिकार जनतेचा आहे. काश्मीरनें कुठें सामील व्हावे, हे सार्वमतानें ठरवले जावे असें हिंद सरकार म्हणते. जुनागडमध्यें सार्वमत घेतले गेले. मग त्याला अपवाद कोल्हापूर कां ? ’

रत्नापा गटानें जी विलीनीकरणांची भूमिका घेतली होती त्यामागें कसलीही तात्विक बैठक नव्हती. कारण यांनी सुरवातीला प्रधानमंडळांत यायचे कबूल केलेच होते. पण पाहिजे ती जागा मिळाली नाही म्हणून लागलीच विरोधी भूमिका घेतली. ती निव्वळ सूडाची होती. प्रामाणिक-पणाची नव्हती. परिषदेची भूमिका तात्विक होती. विलीनीकरणाला असा विरोध नव्हता. पण जबरदस्तीनें आणि लोकशाहीला सुटून होऊं नये हाच आग्रह होता.

आपल्याला पाहिजे ते मंत्रिपद मिळत नाहीं एवढ्याच कारणानें आपल्या गटांतील व्यक्तीनाही ते मंत्रिपद सोडणे त्यांनें नाखुषीनें भाग पाडले असे रत्नापांच्या एकंदर स्वभावाचे निरीक्षण करतांना अनुमान निघूं शकते.

अधिवेशनांत विलिनीकरणाला अनुकूल असा एक हातही उचलला गेला नाहीं.

श्री. कुंभार यांच्या एकंदर वागणुकीचा विचार करून त्यांचे सभासदत्व तीन वर्षे रद्द करण्याचा ठराव सर्वानुमतें पास झाला. हा अधिवेशनाचा ठराव झाला असतांना संस्थान बाहेरच्या पत्रांनी, त्यांनें बोगस निर्माण केलेल्या प्रजापरिषदेला मानण्याचे ठरवले व आपल्या हातीं असलेल्या पत्रांचा दुरुपयोग केला. ही भांडवलशाही आणि जातिवादीपत्रें खऱ्या गोष्टी कशा दडपून टाकतात त्याचे अत्यंत कटु अनुभव पुढें आले.

× × ×

**हिंदराष्ट्राचा महान् अशुभ दिवस**—३० जानेवारी १९४८ ! हिंदराष्ट्राचा महान् अशुभ दिवस ! अॅटम् बॉबनें एवढा मोठा धक्का जगाला बसणार नाहीं इतका मोठा धक्का हिंदुस्थानला बसला ! याच दिवशीं प्रजापरिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक भरली होती. संध्याकाळचा सहाचा सुमार असेल. दार लोटून एक दोन विद्यार्थी एकदम आंत आले. त्यांचे चेहरे बावरे बावरे झाले होते. तोंडांतून येणारे शब्द गुदमरूनच येत होते.

बैठक बंद करा ! महात्माजींचा खून झाला !

किती भयंकर बातमी ! किती अमानुष ! किती अशुभ ! असं होईल कसं ! किडा मुंगी सुद्धा ज्यानं मारली नसेल त्याचा खून ! असं होईल कसं ! आमचा विश्वास बसेना ! मी त्यांच्या तोंडाकडे पहातच राहिलो. जणुं सर्व भावना थंडावल्या ! रक्तवाहिन्या थंडावल्या ! शक्ती नाहीशी झाली ! गात्रें लुळी पडली. कांहीं समजेना ! विचार करण्याची बुद्धीच नष्ट झाली !

कांहींवेळानें शुद्धीवर आलो. वाट चालू लागलो. जनसमुदायाचा प्रचंड प्रवाह आपोआपच बिंदु चौकाकडे वहात चालला होता. बटन दाबलं जावं त्याप्रमाणें सर्व दुकानें कोणी न सांगता भराभरा बंद झाली ! सर्वांच्या चेहऱ्यावर जणुं प्रेतकळा आली होती. विजेचे दिवेही बंद पडले ! त्यांना वाटलं असेल भारताची प्रकाशज्योत मालवली, आता आपला कसला प्रकाश

पडणार ! लाऊड स्पीकरही काम देईना ! भावनेला शब्द अपुरे पडणार ! नव्हे शब्दाची शक्ती अपुरी पडणार याची जाणीव लाऊड स्पीकरलाही झाली असावी ! जनता अधोमुख अश्रू ढाळीत होती ! सर्व जातींना आणि धर्मांना पावन करणारी एक अश्रुगंगा वहात होती ! चिकार समाज भरला असूनही बिंदु चौकांत शुकशुकाटच भासत होता. जिवाला जडाचं स्वरुप आलं होतं ! भारताचा प्राण निघून गेला होता !

सभेंत बोलायला उभा राहिलो. शब्द उमटेना.

महात्माजी ! महात्माजी ! महात्माजी ! देवा सोडून गेलास ! एवढेच शब्द तोंडावाटे बाहेर पडले !

महात्माजींचा विषय आला कीं तासान् तास बोलणारा मी, माझी जिव्हा काम देईना. हृदयाची भाषा जिव्हा काय बोलूं शकणार ! भावनेचा अतिरेक एकाच वाटे बाहेर पडूं शकतो. एकच साधन मजजवळ होतं ! अश्रू ! हृदय ओथंबून बाहेर पडलेली अश्रूंची मालाच तेवढी मी त्यांच्या स्मृति चरणावर वाहूं शकलो.

राष्ट्राचा धनी ! प्रेमाची माऊली ! विश्वाची मोहिनी, अहिंसेची बांसरी मोडून पडली. प्रत्येकांच्या हृदय मंदिरांतील ती पवित्र मूर्ति नाहीशी झाली. आम्ही सर्व उघडे पडलो. आधार तुटला. हिंदवी रथाला आंवरून धरणारा सारथी निघून गेला !

दुःखद अंतःकरणानें आम्ही सर्व आपआपल्या घरीं गेलो ! दुःख ! दुःखापेक्षां दुसरी कसलीच भावना यावेळीं कोणाच्या हृदयांत नव्हती ! माझी रात्र उघड्या डोळयांनीं गेली !

महात्माजींची मूर्ती ! सारखे त्यांचेच विचार !

**जाळपोळीला सुरवात—** महात्माजी गेल्या नंतरचा दुसरा दिवस उजाडला. सकाळचा ८।९ चा सुमार असेल ! इतक्यात दोघेतिघे ब्राह्मण घाबऱ्या घाबऱ्यानं आले. म्हणाले, ‘माधवराव ! आमचं रक्षण करा. आमच्या दुकानांची जाळपोळ चालली आहे.’ मी तसाच अनवाणी घरच्या सदरा विजारींनिशी पळत सुटलो. कोणाचीशी मोटर रस्त्यावरून जात होती. तिला हातानें थांबवली. बॉनेटवरच गडबडीनें उडी घेतली व आग लागली होती त्या ठिकाणीं गेलो. लोक खरोखरीच महात्माजींच्या

खुनामुळें वेडे झाले होते. खून एका हिंदुसभावाल्या ब्राह्मणानें केल्यामुळें त्यांनीं त्यांचा सूड घेण्याचे ठरवले होते. समाज खवळला म्हणजे तो भलता अविचारी बनतो. त्याची सारासार बुद्धी नष्ट होते. मी जमावापुढें गाडी नेऊन मोठ्यानें ओरडून म्हणालो,

‘ हा प्रकार महात्माजींना केव्हांही आवडला नसता. ही जाळपोळ घरांची नव्हे. ही महात्माजींच्या ध्येयाची तुम्ही जाळपोळ करीत आहात. त्यांच्या ध्येयाचा असा नाश करूं नका. यानें तुम्हाला महात्माजींचा आशिर्वाद मिळणार नाहीं. तुम्ही हे बंद करा. बंद करा ! बंद करा ! ’ प्रत्येक ठिकाणीं जाऊन मी हे सारखा सांगत होतो. त्यांना हात जोडत होतो

जमावांतील कांहीं लोक पुढें आले व म्हणाले, ‘ या हरामखोरांनीं पेढे वाटले हो ! महात्माजींचा खून झाला म्हणून यांनी पेढे वाटले! यांनी पोळयांची जेवणें खाल्ली.’

‘ असेल कदाचित् पण शत्रूवरही प्रेम करा हा महात्माजींचा उपदेश विसरूं नका. महात्माजींना गोळी मारणाऱ्याला, ‘ खुळया काय केलंस ’ असं म्हणून त्यांनीं आशिर्वादच दिला असेल ! तुम्ही हे बंद केलं पाहिजे नाहीतर मलाच आगींत ढकला.’

माझा उपदेश कांहीं फुकट गेला नाहीं. लोकांनी माझा अपमान केला नाहीं. ते म्हणत, ‘ जा, आम्ही कांहीं करूं देत नाहीं.’ ‘ जा तुम्ही ! कांहीं काळजी करूं नका ’ असं म्हणत आणि मी दृष्टिआड झालो कीं जाळपोळीला सुरवात करीत. हा प्रकार पाहून मला असह्य झालं ! महात्माजींच्या तपःश्चर्येचा आणि त्यांच्या तत्वज्ञानाचा असा चुराडा झालेला पहाण्यापेक्षां मेलेलंच बरं म्हणून मी भालजी पेंढारकराच्या सिनेमाच्या आगींत धांव घेऊं लागलो, पण शाहू मिल मजूर संघाचे पदाधिकारी व गिरणींतल्या कांहीं कामगारांनी कंबरेला विळखा घालून जखडून ठेवलं ! इतर सर्व मंत्रीही आग थांबवण्याकरता सारखे फिरत होते. आम्हां सर्वांचें प्रयत्न कांहीं फुकट गेले नाहींत. एक दीडपर्यंत सर्व दंगा शांत झाला. नदीवर जाण्यासाठीं मिरवणूक निघाली. एकूण एक सरकारी लवाजमा बाहेर काढला होता. मिरवणुकीचं स्वरुप प्रचंड होतं. पंचगंगा नदीवरील पटांगणांत, टेकडीवर, पुलावर, नदीच्या दोन्ही तीरावर प्रचंड जनसमुदाय

जमला होता. कोल्हापुरच्या इतिहासांत एवढा प्रचंड जमाव केव्हां जमला नसेल. मी इतका थकलो होतो कीं मला उभे राहवेना. मी मैदानांत मातीवरच झोंपून राहिलो. सभेचा लाऊड स्पीकर येताच लोकांना पुनः अहिंसा तत्वाची जाणीव करून दिली. जाळपोळ, हिंसा, अत्याचार करणार नाहीं म्हणून जमावाकडून महात्माजींची शपथ घेतली. लोकांनी शांतता राखण्याचे वचन दिल्यामुळें मनाला थोडा विरंगुळा वाटला ! ट्रकमधून पडूनच घरी आलो. तासभर सुद्धा घरीं पडून राहिलो नसेन. पुनः दंगा सुरू झाल्याची बातमी कानावर आली. लगेच शेजारच्यांची मोटर मागून घेतली. गेल्यावर पाहिलं ते दृष्य भयंकर होतं. दंगेखोरांनी हिंदुसभेच्या बापट डॉक्टरांच्या घराला गराडा घातल्यामुळें पोलीसांनी गोळी झाडली. त्यामुळें एक मेला ! कांहींना मोठ्या जखमा झाल्या.

**माझी तत्वनीष्ठा—** यावेळेपावेतो मी गांधीजींचा कायावाचामनें उपासक व अहिंसा तत्वज्ञानाचा कट्टर अभिमानी होतो. आमचे मंत्रि-मंडळ असतांना जनतेवर गोळीबार व्हावा हे मला असह्य झाले. पोलिसांनीं केलेल्या गोळीबारांत पडलेलें प्रेत पाहुन माझ्या हृदयाला अत्यंत वेदना झाल्या. मी अगदीं वेडा झालों. मला कांहीं सुचेना. राग आवरेना. जनतेपैकीं एक प्रेत ते सरकारच्या आज्ञेमुळें ! दंगा शमवण्याकरितां, लोकांना आवरण्याकरितां पुढें होऊन शांत करण्याकरितां मी मरायला तयार झालो होतो. लोकांच्या रागाला मी बळी पडलो तरी माझ्या जन्माचं सार्थक झालं असतं. मला गांधीजींचा आशिर्वाद मिळाला असता. एखादा मंत्री कामास आला असता तरी मला अभिमान वाटला असता ! पण अधिकारा-वर असतानं जनतेचा बळी !!

ज्या जनतेकरितां माझं निम्मं आयुष्य खर्चेलं, प्रजेचे हाल कमी व्हावेत म्हणून दोन वर्षे आनंदांत बेड्या सहन केल्या, पाड्या वाहिल्या, जमिनी सारवल्या, हमालाची कामें केली, ज्या जनतेला मी परमेश्वराप्रमाणं मानलं त्यापैकीं एकाचा आमच्याकडून बळी !

महात्माजी असते तर त्यांनीं अशा स्थितींत गोळीबाराचा हुकूम दिला असता कीं लोक भावना आवरण्याकरतां स्वतःचा बळी दिला असता ! आम्ही ब्रिटिशाप्रमाणें राज्यकारभार करणार कीं, गांधीतत्त्वज्ञानाला अनुसरून

करणार ! मला आठवलं पूर्वी मुरारजींनी गोळीबाराची ऑर्डर दिली असतां गांधीजी खवळले होते !

नाहीं मी गोळीबार करूं देणार नाहीं ! !

दुःख, निराशा, राग या भावनांचा अतिरेक झाला ! त्या तशा अवस्थेंत मी पोलीस कचेरींत गेलो. आणि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट श्री. माळी यांना खूप बोललो ! मी काय बोललो त्यातला मला एक शब्दही आठवत नाहीं. पण मला न शोभतील अशीं वाक्यें माझ्या तोंडून गेली असें मला दुसऱ्याकडून समजले. मला दुःख झालें. दुसरें दिवशीं उठल्याबरोबर मी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटना क्षमेचें पत्र पाठविलें. त्यानेंहि माझ्या मनाचं समाधान झालं नाहीं. मी घरीं जाऊन त्यांची गांठ घेतली व पुनः क्षमा मागितली. मी क्षमा मागितली नसती तर ते माझं यावेळीं कांहीं वाईट करणार होते अशी परिस्थिती नव्हती. सरकार आमचं होतं. तथापि मी त्याही पुढें जाऊन ' हंटर ' या पत्रांतून जाहीर दिलगिरी व्यक्त केली. गांधीतत्त्वज्ञाला सुटून ही वागणूक झाली नव्हती. म्हणून यामुळं मला समाधानच वाटलें.

**पत्रक.**—लोकांनीं संयम राखावा म्हणून मी याचवेळीं एक पत्रक काढलें.

' एका माथेफिरूनें महात्माजींच्यावर वार करून आत्मनाश करून घेतला. पण भक्तांनीही भावनेच्या अतिरेकामुळें त्यांच्या परमपवित्र अहिंसा तत्त्वावरही घाव घातला. महात्माजी खुनी माणसालाही आशिर्वाद देत गेले असतील! पण महात्माजींचे भक्त म्हणवून घेणारे मात्र अत्याचार, जाळपोळ व हिंसा याला प्रवृत्त व्हावेत हे भारताचे केवढे दुर्भाग्य. देशभर झालेला अत्याचार, जाळपोळ, हिंसा पाहून महात्माजींच्या आत्म्याला समाधान वाटेल काय ? ते जिवंत असते तर त्यांना काय वाटले असते. त्यांनी अग्निभक्षण केला असता. त्यांनी नुकताच जो उपवास केला तो कशाला केला, याचा विसर आपल्यास पडला काय ? हिंसा, अत्याचार, जाळपोळ हीच काय महात्माजींची शिकवण ! याचसाठीं काय महात्माजीनीं आपले आयुष्य घालवले ! महात्माजीनीं आम्हाला देव बनवण्याचा प्रयत्न केला. आमच्यांतील सद्भावना जागा केल्या. आपल्या जीवनांतून सत्य, अहिंसा व प्रेम याचा वर्षाव केला ! पण महात्माजींचा नश्वर देह

जातांक्षणीच आमच्यांतील पशु जागा व्हावा काय? करवीरस्थानों! तुम्ही हिंसा, अत्याचार, जाळपोळ बंद करणार कीं महात्माजींच्या पवित्र अहिंसा तत्वाचीच होळी करणार! यानें महात्माजींचा आशीर्वाद मिळणार नाहीं. हें दृष्य पाहून महात्माजींच्या हृदयांतून रक्ताचे पाट वाहतील. बंधुनों! सूडाच्या भावना आवरा. शांती राखा! यानेंच महात्माजींच्या आत्म्यास शांती मिळेल. हीच त्यांची खरी सेवा. हीच खरी भक्ती. हेच खरे प्रेम.

**गोळीबार आणि माझी भूमिका.—** आमच्या सरकार ऐवजी त्या ठिकाणीं ब्रिटिश धोरणानें चालणारें सरकार असते तर त्यांनी गोळीबार करून दंगा शमावला असता. पण गांधीवादानें चालणाऱ्या राजवटीला त्यानें काळीमा लागला असता. माझी अद्याप प्रामाणिक समजूत आहे कीं ज्या तत्वज्ञानानें मी चालत होतो त्या तत्वज्ञानाला सुटून माझी वागणूक झाली असं मला अद्याप वाटत नाहीं. विनोबा भावे या सारखी मंडळी याबाबत फार तर निकाल देऊ शकतील. मंत्रिमंडळानें गोळीबारानें दंगा शमवला नाहीं याला मी सर्वस्वी जबाबदार आहे.

पण मला जे दुःख झाले, माझ्या हृदयावर जो अत्यंत मोठा आघात झाला तो माझ्यावर आणि मंत्रिमंडळावर केलेल्या दुष्ट आरोपामुळें. आम्ही मुद्दाम दंगा चेतवला. आम्ही ब्राह्मणांची घरें जाळायला प्रोत्साहन दिले. समोर उभा राहून खुणावले! असे ते आरोप होते.

माझी विचारसरणी चुकीची असेल. गांधीतत्वज्ञानाचा कदाचित मी चुकीचा अर्थ लावला असेल. पण ज्यांचं संरक्षण करण्याकरता रक्ताचं पाणी केलं, मूर्छा येईपर्यंत श्रम घेतले, त्या माझ्यावरच घरें जाळण्याला प्रोत्साहन देण्याचा आरोप! खरोखरीच माझ्या मनांत असे दुष्ट विचार आले असते, आणि 'काय पाहता शिल्लक राखू नका यांना' असे एक वाक्य त्यावेळीं उच्चारले असते, तर शहरांत ब्राह्मणांची घरंच नव्हेतर एक ब्राह्मण शिल्लक राहिला नसता. पण ज्यांना जिवाचं रान करून वाचवलं त्यांच्यापैकीं कांहींच्याकडून 'मी प्रोत्साहन दिलं' असा आरोप व्हावा!

विरोधी गटानें या जाळपोळीचा फायदा घ्यावा यांत आश्चर्य नाहीं. पण ज्यांना वाचवलं त्यांनीही त्यांना साथ दिली! कॉंग्रेस श्रेष्ठीनाही विलीनीकरणासाठीं कांहीं तरी निमित्त पाहिजेच होतं, त्यांना ही संधी मिळाली!

ही जाळपोळ विचारपूर्वक झाली. यात जातिवाद होता, कट होता वगैरे जी विधानें कांहींनी केली त्या मागें सत्याचा कांहीही आधार नव्हता. या आरोपामागें विरोधी पक्षाची आणि विशिष्ट वर्गाची निव्वळ सूड भावना होती. प्रजापरिषदेतील दुसऱ्या मत्सरग्रस्त गटाचा तो पद्धतशीर प्रचार होता. या निमित्तानें बहुजन समाजाची राजवट दूर करण्याचा तो डाव होता. खोट्या तारा करणं, खोट्या तक्रारी तयार करणं हे काम त्यांनी चालवलं होतं व त्यांतील एक टाइपूड फार्म, मिचेलच्या हाताखाली काम केलेल्या त्यांना मराठी शिकवणाऱ्या एका ब्राह्मण गृहस्थांनीच मला घरीं येऊन दाखवला.

जनसमुदाय चिडला तो पेढे वाटल्याच्या बातमीनें. पण ही बातमी सर्व महाराष्ट्रांत होती. त्याच बातमीमुळें आर. एस्. एस्. व हिंदुसभावाले यांच्याविरुद्ध सर्व समाज खवळला होता. जातिवादाचा संबंध सुरवातीला तर मुळींच नव्हता. कालांतरानें त्यांत गुंडगिरी शिरली तसाच परंपरागत जातिद्वेष शिरलाच नसेल असें नाहीं. त्याला परंपरागत चालत आलेली विषमता आणि गुलामगिरी कारण असूं शकेल !

दगडू बाळा भोसले, या मराठा पेढेवाल्या दुकानदारानें पेढे वाटणाऱ्यांना पेढे विकले या समजूतीनें त्याच्या दुकानाची नासधूस झाली ! भालजी पेंढारकर ब्राह्मण नव्हे पण आर. एस्. एस्. प्रमुख व हिंदुसभेवाले म्हणून त्यांच्यावर राग ! म्हणून त्यांचा सिनेटोन जाळला ! हिंदुसभेचे उपाध्यक्ष श्री. निंबाळकर हे तर राजांचे नातलग होते. यशवंत कंपनी जाळली याच्यांत तर खुद्द प्राइममिनिस्टर एक पातीदार होतें. ही उदाहरणें ब्राह्मणाविरुद्ध कट होता हे दाखवूं शकत नाहीत.

खेड्यावरचा प्रकार मात्र निराळा झाला. ब्राह्मणानें महात्माजींना मारले एवढेच ते जाणूं शकले. हिंदुसभावाला ब्राह्मण आणि दुसरा ब्राह्मण असा ते भेद करूं शकले नाहीत. कांहीं भागांतील ब्राह्मणांची सावकारशाहीही त्यांना भोंवली. भावनेची अवस्था ओसरल्यानंतर यांत गुंड शिरले. व त्यांचा हेतू जाळपोळींतून स्वतःचा फायदा करून घ्यावा असा होता. यांत कोणत्याच जातीचा द्वेष नव्हता. मुख्य हेतू स्वतःचे साधले ते साधून घ्यावे या पलिकडे नव्हता. भावनेचा आवेग ओसरल्यानंतर ज्याप्रमाणें

त्यांत गुंडगिरी शिरली त्याप्रमाणें पुढें कित्येक ठिकाणीं जातिद्वेषानें उठाव घेतला. त्याला कारण पूर्व इतिहास. अनेक वर्षांपासून खालच्या समाजावर केलेला जुलूम. सामाजिक धार्मिक व राजकीय दडपणाचा तो परिणाम नव्हता असं म्हणता येणार नाहीं.

शांतता राखण्यासाठीं मी चटकन बाहेरचा दौरा काढला. देवाळे या गांवीं तेथील लोकांच्या आमंत्रणावरून महात्माजींच्या नांवानें एका संस्थेचें उद्‌घाटन करण्याकरितां गेलो होतो. मी प्रथम तेथील परिस्थिती समजून घेतली व नंतर गांवकऱ्यांना म्हणालो, 'जीं ब्राह्मणांची घरें जाळली गेली आहेत त्यांना आसरा बांधून द्या. त्यांना प्रेमानें व अगत्यानें बोलावून आणा. त्यांच्या सुरक्षतेची हमी घ्या. हे सव डोळयांनीं पाहिल्या नंतरच मी तुमच्या संस्थेचे उद्‌घाटन करीन. मी आज कांही उद्‌घाटन करीत नाहीं.' लोकांनीं हे ऐकले व त्यांनी हे सर्व पुरें करण्याचे वचन दिले. हे राहिले बाजूला पण विरोधी गटानें आम्हाला मारण्याकरता या जाळपोळीचा फायदा घेतला.

प्रजापरिषदेच्या या विरोधी गटानें जाळपोळी दिवशीं आग विझवण्याचा किंवा लोकांना शांत करण्याचा जराही प्रयत्न केला नव्हता. जमाव शांत करण्याकरता या गटांतील एकानेंही डोकें बाहेर काढले नव्हते. महात्माजींच्या दुखवट्याच्या सभेंतही भाग घेतला नव्हता. हे वाढेल तेवढें त्यांना पाहिजे होते. कारण त्यांनी रचलेल्या कटाला या गोष्टीं उपयोगी होत्या. त्याचं स्वरुप जेवढं मोठं होईल, आणि करून दाखवता येईल तितकं पाहिजे होतं! तसं महाराष्ट्रांतील आमच्या विरोधी पत्रांनी केलं.

महात्माजींच्या खुनामुळें वेडा झालेला समाज आपण जे कृत्य करतो ते महात्माजींच्या भक्तीमुळें, प्रेमामुळें करतो असे समजून जाळपोळ करीत सुटला होता. आपण करतो हे सत्कृत्यच करतो ही भक्तीनें अंध झालेल्या वेड्या समाजाची समजूत. यावेळीं मंत्रिमंडळानें जर गोळीबार केला असता. तर महात्माजींच्याचसाठीं आम्ही मरत आहोत या कल्पनेनें शेंकडों लोकांनी गोळीबारास तोंड दिले असते. महात्माजींच्यासाठीं आपण मेलो तर जिवाचं सोनं होईल या समजुतीनें हजारों लोकांनीं मृत्यूला कवटाळले असतें. अशावेळीं मंत्रिमंडळानें संयम राखला! प्रजेची

हत्या करूं दिली नाहीं. वेड्यांचें खून पाडले नाहीत. जीव धोक्यांत घालून वेड्या झालेल्या समाजाला उपदेशानें आंवरण्याचा प्रयत्न केला. अनावर झालेल्या समाजाच्या मध्यभागीं जाऊन जाळपोळ, आंवरण्याचा प्रयत्न केला. या त्यांच्या प्रयत्नाबद्दल गांधीवादी म्हणून घेणाऱ्या कॉंग्रेस सरकारनें त्यांचें चीज करायला हवें होतें. पण गोळीबार केला नाहीं म्हणून ते दोषी ठरले! करवीर जनतेचे मुडदे पाडले नाहीत म्हणून मंत्रिमंडळ दोषी! गांधी तत्वाप्रमाणें वागले म्हणून मंत्रिमंडळ दोषी!!!

**महात्माजींच्या अस्थि—** मुंबईस मी महात्माजींच्या अस्थि मिळवण्याकरता गेलो होतो. गेलो ते ल. मा. पाटील मंत्री यांच्याचकडे उतरलो. तेथून पं. प्र. खेरांना मी कशासाठीं आलो ते फोनवरून कळवलें. 'आपण पुण्यास एक दिवस जाऊन येणार आहोत, आल्यावर जमल्यास पाहतो.' म्हणून त्यांचे उत्तर आले. ती एक रात्र आणि एक दिवस महिन्यांप्रमाणें गेली. सवड मिळालेल्या दिवसांत तेथील बहुतेक मंत्र्याच्या गांठी घेतल्या. मुरारजी देसाई यांची गांठ घेतली. त्यावेळीं विरोधी गटाची कारवाई प्रत्यक्षच समजून आली. ते म्हणाले 'जाळपोळीबद्दल आजऱ्याच्या फार तारा आल्या आहेत. काय प्रकार आहे?'

**खोट्या तारा—** मी आधलेच दिवशीं खुद्द आजऱ्यास भेट दिली होती. त्यावेळीं एकही घर जळले नव्हते. दंगा करण्यासाठीं आलेल्या सर्व लोकांना पिटाळून देण्यात आले होते. मी जंगलांत गेलेल्या जमावाची गांठ घेऊन त्यांना गांधीजींचा उपदेश काय होता ते समजावून दिले व त्यांना आपआपल्या गांवीं पाठवून दिले. मला तेथे आढळून आले कीं, त्यांनी ही संधी केवळ सावकाराविरुद्ध उठाव घेण्याकरता घेतली होती. ब्राह्मण सावकारांनी त्या लोकांना लेखणीच्या जोरावर भरडून काढले होते, त्यांचा सूड घेण्याची आलेली संधी ते पदरांत पाडून घेणार होते. ते कांहीं गांधीजींचे अभिमानी होते असं म्हणता आलं नसतं! तथापी मी गेलो होतो त्यावेळीं आजरे गांवाला कसलाही धक्का पोचलेला नव्हता तथापी मुरारजींच्यावर तारांचा वर्षाव झाला होता. या मागें पद्धतशीर कारवाई होती.

विरोधी कंपूनें केवळ जाळपोळ थांबण्यास आम्ही असमर्थ ठरलो एवढीच तक्रार केली नाहीं, तर जाळपोळीला मंत्र्यांनी उत्तेजन दिले व

त्यांत त्यांचा हात होता अशा तक्रारी केल्या. त्यावेळीं सरकारनियुक्त मंत्र्यांच्या घरीं आम्ही बसलो असता त्यांनीं सुचवलें कीं, रत्नापा कुंभार या मागे आहे याला तुरुंगांत टाकल्यास या गोष्टीला आपोआप आळा बसेल. पण मीच या विरुद्ध गेलो. ' त्यानें व मी पूर्वी खांद्याला खांदा लावून काम केले आहे. माझ्या शब्दाला मान असेल तोपर्यंत मी त्याला तुरुंगांत घालायला कारणीभूत होणार नाहीं ' असें सांगून त्यांना थोपवले. पण माझ्या या कृत्याचा परिणाम कांहीं चांगला झाला नाहीं. राजकीय मुत्सद्देगिरीच्या अभावामुळें मी फार नुकसान करून घेतले असेच मला आता वाटते. गांधीवादी सरळपणा राजकारणांत चुकीचा ठरतो असा अनुभव आला.

एका मुत्सद्दी गांधीछाप नानानें मंत्र्याच्या हातची सत्ता काढून घेऊन ती आपल्या हाती रहावी म्हणून राजाला पत्र पाठवले. एका दगडांत दोन पक्षी मारण्याची ही फडणीशी होती. महाराजांनी सत्ता काढून घेतली म्हणजे मंत्री खलास झाले. आणि लोकशाही विरोधी वागणूक केली म्हणून महाराज बदनाम झाले. त्यांच्या विरोधी वावटळ साहजिकच उठत आहे.

## महात्माजींच्या अस्थि—

मुंबईहून मी महात्माजींच्या अस्थि माझ्या घरीं घेऊन आलो. पण ज्या अस्थीवर करवीरस्थांनी माळा फुलांचा ढीग घातला त्या ढिगांत विरोधी पक्षाच्या लोकांनी फुलाची एक पाकळीही टाकली. नव्हती. प्रचंड मिरवणूक निघाली सर्व गांव लुटलं! परगांवची हजारों मंडळी आली होती. रथावर फुलांचा सारखा वर्षाव होत होता पण यांनी मिरवणुकीकडे चित्रदुर्ग मटांतून चोरून डोकावण्यापलीकडे कोणताही भाग घेतला नाहीं.



महात्माजींच्या अस्थि

**महात्मा गांधी पुतळा प्रकरण**—कोल्हापुर संस्थान प्रजापरिषदेच्या हातीं राज्यसूत्रें आली. १५-११-४७ दुपारीं ४ वाजतां मंत्र्याच्या शपथविधी झाल्यानंतर माझ्या मनांत कोल्हापुर शहरांत आमच्या कारकीर्दीत महात्मा गांधींचा पुतळा उभा करावा असे आले व या हेतुनें मी महाराजांची भेट घेतली. त्यावेळीं माझ्याखेरीज तेथें दुसरे कोणीच नव्हते पण माझी ही सूचना महाराजांना एकदम पसंत पडली. माझ्या विनंतीप्रमाणें त्यांनी पंचवीस हजार रुपये देण्याचे कबूल केले व तसे प्रजापरिषदेच्या विजयदिनानिमित्त तसें जाहीर करण्यास परवानगी दिली. व ३०-११-४७ ला महाराजांचे हुजूर चिटणीस मे. आर. वाय्. चव्हाणकडून मला पत्र आले. ते

'आपण कार्याध्यक्ष कोल्हापूर संस्थान प्रजापरिषद या नात्यानें महात्मा गांधीजींच्या मशहूर धोरणानुसार श्रीमत् छत्रपतींचे व प्रजेचे तात्कालिक उद्दिष्ट सलोख्यानें साध्य केल्यामुळें ता. ३०-११-४७ च्या विजयदिनानिमित्त करवीर जनतेला जगत्वंद्य महात्मा गांधीजींच्या थोर आदर्शाची सतत जाणीव राहावी म्हणून त्यांची प्रतिमा उभी करण्याबद्दल श्रीमत् छत्रपति महाराज सरकार करवीर यांचेकडून पंचवीस हजार रु. २५००० रुपयेची देणगी देणेत आली आहे.'

या आश्वासनाच्या आधारावर विजयदिनाच्या समारंभ प्रसंगीं मी देणगी जाहीर केली.

महात्मा गांधीजींचा पुतळा कोल्हापुरच्याच शिल्पकाराकडून व्हावा कोल्हापुरचे पैसे कोल्हापुरांतच रहावेत व कोल्हापुरच्या कारागिराचें नांवही त्या बरोबर रहावें म्हणून श्री. बाबुराव पेंटर मेस्त्री यांचेकडून ते काम करून घेण्यात येईल म्हणून जाहीर केले. बाबुरावांच्यावर संपूर्ण विश्वास ठेवून त्यांनीं सूचित केलेली रक्कम मान्य केली.

'फुलसाईझ डबलचा म्हणजे ११ ते १२ फूट उंचीचा ब्रॉंझ धातूचा पुतळा, पुतळ्याखालील दगडी पेडॅस्टलसह साठ हजारांत देणेचा करार झाला. ३० मार्च १९४८ रोजीं हा करार झाला. पुतळा कराराप्रमाणें सप्टेंबर १९४८ ला पुरा करण्याचें ठरलें.

पुढें पुतळ्याकरितां फंड जमा करण्यास सुरवात केली. आमच्या हातीं राज्यसत्ता असल्यामुळें फंड जमणें जराही त्रासाचें गेलें नाहीं. बऱ्याचशा व्यक्ती महात्मा गांधींच्या भक्तीसाठीं म्हणण्यापेक्षां आम्हाला

म्हणजे सत्ताधिशांना खूष करण्याकरतांच रकमा देत होते. कारण ही सत्ता गेल्यानंतर ज्यांनीं आश्वासनें भरगच दिली होती अशा लक्षाधिशांनीं ती पुरी केली नाहींत, तथापि फंड ९० हजारावर जमला होता.

पुतळ्याकरितां मी व बाबुराव पेंटर यांनीं शहरांतील उत्कृष्ट जागा विचारपूर्वक नक्की केली. रस्त्यावर पुतळा उभा केल्यानें त्यावर पाहणाऱ्याचें मन केंद्रित होणार नाहीं, त्यावर चिंतन करतां येणार नाहीं म्हणून वरुण-तीर्थातील मैदानाची स्वतंत्र व एकांत जागा शहरांत असून गर्दीपासून अलग अशा जागी निवडली. मैदान वर्तुळाकार होतें. वर कांहीं दिवसांनीं सभोंवार इमारती होणार. पुतळ्याला अवश्य तेवढें अंतर रहात होते. मैदान फार मोठं नाहीं. विशेष लहान नाहीं असं आहे.

या जागेवर पायाभरणीचा समारंभ दरबार व जनता यांच्या सह-कार्यानें खूप थाटानें पार पडला. हत्ती, घोडे, सरकारी लवाजमा वगैरे हजर राहू शकले. १४–२–४८ या दिवशीं हा समारंभ झाला. डेक्कन स्टेटचे रीजंट देसाई वगैरे मंडळी उपस्थित होते.



**म. गांधींच्या पुतळयाचा माधवरावांचे हस्ते झालेला 'पायाभरणी समारंभ'**

यानंतर ॲड. नंजापांची राजवट आली. त्यांनी हा सर्व फंड अखिल भारतीय फंडाकडे घेण्याचा खूप प्रयत्न केला. पण आमचा हा फंड अगदी स्वतंत्र असल्यामुळें त्यांना यश येऊं शकले नाहीं. तथापि त्यांनी त्रास द्यायचे कमी केले नाहीं.

बाबुरावांना काम चालू करण्याला पैसे पोचलेच होते. यामुळें थांबून राहण्याजोगी परिस्थिती नव्हती. पुढें नंजाप्पानीही पैसे देण्याची आडकाठी कमी केली. पण बाबुरावांच्याकडून काम पुरे करण्यात इतकी दिरंगाई होऊं लागली कीं सोय नाहीं. निकड लावण्यासाठीं त्यांच्या घरीं शेंकडों फेऱ्या होत. कांहीं गांधीभक्तांनी अन्न सत्याग्रहाची धमकी दिली. ती वेळ मारून नेण्यापुरती तें वचनें देत. पण पूर्तता व्हायची नाहीं. मलाही वचनें दिली ती मोडली. पुढें पत्रांतून राजरोस टीका करण्याचे प्रसंग आले. जादा दहा हजार कर्जाऊ मागितले. ते देऊनही दिलेली मुदत टळून गेली. यामुळें प्रेमसंबंध दुरावले. कोल्हापुरच्या अभिमानानें व ज्याच्या प्रेमामुळें मी हे काम दिले त्यांचे संबंध एवढी रक्कम पदरांत टाकून पूर्वीप्रमाणें राहिले नाहीत हा माझ्या पदरीं फायदा पडला. ! सप्टेंबर १९४८ ला पुरे होणारे काम आता जुलै १९५३ मध्यें अजून पुरें झाले नाहीं. माझ्या हयातींत ते पाहण्याचं भाग्य लाभो एवढीच इच्छा आता उरली आहे. मित्र गमावला तसं कामही गमावलं जाऊ नये म्हणजे झालं ! !

× × ×

माझ्या भाग्याची आणि आनंदाची गोष्ट. हा मजकूर प्रेसमध्यें जाण्यापूर्वी महात्मा गांधीजीचा पुतळा तयार झाला असून. पुतळा समितीला बाबुराव पेंटरनी कळवले असूनही तो केंव्हां बसवला जाणार हे समितीकडून अद्याप का कळत नाहीं ? म्हणून एकाने वर्तमानपत्रांतून पृच्छा केल्यानंतर मला पुतळा तयार झाला असल्याचे कळले. वस्तुतः सर्वाला मीच कारणीभूत. पण बाबुरावांनी तो यापूर्वीच मला दाखवणे भाग असतांना त्यांनीं मला नेले नाहीं ! मला कळवले नाहीं. तथापि मानापमानाचा विचार न करतां, गांधीजींचा पुतळा बसवण्याचेवेळीं बाबुरावांच्यांत व माझ्यांत वितुष्ट राहू नये, तसे राहणे पुतळा बसवण्याच्या हेतूला विसंगत असे वाटल्यानें मी सकाळीं उठलो



महात्मा गांधींच्या
वरुण तीर्थातील पुतळ्याचे ' क्ले मॉडेल '

आणि बाबुरावांचाकडे गेलो आणि म्हणलो, ' माझ्या टीकेंत व्यक्ति विषयक द्वेष नव्हता. टीका केली ती तुमच्या अक्षम्य दिरंगाईमुळें. आता पुतळा झाल्यानंतर माझा राग संपला, आणि झाल्यागेल्या गोष्टी विसरून जाऊं ' असे म्हणून पूर्व इतिहासावर ता. ६–९–५३ रोजीं पडदा पाडला. एकूण या प्रकरणाचा शेवट गोड झाल्याबद्दल माझ्या मनाला तरी समाधान होत आहे. बाबुरावांच्याकडे जातांना जाऊं कां नको, जाऊं कां नको. हा कमीपणा नव्हे काय असं वाटत होतं; ते गेल्यानंतर नाहींस झालं ! केलं तेच योग्य केलं असं वाटू लागलं. द्वेष भावनेपेक्षां प्रेमच मनाला समाधान देतं. ' शत्रूवरही प्रेम कर ' हा उपदेश वार्गिक वितुष्ट घालवण्याला उपयोगी पडेल असं अद्यापही वाटते.

६-९-५३ ला बाबुरावांच्या घरीं गेलो. हेतू कीं पूर्ववत् संबंध सुरू व्हावेत आज १४-११-५३ भेट घेऊन दोन महिनें पण माझ्या भेटीचा बाबुरावांच्यावर कांहीं परिणाम झाल्याचे अनुभावला आले नाहीं. ते एकवेळही माझ्या भेटीस आले नाहींत. माझ्या एका तात्विक विचाराला हा पुनः एक धक्काच आहे.

× × ×

**लोकराज्यानंतर पुनः कारावास—** दोन तपाहून अधिक इमानेइतबारे करवीर जनतेची सेवा केल्याबद्दल, जनतेच्या हक्कासाठीं अनेकवेळां कारावास भोगल्याबद्दल, बायको मुलाला निराधार टाकून तुरुंगवास पतकरल्याबद्दल, हिंदसरकारच्या प्रतिनिधीनें मला ता. ११–४–४८ रोजीं मानाची जागा दिली ! तुरुंगवास भोगल्याचे बक्षीस पुनः तुरुंगवास हे मिळालं. तेही एक गुंड समजून !!!

करवीर सरकारचे ॲड्मिनिस्ट्रेटर मि. नंजाप्पा यांनीं मी कोल्हापूरची शांतता व सुव्यवस्था बिघडवितो व राज्याचा पायाच उखडून काढतो अशा आरोपावरून मला ता. १४-४-१९४८ रोजीं आपल्या ऑफिसमध्यें बोलावून घेऊन, चर्चेच्या शेवटीं माझा भरपूर अपमान करून, मला तेथेंच अटक केली. अटक केल्यावेळीं जी कारणे दिली ती फारच मोघम होती म्हणून माझेवर कोणते आरोप आहेत ते मी लागलीच तुरुंगांत आल्यावर लिहून विचारले. त्याचे उत्तर ता. ५–५–४८ ला मला मिळाले.

माझ्यावरचे आरोप माझे शत्रूही मजवर करणार नाहींत इतके खोटे होते. कोल्हापुरांतील कोणीही ( शत्रू नसलेली ) सज्ञान व्यक्ति, मी अत्याचारी चळवळीला प्रोत्साहन देणारा, दडून चळवळ करणारा किंवा हिंसावादी मला म्हणणार नाहीं. डॉ. पट्टाभीसितारामय्या, शंकरराव देव, न. वि. गाडगीळ, पंतप्रधान खेर वगैरे पुढाऱ्यांना मी गांधी अनुयायी व अहिंसावादी असल्याचे माहित होते.

आतांपर्यंत मी अनेक वेळां तुरुंगांत गेलो आहे. बेड्यापासून ते सर्व प्रकारच्या शिक्षा, राजकीय चळवळ करीत असतां भोगल्या. उघड उघड सभेंत बोलून, सत्याग्रह आणि कायदेभंग करून, जाणूनबुजून तुरुंगांत गेलो. पण मी केव्हांही आणि कसलीही गुप्त चळवळ केली नाहीं. १९४२ मधील भूमिगत चळवळींत आमच्यांतील कांहीं इतर कार्यकर्ते यांनीं भाग घेतला पण मी सामील झालो नाहीं. उलट चोरट्या मार्गाचा व अत्याचारी चळवळीचा, अप्रियता पत्करूनही निषेध केला. जगांत शांतता नांदेल व युद्धें बंद पडतील तर ती महात्माजींच्याच मार्गानें व अहिंसेच्याच उपायानें अशीं माझी यावेळेपावेतों समजूत होती. यासाठीं मी अनेक व्याख्यानें दिली, माझ्या स्वतःच्या व बाहेरच्या वर्तमानपत्रांतून शेंकडों लेख लिहिले व पुस्तकेंही लिहिली. राज्यकारभार चालविणाऱ्यांनींसुद्धां महात्माजींचा आदर्श ठेवूनच राज्यकारभार चालवला पाहिजे, दहशतीच्या मार्गानें शांतता राखण्याचा प्रयत्न करणें घातक आहे असे माझें मत होते. ब्रिटिशांनीं कायदा व शिस्त ज्या मार्गानें प्रस्थापित केली तो दहशतवादाचा मार्ग लोक सरकारनें स्वीकारूं नये, मतपरिवर्तनावरच भर द्यावा असें माझे स्पष्ट मत होते. महाराष्ट्रांत शांतता प्रस्थापित होईल व जातिजातींत सलोखा निर्माण होईल तर तो केवळ ' क्षमा करा आणि विसरा ' याच मार्गानें होईल, याच दृष्टीकोनांतून मी कोल्हापुरांतील जाळपोळीकडे पहात आलो व प्रजापरिषदेच्या मंत्रीमंडळानेही याच धोरणानें या चळवळीकडे पहावे अशीं माझी अपेक्षा होती.

मी आतांपर्यंतचे सारे राजकीय आयुष्य याच ध्येयाला धरून नेत असतां, कोणाचे तरी ऐकून व माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्याचा यत्किंचितही विचार न करतां, खोट्या माहितीवर विश्वास ठेऊन श्री. नंजाप्पा

यांनीं माझ्याबरोबर सभ्यतेची व सर्व साधारण शिष्टाचाराची मर्यादा सोडन ठग, गुन्हेगार, दरोडेखोर, डाकू समजून वागणूक केली. मला कांहीं दर्जा आहे, दानत आहे, संस्थानांत पत आहे, असं यांना जराही वाटत नव्हतं. आतांपर्यंत कोणीही युरोपियन किंवा कोल्हापुरांतील यापूर्वींचा कोणी मंत्री आणि राजा वागला नसेल, इतक्या उद्धटपणानें यांनी वागवले व ज्या अत्याचारी मार्गांचा, चळवळींचा व पद्धतीचा मी सतत निषेध केला व विरोध केला तेच आरोप माझ्यावर बिनदिक्कत केले. हे सर्व आरोप खोटे आहेत, असे आरोप तुम्ही मजवर करूं नयेत म्हणून लखी व तोंडी सांगितले, तरी त्यांनीं माझ्या शब्दावर विश्वास ठेवला नाहीं. मी तुरुंगाला भीत नव्हतो. मी अनेक वेळां तो भोगला आहे, पण खोटे आणि दुष्ट आरोपामुळें नंजाप्पांनीं मजवर फार मोठा अन्याय केला. आयुष्यांत भरून न निघणारी अशी जखम केली.

तुरुंगांत यताच लोक दंगा करतील तर त्यांनीं कसल्याही प्रकारची विरोधी चळवळ करूं नये म्हणून पत्रक काढण्याची परवानगी मागितली, ती नंजाप्पानीं दिली नाहीं.

ॲडमिनिस्ट्रेटर येण्याअगोदर ॲडमिनिस्ट्रेटर कोल्हापूरवर लादणे हे मला असह्य झाले. २०।२५ वर्षें हाल सोसून कोल्हापूरनें आपले उद्दिष्ट गांठले. जबाबदार राज्यपद्धती मिळाविली. लोक सरकार आले. आमच्या प्रजापरिषदेचे मंत्री आले. आणि विरोधी पक्षाच्या तारा, पत्रें, भेटी या प्रचारावरून आमचे लोक मंत्री काढले जावेत, आमची तपश्चर्या फुकट जावी, आमचा अपमान व्हावा, यानें मला अत्यंत दुःख झाले. चोहोंकडे जाळपोळ झाली. सांगली, मिरज, सातारा, बेळगांवला झाली, पण कोल्हापूरचेच मंत्री मात्र आपल्या कामावरून दूर व्हावेत, हा मला अन्याय वाटला. आम्हां सर्व कार्यकर्त्यांना हा अन्याय वाटला. म्हणून आम्ही या नेमणूकीचा निषेध करायचे ठरवले. जाहीर सभेंत निषेध केला व एक दिवसाचा हरताळही पाळला. पण यानंतर पुढें कांहींही केले नाहीं. ॲडमिनिस्ट्रेटर हे हिंद सरकारचे असल्यामुळें लढ्याला हिंद सरकार विरुद्ध स्वरुप येईल म्हणून सर्व विरोध मागें घेतला. ‘ ज्ञानप्रकाश ’ व माझे ‘ अखंड भारत ’ पत्रांतून तसे पत्रक काढले. वॉरंट काढले असल्यास हजर रहा व न्यायाला सहाय्य

करा म्हणून लेखी आदेश दिला. या आदेशानंतरहि ॲडमिनिस्ट्रेटरनीं मला अटक केली. मी अत्याचाराला प्रोत्साहन देतो, शाहू मिल व सरकारी नोकरांचा संप घडवून आणण्याचा प्रयत्न करतो असा आरोप करून मला अटक केली, आणि केव्हां, तर ही चळवळ मागें घ्या, कसलाहि विरोध करूं नका, वॉरंटे असतील ते हजर व्हा, न्यायाला मदत करा, असें जाहीर केल्यानंतर, हे नंजाप्पा मला अटक करतात !

शाहूमिल संघ सरकारी रजिस्टर संघ आहे. कॉंग्रेस मजदूर संघाशीं जोडलेला आहे. कॉंग्रेस मजदूर संघाच्या महाराष्ट्र विभागाचा मी अध्यक्ष होतो व सुरवातीपासून शाहूमिल संघाचाहि अध्यक्ष होतो. महात्माजींच्या धोरणाला धरून मी ही संस्था १०।१२ वर्षें चालविली होती.

**सरकारी नोकर संघ—** या संस्थेला दरबारनें मान्यता दिली नव्हती. मी या संस्थेचा सभासदही नव्हतो व मला घटनाही माहीत नव्हती. मी यांच्या बैठकीला कधींही गेलेलो नव्हतो.

संप हा मार्ग चोरटा नाहीं. त्याला कायद्याची मान्यता आहे. संप हा उगाच होत नाहीं. त्याला कार्यकारी मंडळाची बैठक होऊन ठराव पास व्हावा लागतो. तो मग सर्वांना समजावून त्यांची अनुमती मिळवावी लागते. मग नोटीस देऊन संप करावा लागतो. असा कांहींही प्रकार दोन्ही संस्थेंत झालेला नव्हता. तसें त्या त्या संस्थेच्या सेक्रेटरींनीं श्री. नंजाप्पांना कळविलें, मी हिंसेचा निषेध करणारा आहे असें मी कळविलें तरी मी अटकेंतच—

कोल्हापुरांत कोण व्यक्ति कशा आहेत याची बरोबर माहिती न घेतां, प्रजापरिषदेतील केवळ एका विलीनीकरण विरोधी पक्षाला चिरडून टाकण्याचे धोरण श्री. नंजाप्पांनीं स्वीकारलें.

" हिंसेवर व गुप्त चळवळीवर ज्यांचा विश्वास आहे, अशाशीं माझे संबंध आहेत," हाही एक आरोप माझ्यावर करण्यांत आला. खासगी संबंध आणि राजकीय सहकारिता या गोष्टी एकच आहेत अशीं श्री. नंजाप्पांची समजूत ! महात्माजी पूर्ण अहिंसावादी असूनहि त्यांचे संबंध व प्रेम नेताजी बोस, भाई जयप्रकाश यांच्यावर होते. सार्वजनिक काम करणाऱ्या व्यक्तिचे संबंध सर्व मताचे लोकांशी येणे अपरिहार्य असते.

दे. भ. नाना पाटील हे माझे स्नेही आहेत, पण त्यांच्या भूमिगत चळवळीशी माझा कसलाच संबंध नव्हता. त्यावेळीं उघड सत्याग्रह करून मी तुरुंगांत गेलो होतो. भाई गोरे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, शंकरराव देव, शंकरराव मोरे, जेधे, जावडेकर, या सर्वांचे माझे संबंध आहेत, पण म्हणून आम्हां सर्वांची राजकीय मतें कांहीं एक नाहींत. किंवा आम्ही एका संस्थेचे सभासद नाहीं. मत आणि मैत्री या गोष्टीं भिन्न असतात असं नंजाप्पांना वाटलं नाहीं. नाना पाटील सारख्यांची मैत्री हा स्थानबद्ध करून ठेवण्याजोगा त्यांना महाभयंकर गुन्हा वाटला.

**संस्थानांत शेतकरी–कामगाराचे राज्य आणावे हीच आमची महत्वाकांक्षा**—हिंदसरकारचे धोरण सर्वच संस्थानें नष्ट करण्याचे नव्हते. त्यांनीं ही बाब लोकांच्या इच्छेवर सोंपविली होती. प्रजापरिषदेचे व प्रजा-परिषद संमेलनाचे आतांपर्यंत झालेले अध्यक्ष डॉ. पट्टाभी, खेर, गाडगीळ, ल. मा. पाटील, यांनीं जबाबदार राज्यपद्धतीवरच भर दिला होता व तसेच ठराव झाले होते. तेव्हां कोल्हापूरचे राज्य जनतेच्या हातीं ठेवून सर्वांअगोदर कोल्हापूर संस्थानांत शेतकरी–कामकरी राज्याची घोषणा करतां यावी ही आमची महत्वाकांक्षा होती. काश्मीरांत शेख अबदुल्ला यांनीं तशी घोषणा केली. या गोष्टीं आम्ही कराव्यात असा आमचा इरादा होता. फक्त अंतर्गत कारभारापुरते आम्हाला आचार स्वातंत्र्य मिळावे एवढीच आमची इच्छा होती. ग्रामराज्याचा प्रयोग आम्ही येथें करून पाहिला. तो आतां सत्ता आल्यामुळें अधिक यशस्वी करतां येईल असें आम्हांला वाटले. माझे हे कृत्य महात्माजींच्या धोरणाला सुटून आहे असें मला वाटले नाहीं. आर्थिक विकेंद्रीकरण आणि राजकीय विकेंद्रीकरण हे आपल्या राष्ट्राचे धोरण राहिले तरच जगांत आपल्या हिंद संस्कृतीचे वैशिष्ट्य प्रस्थापित होईल, नाहीतर आपले राष्ट्र पाश्चिमात्य लोकशाहीच्या धर्तीवर जाऊन पुन्हा लढाईच्या अग्नींत सांपडेल असें मला वाटत असें.

**सारा रोष कोल्हापुरवर !**— कोल्हापुरांत जाळपोळ झाली. तशी महाराष्ट्रांत झाली. पण कोल्हापुरांत एकही हत्या झाली नाहीं. कोणा स्त्रीची अब्रू घेण्यात आली नाहीं. पैशाची अफरातफर झाली नाहीं. जाळपोळ कोल्हापुरांत झाली तशी सांगलींत झाली. मिरजेंत झाली.

कराड, बेळगांव वगैरे भागांत झाली. खुद्द मुंबईत झाली! तेथले मंत्री नाहीं कमी झाले? पण कोल्हापुरचे लोकांना जबाबदार असलेले मंत्रिमंडळ सक्तीनें बरखास्त करून तेथे एक हुकुमशहा अॅडमिनिस्ट्रेटर नेमला जातो! मागें प्रचंड सत्ता व शक्ती आहे म्हणून लोकमत धाब्यावर बसवून लोकशाहीचा उपमर्द केला जातो!

**वल्लभभाईंची गांठ.—** लहान संस्थानें विलीन झाली पाहिजेत असें हिंद सरकारनें जसें स्पष्ट धोरण जाहीर केले तसें मोठ्या संस्थानाबद्दल जाहीर केले नाहीं. त्या मोठ्या संस्थानापैकीं एक म्हणून हिंद सरकारनें कोल्हापुरला मान्यता दिली. हे संस्थान अंतर्गत कारभार पाहण्यास समर्थ आहे असें ठरवले. वल्लभभाईंचे आमच्या संस्थानाबद्दल धोरण काय ते स्पष्ट समजावे म्हणून मरीन लाइनवरील त्यांच्या मुलग्याच्या— डाह्याभाईच्या—बंगल्यांत, गांठ घेतली. माझ्याबरोबर खांडेकर वकीलही होते. त्यावेळीं तेथे दादा धर्माधिकारी असावेत. पण ‘ संस्थानांतली प्रजा आपल्या इच्छेप्रमाणें कोणताही निर्णय घेऊ शकेल. ’ असे त्यांनी स्पष्ट सांगितले. पण त्यांच्या मनांत निराळे होते ते त्यांनी विश्वासानें सांगायला हवे होते. ते त्यांनी मोकळया मनानें सांगितले नाहीं.

**अयोग्यमार्गें विलीनीकरण.—** विलीनीकरणाला आम्ही घाई केली नाहीं, आतुरता दाखवली नाहीं याचा अर्थ आम्ही विलीनीकरणाला कायमचे विरोधी होतो असें नाहीं. आम्हाला आमच्या कल्पनेप्रमाणें येथें शेतकरी—कामगार राज्याचा प्रयोग करून पाहण्याची महत्वाकांक्षा होती. विलीनीकरण झाल्यानंतर आमच्या इच्छेप्रमाणें तात्काळ सुधारणा करणे शक्य नव्हते. बाहेर शेतकरी-कामगार राज्याला अनुकूल परिस्थिती नव्हती. समाजवादी राजवट आणण्याचे हिंद सरकारचे धोरण नव्हते. आम्हीं, आमच्या मंत्रिमंडळानें सरंजामदारशाही नष्ट करण्याचे बोलून दाखवले होते. यामुळें सरंजामदारही रुष्ट झाले होते. त्यांनाहीं आमची राजवट संपल्यास दुःख होणार नव्हते. रा. ब. लठ्ठे यांचा सल्ला यावेळीं संस्थान विलीन व्हावे असा नव्हता. श्री. लठ्ठे या आपल्या मताला अखेरपर्यंत चिकटून राहिले. त्यांची भूमिका घटनेला धरून कायदेशीर

अशी होतें. यामुळें तें काँग्रेसश्रेष्ठींच्या फार नाराजीत आले. पण महाराजांनी आम्हालाही विचारले नाहीं. जनतेलाही विश्वासांत घेऊन त्यांच्यावर ही बाब सोंपवली नाहीं. व विलीनीकरणाला संमती दिली. व या आधारावर लोकांना बाजूस सारून, लोकमत न घेता काँग्रेसश्रेष्ठींनी संस्थान विलीन केले. महाराजांची भूमिका पुरोगामी होती कीं इष्टापत्ति म्हणून हा मार्ग स्वीकारला ते, तेच जाणे! सत्तेची खुषी असणेच संभवनीय अधिक! बाकी काँग्रेसचे करणे लोकशाहीला धरून होते असें म्हणता येणार नाहीं.

**हिरे चव्हाणांचा प्रयत्न.—** ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पानें मला तुरुंगांत टाकले त्यावेळीं मला तेथें भेटण्यास व शक्य तर माझी सोडवणूक करता यावी या इराद्यानें प्रांताध्यक्ष हिरे व यशवंतराव चव्हाण ही दोन मंडळी आली होती. मी काँग्रेसमध्ये यावे अशी भाऊसाहेबांची फार इच्छा होती. हिरे तसे बोललेही. ‘ माधवराव त्याग आणि कष्टाच्या दृष्टीनें केशवराव जेध्यांचे मागे ही जागा वस्तुतः तुमची आहे. तुम्हाला ती मिळण्याजोगी आहे. तुम्ही काँग्रेसमध्यें या ’ अशा अर्थाचे ते बोलले. त्यांनी मला सोडण्याची खटपट केली असावी. कारण त्यांच्या भेटीनंतर मी लवकरच सुटलो.

सुटल्यानंतर मी पुण्यास गेलो. बाबुराव चिपळुणकर यांचे घरीं मी उतरलो होतो. तिथें हिरे आले. आम्ही पुष्कळ बोललो. काँग्रेसमध्यें जाण्याबद्दल मी आतुर तर नव्हतोच. काँग्रेसमध्यें जाण्याची माझी इच्छा नव्हती. मी जिल्हाध्यक्ष रहावं ही त्यावेळी सर्वांची इच्छा दिसून आली. पण मी स्पष्ट नकार दिला. पण बॅ. खर्डेकर, एम्. आर्. देसाई यांना अध्यक्ष व सेक्रेटरी या जागा देऊन कांहीं थोडे दुसऱ्या गटांतलें असावेत ही माझी सूचना त्यांनी कबूलही केली. नंजाप्पाच्या कारकीर्दींत मला तुरुंगांत जाण्याचा प्रसंग येणार म्हणून प्रजापरिषदेचे कार्य पुढे चालवण्याकरता खर्डेकर व एम्. आर. देसाई यांना ते अधिकार देण्यात आले होते. त्यांनीं नंजाप्पा असतानांच दौरें काढून बहुजनसमाजांत जागृती राखली होती. यामुळें तुरुंगांत असतानाही आम्हाला उत्साह वाटत होता. याच वेळीं विलीनीकरणासाठीं काढलेल्या रत्नाप्पाच्या दौऱ्यांत त्याची होणारी

फटफजीतीही वाचण्यात येत होती. एम्. आर. देसाई यांची धडाडी व संघटना चातुर्यही वाखाणण्याजोगे होते. पण हिन्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना या गोष्टी करता आल्या नाहींत असे दिसलें. हिन्यांना ज्या गोष्टी पाहिजे होत्या त्या दिल्लीतल्या कमेटीतील एक दोन व्यक्तींना नको असाव्यात असें मला वाटते. यामुळेंही कल्पना बारगळली.

**मला काँग्रेसमध्यें राहणे नको होते.—** माझी स्वतःची इच्छा मात्र काँग्रेसमध्यें राहण्याची नव्हती. स्थानबद्धतेच्या कालांत मला या गोष्टीचा शांतपणें विचार करता आला. भावी आयुष्याची निश्चित अशी रुपरेखा आंखता आली. काँग्रेसमध्यें राहण्यात व्यक्तिशः माझा खूपच फायदा झाला असता. पण फायद्याच्या दृष्टीनें मी माझे आतापर्यंतचे आयुष्य घालवले नव्हते. नाहीतर लाखो रुपये मी सहजगत्या मिळवूं शकलो असतो. तशी हाती सत्ता होती, संधी होती.

काँग्रेस ही देशाला धडाडीनें समाजवादाकडे नेईल असें जराही लक्षण दिसेना. राजशाही नष्ट केली ती मुख्यतः भांडवलवाल्यांच्या स्वार्थासाठीं आणि आपल्या हातीं सर्व सत्ता केंद्रित करण्यासाठीं असेंच दिसूं लागले. संयुक्त—महाराष्ट्र पुढे ढकलण्यात जी वृत्ती आहे तीच संस्थानें नष्ट करण्यात आहे. कारण राजसत्ता नष्ट केली पण भरमसाट उत्पन्नें शाबूत ठेवलीच आहेत. वल्लभभाई तर भांडवलवाल्यांचे रक्षक आणि कम्युनिझमचे तर उघड उघड शत्रू ! गरीबांची पिळवणूक चालूच आहे.

या सर्व गोष्टी उघडकीला आणून समाजवादी राजवटीसाठीं श्रमजीवी वर्गाची संघटना करायची तर काँग्रेसमध्यें राहून शक्य नव्हते. काँग्रेसचा सभासद त्या संस्थेच्या शिस्तीला बांधलेला ? तो काँग्रेसच्या आणि काँग्रेस सरकारच्या विरुद्ध कसे बोलणार ! काँग्रेसमध्यें राहिल्यास ज्या बहुजनसमाजाचा माझ्यावर विश्वास ते बुचकळयात पडणार ! त्यांच्यांत जागृती मग मी कशी करणार ? प्रतिकारशक्ती कशी वाढवणार, आणि म्हणून मी तुरुंगांत असतानाच पूर्ण विचार करून शेतकरी—कामगार पक्षांत जाण्याचे ठरवले.

**शेतकरी कामगार पक्षांत.—** पण शेतकरी—कामगार पक्षांत एकट्यानें घाईने न जाता माझ्याबरोबर असलेल्या सर्व सहकाऱ्यासकट जाण्याकरता प्रजापरिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक घेऊन तसा ठराव केला व प्रजापरिषदेचे विसर्जन करायचे ठरवलें. यामुळें कोल्हापुरच्या बहुजनसमाजाच्या राजकारणाला निश्चित दिशा लागणार असल्यामुळें सभा खूपच मोठी झाली. पटांगण भरून रस्ते बंद झाले. सभेंत परिषदेचे विसर्जन व शेतकरी—कामगार पक्षांत पदार्पण जाहीर केलें.

कम्युनिझमच्या प्रचारासाठी पुढील आयुष्य शेतकरी-कामगार पक्षासाठीं घालवायचे पण सभासद व्हावे कीं नाहीं याचा निर्णय होईना. पण सभासद झाल्याशिवाय पक्षाला तुमच्याबद्दल व तुम्हालाही पक्षाबद्दल तितकासा आपलेपणा वाटणार नाही म्हणून सभासद झाले पाहिजे असा शंकरराव मोऱ्यांचा फार आग्रह झाला. म्हणून सभासद झालो.

यानंतर सोलापुरच्या अधिवेशनास गेलो. ठराव संपल्यानंतर मंडपांत माझे स्वतंत्र व्याख्यान झाले. अधिवेशन अत्यंत यशस्वीपणें पार पडले. अध्यक्ष, शेतकऱ्यांचे आवडते पुढारी नाना पाटील हे होते. या पक्षांत बहुजन समाजांतील लोकप्रिय पुढारी असल्यामुळें हा पक्ष फार लवकर फोफावला! कारण याच लोकांच्या जोरावर काँग्रेसची महाराष्ट्रांतली शक्ती वाढलेली व ते आतां बाहेर पडलेले!

काँग्रेस अप्रिय झालेली! कम्युनिस्ट १९४२ वेळच्या अराष्ट्रीय व चुकीच्या धोरणामुळें बदनाम झालेले. समाजवादी पक्ष पांढरपेशा बुद्धीजीवींचा. यामुळें शे. का. पक्षावर खेडुतांचा लवकर विश्वास बसूं शकला.

**नंजाप्पाची दमदाटी—** मी सोलापुरचे अधिवेशनानंतर पुणें व सातारा येथे पक्ष प्रचाराच्या सभा घेतल्या. यामुळें नंजापाची स्वारी चिडली. कोल्हापुरला येताच नंजापानें ऑफिसमध्ये बोलवून घेतले. व मला धमकी देण्याला सुरवात केली. वाटेल तसा अपमान केला. मला तो इतका असह्य झाला कीं मीही त्याला तितक्याच चढत्या आवाजांत उत्तरें दिली. झाला प्रकार, काय व्हायचे ते होऊं दे. तो लोकांना कळावा म्हणून प्रसिद्धीस दिला— तोच छापील मजकूर मुद्दाम खाली देत आहे.

झाला हा प्रकार १-१०-४८ रोजीं झाला. ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पानें बोलावल्यामुळें डॉ. धनवडे यांच्या गाडीतून साडे पांच वाजतां गेलो. त्यावेळीं माझें व नंजाप्पाचें बोलणे म्हणण्यापेक्षां बाचाबाची झाली. नंजाप्पांनी मला स्थानबद्धतेंत ठेवल्यामुळें माझ्या साप्ताहिक 'अखंड-भारत' पत्राचें प्रकाशन बंद पडले होते तें मी सुटल्यानंतर ३०-९-४८ ला परत सुरू केले. त्या अंकांत मी 'करवीरच्या प्रजाजनानो, कोल्हापुरच्या लोकशाहीसाठीं एकजूट उभारा' हा लेख लिहिला. या लेखांतील 'लोकशाही' शब्दाचा अर्थ विचारून नंजाप्पा माझ्यावर खेकसून म्हणाले, 'कोल्हापुरांत लोकशाही नाही असें तुम्हाला म्हणावयाचे आहे काय?' मी म्हणालो 'हो! नंजाप्पा तुम्ही राजाला व प्रजेला जबाबदार न राहता कारभार करीत आहात.' त्यावर नंजाप्पा म्हणाले, 'मूर्खासारखे बडबडू नका.' मी ताबडतोब त्यांना बजावले कीं, 'नंजाप्पा! ज्या आवाजांत व भाषेंत तुम्ही बोलत आहा तो आवाज व ती भाषा मला सहन होणार नाहीं. तरी तुम्ही मला जे काय विचारणार असाल ते लेखी विचारा व त्यावर मीही तुम्हाला लेखीच उत्तर देतो.' नंजाप्पा गरम झाले. ते उद्गारले, 'Stupid! मला शहाणपणा शिकवता काय?' मी ही चढत्या सुरांतच उत्तर दिले 'नंजाप्पा! दमबाजी करण्याचे कारण नाहीं. तुम्हाला काय करावयाचे असेल ते करा.' यावर नंजाप्पा थोडे नरमले. पुनः त्यांनी विचारले, 'तुम्ही गॅझेट वाचता कीं नाहीं?' 'होय वाचतो,' नंजाप्पा—'मग निवडणुका होतील असे गॅझेटमध्ये जाहीर केलें असता पुनः तुम्ही निवडणुका संबंधी कां लिहले?' मी—'नंजाप्पा आम्ही निवडणुकांचा कार्यक्रम व तारीख दरबारनें प्रसिद्ध करावे असें लिहले आहे. तुम्ही तो कार्यक्रम अद्याप प्रसिद्ध कां करीत नाहीं?' नंजाप्पा यावर निरुत्तर होऊन चिडून म्हणाले, 'निवडणुका हातावर जिंकावयाच्या असतात, असें लिहून तुम्ही हिंसेचा प्रचार करीत आहात.' मी—'नंजाप्पा तुम्हाला मराठी मुळीच कळत नाहीं— हात वर करून—म्हणजे मतें देऊन आपली मेंजॉरिटी (बहुमत) लोकांनी केली पाहिजे अशा आशयाचे ते वाक्य आहे. ते तुम्ही वाचलेलें नाहीं. आणि निष्कारण वाटेल तसले आरोप करीत आहात! माझ्या गेल्या वीस

बावीस वर्षांच्या सार्वजनिक आयुष्यांत हिंसेचा प्रचार मी कधीही केलेला अगर अत्याचाराला उत्तेजन दिलेले नाहीं.' नंजाप्पा,–'**Don't talk nonsense !** थापा ठोकूं नका ! तुम्ही गुप्त कट केल्याचा आणि प्रत्यक्ष उभे राहून शहरांतील जाळपोळीला उत्तेजन दिल्याचा माझ्याकडे पुरावा आहे ?' मी—' नंजाप्पा असला आरोप मी कधीही सहन करणार नाहीं ! तुम्ही खुशाल खटला घालून मला तुरुंगांत घाला. त्याला माझी तयारी आहे. पण उगाच जर भलते सलते बोलाल तर मला सहन होणार नाहीं.' नंजाप्पा—' जास्त बोलूं नका, तुम्हाला सात वर्षे तुरुंगांत डांबीन.' मी.–' वळकटीसह तयारीनें आलो आहे. मी आतांसुद्धा तुरुंगांत जाण्यास तयार आहे.' नंजाप्पाच्या स्वभावाची व वागणुकीची आणि त्यानें आम्हा बाबतींत स्वीकारल्या धोरणाची पूर्ण कल्पना असल्यामुळें मी तुरुंगत जाण्याच्या तयारीनेच आलो होतो. नंजाप्पा—' जेधे, मोर यांना बोलावता काय ? माझ्याकडे तुमची पत्रें आहेत.' मी— ' तुम्ही खोटे बोलत आहात. मी त्यांना इकडे येण्यासाठीं पत्र घातलेले नाहीं. ते आपणहून इकडे येत आहेत. तुम्ही जर जंटलमन असाल तर माझे पत्र दाखवा. माझे तुम्हाला आव्हान आहे. इथे बोलावून अपमान करण्यात तुमचा काय हेतू आहे ? मला इतःपर बोलावत जाऊ नका' ( यानंतर मी पुनः त्यांच्याकडे गेलो नाहीं. गांधी पुतळयाबाबत बोलावणे आले होते पण मी गेलो नाहीं.) नंजाप्पा—'पुढच्या खेपेस पोलीसाच्या लॉरींत घालून हिंडवतो. मग मला तुमचा मान नि अपमान कसला आहे तो पहावयाचा आहे. सोलापूरला शेतकरी–कामगार पक्षाच्या अधिवेशनला जाऊन वल्लभभाईवर महात्माजींच्या खुनाचा आरोप करता काय ?' मी— ' सोलापुरच्या आमंत्रणाला मी निमंत्रित म्हणून म्हणून गेलो होतो. पक्षाचा सभासद अद्याप मी नाहीं. आणि वल्लभभाईच्यावर महात्माजींच्या खुनाचा आरोप करणारे मी भाषण केले असे जें आपण म्हणता ते धादांत खोटे आहे. त्यासाठीं पुण्याच्या वर्तमानपत्रांतील रिपोर्ट नीट चाळा.' नंजाप्पा— ' पुण्याच्या भाषणात नंजाप्पा मला मिरज स्टेशन सोडून कोल्हापूर हद्दींत प्रवेश करताच कदाचित अटक करील, असे म्हणाला होता की नाहीं ?' मी– ' होय ! मला तंस वाटले म्हणून मी म्हटले.'

नंजाप्पा—( चढत्या आवाजांत ) 'सोलापुरला जायला तुमच्याकडे पैसे कुठून आले? माझ्याकडे यायला टांग्यासाठीं पैसे नसतात तुमच्याजवळ—अन् गुप्त मीटिंग घेता काय? याद राखा माझ्याशी गांठ आहे. सात वर्षे तुरुंगांत डांबीन.'

नंजाप्पाच्या या बोलण्यामुळें माझा संताप अनावर झाला. मी खूप मोठ्या आवाजांत बोललो, 'नंजाप्पा तुम्ही आज कोल्हापुरचे बादशहा झाला आहात काय? ही तुमची बादशाही कांहीं अनंतकाळ टिकणारी नाहीं. मी पुष्कळ राजांच्या कारकीर्दी पाहिल्या आहेत. अनेक रेसिडेंट्स पाहिले आहेत. कित्येक हुकुमशाहांच्या दडपशाहीला तोंड दिले आहे, पण तुमच्यासारखा उन्मत्त अधिकारी पाहिला नाहीं. असल्या मगरुरीमुळें हिंद सरकारच्या प्रतिष्ठेला तुम्ही काळीमा फांशीत आहात. मला माहीत आहे कीं, जी मंडळी आज कोल्हापूर विलीन होऊ नये म्हणून झगडत आहेत त्यांच्यावर तुम्ही पक्षपातीपणानें दांत धरला आहात. मजप्रमाणेंच आणखी कित्येकांना एकएकटे बोलावून त्यांना तंब्या भरणे, बायका पोरांना तुरुंगांत डांबीन अशा धमक्या देणे आणि अपमानास्पद रीतीनें वागवून त्यांची मानखंडना करून त्यांना डिवचणे हा तुमचा नित्याचा क्रम होऊन बसला आहे—'

नंजाप्पा मला इतःपर बोलावीत जाऊ नका. काय करायचे ते खुशाल करा. तुरुंगांत घाला नाहीतर फांशी द्या.'

या भेटीनंतर काय व्हायचे ते होवो पण लोकांना हा सगळा प्रकार कळला पाहिजे म्हणून आमच्या भेटीचा वृत्तांत अनेक पत्राकडे पाठवून दिला व तसेच एक पत्रक छापून ते माझ्या पत्रांत छापले व बाहेरच्या पत्राकडे पाठवले. ते अनेक ठिकाणीं प्रसिद्धही झाले. ते— तसेच खाली देत आहे.

**ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पाच्या भेटीसंबंधी पत्रक**—ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पा हे कोल्हापुरास आल्यापासून त्यांनीं निव्वळ दमबाजीचे राजकारण सुरू केले आहे. त्यांना सारी प्रजापरिषद गुंडांची संस्था वाटत आहे. आणि जे त्यांना व कॉंग्रेसला अनुकूल बोलतील तेवढेच सत्पुरुष वाटत आहेत. एकाच गटावर त्यांनी सूड उगवण्याचें ठरवलें आहे या गोष्टीचा

अतिरेक झाला म्हणून या अन्यायाला आता वाचा फोडणें कर्तव्य होऊन बसले आहे.

महात्मा गांधींची शिकवण माणसांना नामर्द बनवणारी नाहीं.

नंजाप्पांनी निःपक्षपाती राज्यकारभार करणेंचे टाकून एका पक्षाला चिरडून टाकण्याकरता ते आपले शक्तिसर्वस्व खर्च करीत आहेत असे म्हणावे लागते. आपल्या ऑफिसमध्यें एकएकाला बोलावून त्यांनीं कित्येक लोकांचा उपमर्द केला आहे. माझा अपमान करण्याची ही चौथी वेळ आहे. यापुढें स्वस्थ बसणे म्हणजे स्वाभिमान टाकून देणें आहे. असे स्वाभिमान्यशून्य जिणें काढण्यापेक्षां जे काय व्हायचे असेल तें होऊ दे, या निश्चयानेंच मी झाल्या गोष्टीला प्रसिद्धी देत आहे.

स्वतः यांना मराठी चांगलं समजत नाहीं. आणि जाणत्याकडून समजून घेण्याइतकीं नम्रताही दिसत नाहीं. त्यामुळें भलता अर्थ काढून त्यांनी वाटेल ते तोंडसुख घेतले. नंजाप्पाना असं वाटत असेल कीं जगांत आपलं कोणीही कांहींही वाकडं करूं शकत नाहीं. हिंदसरकारच्या पाठिंब्या-वर आपण कोणाची कितीही नालस्ती केली तरी आपल्याला पूर्ण मुभा आहे. पण बेमुर्वतखोर, असभ्य वागणुकीनें आपण हिंदसरकारची नाचक्की करीत आहोत याचा त्यांना अजिबात विसर पडला आहे. गुन्हा झाला तर त्यासाठीं तेथें कोर्टें आहेत. शिवाय पोलीस खातेही आहेच. मग नंजाप्पांनी वाटेल त्याला खासगी बोलावून दमबाजी देण्याचे कारण काय ? नंजाप्पांचे काम निःपक्षपाती राज्यकारभार करणं एवढंच आहे.

प्रजापरिषदेचा एखादा विशेष महत्वाचा माणूस यांना वाटला कीं त्याला बोलावून ' तुला तुरुंगांत टाकीन ! तुझ्या मुलाला तुरुंगांत टाकीन, तुझ्या पोराला तुरुंगांत टाकीन ( टाइम्सचे रिपोर्टर श्री. जांभळे हे सत्य बातमी देत. त्या यांना अनुकूल अशा नसत. याचा परिणाम त्यांच्या मुलाला भोगावा लागला. ) अशा प्रकारच्या तंब्या देत असतात. मी म्हणे गुप्त कट करीत आहे. अत्याचाराला प्रोत्साहन देतो. मी समोर उभा राहून लोकांची घरें जाळावयास लावली असे अधम आरोप हे गृहस्थ करीत असतात. मला ता. १ रोजीं बोलावून त्यांनी अशाच प्रकारें गरळ ओकले ! मला सात वर्षें तुरुंगांत टाकण्याची धमकी दिली.

त्यांच्यांत हिंसा भरली आहे म्हणून त्यांना ती सर्वांत दिसत असावी. कारण त्यांनी लष्करांत नोकरी केली आहे. त्यामुळें त्यांची ती वृत्तीच बनली असली पाहिजे. एकएकस्याला बोलवून वाटेल ते तोंडसुख घ्यायचे व लगेच मी कांहीच बोललो नाही, असं म्हणायला हे सद्गृहस्थ मोकळेच. ( माझ्या बाबतींत त्यांनी पुढे तेच केले. )

सर्व गांधीभक्तांचा हक्क असताना त्यांनी (नामधारी) कॉंग्रेस कमेटीला तेवढी जयंति साजरी करण्याची परवानगी दिली. पण ज्या प्रजापरिषदेनें कोल्हापुरला स्वराज्य मिळवून दिले. स्वराज्यासाठीं ज्या प्रजापरिषदेचे अनेक कार्यकर्ते बळी पडले त्या प्रजापरिषदेला गांधी जयंति साजरी करण्याकरता परवानगी दिली नाहीं. ही वागणूक हुकुमशहाला शोभेल पण लोकशाही राजवटीने नेमलेल्या अधिकाऱ्याला कधीही शोभणार नाहीं. लोकशाहीच्या दृष्टीनें हा गुन्हा आहे......

आम्हास आलेल्या अनुभवावरून आमचे स्पष्ट मत आहे कीं मि. नंजाप्पा हे ॲडमिनिस्ट्रेटर राहिल्यास कोल्हापुरच्या निवडणुका कधीही निःपक्षपाती होणार नाहीत... संस्थान विलीन व्हायचे कीं नाहीं हे लोक ठरवतील त्याबद्दल कोणा पुढाऱ्याला चांगले वाईट म्हणण्याचे कारण नाहीं. पण ही हुकुमशाहीला शोभणारी मुस्कटदाबी असहय्य होत आहे. कोल्हापुरांतील स्वतंत्र विचारांचा गळा दाबून टाकला आहे... मनुष्य जुलूम एका कमाल मर्यादेपर्यंत सहन करूं शकतो. पुढे तो सहन करणे अशक्य होते. म्हणून हे विचार मांडीत आहे.

माधवराव बागल.

या लेखानंतर नंजाप्पा माझ्यावर सूड उगविल्याशिवाय राहणार नाहींत याची पूर्ण जाणीव ठेवूनच मी हा लेख लिहिला आहे—

या लेखाच्या प्रति महाराष्ट्रांतील बहुतेक पत्राकडे पाठवल्या. अनेकांनी हा लेख वाचला. त्याचें इंग्रजी भाषांतर दिल्लीतील एका पत्रांतही समग्र आले होते.

× × ×

कोल्हापुरांतील गेल्या २५–३० वर्षांतील अनेक राजवटी आम्ही पाहिल्या. शाहू महाराज, राजाराम महाराज, ताराबाई राणीसाहेब नंतर

शहाजी महाराज, तसेच सर सबनीस, लठ्ठे, सुर्वे, बागवे, पेरी, मिचेल, ऑस्टिन हे सर्व मंत्री पाहिले. पेरी–मिचेल तर जाणुन बुजून परके पण त्यांनीही आपल्या गोड आठवणी मागे ठेवल्या. त्यांनी आपल्या राजकीय शत्रुंचेही थोरपणानें, सौजन्यानें व नम्रतेनें प्रेम संपादन केले. आपल्या इंग्रजी संस्कृतीचा दर्जा वाढवला. पेरीनी तर सायकल वापरून अधिकाऱ्यांना साधेपणाचें उदाहरण घालून दिले. मिचेल यांनी असेंब्लींत जाहीरपणें चूक कबूल करून मनाचा मोठेपणा आणि लोकशाहीची चाड दाखवली. गेल्या कोणत्याच अमदानींत जुलमी व अन्यायी प्रकार झाले नाहीत असें नाहीं पण कॅांग्रेसच्या आलेल्या या प्रतिनिधींनें मात्र सर्वांवर ताण केली. कोल्हापुरांत मराठादि बहुजनसमाज हा बंडखोर आहे असे समजून त्याला निष्ठुरतेनें चिरडून काढले पाहिजे या निश्चयानें त्यांनी पाऊलें टाकलीं. जाळपोळीची सबबही त्यांना मिळाली. मग काय ? नेहमीच्या कायद्याला काळ्या जुलमी सुरक्षा कायद्याचें आणखी सहाय्य मिळाले ! कांहींना नेहमीच्या कायद्याखालीं तर कांहींना सुरक्षा कायद्याखालीं असें शेंकडों लोक तुरुंगांत टाकले. कोल्हापुरच्या राजकीय इतिहासांत राजकीय कारणावरून, अशा संख्येनें अटक केल्याचे उदाहरण सांपडणार नाहीं. या वावटळीमुळें कोल्हापुरचा बहुजनसमाज भयभीत होऊन गेला. मिलिटरी राजवट असल्याचा अनुभव आला. मेंढराप्रमाणें आरोपींची तुरुंगांत खेच झाली. जेलरनांही असें दृश्य यापूर्वी पहायला मिळाले नव्हते. जे पूर्वी राजकीय चळवळींत कधीही पडले नव्हते अशा सुखवस्तू सन्मान्य गृहस्थांना उगाच संशयावरून तुरुंगवास दाखवला. डॉ. डी. आर. धनवडे यांना स्थानबद्ध केले. त्यांची पेन्शन बंद ठेवली. हे पूर्वी दरबार सर्जन होते. व यावेळीं शहाजीराजांचे पर्सनल डॉक्टर होते. एस्. एस्. भोसल्यांची पेन्शन बंद ठेवली. प्रो. एम्. आर. देसाई, श्री. भाऊसाहेब महागांवकर इनामदार, तालीम संघाचे पाडळकर वगैरें अनेक सभासद, मंत्री खांडेकर व सरनाईक अशांना स्थानबद्ध करून ठेवले. आम्हीं तुरुंगांत असतानाच आमच्या कानावर आले, एकानें दवाखान्यांत मजल्यावरून उडी घेऊन जीव दिला. नानासाहेब जगदाळे यांची बायको नवऱ्याचे म्हातारपणीं आता कसें होणार म्हणून भीती घेऊनच मेली ! या सर्व गोष्टींना माझ्या 'अखंड भारत'

पत्रांतून वाच्यता मिळूं लागतांच, केस न घालता सुरक्षा कायद्याखालीच पत्र बंद करण्यात आले. पत्र बंद करूनही समाधान झाले नाहीं. छापखानाही बंद करण्यात आला. ज्यांनी आपलाही अपमान करण्यात आला म्हणून लेखी पत्र प्रसिद्ध केले त्या यल्लाजीराव कांबळे यांना हद्दपार केले. सातारचे केशवराव विचारे, ज्यांचा राजकीय चळवळीशी काडीचाही संबंध नव्हता, ज्यांची सारी हयात सहकारी चळवळींत व सत्यशोधक समाज प्रचारांत गेली त्यांना हद्दपार करण्यात आले. इचलकरंजींचे चिवटे यांनाही सुरक्षा कायद्याखालीं १० महिन्याच्या अटकेनंतर लगेच हद्दपार करण्यात आले. नंजाप्पाहून जे सर्व दृष्टया थोर त्या पूज्य गुरुवर्य रावबहादुर अण्णासाहेब लठ्ठांच्या घरचें सामान, तें सरकारी इमारतींत आहेत असें म्हणून देखरेखी खालीं घरांतून बाहेर काढण्यात आले व त्या थोर माणसांचा अपमान करण्यात आला. तोही दिवाळीच्या सणाच्या दिवशीं. त्यांच्या गैरहजरींत. त्यांच्या माणसांचा अपमान केला.

ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पा यांची कारकीर्द अशा प्रकारें चिरस्मरणीय होऊन राहिली. याचमुळें या पुढील, म्यु. पा. निवडणुकींत, जिल्हा बोर्डाच्या निवडणुकींत व असेंब्लीच्या निवडणुकींत कॉंग्रेसला मार खावा लागला ! आणखी कित्येक वर्षें तरी या आठवणी बुजणार नाहींत !!! माझ्या व नंजाप्पाच्या बाचाबाचीनंतर मला त्यानें कांहीं तुरुंगांत पाठवले नाहीं. मी सरळ म्युनिसिपल हॉलमध्यें सभा ठरली होती तेथें गेलो ! लोकांना घडलेली सर्व हकीकत कळवली. पोलीस हजर होते. त्यांना म्हणालो; ‘ लिहून घ्या सगळ आणि सांगा त्या नंजाप्पाला मी तुरुंगांत घाल म्हणतो आहे म्हणून.’ संध्याकाळीं कागलला सभा घेऊन तेच सांगितले. वर्तमानपत्र माझ्या हातांत होतेचे. त्यांतून सर्व भाषण छापले. इतर वर्तमानपत्रांना पाठवले. यानंतर नंजाप्पानें जाईपर्यंत मला कांही दमदाटी दिली नाही.

गव्हर्नर आले. त्यांचे भेटीचे आमंत्रण आले. त्यांना नंजाप्पाचा प्रकार कानावर घातला. त्यांनी माझी मतें समजून घेण्याकरता पूर्वींचे लिखाण मागितले. ते मी नंजाप्पा ॲडमिनिस्ट्रेटर असल्यानें त्यांचेमार्फत पाठविण्यासाठीं दिले. त्यांने ते तसेच दाबून ठेवले होते. नंतर मी दुसऱ्या प्रती पाठवल्या. त्या वाचून त्यांनी आनंद प्रदर्शित केला !

या नंतर विलीनीकरण समारंभाला पं. प्र. खेर आले. माझी पूर्वीची चांगली ओळख असतांना यांनी दुसऱ्याचे ऐकून दूषित ग्रह करूनच उपदेशाचे डोस पाजण्यास सुरवात केली.

जातिवादी शे. का. पक्षांत कशाला जाता. जेधे–मोरे जातिवादी समजून त्यांचा उल्लेख केला. मी हिंसावादी असल्याची शंका घेतली. जाळपोळीला मी कारणीभूत असावे असा बोलण्याचा रोख होता. मी ही चिडून उत्तर दिलें, ' आपल्या सारख्यांनी कितीही आरोप केले तरी खरे खोटे जाणणारा न्यायधीश अंतःकरणांत असतो, त्याच्यापासून कांहींही दडवून ठेवता येत नाहीं. तो मला दोषी ठरवणार नाहीं. '

× × ×

**कलेक्टर बाम.—** नंजाप्पानंतर श्री. बाम हे कलेक्टर म्हणून आले. आल्यावर माझ्या घरीं आले.मी ही एक दोन वेळां त्यांचे बंगल्यावर गेलो. त्यांच्या ' मॅनर्स ' चांगल्या होत्या. आढ्यता नव्हती. सहेतुकच असेल पण नंजाप्पानें निर्माण केलेले कटु वातारवण कमी करण्याचा तो प्रयत्न असेल. यांची वृत्ती खेळाडू, ऐषआरामी, सरंजामदारी थाटाची होती. दौरा, समारंभ आणि शिकार यांतच त्यांना विशेष आनंद वाटत असल्याचें दिसले. पण नंजाप्पासारखे त्रासदायक आणि सूड बुद्धीचे नव्हतें. येथील शिरस्त्याप्रमाणें लाळघोट्यांनी त्यांना फार चढवून ठेवले. कुठलाही समारंभ असला कीं त्याचे अध्यक्षस्थान यांना द्यायचे आणि मंडित करायचे. ही प्रथा लोकशाहीला मारक झाली. आपला विषय असो नसो त्याचे अध्यक्ष-पद स्वीकारायचें. याने आपण लोकप्रिय होत आहोत अशी त्यांनी कल्पना करून घेतली असावी. पण कोणीही कलेक्टर आला तर आशाळभूत पत्रें त्याचा स्तुतिपाठ करीत असतातच. याची जाणीव त्यांना असायला हवी होती. यामुळें लोकांनाही वाईट संवय लागली आहे. पूर्वी धार्मिक समारंभाला भट हा आवश्यक असें तरी येथें कलेक्टरशिवाय समारंभाला महत्व आणि शोभा प्राप्त होत नाही असें झाले

**सत्यशोधक परिषद व भास्करराव जाधव.—** शे. का. पक्षांत गेल्यानंतर कांहीं महिन्यांनी कोल्हापुर येथें सत्यशोधक परिषद भरविण्याचा

विचार माझ्या डोक्यांत आला. त्याला मी पत्रांतून चालना दिली. सत्यशोधक समाजाचे सेक्रेटरी भाऊसाहेब शाहीर यांनी संस्थेतर्फे परिषदेसाठीं पांचशेहें रुपये मंजूर केले.

सत्यशोधक समाजाचें जुनें वृद्ध मान्यवर पुढारी गुरुवर्य भास्करराव जाधव यांच्याही मनांत हेच विचार चालले होते. त्यांनी पत्रव्यवहारही केला होता. मी जोरानें भाग घेत आहे म्हणून त्यांना फारच आनंद झाला ! मीच पुढाकार घ्यावा व पुढील जबाबदारी स्वीकारावी, महाराष्ट्रांतील सर्व संस्थांचे महा-अध्यक्षपद स्वीकारावे ही त्यांची फार फार इच्छा होती. पण शे. का. पक्षांतील लोकांनी मी इकडे गुंतून पडल्यास, पक्षाचे नुकसान होईल म्हणून फार विरोध केला. त्यामुळें मला भास्कररावजींना नाराज करणे भाग पडले. पण त्याचा त्यांना जबर धक्का बसला ! यावेळीं त्यांचे माझ्यावर फार प्रेम होते. माझं नेहमीं जाणं येणं असें. 'शाहु महाराजांच्या आठवणी' लिहून घेतांना मला रोज त्यांच्याकडे जाऊन ऐकत बसावे लागे. यामुळें पूर्वी असलेले संबंध अधिक निकटचे झाले होते. माझ्या दृष्टीनें पक्षांतील लोकांनी ही चूक केली. त्या संस्थेचा मी अध्यक्ष झालो असतो तर माझ्यामुळें दोन्ही संस्था जवळ आल्या असत्या. त्यांतील कांहीं कार्यकर्ते पक्षांत आले असते. हा दूरदर्शीपणा न दाखवल्यामुळें पुढें त्या संस्थेचे व पक्षाचे संबंध सलोख्याचे राहिले नाहीत.

मी स्वागताध्यक्षही झालो नाहीं तरी परिषदेंत भाग घेतला. पुढील ठराव मीच मांडले. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी उद्घाटन करावे ही माझी सूचना जाधवरावनां पसंत पडली. अध्यक्ष मुकुंदराव पाटील यांना केले.

(१) 'सत्यशोधक समाजाच्या सभासदानें आपले लग्न कोणत्याही धर्मपद्धतीनें न करता ते रजिस्टर पद्धतीनें करावे.'

(२) 'यापुढे सत्यशोधक समाजानें देवाधर्माच्या गुलामगिरीतून संपूर्णतः मुक्त झाले पाहिजे. म. फुल्यांनी त्यावेळीं त्याकालची परिस्थिती पाहून १०० देव नको १ देव असावा ही पुरोगामी विचारसरणी मांडली. आतां याहीपुढे जाऊन देवाचे समूळ उच्चाटन केले पाहिजे' असें ठराव मांडले. पहिला ठराव पास झाला. दुसऱ्याची तितकी तयारी दिसली नाहीं.

**पक्षप्रचाराचा दौरा.—** सावंतवाडी भागांत पक्षप्रचाराचा दौरा काढला होता. त्यावेळीं प्रकृतीला बरें नव्हते. पण तसाच गेलो. सावंत-

वाडीस बापूसाहेब चिटणीस यांच्याकडे उतरलो. ते दौऱ्यांत बरोबर होते. मोठा उमदा माणूस. दिलदार, शोकीन, निर्मळ मनाचा, सुसंस्कृत. खूप बोलले. पाटणकर वकील मागे राहून सेवा करणारे. खानोलकर विद्याव्यासंगी व कष्टाळू. हे सर्व कार्यकर्ते बरोबर होते. कणकवलीस डॉ. सावंतांच्यांत उतरलो. तेथें जवळ जवळ अंथरुण धरलें. त्यांनीच मग करवीरी परत जाण्याचा उपदेश केला म्हणून घरीं परतलो.



**दिनकर.**—घरांत पाय टाकला नव्हता इतक्यांत बायको म्हणाली, 'धाकटे भावोजी फार आजारी आहेत. त्यांना सरकारी दवाखान्यांत नेलं आहे. तसंच जाऊन या.' मी टांगा परतवला. पाहतो तो दिनकर शुद्धीवर नव्हता. तो शुद्धीवर येई-पर्यंत थांबून मग घरीं जावे म्हणून वाट पहात बसलो. पण दुर्दैव, तो पुन: शुद्धीवर आला नाहीं. आपल्या मुलास व पत्नीस टाकून अकाली निघून गेला. वस्तुत: मी सर्वांत मोठा. माझा हक्क सर्वांत प्रथम जाण्याचा. पण सर्वांत धाकटा भाऊच आम्हास सोडून गेला! स्वभावानें गरीब आणि निरुपद्रवी. नोकरी भली घर भलं. केंव्हा केंव्हा सत्यशोधक समाजांत मात्र काम करीत असे. भावनाप्रधान. बरा बोलत असे. आम्ही विभक्त होतो. पण विभक्तपणामुळें कांहीं बांकुडपणा आला नव्हता आतां आम्ही तिघे उरलो.

**शंकरराव.**— माझ्या खालचा, दुसरा नंबर. बी. ए. आहे. आज कोल्हापुर जिल्हा डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डचा चीफ ऑफिसर आहे. दमेकरी आहे पण काम झटून करतो. प्रामाणिक आणि नम्र. नोकरी पतकरली नसती तर चांगला लेखक झाला असता. 'सत्यवादी' पत्रांत



त्याचे बरेच लेख आले होते. कांही लेख चांगलें अभ्यासू होते. 'विजयी-मराठा' कार श्रीपतराव शिंदे यांनी आपल्या पत्राचा संपादक होण्या-बद्दल त्याला फार आग्रह केला होता. भाषाशैली मोठी बोचक असे. ठाकऱ्यांचे त्यामुळें त्याच्यावर प्रेम होते. विभक्तपणामुळ याचे माझे संबंध दुरावले नाहींत. नोकरीमुळें त्याला मोटार ठेवावी लागली आहे. जरूर लागेल तेव्हां मला तिचा फायदा मिळतो. बहुधा लागत नाहीं. पण लागेल तेव्हां हक्कानें मागतो व आनंदानें ती दिले जाते.



**वसंतराव.**— बी. ए.; एल्.एल्. बी., वकील, हा तिसरा. उत्कृष्ट वक्ता. मराठी, इंग्रजी व हिंदींत अस्खलित व्याख्यान देऊं शकतो. चांगल्या वक्त्यांत गणना करता येईल. वकीलीतही हुषार. विशेषतः क्रिमिनल साइडला. माझ्या मतें कोल्हापुरांतील पहिल्या दर्जाच्या निष्णात वकीलांत गणना करता येईल. पण नेहमीं आजारी, दमेकरी. त्यामुळें अंगांतल्या सर्व गुणावर विरजण पडले आहे. कमी

हुषार वकील श्रमानें याचेपुढें गेले आहेत. आजारीपणाचा स्वभावावर व परिस्थितीचा वागणुकीचा जीवनावर परिणाम झाला आहे. आळस चिडखोरपणा व दुर्बलता हे दुर्गुण, अंगी जडले आहेत.

**विमलाबाई.**—वसंतरावची बायको मराठा समाजांत हिच्या इतकी चांगली व मुद्देसूद बोलणारी स्त्री कोल्हापुरांत तरी कोणी नाहीं. इतर ही क्वचित आढळेल. हिंदीही बोलते. मोठ्या सभेंत निर्भयतेने विचार परिणामकारक मांडूं शकते. नगरपालिकेंत सॅनेटरी कमेटीची चेअरमन म्हणून काम करूं शकली. शेतकरी–कामगार पक्षांत काम करीत असे. पण कांहीं लोकांच्या मत्सरी वागणुकीमुळें तिला पक्ष सोडावा लागला व ती स्वतंत्रपणेही पुनः म्युनिसिपल निवडणुकींत पक्षाविरुद्ध राहूनही निवडून येऊं शकली. पुढें येण्याजोगी व नांव काढण्याजोगी अंगी पात्रता आहे. फुले सूतिकागृह चालूं करण्यात तिची तळतळ फार होती.

**पुनः स्थानिक स्वराज्य.**— विलीनीकरण झाले तरी म्युनिसिपालिटी आमच्याच ताब्यांत होती. तुरुंगांत जातावेळीं सिव्हिक बोर्डाचा मी अध्यक्ष होतो. त्यानंतर आत जातांना ती जबाबदारी खर्डेकर, एम्. आर. देसाई, वगैरे मंडळीकडे सोंपवली होती. परत ही जबाबदारी मी पुनः घ्यावी म्हणून सर्वांनीं आग्रह केल्यामुळें ती मी स्वीकारली. रा. सा. चव्हाण, माजी हायकोर्ट जज्ज व श्री. बराले यांना सहकारी सभासद म्हणून घेतले. यावेळीं म्यु. पा. ची निवडणूक (दुसऱ्या वर्षाची) व्हावयाची होती. पदवीधराशिवाय अध्यक्षपद पेलता येत नाहीं ही भावना लोकांतील जावी म्हणून पूर्वी शाहु मिलमध्यें कारकुनाचे काम केलेले व केवळ आपल्या कर्तृत्वावर १।२ सोसायट्या चालवणारे श्री. द. मा. साळोखे यांना नगराध्यक्षपदावर घातले. स्टँडिंग कमेटीवर सोनवणे हरिजन, सॅनेटरी कमेटीवर विमलाबाई बागल अशी निवड केली. साळोखे यांनीं विशेष शिक्षण नसतानांही जबाबदारी चांगली पार पाडली.

**रा. सा. व्ही. जी. चव्हाण.**— यांचा विशेष संबंध आला तो मी त्यांना सिव्हिक बोर्डमध्यें घेतल्यानंतर व आंबेडकर पुतळा समितीचे सेक्रेटरी म्हणून. ते वयानें माझ्याहून वडील. आमच्या वडिलांच्याकडे शाहु महाराजांनी केसीसची माहिती घेत जा म्हणून पाठवले होते. त्यानंतर

पुढें ते डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व नंतर हायकोर्ट जज्ज झाले. पेन्शनीनंतर त्यांचा माझा हा संबंध आला. बराल्यांनी व ह्यांना मी सिव्हिक बोर्डमध्यें घेतले होतें. बराले वयानं फार लहान. पण चव्हाणांचे व माझे केव्हांही खटकायचे नाहीं. ते आपले घोडे दामटायचे नाहींत. डावपेच करायचे नाहींत. गटबाजी वगैरे प्रकार त्यांना माहीत नाहींत. म्यु. कौन्सिलरची निवड करतांना आपला अमका पाहिजे तमका नको हा आग्रह धरणार नाहींत. आपली कामें करून घेणें, वजन टाकणे, कोणाला उडवणें या उपद्व्यापांत कधींही पडणार नाहींत. सत्तेचा हव्यास नाहीं, प्रसिद्धीचा मोह नाहीं. पुढारपणाची इच्छा नाहीं. निव्वळ स्वयंसेवकांची भूमिका घेऊन पण अगदी कळकळीनें काम करणारें. वृत्ती बंडखोर नव्हती असणेही शक्य नव्हते. पण सनदशीरपणें व धिमेपणानें, पूर्ण निस्वार्थीपणानें काम करण्याचा गुण घेण्याजोगा. चव्हाणांनी केव्हांच हेका न चालवल्यामुळें त्यांचे माझे कधीच खटकले नाहीं. त्यांच्या स्वभावांतील एखादा ठळक दोष शोधावा म्हटला तरी मिळणार नाहीं. साठीं उलटून गली तरी स्वारी तरुणाच्या चिकाटीनें काम करते. अधिकार भोगूनही अधिकाराचा ताठा अंगी जराही नाहीं. माझें सर्व दोष त्यांनीं मुरवून घेतलें.

**नगराध्यक्ष सोनवणे.—** बी. ए. एल्. एल्. बी. आज असि. को. रजिस्ट्रार, रत्नागिरी. त्या पुढील वर्षी श्री. सोनवणे यांना अध्यक्ष केले. ही निवडणुक करतांना माझे आयुष्यांत मी एक मोटे पवित्र आणि कोल्हापुरच्या परंपरेंत मानाची भर टाकणारे कार्य केले असे मला वाटले. कारण कोल्हापुरच्या इतिहासांत हरिजनाला अध्यक्षपद मिळाल्याचे हे पहिलेच उदाहरण होय. मोठा सत्शील प्रामाणिक आणि इमानी माणूस. बहुतेकांचा अनुभव ! आपले काम संपले, यापुढे माधवरावांच्याकडून आपला कांही स्वार्थ साधण्याजोगा नाहीं असें दिसले कीं पुनः तोंड दाखवायचं नाहीं. गांठ घ्यायची नाहीं. सोनवणे हेच एक यांत विशेष असें अपवाद दिसले. आतां तर ते परगांवी नोकर आहेत. मोठ्या हुद्यावर आहेत. पण आल्यावर माझी भेट घेतल्याशिवाय राहत नाहींत. त्यांनी आपुलकी अद्याप राखली आहे. सिव्हिक बोर्डाचा अध्यक्ष नात्यानें वसंतराव बागल, श्रेष्ठी वकील, तेंडोलकर वकील, द. मा. साळोखे,

सोनवणे, भाऊसाहेब शाहीर इतक्यांची अध्यक्षपदावर निवड केली. पण या पूर्वींच्या व पुढें झालेल्या कोणत्याहि नगराध्यक्षाच्या कारकीर्दीहून द. मा. साळोखे व सोनवणे यांच्या कारकीर्दींत कामाचा उठाव दिसण्याजोगा झाला. मॅटर्निटी होम, डांबरी रस्तें, बागा, पुतळे, राजारामपुरीतील मार्केट यांचवेळीं झाले. बोर्डाचा अध्यक्ष, बोर्डाचे सभासद, पक्ष प्रमुख व कौन्सिलर्स यांच्यामध्यें प्रेम, विश्वास व एकोपा व शिस्तपालन असल्याने कामाचा उरक झटझट झाला. पक्षप्रमुख जगताप यांचीही फार मदत झाली.

या दोन तीन वर्षांत म्युनिसिपालिटीच्या हातून ठळक दिसणारी अशी बरीच चांगली कामें करता आली. त्यांतील कांहीं कामें संस्था आमच्या हाती नसती तर पार पडूं शकली नसती.

**फुले व आंबेडकर व राजर्षि शाहू छत्रपती यांचे पुतळे.—** माझ्या दृष्टीनें कोल्हापुरच्या थोर परंपरेंत भर घालणारी म्हणजे फुले व आंबेडकर यांच्या पुतळ्यांची स्थापना. हे पुतळें हिंदुस्थानांत प्रथम कोल्हापुरांतच बसत आहेत. महात्मा फुल्यांचा पुतळा बाबुराव पेंटर यांनी माझ्या शब्दाला मान देऊन, ब्रॉंझच्या किंमतींतच दिला. हे येथें मला कृतज्ञतापूर्वक नमूद करणे भाग आहे. व त्या ब्रॉंझची लागणारी बहुतेक सारी किंमत भाऊसाहेब पाटील शाहीर, त्यावेळचे सत्यशोधक समाजाचे सेक्रेटरी यांनीच जमवली. व आंबेडकरांच्या पुतळ्यास लागणारा फंड बव्हंशी रा. सा. व्ही. जी. चव्हाण व मी हिंडून मिळवला. रा. सा. चव्हाण यांची मोटार नसती तर मला फिरणे झाले नसते. हा पुतळा बसवण्याची कल्पना गंगाराम कांबळे यांनीं त्यांच्या आताच्या एका लग्नप्रसंगीं सुचवली. त्यावेळीं तेथेच मी ती कल्पना पुरी करण्याचे जाहीर करून कामास लागलो व लवकरच ती इच्छा पार पडली. श्री. बाळ चव्हाण, शिल्पकार यांनी ते काम केले. कॉंग्रेस सरकारनें हे पुतळें बसवण्याबाबत आम्हास सहानुभूती दाखवली नाहीं. शक्य तितके अडथळे उपस्थित केले. म्यु. पानें दिलेली देणगी व ठरवलेली जागा नामंजूर केली. सरकारच्या ताब्यांत असलेले व पडून राहिलेले संगमरवरी पेडॅस्टल मागितले. वाटल्यास पैसे घ्यावेत म्हणून अर्ज केला, पण तोही नामंजूर झाला.

तथापि नगरपालिकेच्या ताब्यांतील शहरांतील उत्कृष्ट व मध्यावरची रहदारीची जागा आम्हाला मिळूं शकली. उद्घाटनाचा प्रसंग आला कीं कोणी तरी मोठा समजला गेलेला माणूस, गव्हर्नर, प्रधान असा कोणीतरी आणायचा ही प्रथा मोडून टाकून जमलेल्या जमावांतल्या अनोळखी व्यक्तीकडून म्हणजे जनतेच्या हस्तेच पुतळयाचे उद्घाटन करण्यात आले. आज हे पुतळे बिंदुचौकांत आहेत. व पूर्वी ठरल्याप्रमाणें आता चौकांत फरशी घालण्यांत आली आहे.

**शाहूमहाराजांचा बस्ट.**—या पुतळयाबाबत बऱ्याच चमत्कृतिपूर्ण अशा घटना घडून आल्या. शाहूमहाराजांच्या निधनानंतर त्यांच्या मोठ्या पुतळयाचे काम मला मिळावे म्हणून नमुन्यादाखल हा पुतळा तयार केला होता. बस्ट मला राजद्रोहाच्या गुन्ह्यावरून जी २ वर्षे सक्तमजूरी व १००० दंड अशी शिक्षा झाली त्यावेळीं दंड वसूलीसाठीं जप्त करून नेला. जप्त करणाऱ्यांनी आपण शाहू महाराजांचा बस्ट जप्त करीत आहोत हे समजून वागण्याची अक्कल बाळगली नाहीं. याचबरोबर माझा स्वतःचाही बस्ट जप्त केला. यामुळें यावेळी हा एक मोठा टीकेचा विषय होऊन बसला होता.

**केशव सिताराम ठाकरे यांची टीका.**— प्रबोधनकार केशव सीताराम ठाकरे यांनी याचवेळीं म्हणजे १९३९ सालीं याबद्दल 'ज्ञान-प्रकाश' मधून खडसून टीका केली होती ती—

'श्रीयुत माधवराव बागल यांच्या एक हजार दंड वसुलीसाठीं करवीरकर छत्रपतींच्या दरबारनें बागलांच्या घरावर जप्ती आणली आणि दोन उत्कृष्ट कारागिरीचे प्लास्टर पुतळे जप्त करून नेले. एक शाहू छ. महाराजांचा व दुसरा खुद्द माधवराव बागलांचा. असे हे दोन (लाइफ् बस्ट) अर्ध पुतळे आहेत. जप्तीच्या वेळीं जमविलेल्या पंचांनी शाहू महाराजांच्या तळयाची किंमत ८०० आणि माधवराव बागलांच्या पुतळयाची किंमत

रु. ४०० मिळून रु. १२०० ठरवली. दंड आहे १००० चा. हे दोन्ही पुतळें कोल्हापूर पोलीसांनी जाहीर लिलांवानें विक्रीसाठीं करवीरच्या चव्हाट्यावर मांडले. परंतु लिलांव बोलण्यास कोणीही करवीरस्थ पुढे न आल्यामुळें ते पुतळें परत नेण्यात आले...माधवराव बागलांच्या राजद्रोही गुन्ह्याचा निचरा काढण्यासाठीं दंडवसुलीच्या जप्तींत, पुतळयाच्या प्रतीकानेच कां होईना, अखेर सांपडले कोण ? तर खुद्द करवीराधिपति शाहू महाराज आणि त्यांच्या जोडीचे राजद्रोही गुन्हेगार बागल !......

माधवराव बागल तर उघड उघड दरबारचे गुन्हेगार. त्यांची रवानगी तुरुंगांत झालीच होती. लोकादराच्या धवलगिरीवरून खाली ओढून त्यांना जमीनदोस्त करण्याचा आणि लोकांवरही आपल्या सत्तेचा दरारा बसवण्याच्या भोळसट नि बावळट कल्पनेनें दरबारी महाजनांनी बागलांची साधेल तेवढी विटंबना करायची तेवढी केली. आणि लोकांच्या सक्रीय निषेधाला वगून आज ती तुरुंगाबाहेर होत नसेल, तर आंत तरी खास होत असेल असे मानण्याइतक्या बातम्या वृत्तपत्रांत व्यक्त झाल्या आहेत. या विटंबनेची कड शिगेला पोंचवण्यासाठीं माधवराव बागलांचा प्रत्यक्ष पुतळाच चव्हाट्यावर विक्रीला मांडण्याची कल्पना कोल्हापुरी राजकारणालाच शोभण्यासारखी आहे...लोकशाही तत्त्वांच्या जागृतीचे अजरामर चिन्ह म्हणून करवीर जनतेने हे दोन्हीही पुतळें चढाओढीने विकत घेऊन सार्वजनिक ठिकाणीं त्याची स्थापना करणे अगत्याचे आहे.—

**नगरपालिकेनें ठाकऱ्यांची इच्छा सफल केली.**— त्यावेळीं म्हणजे १९३९ सालीं अशक्य आणि हास्यास्पद वाटणारी केशवराव ठाकऱ्यांची ही सूचना पुढें १२ वर्षानंतर प्रत्यक्षांत येऊं शकली. छ. महाराणी ताराबाईंचे राजवटींत या बस्टचे उद्घाटन बेबी महाराजांचें हस्तें दरबारी थाटांत करवीर नगरपालिकेच्या हॉलमध्यें करण्यात आले. व तो बस्ट आज तेथे आहे.

त्याच बस्टचे ब्रॉंझ कास्टिंगचे उद्घाटन गंगावेशींत शाहू उद्यानांत छ. शहाजीमहाराज यांचे हस्तें करण्यात आले.



टाकऱ्यांची दुसरी इच्छा अगदी त्याच स्वरुपांत प्रत्यक्षांत आली नसली तरी थोड्या निराळ्या स्वरुपांत आली. नगरपालिकेनें कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या हस्तें मला मानपत्र समर्पण करून त्यांच शाहु-महाराजांच्या पुतळयाजवळ माझं तैलचित्र लावल आहे व राजारामपुरीतील मार्केटलाही माझ नांव देण्यात आले आहे. एका चौकालाही बागल चौक असे नांव दिले आहे. करवीर जनतेची मी जी अल्पशी सेवा केली तिची अनेक पटीनें परत फेड केली आहे व हे जनतेचं ऋण पुनः माझ्या डोक्यावर बसले आहे.

**उद्घाटन वेळीं कलेक्टरशी खटका.**— शाहु उद्यानांतील पुतळयाचे अनावरण प्रसंगी मी छ. शाहुंच्या शैक्षणिक धोरणाशी कॉंग्रेसच्या धोरणांशी तुलना करीत होतो. बहुजनसमाजाला मिळणाऱ्या फीच्या सवलती, स्कॉलरशिप्स, प्रत्येक जातीची बोर्डिंगें, पुनः नोकऱ्यांची सवलत, यामुळ साऱ्या

महाराष्ट्रांतील बहुजनसमाजावर त्यांचे उपकार झाले होते. कॉंग्रेसनें आता या सवलती काढून घेतल्या ' असे बोलतांना भाषण राजकीय होत आहे ते होऊं नये म्हणून कलेक्टर श्री. बाम यांनी मला सूचना केली. तेंव्हा मी म्हणालो, ' काय बोलायचे हा माझा प्रश्न आहे. त्याला कोणी अडथळा आणूं शकणार नाहीं ' यामुळें वातावरण बरेच गरम झाले. पण श्री. बामनी त्याचे स्वरुप वाढवले नाहीं. श्री. बाम तसे दीर्घद्वेषींही वाटले नाहीत. ऐषारामी व निरुपद्रवी होते. वागणूक व आचरण सरंजामदारशाही होते. मात्र वेळीं अवेळीं प्रत्येक समारंभाचे अध्यक्षपद स्वीकारून त्यांनीं लोकांत खुषमस्करी करण्याच्या संवयीला प्रोत्साहनच दिले. कसलाही समारंभ असो अध्यक्ष कलेक्टर हा ठरलेला. लोकशाहीची वाढ यामुळें खुरटली. जनतेतील स्वतंत्रवृत्ती व स्वाभिमान कमी झाला. सरकारी अधिकाऱ्यांनी अशा रीतीनें आपण लोकप्रिय ठरतो ही कल्पना काढून टाकली पाहिजे. कारण कोणीही व्यक्ती अधिकारावर आली की खूष करणारे लोक आणि पत्रे त्यांना लोकप्रिय ही विशेषणे लावत असतातच. पण यानें त्यांनी स्वताची दिशाभूल करून घेणे चुकीचे आहे.

**श्रीशिवछत्रपतींचे पेंटिंग.**— यानंतर म्यु. पा. हॉलमध्यें छत्रपति शककर्ते शिवाजी महाराज यांचे पेंटिंग व करवीर राज्यसंस्थापक महाराणी ताराबाई यांचे अशी पेंटिंग्ज लावण्यात आली. याचें श्रेय मुख्यतः मुंबईचें पंत प्रधान बाळासाहेब खेर यांनाच द्यावे लागेल. त्यांनीं श्रीशिवछत्रपतींना कमीपणा आणणारे उद्गार काढून त्यांच्या भक्तीची लाट महाराष्ट्रभर उसळून दिली. जेथें उत्सव होत नव्हते तेथें मोठ्या प्रमाणावर होऊं लागले. कोल्हापुरनें तर आघाडी मारली, मी सभेंत परिषदेंत, लेखांत, टीकेची झोड, उडवली. कराड—कोळेवाडीच्या सभेंत सर्वांअगोदर निषेधाचा ठराव केला. त्यांच्या थोर ! उक्ती नंतर त्याच दिवशीं झालेली ती सभा होय. नंतर अष्टे शेतकरी परिषदेंत, उमरावतीच्या संयुक्त महाराष्ट्र परिषदेंत, जेथें संधी मिळेल तेथें निषेध केला. नगरपालिकेनें आपल्या अधिकारांत आपल्या शाळांना सुटी दिली व सभा घेतली आणि त्यानंतर भाई शंकरराव मोरे यांच्या अध्यक्षतेखालीं माझ्याच हस्तें शिवछत्रपतींच्या पेंटिंगचें उद्घाटन झाले.

**संस्थापक ताराराणींचें पेंटिंग.—** यानंतर महाराणी ताराबाई यांचे पेंटिंगचें उद्घाटन माझ्याच अध्यक्षतेखालीं छ. विजयमाला राणीसाहेब यांचें हस्तें झालें. या गोष्टी म्यु. पालिटी कॉंग्रेसच्या हातीं असती तर झाल्या नसत्या ! याच्या उलट वागणूक जिल्हा बोर्डाची झाली ! यासाठीं तेथें भांडाभांडी झाली. कारण या वेळीं ही संस्था कॉंग्रेसच्या हातीं होती.

कोल्हापुरच्या कलासंग्रहांत चित्रकार तपस्वी आबालाल रहिमान व गानसम्राट अल्लादियाखां यांच्या पुतळयांचीही भर पडली आहे.

**शेतकरी-कामगारपक्षांतले पुढारी—** शे. का. पक्षांत गेल्यामुळें कोल्हापूर बाहेरच्याही प्रश्नांचा संबंध जास्ती येऊं लागला. सुरवातीला आमच्या पक्षाची ताकत मोठी होती, सारखी वाढत होती. तशीच वाढत गेली असती तर महाराष्ट्रांत तरी कॉंग्रेसचे स्थान अगदी डळमळीत झाले असते. केशवराव जेध्यांची आतांपर्यंतची तपःश्चर्या, त्यांचा लौकिक व लोकप्रियता, स्वभावांतील स्फटिकवत् निर्मलता, धैर्य आणि धडाडी, क्षत्रियाची नेकी आणि सीधेपणा; नाना पाटलांची खेडुतांवरील असामान्य पकड, नम्रता जिवाची काळजी न करता काम करण्याची चिकाटी, शिस्तीचे पालन शिकण्याची तळमळ, भाषेतले माधुर्य आणि सोपेपणा, व प्रसंगावधान, तुळशीदास जाधवांची कमालाची चिकाटी, भयंकर महत्वाकांक्षा अन् तळमळ सोलापुरच्या बहुजनसमाजावर आणि कामगारावर असलेली त्यांची छाप, काका वाघांचा खेळीमेळीचा, पोटांत शिरणारा स्वभाव व संघटनाचातुर्य आणि कामाची धडाडी. शंकरराव मोरे यांची कोणालाही हार न जाणारी विद्वत्ता, समयसूचकता, मन रिझवणारे, खुलवणारे, ज्ञानपूर्ण वक्तृत्व व राजकारणी धूर्तपणा आणि रघुनाथराव खाडिलकर यांचा सर्वांना मिळवून घेणारा प्रेमळ स्वभाव, व विद्वत्ता आणि वादपटुता, कुलाब्याच्या राऊतांचे वजन, दत्ता, सथ्था, भापकर, व व्ही. एन्. पाटील केशवराव पवार वगैरे या हुषार व कर्तृत्ववान कार्यकर्त्यांचा पाठिंबा, यामुळें कॉंग्रेसला चांगलाच हादरा बसला होता. पण !

पण महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या दुर्भाग्यानें या पुढाऱ्यांत द्वेषाचा, निंदेचा, अविश्वासाचा कलि थैमान घालूं लागला ! पक्षनिष्ठा

आणि ध्येयनिष्ठा याहून व्यक्तीनिष्ठाच प्रबळ झाली ! अपमानानें परस्परांची मनें एकमेकाविषयीं कलुषित झाली ! हें वातावरण खालच्या कार्यकर्त्यांतही शिरलें. आणि निवडणुकीच्या सुमारास पार्टी दुभंगली ! शत्रूंना रान मोकळें करून दिलें.

**निवडणुका व माझी माघार.**— नव्या निवडणुकांत शेतकरी–कामगार पक्षाच्या कोल्हापूर, दक्षिण सातारा व रत्नागिरी या तिन्ही युनिटनीं पार्लमेंटच्या उमेदवारीसाठीं माझें नांव सुचवले होते. पार्लमेंटरी बोर्डनें कोल्हापुर जिल्ह्यासाठीं माझें नांव नक्की केले. पण राजकीय चळवळींत पडल्यापासून माझी भूमिका प्रचारकाचीच होती. अधिकाराची जागा भोगण्यापेक्षां प्रचारकाचीच भूमिका माझ्या आवडीची होती. याचमुळें मी माझ्यावर लादलेले कोल्हापुरचे मंत्रिपद टाकून दिलें होते. यांत मी मोठा स्वार्थत्याग केला असें मला मुळींच वाटत नव्हतें. जें आवडीचे नव्हतें तें टाकलें. उलट तें टाकल्यानेच मला आनंद वाटला होता. पक्षाला यश येण्याच्या दृष्टीनें मी उभा रहावे असा मोरे–जेधे–जाधव-यांचा खूप आग्रह होता. पण मला ती जागा मोहाची वाटण्यापेक्षां बंधनाचीच वाटली. पक्षाच्या दृष्टीनेही मला उभे राहणे बरें वाटले नाहीं. कोल्हापूर जिल्ह्यांत मराठ्यांची संख्याच मोठी. जातिवाचक दृष्टीनें विचार केला तर मी, खर्डेकर व आमचे बंधू वसंतराव बागल हे तिघेही राहणे धोक्याचे झाले असतें, विशेषत: मतदानाची वांटणी तिघांत होऊन काँग्रेसचाच उमेदवार एखादेवेळीं आला असता. मी २०।२५ वर्षें सतत काम करीत असल्यामुळें व ज्या संस्थेनें कोल्हापूरच्या राजाशी झगडून लोकशाहीचे हक्क मिळवले व राज्यकारभार हातीं घेतला त्या प्रजापरिषदेच्या जन्मापासून ते अधिकारपदरीं पडेपर्यंत कार्याध्यक्ष असल्यानें मी बरीच मतें घेतली असती. खर्डेकरांच्या पाठीमागें शिक्षकवर्गाची संघटना असल्यामुळें व तो शिक्षक वर्ग खेडोंपाडीं पसरल्यामुळें त्यांनाही बरीच पडली असती, शहरांतील कांहीं थोडी वसंतराव बागलांना पडली असती. म्हणून मी माघार घेणे मला इष्ट वाटले. त्यामुळें खर्डेकर येणे हें निश्चित होणार होते. त्यांतही ते शे. का. पक्षाचे नसले तरी त्यांचा कल काँग्रेसच्या उलट आणि पक्षाला अनुकूल असल्यामुळें माघार घेऊन त्यांनाच मदत करावी

असा मी बोर्डापुढें आग्रह धरून त्याची प्रयासानें कबूली मिळवली व लगेच खर्डेकरनां तसें कार्ड टाकलें. व कोल्हापूर शहरांत व कोल्हापूरच्या खेड्यांत त्यांचा प्रचार केला! पण माझ्या दुर्दैवाची गोष्ट कीं ज्या एका सद्बुद्धीनें हें केलें त्याची त्यांच्याकडून चार ओळीं पाठवूनही चीज झाली नाहीं किंवा पूर्वीहून संबंध जवळचे झाले नाहींत. उलट कोणत्या गैर-समजानें कोण जाणें, ते पूर्वींहून दूरच गेले! तथापि हा व्यक्तिविषयक प्रश्न बाजूस ठेवला तरी कॉंग्रेसचा उमेदवार पडावा हा मुख्य उद्देश तो ते निवडून आल्यानें साधला! जे उद्दिष्ट होते ते साध्य झाले.

वसंतराव बागल.— निवडून येतील असें मला केव्हांच वाटले नाहीं. पैशाचं पाठबळही नव्हतं. मित्रांचा संच नव्हता. प्रभावी संघटना मागें नव्हती. जिल्ह्याचे डोळयांत भरण्याजोगं काम नव्हतं. अन् त्या समाजवादी संघटनेने जीव तोडून प्रयत्नही केल्याचेही दिसलें नाहीं. निवडणुकीस उभा राहण्यापूर्वी माझी सल्ला घेतली नाहीं. फार पूर्वींपासून त्या पक्षांत होते असेंही नाहीं. यामुळें त्या पक्षानेही हिरीरीनें प्रयत्न केला नसावा. मला तर उलट प्रचार करणे भाग पडले.

त्र्यं. सी. कारखाननीस.—यांनीही असाच खुळेपणा केला. माझी सल्ला जुमानली नाहीं. शेतकरी–कामगार पक्षातर्फे आपले नांव यावे म्हणून प्रथम जो प्रयत्न करायला पाहिजे होता आणि जो करण्याबद्दल मी घरीं जाऊन आग्रह केला तो केला नाहीं. नांव सुचवणारा मनुष्य तयार केला नाहीं. मोऱ्यांची गांठ घ्या व आपली हकीगत कळवा म्हणून सांगितलें ते योग्य वेळीं केले नाहीं. दुसरें नांव नक्की केल्यावर आकांड तांडव व धडपड चालू केली. अखेर त्राग्यानें स्वतंत्र उमेदवार म्हणून उभे राहिले. जे वसंतराव बागलांचे तेच यांचे झाले. निदान त्यांनीं समाजवादी पक्षाचा तरी कांस धरली होती. हे स्वतंत्र राहिले. राहणं नेहमी कोल्हापुरांत. राहिलें शाहुवाडीला. दांडगी लोकप्रियता नाहीं. पैशाचा जोर नाहीं. मनुष्यबळ नाहीं. मला विरोधी प्रचार करणे भाग पडलें. रंगराव पाटील त्या भागांतलें, सधन, आणि शेतकरी–कामगार पक्षाचा पाठिंबा व काम केलेले. यामुळें आमच्या दोस्तांची स्वारी पडली!

गणपतराव जाधव— मी जिल्ह्यांत नाहीं तर निदान शहरांत तरी उभे रहावे म्हणून पुनः जेधे–मोरे–जाधवांनी आग्रह केला. पण माझ्या स्वभावानुसार मी कबूल झालो नाहीं. बराले यांना मग उभे केले. काँग्रेसनें उभे केलेले उमेदवार गणपतराव जाधव हे निवडून येण्याची शक्यता फार होती. यांच्या हातीं कोल्हापुरचे प्रमुख पत्र ' पुढारी ' होते हे संपादकच ते. यामुळें त्यांचा मित्रगण मोठा. पैसे खर्चण्याची शक्ती मोठी. कोल्हापुरचा– विशेषतः वरचा मराठा वर्ग अनुकूल. माझ्या हितचिंतकांतच त्यांना मानत आलो. त्यांनाही मी राहूं नका म्हणून सांगितले. पडतील अशी खात्री वाटली म्हणून नव्हे. येणे अशक्य नव्हते. पण आहे ती ' संपादका'ची जागा आमदारकीपेक्षां कमी नाहीं आणि म्हणून तुम्ही त्या भानगडींत पडूं- नका असें आग्रहानें सांगितले. पैसा नसलेल्यांना वेड लागलं. मग पैसा, माणूसबळ, काँग्रेसची संघटना मागे, मित्रगणाचा आधार, एवढं असल्या- नंतर ते मोहाला बळी पडल्यास त्यांना अविचारी खास म्हणता येणार नाहीं. पण कोल्हापुरचं एकूण वातावरण यावेळीं काँग्रेसच्या उलट होतं. नंजाप्पाच्या राजवटीनं कोल्हापुरच्या मराठ्यांना आणि बहुजनसमाजाला भरपूर दुखवले होते. तालीम संघाचा नंजाप्पानें सूड उगवला होता. यामुळं काँग्रेस द्वेषाची जी लाट उसळली त्यापुढं गणपतरावांचा निभाव लागला नाहीं. काँग्रेसच्या मंडळींनीही करावा तसा प्रयत्न केला नाहीं. हे पडल्यास आनंद वाटणारा एक गट काँग्रेसमध्येही होता. मी शेतकरी–कामगार पक्षांत असल्याने पांच सहा सभा घेऊन प्रचार उलट केला. खासगी संबंधाचा परिणाम होऊं दिला नाहीं. बिंदु चौकांत मोठ्या सभेंत भरपूर तोंडसुख घेतले; त्यांच्या घरापुढं सभा घेतली व भरपूर उलट बोललो. याचा व एकूण परिस्थितीचा परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं व गणपतराव पडले. पण विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे, ज्यांच्या विरुद्ध मी उघड प्रचार केला त्या गणपतरावनी पुढारींत माझ्याविरुद्ध एक ओळही लिहली नाहीं. माझे संबंधही टाकले नाहींत. ते शत्रू झाले नाहींत.

अनेक व्यक्तींचा मी प्रचार केला. पण काम झाल्यानंतर त्यांनीं पुनः तोंड दाखवले नाहीं. किंवा लोभांत काडीची वृद्धी नाहीं. उलट

लांबच गेले. पण गणपतरावांच्या उलट प्रचार करूनही त्यांचे संबंध बिघडले नाहींत. किंवा त्यांनीं मनांत सूड बुद्धी बाळगली नाहीं. पूर्वीप्रमाणें आजही माझ्या हितचिंतकांत त्यांची गणना मी करूं शकतो.

**बराले.**— बराले यांना निवडणुकीचे वेळीं, ते पक्षांत असल्यामुळें कर्तव्य म्हणून मी प्रामाणिकपणें प्रचार केला. जाधवांना यावेळीं मदत करणं म्हणजे माझ्या ध्येयाशी आणि जीवनाशी प्रतारणा केल्याप्रमाणें झाले असते. ते मला केव्हांही शक्य नव्हते. पक्ष आणि ध्येयदृष्ट्या बरालेच जवळ, म्हणून ते निवडून येताच मला आनंदाने गहिंवरून आले. अर्थात ही भूमिका तात्विक होती.

बराले यांचे माझे संबंध एक पक्ष आणि ध्येय यामुळें जवळचे कांहीं स्वभावदोषामुळें मी जरी त्यांच्याविषयीं समोर व मागे कुरकुरत असलो तरी त्यांना केव्हांही दूर केले नाहीं. अगदी जवळच्या आणि विश्वासाच्याच जागेवर घेत आलो. रत्नाप्पा भूमिगत झाल्यानंतर ज. सेक्रेटरीची जागा मी बराल्यानांच दिली होती. म्यु. पा. सिव्हिक बोर्डमध्यें अगदी बरोबरचे सहकारी म्हणून रा. सा. चव्हाण, जज्ज यांच्याबरोबर घेतले होते. रत्नाप्पाला शह देण्यात आणि तेच डावपेच त्यांच्या गळयांत घालण्यात बराले वाकबगार होते. त्यावेळीं बराल्यांचा बराच उपयोग झाला. बराल्यांच्यांत महत्वाकांक्षा आहे. आपल्या विरोधी व्यक्तींना बाजूस सारण्याचे सर्व डावपेच ते करूं शकतात. राजकारणांत जी मुत्सद्देगिरी असावी लागती अन् माझ्यांत नाहीं ती त्यांच्यांत भरपूर आहे. निवडून आलेल्या आमदारांत बराल्यांचे भवितव्य मला फार आशादायक वाटतं. पण ते सुखासीन आहेत. चिकाटी कमी आहे. ती येणें भाग आहे.

**खांडेकर वकील.**— हे निवडून आले ते केवळ स्वतःच्या जोरावर. माझी प्रचाराच्या दृष्टीनें यांना कांहीच मदत झाली नाहीं. किंवा पक्षाच्या जोरावर आले म्हणता येणार नाहीं. मंत्री असतांना त्यांनीं गरीबांना ज्या जमिनी दिल्या त्याचा त्यांना बराच फायदा मिळाला. त्यांतही मराठा वकील म्हणून त्या पेट्यांतील हेच एक नांवालौकिकाला आलेले. पैशाचं पाठबळ भरपूर होतं. वकीलीमुळें त्या भागांतलं माणूसबळ मिळालं. यामुळें निवडन येणे बरेच सोपे गेलें. खांडेकर असामान्य

बुद्धीचे नव्हेत. ध्येयवादी, महत्वाकांक्षा जबर नाहीं. पण आपल्या वकीलीच्या धंद्यांत अत्यंत चिकाटीनें, परिश्रमानें काम करणार. माझे वडिलांचे प्रॅक्टिस दांडगे होते. पण अखेरपर्यंत लहान मोठी कसलीही केस असो तिचा विद्यार्थ्याप्रमाणें अभ्यास करणार. ते सारे गूण खांडेकरांच्यांत आहेत. खुनाच्या केसमध्यें जेथें आपल्याला समजत नाहीं तेथें त्या डॉक्टरांच्याकडे जाऊन समजावून घेणार. यामुळें त्यांनीं वकील म्हणून चांगलाच लौकिक, विश्वास व पैसा संपादन केला आहे. ' प्रथम प्रपंच मग परमार्थ ' हे त्यांच्या आयुष्याचे आजचे स्लोगन आहे. तसे ते बोलतातही, ' मी प्रथम माझ्या पायावर उभा राहाणार. त्यांतून सुटल्यावर मग देशसेवा. पैसा नसला कीं कोणी विचारत नाहीं. ' या विचारसरणीनुसार त्यांनीं आपले आयुष्य आंखले आहे.

**नारायणराव सरनाईक.—** हे कोणत्याच पक्षाचें नसल्यामुळें यांना कोणत्याच पक्षाचे सहाय्य मिळाले नाहीं. पूर्वीपासून हे एकांडे शिलेदार. पण ध्येयवादी नाहींत असे नव्हे. त्यांनीं आपली शेतकरी संघटना बनवली होती. ऊसकऱ्यांत काम केलें होते. जीव धोक्यांत घालून काम केले नसले तरी काम केले नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. त्यांच्यांत चिकाटी आहे, व्यवहार आहे, हुषारी आहे. ते आपल्या संघटनेच्या बळावर निवडून आले कौतुकाची गोष्ट कीं शे. का. पक्ष व कॉंग्रेस या दोन्ही उमेदवारांना ते मागें टाकूं शकले. को–ऑपरेटिव्ह बॅंकेच्या कामांत त्यांचे सतत लक्ष आहे. सचोटीचे आहेत. नेकी व प्रामाणिकपणा हा मोठा गुण अंगीं आहे. जनसेवेची तळमळ आहे.

**दिनकरराव यादव.—** यांनी मला शिरोळपेठ्यांत भरपूर फिरवले. दिनकराव यादव यांनी या पेठ्यांत आपल्या कार्यानें लोकप्रियताही मिळवली होती. कार्यकर्त्यांचा उत्कृष्ट संच त्यांना मदतनीस होता. कोल्हापुर जिल्ह्यांतला या तालुक्यांतला संच पहिल्या प्रतीचा होता. मतवाल, लखबा बुरुड, गंगाराम कोळी वगैरे मंडळी जिवापाड राबत होती. असे असूनही हे कां पडले मला समजत नाहीं ! हे पडल्यानें मला वाईट वाटले. मोठ्या खुल्या मनाचा, प्रेमळ अंतःकरणाचा, सीधा माणूस. कांही डावपेच नाहीत. उमद्या स्वाभावाचा—

**माझे समाधान.**— मी स्वतः निवडणुकीसाठीं उभा राहिलो असतो तर माझ्या हातून जसा पक्षप्रचार झाला व पक्षाची तात्विक भूमिका सांगूं शकलो तसा झाला नसता. मी एकाच जिल्ह्यांत माझ्या स्वतःसाठीं गुंतून पडलो असतो. पक्षांतील जिल्ह्याबाहेरच्या उमेदवारांना सहाय्य करता आलं नसतं. माझ्या न राहण्यानें मी पक्षाची अधिक सेवा करूं शकलो. पक्षाचा स्वार्थ अधिक साधला. आणि प्रचाराची हौस भागवूं शकलो. कोल्हापूर शहर, व जिल्ह्यांतील शाहुवाडी, पन्हाळा, शिरोळ, बावडा या तालुक्यांतील बरीच खेडीं, रत्नागिरी, सातारा, पुणें, हैद्राबाद या जिल्ह्यांत दौरा काढूं शकलो. इतर वेळीं असा प्रचार करता आला नसता. पक्षाला ही एवढा खर्च करणे शक्य झाले नसते.

निवडणुकीस उभा राहिलो असतो तर माझ्या आयुष्यास एक निराळेच वळण लागले असते. वाचन, लेखन, व्याख्यान हे माझ्या आवडीचे विषय ! ते सोडून न आवडणाऱ्या विषयांत डोकें घालावे लागले असते. या दृष्टीनें मी उभा राहिलो नाहीं म्हणून बऱ्याच हितचिंतकांना जरी वाईट वाटले. तरी मला दुःख झाले नाहीं.



**बॅ. माने.**— निवडणुकींत जी व्यक्ती पडल्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटले ती व्यक्ती म्हणजे बॅ. माने हे होत. त्यांचे माझे संबंध अलीकडेच आले. त्यांचा ध्येयवाद, करारीपणा, सत्यनिष्ठा, धडाडी व प्रामाणिकपणा पाहून त्यांच्याबद्दल आदर वाटूं लागला व त्याचे रुपांतर मत्रींत झाले. ते महार जमातीतील आहेत. डॉ. आंबेडकरांच्यानंतरचे हेच दुसरे, त्या जमातीतील बॅरिस्टर होत. स्वार्थाकडे पाहून त्यांनीं आपल्या ध्येयाला मुरड घातली असती तर ते डॉ.

आंबेडकरांच्या प्रेमांत गेले असते. व डॉक्टरांचा राजकीय वारसा स्वाभाविकत:च त्यांच्याकडे आला असता. पण बाबासाहेबांनीं मंत्रिपद स्वीकारल्यापासूनचे धोरण बॅ. माने यांना प्रतिगामी स्वरुपाचे वाटत होते. हरिजनांच्या सामाजिक व धार्मिक प्रश्नानंतर डॉक्टर साहेबांनी आर्थिक प्रश्न हातीं घ्यायला पाहिजे होता. सर्व जमातींतल्या दलित वर्गांच्या संघटनेचा प्रश्न हातीं घ्यायला पाहिजे होता. पण डॉक्टर साहेबांनी अमेरिकेला अनुकूल व कम्युनिझमला प्रतिकूल असे उद्गार काढल्यामुळें तें निराश झाले. मी स्वतःही डॉक्टर साहेबांचा चहाता आहे. त्यांचा पुतळा बसवण्यात मीच पुढाकार घेतला असूनही मला त्यांच्या या उद्गाराचें आश्चर्य वाटलें! हिंदुस्थानांतली खरी लढाऊ, निर्धन, प्रोलिटेरिएट जात कोण ती असेल तर ती अस्पृश्य मानलेल्या वर्गाची. ना घर ना दार ना इस्टेट. ना आर्थिक ना सामाजिक ना धार्मिक दर्जा! कम्युनिझमची कोणाला खरी जरुरी असेल तर ती या वर्गाला. पण डॉक्टर साहेबांनीं अमेरिकेच्या अनुकूल उद्गार काढावेत हें त्या समाजाचे दुर्भाग्य! बाबासाहेबांनीं आतापर्यंत केलेल्या चिरस्मरणीय कार्यांमुळें ते हरिजनांचें देव होऊन बसले आहेत. त्यांचीं देव्हाऱ्यावर स्थापना झाली आहे. ते बाबासाहेबांचे अंध पूजक झाले आहेत. त्यांची स्वतंत्रबुद्धी मरून गेली आहे. या त्यांच्या गुलामगिरीतून मुक्त करण्याकरता बॅ. माने यांनीं कटुकर्तव्य म्हणून पुरोगामी दलित पक्षाची स्थापना करून पवित्र बंडाचे निशाण हातीं धरले. डॉ. बाबासाहेबांविषयीं त्यांच्या मनांत नितांत आदर असूनही कर्तव्य म्हणून त्यांना हें पाऊल टाकावे लागले. 'डॉ. बाबासाहेबांसारख्या थोर माणसांविरुद्ध—ज्यांचे उपकार आपल्या समाजावर झाले आहेत त्या माणसाविरूद्ध, आज आपल्याला नाइलाजानें बोलावे लागत आहे म्हणून गहिंवरून त्यांनीं टिपें टाकलेली मी डोळयांनें पाहिली आहेत. म्हणूनच असा प्रामाणिक माणूस पडायला नको होता. ते निवडून आलेही असते. पण आमच्याच पक्षांच्या गैरसमजानें म्हणा किंवा स्वार्थासाठीं झालेल्या चुकामुळें त्यांना हार खावी लागली!!

या निवडणुकीच्या प्रसंगामुळें अनेक कटु अनुभव आले. मित्रांची तत्त्वभ्रष्टता, लोकांची स्वतःचे नांव येण्यासाठीं केलेली गटबाजी आणि

स्वार्थ, कारणापुरती गोडी, प्रेमाचा अभाव, कुत्सितपणा वगैरे अनेकांचे अनेक अनुभव आले. जे आमच्या पक्षांत ते इतर पक्षांत!

**संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्षपद.**— खेडूत जनतेला संयुक्त महाराष्ट्राच्या कल्पनेची अद्याप बरोबर जाणीव झाली नव्हती. संयुक्त महाराष्ट्राची अवश्यकता अद्याप साहित्यिकांत आणि केवळ वरच्या थरांतच तरंगत आहे. तुरुंगांत असतांना मला हा प्रचार करण्याची संधी मिळावी असें वाटत होते.

मी पूर्वी करवीर जिल्हा संयुक्त महाराष्ट्र परिषदेचा स्वागताध्यक्ष झालो होतो. चमत्कारिक योगायोग म्हणायचा. या निवडणुकीच्या दरम्यानच उमरावतीस भरलेल्या संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्षपद जून १९५१ ला अनपेक्षितरित्या माझ्याकडे आलें. उमरावतीचे माजी मंत्री चौबळ हे स्वागताध्यक्ष होते. डॉ. खेर, डॉ. पंजाबराव देशमुख, पेंडसे वगैरे नामवंत पुढारी परिषदेस आले होते. ' संयुक्त महाराष्ट्र ' हे मुख्यतः खालच्या श्रमजीवी वर्गालाच किती फायदेशीर आहे तें मी प्रामुख्यानें मांडले. शेतकरी कामगार राज्य जवळ आणण्याला ते उपयुक्त आहे याचे मी प्रतिपादन केले. ही परिषद यशस्वी झाली. महाविदर्भाचे पुरस्कर्ते बियाणी किंवा त्यांचे साथीदार यांनी परिषदेंत येऊन तोंड उघडले नाहीं. बाहेरही कांहीं कांगावा केला नाहीं.

**माझे आर्थिक जीवन.**— सबंध आयुष्यांत मी स्वतःच्या आर्थिक प्रश्नाकडे कधीच लक्ष दिले नाहीं. पैसा मिळवण्याचा कोणताही धंदा केला नाहीं. राजकारणांत फायद्याचा विचार केला नाहीं. लेखनांतही तेच झाले. आतां या साऱ्या अडचणी दत्त म्हणून उभ्या राहिल्या. सार्वजनिक कार्यकर्त्याला पोटापुरता तरी पैसा लागतोच. तीच पंचाइत पडूं लागली.

वडील सधन म्हणून समजले गेले तरी ते कांहीं व्यापारी नव्हते. त्यांनीं आपल्या आयुष्यांत नोकरी आणि वकीलीतून फारतर लाखापर्यंत मजल मारली असेल. पण त्यांत चौघा भावांचा शिक्षणाचा खर्च, राहणीचा खर्च वगैरे जाऊन वडिलांची मागे स्थावर जंगम रोकड मिळून राहिली असेल फारतर साठ—सत्तर हजार! त्यांत आम्हीं भागीदार चौघे. सुरवातीला कांहीं दिवस एकत्रांत रहात होतो. समाइकांतली इस्टेट कोणाही भागी-

दारानें आपल्या इच्छेप्रमाणें खर्च करावी ! त्याला आवर नाहीं. म्हणून विभक्त झालो. होते तें सांठप आणखी कमी झाले होते ! माझ्या वाटणीला जिवंत झरा आला फक्त घर भाड्याचा. शाहूपुरींतील दोन वखारी हाच एक जीवनाचा आधार ! मुलगा दौलत, इंजिनिअरिंग कॉलेजला जाऊं लागला ! दोन वखारींचं उत्पन्न आतांपर्यंत होतं बावीसशेहें पर्यंत. राहतो भाड्याचें घरीं. त्याचं भाड रुपये तीस. सामाजिक दर्जामुळं आणि बायकोच्या प्रकृती दोषामुळं स्वयंपाकाला बाई ठेवावी लागली. पंचवीस तीस रुपयाखेरीज बाया रहात नाहींत.

या परिस्थितींत भाडेनियंत्रणाचा फायदा घेऊन वखारवाल्यांनी भाडें बावीसशेहेंचे हजारावर आणले, तेवढ्याच जागेला शेजारी तीन हजार येतात. पण आम्ही वाढवत आणले या सबबीवर बावीसशेहेचे एक हजारावर आणले. त्यांत पडधडीचा खर्चही आमचा ! ज्या एका दुकानाला १५।२० पडतात तो दुकानदार तीन रुपये देऊं लागला !

या प्रकारामुळें जवळची शिल्लक संपत आली. पुढच्या जीवनाची भयानकता रात्रंदिवस भेडसावूं लागली. मुलाचं शिक्षण पुरं कसं होणार ही चिंता बेचैन करूं लागली ! आता कोणता धंदा करणार ! कुणाजवळ भीक मागणार ? राहणी, वरच्या दर्जाची. माझी स्थिती खालावली आहे हे खरं कोण मानणार ! मित्रांना माहित आहे. जवळच्या गणगोतांना माहित आहे. पण कोणी पांच रुपये उचलून देण्याचं औदार्य दाखवलं नाहीं. मला मोटार देण्याची एक टुम निघाली. ती त्यांच्या त्यांच्यातच बारगळली. कांहीं रक्कम जमली होती. ती कल्पना बारगळण्यापूर्वी जी अल्पशी जमली ती त्यांनीच आपल्याकडे ठेवली व संपवली. कांही मित्रांनी पर्स देण्याचा विचार केला. ती थोडी रक्कम जमली. पण त्यालाही कोणी चिकाटीनें लागले नाहीं. मी ज्यांची त्यांना ती रक्कम परत करा, मला नको म्हणून सांगितले. पण तीही रक्कम त्यांनी परत केली नाहीं. ज्यांनी कांही रकमा दिल्या असतील त्यांना मात्र वाटत असेल ती मला पोंचली ! ही स्थिती इतरांना माहित नसल्यामुळें फंडासाठीं अन् खासगी सहाय्यासाठीं लोक माझ्याकडे येतातच. मजकडे कांहीं नाहीं म्हणून सांगितले तरी खरेंच वाटत नाहीं. खोटेपणाचा आरोपही येतो. अंगावरचे कपडे

चांगले असतात, घरी कोण आले तर श्रीमंताला शोभेसा फर्निचर वगैरेचा सरंजाम आहे. तोही मला नडतो. ज्या गोष्टीं यापूर्वीं भूतदयेनें प्रेरित होऊन केल्या त्यामुळें आपत्तींत आणखी भर पडली.

**मला आलेले कांही कटु अनुभव.**— एका मित्राची आर्थिक स्थिती कमालीबाहेर खालावल्याचे दिसून आले. यावेळीं त्याला मदत केली तर तो सांवरेल आणि प्रपंचाला लागेल म्हणून यावेळीं त्याला हात द्यावा असे वाटूं लागले. अर्थात तसा हातभार लावण्याजोगी माझी स्थिती नव्हती. काटकसरीनें थोडी पुंजी, मुलाच्या शिक्षणासाठीं म्हणून सांठवली होती. मला दुसरा कसलाच आणि कोणाचा आधार नव्हता. मुलासाठीं तोंड वेंगाडण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून तीन हजार चार रुपये सांठवून ठेवले होते. गरजू मित्राला आज द्यावेत. तो जाणून पुढे परत करील म्हणून त्याचेवर दीडहजार रुपये खर्च केले. आयुष्यांतल्या सार्‍या इस्टेटीतली सांठलेली ही निम्मी रक्कम त्याचेवर खर्च केली. पुढे तो रांकेला लागला. पैसे मिळवूं लागला. दरमहा शेंकड्यानें प्राप्ती होऊ लागली. पण त्यानें त्यांतली एक पैही परत केली नाहीं. उलट येणे जाणे बंद केले.

कांहीं व्यक्तींशी माझे संबंध केवळ एक व्यक्ती म्हणून आले ते संबंध मात्र टिकले आहेत. माझी जागा फायद्याची होती त्यावेळीं ज्यांचे संबंध जवळचे आले. तो मोह गेल्यानंतर त्यांचे अगत्य, त्यांची नाटकी लीनता, त्यांचे प्रेम उडून गेले. पण ही माझी आताची दृष्टी! तडाखे बसल्यानंतरची. तोपर्यंत मला यांच्या स्वभावाची जाणीव झाली नव्हती. खुळा मी! किती विश्वास यांच्यावर! त्यांतही पूर्वी यातल्या एकाच्या स्वभावाची ओळख असूनही तो बदलला अशा समजूतीने मी वागलो. पूर्वीची वागणूक विसरलो!

**माझा मोठा दुर्गुण.**— हा कीं मी निस्वार्थी प्रेम अद्याप करूं शकत नाहीं. परत प्रेमाची मी अपेक्षा करतो. ज्यांच्यावर अत्यंतिक प्रेम केलें माझ्या दृष्टीनें मला करता येईल ते केले, लौकिकदृष्ट्या उपकार केले, त्यांनीं निदान मजवर प्रेम तरी करावे असे मला वाटते. याच स्वभावामुळें मी केव्हां केव्हां दुःखाचा डोंगर उभा करतो. आणि मग मी असं असं केलं पण त्यांना उपकाराची जाणीव नाहीं असे शब्द तोंडांतून निघून जातात! याला निष्काम प्रेम कोण म्हणेल? केलेल्या गोष्टीचं पावित्र्य

यानं नाहीसं होतं. पग हा स्वभाव आहे माझा !! हा दोष जात नाहीं. अद्याप दुःख पाहिले कीं गुदमरून जातो. वर्तमानपत्रांतला किंवा कादंबरीतला दुःखद प्रसंग वाचला कीं अश्रू वाहू लागतात. तसाच संतापानें भडकून जातो. ज्याच्यावर प्रेम असेल त्याचा अपमान करतो. पण भावनेचा ओसर गेला कीं १०।१५ मिनिटांत केल्याचा पश्चाताप होतो. कृतघ्नतेची व अन्यायाची चीड येऊन तोंडावर, तसे मागेही, बोलतो. हे व्हायला नको ही जाणीव मागाहून येते. स्वभाव बदलण्याचा प्रयत्न करूनही बदलत नाहीं. यामुळें प्रेम करणारेही शत्रू बनतात.

हे लिहित असतानांसुद्धा ही वृत्ती त्या मागें आहेच कीं अशा अशा लोकांनीं माझ्याशीं अशी वागणूक करायला नको होती ती केली ! त्या व्यक्तीच्या नांवांचा उल्लेख मी मुद्दाम करीत नाहीं. त्याचा उल्लेख केल्यानें त्या व्यक्तींचा सूड उगवल्याप्रमाणें होईल. ती भावना मात्र माझ्यांत नाहीं. तशी इच्छा नाहीं. म्हणून मी कोणाही व्यक्तीच्या नांवाचा येथें उल्लेख करूं इच्छीत नाहीं. आलेल्या अनुभवाची फक्त जाणीव वाचकांना देत आहे. आत्मचरित्राचा हेतूही तोच असतो. आलेल चांगले वाईट अनुभव जगासमोर मांडणं. हे लिहिलेच नाहीं तर ते आत्मचरित्रच होणार नाहीं.

ज्या गोष्टी मी भूतदयेनें प्रेरित होऊन केल्या त्याचा माझ्या आर्थिक जीवनावर परिणाम झाला. त्यावेळीं मी तुरुंगांत होतो. माझ्या एका मित्राचे हाल, त्याची आर्थिक अडचण, कुटुंबावर पडलेलें संकट, आणि त्यानें मजपासून केलेली अपेक्षा यामुळें मी बेचैन झालों. मजकडून कांहीं पैसे मिळावेत म्हणून त्याने अपेक्षा केली. ती रक्कम मला खरोखरी झेपण्याजोगी नव्हती. पण विचार यायचा लोकांसाठीं मी तुरुंगांत पडलो मग मित्राला संकटावेळीं उपयोगी पडूं नये काय ? याच भावनेचा अखेर पगडा पडला आणि मी तेथूनच त्याची गरज भागवण्याची व्यवस्था केली. अर्थात व्यापार या दृष्टीनें हे कांहींच केले नसल्यामुळें लिहून घेण्याचा प्रश्नच नव्हता. पुढें त्याचे गाडे रांकेला लागले. तो शेंकड्यानीं मिळवू लागला. मी गरीब. मुलाच्या शिक्षणाची अडचण उभी. पण या गृहस्थानें एक दमडीही जाणून परत केली नाहीं. उलट विश्वासानें सोंपवलेल्या कामगिरींत ही माझीच

हक्काची पण त्याचे हाती पडलेली रकम, मला न विचारता, वापरली. ते ही संबंध विशेष चांगले नसतांना.

**दुसरा अनुभव.**— पुढें आणावा व रांकेला लावावा म्हणून एका ओळखीच्याला खूप घळ घातली. त्यांनीं त्याला चांगली विश्वासांतली जबाबदारीची नोकरी दिली. पण अगत्यानें काम करायचें नाहीं. वेळेवर यायचे नाहीं. माझ्यामुळें त्यांना बोलणेही अवघड व्हायचे. नोकरी सोडल्याबद्दल मला वाईट वाटले. कारण पुनः पूर्व-स्थिती आली. सुदैवाने आणखी एका जागीं मला चिकटवता आले. नांव करण्याजोगीं व समाजांत पुढें येण्याजोगीं नोकरी होती. पण पुनः तोच प्रकार ! पुनः रामराम ! कांहीं काल लोटल्यानंतर पूर्वीहून अधिक अनुकूलता मिळाली. पूर्वीच्या दसपटीनें चांगली जागा देता आली. पण ती गेली ! पुनः आर्थिक स्थिती खालावली, ती कमालीच्या टोकाला गेली. अन्न वस्त्राची पंचाईत पडूं लागली. मी ही आर्थिक दृष्ट्या खालावत चाललो होतो. म्हणून यांना सहाय्य करण्याकरता दुसऱ्याकडे मला तोंड वेंगाडावे लागले. पुढें दुर्भाग्य आठवले. स्वारी एका सट्ट्यांत पडली. कांहीं मूर्खांनीं उत्तेजन दिले. मी खूप सांगून पाहिले. खूप रागेही भरलो. आपण कोण, करतो काय, याचा विसर पडला. जीव तोडून प्रेम करणाऱ्याच्या शब्दाची किंमत राखली नाहीं. सट्टा अंगावर आला ! स्वतःची चूक आणि संबंध माझा तोडला आणि मला पाहिजेत म्हणून व मी मागितले असे सांगून एकाकडून पैसे घेतले. तो माझे देणें होता. त्यानें ते दिले आणि यांनीं माझ्या अपरोक्ष माझ्या संमतीशिवाय ती रकम गप्प केली ! आणखी याहूनही एका मोठ्या गोष्टीची ज्यामुळें माझ्या आर्थिक जीवनावर परिणाम होईल अशी माझ्या संमतीशिवाय उलाढाल केली !

**तिसरी व्यक्ती.**—वरील दोन्हीहून थोडी दूरची पण पूर्ण विश्वासांतली. याची आर्थिक परिस्थिती मात्र बरीच चांगली. माझी आर्थिक परिस्थिती माहीत. पैशाच्या ओढाताणीची यांना पूर्ण कल्पना होती. मित्र म्हणून घरच्या गोष्टी सांगितलेल्या. पोरांसाठीं बँकेंत ठेवलेली रकम माहित. हे म्हणाले तुमचं तसं उत्पन्न नाहीं. बँकेतल्या रकमेचं व्याज तुटपुंजें. ती माझ्याकडे द्या. कोणत्यातरी धंद्यांत घालतो. भरपूर फायदा मिळेल. तो मी तसाच

तुम्हाला देईन म्हणजे झाले. तुम्हाला व्यापार करणं जमायचं नाहीं. तो उपद्व्याप मी करीन! मी विश्वास ठेवला. दोन हजार रक्कम ठेवली. ठेवल्यावर मुलग्यासाठीं पहिल्याच वर्षासाठीं हजार रुपये घेणे भाग पडले. एकदम विश्वास जाऊं नये म्हणून त्यांनी कांही रक्कम परत केली आणि पुढचे हजार, धंद्यांत तोटा आला म्हणून लांबवले! एवढ्यानेच थांबले नाहीं. माधवरावांचे मी दीड हजार रुपये देणे आहे. त्यांच्या मुलासाठीं आज त्यांना जरुरी आहे असे सांगून, मला मानणाऱ्या एका सामान्य व्यक्तीकडून चिठीचपाटी न देतां दीड हजार उसनवार घेतले आणि ते मला न देता स्वतःच लांबवले!

जगांत अशा गोष्टी चालत असतातच पण जीवाभावाचे स्नेही म्हणून विश्वास ठेवणाऱ्यांनी अशी वागणूक केल्यानें मात्र जिव्हारी घाव बसतो व 'ब्रुटस! तूं सुद्धा या खुनींत आहेस काय' असं म्हणणाऱ्या सीझरच्या शब्दाची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं.

तात्विक धक्का.—या याच्या वागणुकीमुळें तात्विक दृष्ट्याही मला मोठा धक्का बसला. मी पूर्वी कट्टर गांधीवादी पण श्रमजीवी समाजांत आत्मविश्वास उत्पन्न करायला व त्यांची लढाऊ संघटना बनवायला हा तोकडा पडतो असा उपवासाने मला अनुभव आला. पण व्यक्ती व्यक्तींच्या संबंधांत 'प्रेमानें प्रेम मिळते' हा विश्वास या कालपर्यंत राहिला होता. प्रेमाने व्यक्तीचे अंतःकरण जिंकता येते यावर माझा विश्वास होता. पण आता हा विश्वासही डळमळूं लागला आहे. कारण ज्या कांहींना मी सहाय्य केले ते माझ्या आवाक्याबाहेरचे होते. त्यामुळे मी स्वतः संकटांत पडेन ही जाणीव असूनही मी त्यांना मदत केली. सख्ख्याभावाहून व मुलाहून ही प्रेम केले. निदान त्यांच्या इतके तरी केले. पण परत मोबदला राहिलाच पण त्यांनीच मला डबघ्यांत टाकले. त्यांच्या वागणुकीनें माझ्यावर गुदरणाऱ्या संकटाचा त्यांनी जराही विचार केला नाहीं किंवा पांच रुपयाची परत फेड केली नाहीं. म्हणून 'प्रेमानें प्रेम मिळते' या तत्व ज्ञानावरचा आतां विश्वास माझा कमी झाला आहे. केवळ विचारानें हे मत बनत आहे असे नव्हे अनुभवामुळे मला या विचाराला यावे लागत आहे. माझ्या वैचारिक जीवनांत यामुळे गोंधळ उडून गेला आहे. तथापि या व्यक्तीबद्दल

मी रागाने बडबडलो तरी मला अद्यापही ते शत्रू वाटत नाहीत. माझा ओलावा सर्वस्वी नष्ट झाला नाहीं.

याचवेळी म्हणजे हे लिहून झाल्यानंतर याच मोहामुळें पुनः फसलो. ज्यांचेबद्दल इतकें लिहले त्यातलीच एक व्यक्ती पुनः जवळ आली. विश्वासानें एकाला पोचवण्याकरता म्हणून कांहीं रक्कम जवळ दिली. त्यांतील कांहीं रक्कम स्वारीनें मध्येंच स्वतःकरता ठेवून घेतली. ह्या मजकुराचे प्रुफ तपासण्याच्या सुमारासच हें घडलें !

**वैचारिक वावटळींत.—** वरील अनुभवानें नुसती मानसिक शांती ढळली असती तरी पुढें ती पूर्वस्थितीवर येऊं शकली असती. पण यामुळें आलेले पैशाचे संकट कसे दूर होणार ! मनावर ताबा ठेवणे शक्य होईल पण आर्थिक दृष्ट्या पडलेला पेचप्रसंग कसा सुटणार ? मुलाचं शिक्षण कसं होणार ? कोण पैसा पुरवणार ? घरभाड्याचं उत्पन्न आटोपत आलेलं ! वांद्यांत पडलेलं, आणि अपुरं ! जनसेवेंत जवळ जवळ तीस वर्षें गेली आणि पेनशनीच्या काली टांचा घासून मरण्याची वेळ आली.

कुठे नोकरी धरूं ? देणार कोण ? आणि करणार तरी कशी ? मोठमोठ्या मानाच्या आणि पैशाच्या जागा टाकून दिल्या, आतां पोटासाठीं नोकरी करूं ? धंदा तरी काय करणार, अन् कसा करणार ! व्यवहाराच्या बाबतींत पोराहूनही पोर ! माझ्यापेक्षां बायकोच शहाणी ! घरीं बसून पैसा कोठून येणार ? कां मी मरतो आहे म्हणून दारोदार भीक मागत हिंडूं ? करूं तरी काय ? कां लोकांना म्हणूं, मी इतक्या वर्षें तुमची बिन पगारी सेवा केली, आतां मला जगवा ! घरीं बसून अडचण दूर होत नाहीं. बाहेर पडून निवारत नाहीं. माझे कांहीहीं होवो पण पोराच्या शिक्षणाचे कसें ? अब्रुनें दिवस तरी कसे काढायचे ?

कित्येक रात्रीं विचारांत गेल्या. विचारानें थैमान घातला ! डोक्यांत किडे पडूं लागले ! दिवसा कांहीं सुचेना ! रात्रीं झोंप लागेना !

रात्रीं दोनतीनचा सुमार असेल. खांडुक ठसठसूं लागलं म्हणजे फोडल्याशिवाय बरं वाटत नाहीं. पू बाहेर पडला म्हणजे हलकं वाटतं. तसंच झालं माझं ! विचारानं गुदमरून गेलो ! आत्महत्येचे विचार येऊं लागले ! याच मनःस्थितीत येतील ते विचार लिहले ! लिहून धांदरटा-

सारखा उगाच बसलो. सकाळचे पांच झाले. पत्र पाकीटांत घातलं आणि पोस्टाच्या पेटींत टाकून दिलं !

पत्र टाकलं आणि भ्रमिष्टासारखा व्हरांड्यांत बसलो ! किती वेळ बसलो कुणाला ठाउक. कधी न येणारे एक गृहस्थ सहजी आले. कारणही कांहीं नव्हतं. मी विचारलं कां आला म्हणून. टाइम्सचे रिपोर्टर जांभळे, त्यांचे माझे कांहीं जिव्हाळ्याचे संबंध नव्हते. तेच म्हणाले, 'कांही काम नाही.' आठवण झाली. यावंसं वाटलं, आलो. आणि त्यांनीच सुरवात केली.

'माधवराव पुष्कळ दिवस जगा बोवा. आज ना उद्या तुमच्या कार्याची चीज होईल.'

माझ्या मनांत चाललेल्या नैराश्याच्या विचारसरणीला थोपवून धरणारी ही वाक्यें ऐकून मी थक्क झालो. आत्महत्येचे विचार आले तरी ती गोष्ट मी केली असतीच असे नाहीं. त्यालाही एक प्रकारचं धैर्य लागतंच. जगण्याचा मोहही तितकाच अनावर असतो. मात्र त्या वाक्यांनी विचाराला निराळी कलाटणी मिळाली. समाधान झालं ! माझ्या विषयीं विचार करणारे कांही लोक आहेत ही भावनाही उत्साह देणारी झाली !



**प्रभाकरपंत कोरगांवकर.**— दुसरें दिवशीं ज्या मित्राला पत्र पाठवलं होतं त्यांच्याकडून तांतडीनें पत्र घेऊनच एक माणूस आला ! मी येत आहे मग बोलूं. कांहीं तरी अविचार करूं नका. असेच ते पत्र होतें.

ते आले. त्यांना सर्व हृदय मोकळं करून सांगितलं. सर्व परिस्थिती कळवली. माझी आहे ती सर्व इस्टेट ताब्यांत घ्या. विकत घ्या, किंवा विका. किंवा त्याची व्यवस्था बघा. पण पोटापुरती व्यवस्था झाली नाहीं तर मी काय करूं ?'

ते म्हणाले ' तुम्हीं स्वस्थ बसा. कसली काळजी करूं नका. तुमचें व्यवहार मी पाहतो. कमी पडेल ते मी देतो. तुम्हीं भलते सलते विचार डोक्यांत आणूं नका.' तोच एक खरा मित्र आढळला ! गणगोत, जातभाई आणि इतर कोणी माझ्या जीवनाच्या विचार केला नाहीं. कसे चालते याची विचारपूसही केली नाहीं. एकच व्यक्ती माझ्या संकटकाली उभी राहिली. ती म्हणजे प्रभाकरपंत कोरगांवकर. प्रेमाचं सोंग पुष्कळांना साधतं, पैशाचं नाहीं साधत. प्रभाकरपंत श्रीमंत आहेत पण दुसरेही आहेत. पण माझ्या उपयोगी किती पडले !

पाहुणेपै नव्हे, जातीचे नव्हे. उपकारांतले नव्हे. पक्षांतले नव्हे. मतें जुळणारी नव्हेत. माझ्याशी संबंध ठेवण्याने त्यांचा फायदा नाहीं. उलट कॉंग्रेस पुढाऱ्यांचा आला तर बोलच येणार. पण यांनी मला या संकटांतून बांचवले ! माझ्या संसाराला हातभार लावला ! माझे आर्थिक व्यवहार आपल्या ताब्यांत घेतले. माझं पूर्वीचें चालत आलेलं जीवन शाबूत ठेवलं !

निस्वार्थी प्रेमाचं हे उदात्त स्वरुप पाहून जीव गहिंवरून येतो. या उपकाराची आठवण झाली कीं डोळयांतून अश्रुधारा वाहूं लागतात. स्वार्थानं आणि पाशवीवृत्तीनं बुजबुजलेल्या या भांडवलशाही जगांत, एखाद्या ताऱ्या-प्रमाणं ही व्यक्ती माझ्या जीवनांत चकाकूं लागते. या सहाय्यामुळें माझ्या देहांत पुनः नवजीवन ओतले गेले. ध्येयसिद्धीचा मार्ग मोकळा झाला ! समाजसेवेसाठीं वाहिलेलं जीवन शाबूत राखलं.

प्रभाकरपंताच्या सहाय्याने मला मिंधे केले नाहीं. माझा स्वाभि-मान मी गमवूं शकलो नाहीं. माझ्या मतावर नियंत्रण ठेवण्याचा त्यांनी कधीही प्रयत्न केला नाहीं. त्यांनीच मला छापखाना दिला. पण त्यांच्या धोरणाबद्दल कधी चर्चा सुद्धा केली नाहीं. अमके लिहा असे सुचवले नाहीं. मतभेदामुळें तोंडांतून बाहेर पडलेल्या गरमागरम शब्दांनी ते कधी दुखवले गेले नाहीत. अपमानामुळे चिडले नाहीत. माझ्याकडून माझ्या मित्रांना जे थोडेबहुत सहाय्य झाले त्या मित्रांपासून मी लोभाची आणि कृतज्ञतेची अपेक्षा केली ! पण प्रभाकरपंत आपल्या उपकाराची कुठे वाच्यता करणार नाहीत. परत मोबदल्याचीही अपेक्षा करणार नाहीत. प्रेमाची अपेक्षा करत नसतीलच असे म्हणता येणार नाहीं. पण तीही करीत असतील असे मी खात्रीने सांगूं शकणार नाहीं. यामुळें ते माझ्याहून वयानें लहान असूनही

मला पूज्य वाटतात. वडिलांनी लहानाचं मोठं केलं आणि साठीनंतर देशोधडी लागण्याच्या धोक्यापासून कोणगांवकरनी आवरलं? म्हणून माझी त्यांच्यावरील प्रेमाची भूमिका त्यांच्याप्रमाणे उदात्त नाहीं. त्यांत कृतज्ञताबुद्धीचा भाग बराच आहे. निर्लोभी आणि निस्वार्थीपणाचं पावित्र्य कमी आहे. माझ्या फट-कळ स्वभावामुळें मी यांच्या प्रेमाला मुकणार तरी नाहीं अशी केंव्हां केंव्हां भीती वाटते. या भीतीतही स्वार्थ दडलेला नाहीं असं मला म्हणता येणार नाहीं.

त्यांच्या संपत्तीच्या आणि त्यांनी इतरत्र दिलेल्या सार्वजनिक देणग्यांच्या मानानें मला केलेली मदत त्यांना रजःकणाइतकी वाटली तरी त्या कणांनी माझ्यावर गुदरणारे संकट दूर केले. तो कण मला डोंगराइतका वाटतो. म्हणून त्यांच्या विचारसरणीबद्दल व धोरणाबद्दल तीव्र मतभेद असूनही त्यांच्याविषयी वाटणाऱ्या व्यक्तिविषयक आदरांत बदल होऊं शकत नाहीं. ते भांडवलशाही समाजांत व व्यवहारांत वाढल्यामुळें त्या संस्काराचे परिणाम त्यांना चुकवता येणार नाहींत. पण त्या भांडवलशाही समाजांतील एक आदर्श व्यक्ती म्हणून ते राहतीलच !

पैसा ही आजकालच्या जगांतील एक मोठीं शक्ती आहे. तिनं वाईट करता येतं तसं चांगलही करता येतं. ते साधन चांगल्या कार्यासाठीं लावावं म्हणून त्यांनी हिरीरीने पैसा संपादन केला आणि त्यांतला बहुतेक देशकार्या-साठीं लावला. स्वतःच्या आपल्या हिश्याच्या वाटणीचा ८।१० लाख रुपयाचा ट्रस्ट करून तो लोककल्याणार्थ कांही व्यक्तींच्या स्वाधीन केला. मला स्वतःला मात्र त्या पैशाचा होत असलेला विनियोग मान्य नाहीं. त्या बाबतींत माझे मतभेद आहेत. पण यामुळें त्यांच्या थोरपणाला कांहीं कमीपणा येत नाहीं. ट्रस्टपूर्वी त्यांनीं प्रजापरिषदेला हजारो रुपयांची मदत केली. १९४२ च्या चळवळीतही कांहींना सद्हेतूनें त्याचा विनियोग कसा झाला याची विचार-पूसही केली नाहीं. सहाय्य केले. गांधी कार्यालाही प्रोत्साहन दिले ! अनेक कार्यकर्त्यांना पोसले !

भांडवलशाही समाज व्यवस्थेंत अशा सत्प्रवृत्तीच्या व्यक्ती कांहीं आढळतील. तथापी चालू समाज व्यवस्था बदलायला, किंवा समाजांतील दारिद्य आणि विषमता नाहींशी करायला, यांचे जीवन उपयुक्त ठरेल असं मात्र मला वाटत नाहीं. त्यांच्या अनासक्तीमुळें त्यांच्या मनाचा विकास होत जाईल. कदाचित यांतून संपूर्ण संन्यासाकडेही अशा व्यक्ती झुक-

तील. पण त्यानें समाजाचें परिवर्तन होणार नाहीं. ही नवी शास्त्रीय विचारसरणी प्रभाकरपंतांनी चांगली समजून घेतलेली नाहीं. व समजून घेण्याकडे त्यांचा कल नाहीं. याचं कारण भांडवलशाही संस्थेतील व व्यवहारांतील पूर्वसंस्कार होत. पण ते त्यांनीं समजून घेतले तर ते तिकडे झुकणार नाहींतच असे म्हणता येणार नाहीं. प्रामाणिकपणें गोष्ट पटल्यानंतर ती स्वीकारण्याचे मनोधैर्य त्यांच्यांत आहे. असं वाटण्याचं कारण, एखादा विषय निघाला म्हणजे मी खूप गरम होतो. स्वभावच आहे तो माझा. खापऱ्या उडतील अशा आवाजांत त्यांच्यावर उखडतो. ‘ तुम्हाला कांहीं समजत नाहीं ’ म्हणून बोलतो. या स्वभावामुळें मला अनेक शत्रू झाले पण प्रभाकरपंत म्हणणार, ‘ अहो माधवरावांचा हा स्वभावच आहे. तो जन्माचा आहे. तो आता कसा बदलणार त्यांना टाकून बोलल्याचे मागाहून वाईट वाटते. पश्चाताप होतो. पण ते जे बोलले त्यांतील राग आणि आवेश बाजूला सारून त्यांत कांहीं सत्यांश आहे कीं नाहीं हें पाहिले म्हणजे झाले ’ या उद्गारामुळें मी शरमून जातो. सार्वजनिक कार्यकर्त्याला त्यांच्या ठिकाणीं असलेला हा गूण किती अनुकरणीय आहे.



**बाबुराव रुईकर.**—हा ही पूर्वी आलेल्या कटु अनुभवाला एक उताराच आहे. चळवळीच्या अगदी सुरवातीपासूनची यांची माझी मत्री. त्या वेळची परिस्थिती फार अवघड अन् धोक्याची होती. प्रजापरिषदेशी संबंध ठेवायला लोक दचकत. माझ्याशी संबंध ठेवायला रक्तसंबंधीही कचरत. नात्यागोत्याचे दूर पळत. त्यावळीं बाबुराव रुईकरनी सरकारीरोषाची पर्वा न करता माझ्याशी स्नेहसंबंध ठेवला. चोरून नव्ह उघडच ठेवला. कारण खाजगी भेटींत आम्ही अंतःकरणानें तुमचेच म्हणून, उघड शत्रूत्व दाखवणारे

होतेच! बाबुरावांनी यावेळीं प्रजापरिषदेच्या ऑफिसला जागा दिली. बाहेरच्या पुढाऱ्यांना घरीं उतरून घेत. कार्यकर्त्यांना आपल्यापरी सहाय्य करीत. मी तुरुंगांत गेल्यावर मला सेंट्रल जेलमध्यें व पन्हाळ्यावर भेटायला येत. घरी कुटुंबातल्या मंडळीना भेटायला येत. घरच्या मंडळीप्रमाणं मानीत. नडीअडीला उपयोगी पडत. बाबुराव चेंगट वाटतात आणि आहेतही. पण स्वतः-वर खर्चण्यात त्यांचा चेंगटपणा असतो. व्यसनी आहेत. पण सिगरेट आणि सुपारी एवढंच त्यांचं व्यसन. आणि पै पै सांठवून यांनी लाख दोन लाखाचा ट्रस्ट लोकांसाठीं केला. सारी सावकारी टाकून दिली. लोकांसाठीं लाखाभराची धर्मशाळा बांधली. रॉयल थिएटरचे सर्व उत्पन्न ट्रस्टचे ताब्यांत दिले. स्वतः इंजिनियर नसतांना कोल्हापुरजवळ एक आदर्श कॉलनी उभी केली आहे.

बाबुरावांना मैत्री जोडण्याचा हव्यास नाहीं. पण पारखून मित्र निवडला व मानला कीं त्यांची मैत्री टाकणार नाहीत. समाजांतील थोरांची पायधरणी करणे त्यांच्या स्वभावाला माहीत नाहीं. भटोत न भेटोत. महिनेनी महिने गांठ न पडो, मैत्रीत अंतर पडणार नाहीं. यामुळ माझ्या जीवनाच्या बेरीज वजाबाकींत बाबुरावांनी बेरजेंत अधिक भर घातली आहे.



राजेंद्रबाबू करविरी आले त्यावेळीं.





गणपतराव गायकवाड व अनंत मगर

**गणपतराव गायकवाड.**—गेल्या पंचवीस तीसवर्षें केवळ प्रेमामुळें, निस्वार्थीपणानें जें कांहीं वागले त्यांत गणपतराव गायकवाड यांचा मला कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें भाग आहे. मला त्यांनीं कांहीं हात उचलून दिले नसले तरी आपत्तीच्या आणि ऐश्वर्याच्या काली घरच्या माणसाप्रमाणें त्यांनीं संबंध ठेवले. तुरुंगांत गेल्यावेळीं गणपतरावांनीं अंग मेहनतीनें माझ्या घरच्या मंडळीची सेवा केली. मी आतताईपणानें कितीही टाकून बोललो तरी लोभांत अंतर पाडलं नाहीं. ती व्यक्ती लौकिकदृष्ट्या कितीही लहान आणि अप्रसिद्ध असली तरी मला ती थोरच आहे. गेली तीस वर्षें अनेक चांगले वाईट प्रसंग आले पण त्यांनीं घरीं येणं जाणं कधी टाकलं नाहीं. अशा प्रेमळ व्यक्तीचा लाभ हे मी माझे भाग्य समजतो.

**अनंत मगर, बी. ए.**— हीही अशीच एक निर्मळ मनाची व अगत्याची व्यक्ती आहे. जवळ जवळ एक तपाहून अधिकचे, त्याचे माझे संबंध. आज हरघडी तो उपयोगी पडत आहे. कुटुंबाला आज तो एक

मोठा आधार वाटतो. नात्यागोत्याचा नाहीं पण रक्तसंबंधीहूनही प्रेम करणारा आणि मुलाप्रमाणें वागणारा. विश्वासू, कृतज्ञ, एकनिष्ठ. या दोन्ही व्यक्ती आज माझ्या कुटुंबियापैकींच झाल्या आहेत. मी घरीं असलो नसलो, परगांवी गेलो तरी यांच्यामुळें मला घरची काळजी वाटत नाहीं. मी जितका अधिकार यांचेवर गाजवतो तितकाच माझी बायको व मुलगा गाजवतात. म्हणूनच ही लहान माणसें मला थोर वाटतात. अनंत लहानपणीं कांहीं दिवस माझेकडे असला तरी पुढील शिक्षण त्यानें स्वतःच्या पायावर उभे राहून पुरे केले. बी. ए. झाला. आज मार्केट कमेटीचा सेक्रेटरी आहे. व ही नोकरी करीत असतांनाच एल्. एल्. बी. झाला. पुढे एम्. ए. होण्याची महत्वाकांक्षा आहे. मार्केट कमेटींत नेहमी गरीबांच्या बाजूनें झगडतो. जगाच्या कटु अनुभवांतून तावून सुलाखून निघाल्यामुळें व्यवहारी बनला आहे.

**एकजुटीची भावना व संयुक्त आघाडी.—** निवडणुका झाल्या. देहाला थोडें स्वास्थ्य लाभले. विचार करूं लागलो. महाराष्ट्राच्या दौऱ्यांत, जनतेतील एक भावना मला विशेषे करून दिसून आली ती म्हणजे कॉंग्रेस विरुद्धच्या एकजुटीची.

ही जी भावना बहुजनसमाजांत दिसून आली, ऐक्याची जी तळमळ दिसून आली ती पुढाऱ्यांत मात्र मला दिसून आली नाहीं. सर्वसाधारण कार्यकर्त्यांत हो इच्छा आहे पण पदाधिकाऱ्यांत तिचा अभाव दिसून आला!

या आमच्या पक्षाच्या फुटीमुळें आमचें कितीतरी उमेदवार पडले. जर एकी असती तर आजच्या यशाहून दुप्पट यश तरी पदरांत पडले असते. या सर्व डाव्यांची एकजूट झाली तर महाराष्ट्रांत तरी ते कॉंग्रेसला चांगलाच शह देतील. याच कल्पनेनं भारून कोल्हापुरच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत मी एकजूटीचा प्रयत्न केला. तो कसाबसा यशस्वी झाला. व शे. का. पक्ष, कम्युनिस्ट पक्ष, कामगार किसान पक्ष, डावा समाजवादी, शे. का. फे. व दलित पुरोगामी या सर्व पक्षांची—कोल्हापुर जिल्ह्यांतील युनिटची, नगरपालिकेच्या निवडणुकीपुरती एकी झाली. एकी झाली पण आमच्या शे. का. पक्षानें मनःपूर्वक प्रचारांत भाग घेतला नाहीं. संयुक्त आघाडीमुळें आपली ताकत कमी होत आहे व दुसऱ्यांना नाहीं ते स्थान

प्राप्त होत आहे अशी त्यांना भीती वाटत असावी. पण माझी दृष्टी जिल्ह्यापुरती नव्हती. येथून एकीला सुरवात होऊन तिचे स्वरूप अखिल भारतीय व्हावे हीच मुख्यतः त्या मागील इच्छा आणि तळमळ होती. मला जेवढे कांही कष्ट घेता यतील तेवढे घेऊन प्रयत्न केला व स्वतंत्र उमेदवार व लोकशाही गटाचे उमेदवार याहून आमचे उमदवार जास्ती आले. स्वतंत्र १० लोकशाही गट १२ व आमचे २२. स्वतंत्रांतले दोन नंतर आमचेकडे आले व आमचे निश्चित असें बहुमत झालें.

पण ज्या ध्येयानें प्रेरित होऊन ही संयुक्त आघाडी निर्माण केली त्या ध्येयानें निवडून आलेले उमेदवार प्रेरित नसल्यामुळें अधिकारपदांसाठीं आमच्याच पार्टींत गट अन् गटबाजी सुरू झाली. सर्व जनतेसमोर घेतलेल्या शपथा मोडल्या. आघाडीतर्फे अध्यक्ष भाऊसाहेब शाहीर कसेबसे निवडून आले. पण सुरवातीपासून जी विघटना सुरू झाली ती वाढली व यामुळें संयुक्त आघाडी ही नाममात्र राहिली. मला हे पाहून वीट आला. मी यापुढें कोणतेही (जबाबदारीचे) अध्येक्षपद स्वीकारायचे नाहीं म्हणून राजिनामा दिला. का. कि. पक्षानें अंग काढून घेतलें. कम्युनिस्ट व डावे समाजवाद्यांनी जाहीर निवेदन करून आपले अंग काढून घेतले. अशा प्रकारें संयुक्त आघाडीचं स्वप्न तात्पुरतें तरी विलयाला गेलं ! पण आज ना उद्या ही आघाडी झाल्याशिवाय तरणोपाय नाहीं हे ही पण तितकंच निश्चित होय !

**जध्यांचा राजीनामा.**— या वेळीं केशवराव जेधे यांनी पक्षाचा राजीनामा दिल्याची बातमी आली. मी पण त्याच मनःस्थितींत होतो. आपणही राजिनामा देऊन मोकळे व्हावे. पण लगेच दुसराही विचार येई. आपण कोणा व्यक्तीच्या रागालोभासाठीं कां पक्षांत गेलो ? पक्ष आपल्या ध्येयाला पोषक वाटला म्हणून गेलो. कोणी प्रेम करतील कोणी द्वेष करताल. त्याचा आणि पक्षाचा संबंध काय ? अमका दुष्टपणानं वागतो, तमका प्रेम करतो, हे प्रश्न वस्तुतः गौण होत. अखेर प्रवृत्तीनेच निवृत्तीवर मात केली आणि केशवरावांना राजिनामा परत घ्या म्हणून पत्र लिहिले. त्यांना पहिले पत्र गेले ते माझेच. जिल्हा बोर्डाच्या दौऱ्यांसाठीं नीशिकला गेलो होतो. परततांना केशवरावांची गांठ

घेऊन हेच सांगितले ! बाबुराव जेध्यांनाही केशवरावांचे मन वळवा म्हणून सांगितले ! ' काम करूं नका वाटल्यास पण नाममात्र कां असेना सभासद म्हणून रहा. कारण तुमच्या राजिनाम्यानें पक्षाची शक्ती फार कमी होणार आहे. ' हीच भूमिका घेऊन कोल्हापुरास आपणही नाममात्र सभासद होण्याच्या इराद्याने काल घालवण्यास सुरवात केली. पण !

**धान्य भाववाढ विरोधासाठीं तुरुंगवास.—** धान्य भाववाढ विरोधी सत्याग्रहानें वातावरण गरम झाले होते. कोल्हापुरांत समाजवाद्यांनी सुरुवात केळी होती. या कार्यक्रमापुरता संयुक्त आघाडीनें सामुदायिक कायदेभंग करण्याचे ठरवले होते. तारीख जाहीर केली होती.

यापुढें झगड्यांत प्रत्यक्ष भाग घ्यायचा नाहीं म्हणून ठरवेल होते. पण मन कुठे स्वस्थ बसते ! लगेच, वर्तमानपत्रांत मी एक स्वयंसेवक म्हणून भाग घेणार आहे असे जाहीर केलें. तुरुंगाचं गठळ व्यवस्थितपणें तयार करून ठेवलं.

ता. ६ जून १९५२ ला सकाळीं उठलो. राजारामपुरी तालमीतील मंडळींना पक्षानें काय सूचना केल्या आहेत ते समजावून घेण्याकरता व त्या मोर्चात भाग घेण्याकरता म्हणून तिकडे गेलो. पण राजारामपुरीची कांहींच तयारी नव्हती. पक्षानें २।३ वेळा प्रयत्न करूनही कोणी जमले नाहीं असे समजले. तेव्हां मीच कांहीजणांना तालमींत बोलावून घेतले. सत्याग्रह व कायदेभंगाची किती आवश्यकता आहे ते त्यांना पटवून दिले. ' आज जर आपण भाववाढ विरोधी सत्याग्रह आणि कायदेभंग करून आपला निश्चय प्रकट केला नाहीं, तर हे भूत कायमचे बोकांडी बसेल ! आज आम्हां कांहीजणांना त्रास झाला तरी त्यामुळें असंख्य अशा गरीबांच्या पोटी चार घांस पडणार आहेत, ' असे बोललो. या उपदेशाचा परिणाम होऊन बरेच जण मोर्चात भाग घेण्यास कबूल झाले. मी ही वाट न बघता तेथूनच मोर्चा चालू केला ! कांहीं मंडळीं पण ती फार थोडी-निसटली. पण सुमारें ७५ लोक मोर्चात सामील झाले. फर्लांगभरांत ती संख्या दोन अडीचशेहपर्यंत गेली. चालू लागताच ती रांक बरीच लांब दिसू लागली. लोकांत उत्साहाचे वातावरण निर्माण झाले. ' धान्य भाव वाढ रद्द करा, ' ही घोषणा सारखी चालू केली. इकडच्या मोर्चाची पोलीसांना कांहींच कुणकुण नसल्यामुळें आम्ही फर्लांगभर सरळ आलो. चावडी जवळ

येताच फोन केला असावा. मोर्चा माझ्या घरांवरून नेण्याकरता वळवला तोच पोलीसाचा पिंजरा, लोखंडी टोप्या चढवलेली पार्टी आली व माझ्याच घरासमोर मला व १५।२० जणांना, अटक करून गाडींत घातलें. आमच्या नंतर मुलांनीं आणखी दोन मोर्चें काढले व अशारीतीनें राजाराम-पुरीतील लोकांनीं यापूर्वी जो कधीही राजकीय झगड्यांत भाग घेतला नव्हता तो जोरानें घेऊन हा डाग धुवून काढला !

आम्हां सर्वांना एक महिन्यांची शिक्षा व ५० रु. दंड, दंड न भरल्यास आठवड्याची आणखी शिक्षा झाली ! आम्ही दंड भरला नाहीं. त्यामुळें पुन: आठवडाभर शिक्षा भोगावी लागली.

तुरुंगांत असतांना एक काम केलं ! सर्व सत्याग्रहींची केशवराव जेध्यांना पक्षांत येण्याची सहीनिशी विनंति पाठवली. कोल्हापुरच्या 'पुढारी' पत्रांत ती जाहीर केली. सुटल्यानंतर पुन: केशवरावांच्या भेटीस गेलो व या खेपेस त्यांचे मन वळवण्यांत यश आले ! या तुरुंगवासाच्या कालांत कुरुंदवाडच्या कार्यकर्त्यांचें संबंध फार जवळचे आले. एकाच वेळीं एकाच ठिकाणीं राहण्याचा प्रसंग आल्यामुळें खूप खूप बोलता आलें. त्यांना मार्क्सवादी विचारसरणीची ओळख करून देता आली. सततच्या सहवासामुळें ते फार सोपे झाले. माझी करमणूक आणि त्यांना कांहीं थोडे शिक्षण देता आलें. लखबा बुरुड मोठा हुषार, पोवाडे करणारा होता, गंगाराम कोळी, मतवाल वगैरे चांगलेच तयार झाले. तेच विचार स्वतंत्र-पणें मांडण्याइतकी त्यांची तयारी झाली. त्यांत वड्डुजातीचा एक तर मोठा चाणाक्ष दिसला.

**विचित्र अनुभव—** पक्षाला मोठेपणा यावा. पुढारी म्हणून आपण न मिरवता पक्षाला स्थान प्राप्त व्हावें म्हणून सत्याग्रहाला वा कायदेभंगाला मी सुरवात केली नाहीं. पक्षानें ठरवावे आपण अनुयायाची भूमिका घ्यावी म्हणून मी घरीं स्वस्थ बसलो. जनता आघाडीनें कायदेभंग जाहीर केल्यानंतर मग आघाडीनें सुचवल्याप्रमाणें मी अमक्या-दिवशीं त्या कार्यक्रमांत भाग घेणार आहे म्हणून स्थानिक पत्रांतून जाहीर

केले. आहे त्या मंडळींत मी सर्वांत वयानें मोठा. साठी जवळ आलेलो. बहुतेक सर्व या ना त्या प्रकारें माझ्याच हाताखाली काम केलेले कार्यकर्ते. पण मी कायदेभंगांत भाग घेणार हे जाहीर झाल्यानंतर—जायला २।४ दिवस होते. पण त्या दरम्यान माझी गांठ घ्यायला पक्षांतला कोणी सभासद आला नाहीं. पुण्याचे र. के. खाडिलकर यांनी मी तुरुंगांत गेल्यावर पत्र पाठवले व भेटायलाही आले. पण पक्षांतले माझ्यासाठीं म्हणून कोणी आले नाहीं. शिक्षा होऊन सुटल्यानंतरही भेटण्याचा शिष्टाचार दाखवला नाहीं. पक्षांत नसलेले. नव्हे विरोधी पक्षांत असलेले. व्ही. टी. पाटील. व 'पुढारी'कार गणपतराव जाधव हे मात्र येऊन गेले. म्हणजे मी तुरुंगांत जाण्याचा अपराध केला कीं काय असे वाटूं लागले! पत्रांतून मला मोठा मथळा मिळाला हे कदाचित पक्षवाढीच्या दृष्टीनें हितकर झाले नसावे असे त्यांना वाटले कीं काय कोण जाणे!

**र. के. खाडिलकर**.— मला तुरुंगांत भेटायला र. के. खाडिलकर आले. ते ब्राह्मण नि मी मराठा. पण जिव्हाळा असला कीं तेथें जातिबंधनें रहात नाहींत. पुण्यास गेलो कीं मी खाडिलकरांच्यातच उतरतो. पुण्यास माझे पाहुणे भरपूर सधन आहेत. मोटार मालक आहेत. पण मला इतरत्र जावे आणि रहावेसे वाटत नाहीं. तो आनंद व मोकळेपणा मी इतरत्र भोगूं शकत नाहीं. निव्वळ एका पक्षांत असल्यानें पक्ष वाढ होत नाहीं असाच मला अनुभव आहे. पक्ष सभासदांत जर कौटुंबिक भावना नसेल, प्रेम नसेल, जिव्हाळा नसेल, आदर नसेल तर त्या पक्षाची सुद्धा वाढ होऊं शकत नाहीं, असाच अनुभव येतो. दुसऱ्यांना एकीचा, व संघटनेचा उपदेश करायचा आणि स्वतःतच जर एकीचा आणि आदराचा अभाव असेल तर पक्षाची वाढ होत नाहीं. म्हणून ध्येयाबरोबर जिव्हाळाही वाढेल असा प्रयत्न कार्यकर्त्यांनी व प्रमुखांनीही केला पाहिजे.

**दैवी प्रेम**— वाईटाबरोबर चांगलेही अनुभव येत असतात. सहेतुक प्रेम केलं जातं तसं अगदी निर्हेतुकही प्रेम केलं जातं. तो ८० वर्षांचा म्हातारा असेल. खेडचा, दरिद्री, अंगांत लंगोटी, महिना दोन

महिने साबण मिळाला नसेल अशी अंगावर लतकरें. पण ३०–४० मैला-वरून मला उगाच भेटायला येणार. केव्हां मोटारीनं येणार केव्हां चालत येणार. भीक मागून भाड्याचें पैसा मिळवणार आणि भेटायला येणार ! ‘ येत जाऊ नकोस आता वाटेतच मरशील, कशाला येतोस ’ असं म्हटलं कीं म्हणणार, ‘ तुला बघावसं वाटतं बघ. मग जिवाला आराम वाटतो. तूं लोकापायी मेलास मग मी एवढा तरास घेतला म्हंजे काय झालं ’ पैची अपेक्षा करणार नाहीं. दिडकी मागणार नाहीं. तुरुंगांत भेटायला आला. पोलीस सोडेनात. त्यांना तो म्हणाला ‘ ते मला काय सांगू नका. मी भेटल्याशिवाय जाणार नाहीं. नाहीतर दगडावर टक्कुरं फोडून घेईन’ तेव्हां पोलीसांनी सोडलं. आंत आला आणि मला कडकडून भेटला. आणि रडूं लागला ! दैवी प्रेम आणखी ते कसलं असतं.

**व्ही. टी. पाटील व माझा कलासंग्रह.**—या सुमारास प्रभाकर-पंत कोरगांवकरांच्यामुळे ही ही एक मनीषा पार पडली. निसर्ग देखावा **Landscape paint ing** हा माझा अत्यंत आवडीचा विषय. आयुष्यांतील कांहीं वर्षें माझी त्या वेडांत गेली. या कलेंत माझा दर्जा फारसा खालच्या दर्जाचा नव्हता. माझी कांहीं **Water colours** तर माझ्या इतक्या आवडीची होती कीं त्याला चांगले गिऱ्हाइक येऊनही मी ती विकलीं नाहीत. त्यांच्यावर माझं फार प्रेम. पूर्वीपासून मात्र एक महत्वाकांक्षा मी बाळगून होतो कीं, माझी ही सर्व इस्टेट करवीर जनतेला अर्पण करावी. म्हणून मी माझा संग्रह सांठवून ठेवला होता. मृत्युपत्रांत मी ती जनतेला दिल्याचे लिहून ठेवणार होतो. पण पुनः असे वाटूं लागले कीं माझ्या मागें तिला योग्य जागा मिळाली नाहीं, त्यांची व्हावी तशी चीज झाली नाहीं, त्याला शोभतील अशा फ्रेमीत ती बसली नाहीत. तर देऊनही व्यर्थ ठरेल. तेव्हां कोरगांवकरना फ्रेमीचा खर्च देण्याची विनंती केली. पांचशेहेपर्यंत खर्च येणार होता. विचारतांच, अगदी खेळाडूपणानें त्यांनी लगेच होकार दिला. आता जागा ! माझ्या दृष्टीनें मला माझ्या राहत्या जागे-जवळ असलेली ताराराणी विद्यामंदिरांतील जागा मिळाल्यास हवी होती. त्याचे चालक व्ही. टी. पाटील यांना विचारतांच त्यांनी पण आनंदानें होकार दिला ! इमारतीत फिरवून, तुम्हाला कोणता हॉल पाहिजे तो निवडा म्हणून सांगितले. निवडतांच भितीतील कपाटे वगैरे काढून भिंती

‘ माधवराव बागल आर्ट गॅलरी ताराराणी मंदिर ’



मोकळ्या केल्या. दिव्याची व्यवस्था केली व हॉल सर्वस्वी चित्रासाठीं राखून ठेवला. याच सुमारास सरसेनापती करीअप्पा यांनी करवीरास भेट दिली. त्यांच्याच हस्तें माझ्या चित्रांच्या गॅलरीचे उद्घाटन करण्यात आले. चित्रे दिल्याची चीज झाली म्हणून मला फार समाधान झाले.

**व्ही. टी. पाटील—** यांचे माझे संबंध तसे कांहीं मैत्रीचे नव्हते. प्रजापरिषदेच्या चळवळीवेळीं ते महाराजांच्या बाजूनें आम्हाला विरोधच करीत होते. यानंतर काँग्रेस अधिकारावर आल्यावर काँग्रेसच्या बाजूनें निवडणूकीस उभे राहिले. पक्ष दृष्ट्या येथेही त्यांची बाजू विरोधाचीच होती. असे असूनही त्यांनीं लोकांकडून खूप पैसा जमवून ताराराणी मंदिर बांधले. आणखी कांहीं प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या सोयी केल्या. हे पाहून मला त्यांच्याविषयी आपुलकी वाटू लागली. व मी माझा चित्रसंग्रह त्यांच्या संस्थेस दिला. मी सरकार विरोधी पक्षांत असतानाही त्याचा त्यांनीं स्वीकार करून कौतुक केले व करीअप्पाकडून उद्घाटन करवले ही गोष्ट निःसंशय भोत्पणाची आहे व धाडसाचीही आहे. आजच्या कोल्हापुरांतील काँग्रेस कार्यकर्त्यांत त्यांचेच काम उठून दिसत आहे.

**सभा संयम.—** अलिकडचा माझा बहुतेक वेळ वाचनांत आणि लेखनांत घालवण्याचं मी मुद्दाम ठरवलं. सभा व्याख्यानें, कांहीं दिवस टाळण्याचे ठरवले.

सभा व्याख्यानाचं एक व्यसनच मला चिकटलं आहे. सभा म्हटली कीं मेलेला उठणार. लोकांनी आपल्याला सभेला बो वावं अशी फार इच्छा. बोलावलं नाहीं तर अस्वस्थ होणार! हाही एक स्वार्थच. यांतून मोकळं होण्याकरता व मनाला शिकवण देण्याकरता, जनसेवा चुकवण्या-करता नव्हे, कारण मी कांही वाचलं आणि लिहलं तरी जनता माझ्या-समोर असते. लेखानें माझ्यापरी मी सेवाच करीत आलो आहे. पण प्रसिद्धीचं वेड आणि त्यांतील हा स्वार्थ कमी व्हावा म्हणून मी कांहीं दिवस हे व्रत पाळण्याचं ठरवलं. याबद्दल कदाचित गैरसमज होण्याचाही

संभव आहे. कारण ३ व ४ डिसेंबर १९५२ ला जेऊरला जी सर्व पक्षीय दुष्काळ परिषद झाली तिचे अध्यक्षपद मजकडे आले होते. पण मी ते स्वीकारले नाहीं. माझा त्या विषयाचा तितका अभ्यास नव्हता हे जरी थोडे बहुत कारण असले तरी मुख्य कारण कांहीं दिवस सभा टाळून संयम पाळणे हाच होता. माझ्या मानसिक विकासाच्या दृष्टीनें मला याची आवश्यकता भासली. पण मी तोंडाला कायमचेच कुलूप घातले. आहे असें नाहीं.

**हल्लीची वर्तमानपत्रें.**— लिखाणांना कांहीं पत्रांत स्थान मिळते. कांहींत मिळत नाहीं. त्यांच्या ध्येय–धोरणाला जमेल असेच लेख ते स्वीकारतात. स्वतःचे किंवा पक्षाचे पत्र नसल्यामुळें विचाराची बरीच कुचंबणा होते. पण लिखाणाचा मुख्य उद्देश प्रचार हाच असल्यामुळें मानापमान बाजूस ठेवावा लागतो. एकानें स्वीकारला नाहीं तर दुसऱ्या-कडे, असा कोडगेपणा करावा लागतो ! येथें ना तेथें, कुठेतरी लेखाला जागा मिळते. प्रचाराच्या समाधानापलिकडे यांत कांहीं फायदा मिळत नाहीं. मिळण्याची अपेक्षाही करीत नाहीं. पुस्तक रुपानें प्रसिद्ध होण्याजोगे बरेच लिखाण शिल्लक आहे. पण पुस्तक रुपानें ते प्रकाशित करण्याची माझ्यांत शक्ती नाहीं. लिखाण जपून मात्र ठेवले आहे. गोष्टी, कला व समाजवाद यावरचे लिखाण बरेच आहे. माझ्या पश्चात कोणी तरी छापील या आशेनेच ते जपून ठेवले आहे.

आजच्या बहुतेक पत्रांचे स्वरुप धंद्याचे झाले आहे. भांडवलवाला धंद्यासाठीं पत्र काढतो. स्वतंत्र व्यक्तीपण पोटासाठींच पत्र काढते. अशाच पत्रांची संख्या अधिक आहे. पत्र जगवणे आणि आपला चरितार्थ व्यवस्थित चालवणे व करता आले तर समाजकार्य करणे हेंच एक उद्दिष्ट प्रामुख्यानें असल्यामुळें ध्येयासाठीं मरण पतकरण्याचा व जेथून पैसे येतात तो झरा बंद करण्याचा अव्यवहारीपणा (!) कोणी करीत नाहीं. यामुळें जेथून जाहिराती मिळण्याची संभवता, त्यांना दुखवण्याचे धाडस ते करीत नाहींत.



**डॉ. धनवडे—** वाचन आणि लेखनांतून वेळ मिळाली कीं विसावा म्हणून डॉ. धनवडे यांचेकडे जातो. दोन तीन तपाची माझी त्यांची दोस्ती. स्कूल ऑफ् आर्टमध्यें जात होतो त्यावेळेपासूनचे संबंध. मी शाहूमहाराजांच्या पन्हाळा लॉजमध्ये रहात होतो त्यावेळीं ते नेहमी येत. पुढे ते दरबारी नोकरींत लागले. कोल्हापुरचे दरबार सर्जन झाले. पण माझे संबंध कांही टाकले नाहीत. ते राजाराम महाराजांच्या अतिशय मर्जीत. मी राजाविरुद्ध चालवलेल्या चळवळीतील प्रमुख. असे असूनही त्यांनी माझे संबंध टाकले नाहीत व महाराजांनीही तशी त्यांच्यावर सक्ती केली नाहीं. पुढे राजद्रोहाच्या केसमध्यें शिक्षा होऊन तुरुंगांत गेलो. त्यावेळीं तें जेलसुपरिंटेंडेंट म्हणून येत. या सर्व अवस्थेतून आमची मैत्री आतापर्यंत टिकली आहे. उपवासाचे वेळीं यांनीच काळजी घेतली. पुढे प्रजापरिषदेतल्या कार्यकर्त्यांनाही सहाय्य करूं लागले. गारगोटी अधिवेशनास हजर राहिले. कांहीं वेळां छापखान्यास सहाय्य केले. सुरवातीपासून ते यावेळेपावेतों डॉक्टर म्हणूनही कुटुंबाला आधार दिला. फी कधीही आकारली नाहीं. मला कम्युनिस्ट वाङ्मयाचा नाद. त्यांना कांहीं पुस्तकें दिली. त्यांनाही या वाङ्मयाचे वेड लागले. यामुळें ते आणखी जवळ आले. या वाङ्मयानें त्यांचे पूर्वीचे विचार बदलेले व आमच्या भेटींत तो विषय नेहमी निघूं लागला. ते डॉक्टर असले तरी त्यांचा वाचनाचा नाद दांडगा आहे. विचारानें आम्ही परस्पराजवळ फार आलो. घरही जवळ असल्यामुळें नेहमीं गांठी भेटी होऊं लागल्या.

**मराठा जातीची व्याप्ती.—** कोल्हापुरास अखिल भारतीय मराठा परिषदेचे अधिवेशन ता. २ मे १९५३ रोजीं भरण्याचे ठरले. डॉ. धनवडे यांची स्वागताध्यक्ष म्हणून व पंजाबराव देशमुख यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली. नेहमीच्या परंपरेला हे सुटून झाले. नाहीतर कोणातरी राजाचीच निवड व्हायची. डॉ. धनवड्यांचे भाषण नेहमीच्या परंपरेला सुटून झाले. ते समाजवादी विचारसरणीवर गेले. माझ्याशी ते विचार बरेचसे जुळणारे होते. मी परिषदेचा सभासद नव्हतो. पण संस्थेला थोडे पुढे ढकलावे म्हणून आम्हा दोघांच्या विचारानें सबजेक्ट कमेटींत खालील ठराव मांडला.

'मराठी भाषा बोलणारा, जो स्वतःला मी मराठा जातीचा आहे, असे म्हणवून घेईल, त्याला परिषदेनें आपला सभासद करून घ्यावे मग तो पूर्वी कोणत्याही जातीचा असेल.'

या ठरावानें परिषदेचे स्वरुप अधिक व्यापक होईल असे मला वाटले. महाराष्ट्रांतील सर्व पोटजाती नष्ट होऊन एकजिनसी महाराष्ट्र निर्माण व्हायला या ठरावानें खूपच चालना मिळेल असा मला विश्वास वाटला व अद्यापही वाटतो. डॉक्टरनाही माझी कल्पना मान्य झाली. परिषदेला तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशी व भाई र. के. खाडिलकर हेही निमंत्रित म्हणून आले होते. त्यांना हे ठराव पुरोगामीच वाटले. व ठराव पास झाल्यास बरेच पुढचे पाऊल पडेल असे त्यांनाही वाटले. मी सभासद नव्हतो पण अध्यक्ष पंजाबराव देशमुख यांनी मला या ठरावावर माझे विचार मांडण्यास परवानगी दिली. कमेटीतील दोनतीन मंडळींना ही कल्पना आवडली नाहीं. त्यांना यांत ब्राह्मणी डावपेच वाटले व मी त्यांचा हस्तक आहे अशी त्यांनी आपली समजूत करून घेतली. ठराव पास नापास असा झाला नाहीं. घटनेंत त्यामुळें बदल करावा लागेल म्हणून तो अगाऊ तीन महिनें सर्व प्रतिनिधींना कळवावा लागेल या मुद्यावर तो त्यावेळीं सभेपुढे ठेवण्यात आला नाहीं.

पण या विचारसरणीवर जे प्रतिकूल आणि अनुकूल असे कांहींनी विचार मांडले ते विचाराला चालना देणारे आहेत, म्हणून मी खाली देत आहे. संयुक्त महाराष्ट्राला ते उपयुक्त आहेत. अनुकूल असलेल्यांचे म्हणणे, अर्थात त्यांत मीही आहे—

जातिनिर्मूलनाशिवाय महाराष्ट्राचे खरे ऐक्य साधणार नाहीं. त्यांसाठीं परिणामकारक उपाय म्हणूनच या प्रश्नाकडे निःपक्षपाती दृष्टीनें पाहिले पाहिजे. महाराष्ट्रांतून जातिनिर्मूलन व्हायचे तर मराठा जातीची घडण इतर कोणत्याही जातीहून अनुकूल आहे. अगदी पुरातन काला-पासून पाहिले तरी तिची परंपरा जातिविध्वंसनाला फार अनुकूल आहे. मराठा ही जात संग्राहक आहे. ब्राह्मण जाती सारखी ती सोवळी जात नाहीं व तशी राहूं शकली नाहीं. ब्राह्मण, जैन, लिंगायत, कुणबी, साळी, माळी, लोहार, कुंभार, सुतार, धनगर अशापैकीं कोणाचेही पाणी मराठ्याला चालते तिनें इतर सर्व जातियांचा आपल्या जातींत समावेश करून घेतला आहे. थोर कुळीच्या म्हणून मानले गेलेल्या शहाण्णव कुळीच्या मराठ्यांचे धागेदोरे खालपर्यंत, कमी समजलेल्या जातींत जाऊन पोहोचले आहेत. अनेक जातीशी लग्नसंबंध आणि शरीरसंबंध झालेली मुलें मराठा जातींत कालांतरानें मोडली गेली आहेत. छत्रपती हे तर मराठ्यांचे आद्यदैवत. त्या छत्रपतींनी मुसलमान झालेल्या निंबाळ-कराला 'तूं मराठाच आहेस' असं म्हणून जवळ केलं आणि त्याच्याशी सोयरिक केली. शाहु छत्रपतीनी तर फारच पुढची मजल मारली. मूळ पाटाची चाल असलेल्या घराण्याशी, तसंच होळकर या धनगर घराण्याशी लग्नसंबंध जोडले व पुढाकार घेऊन आपल्या वाड्यावर अशी अनेक लग्नें आपल्या प्रोत्साहनानें आणि खर्चानें घडवून आणली. पावित्र्याचा समज-लेला हा धागा शाहू महाराजांनीं आपल्या हातांनीच तोडून टाकला. सर्वांनीं मोठ्या आढ्यतेनें आपल्या जातीचे संबंध जेथें जोडायचे तो मोठेपणाच आधार त्यांनीं नाहीसा केला. आज कोल्हापुरांत ब्राह्मण—मराठा, मराठा—मुसलमान मराठा व अन्यजातीची अशी कितीतरी लग्नें झाली आहेत व ती मराठ्यांत मोडली जात आहेत. एक दोन पिढ्या गेल्या कीं ती एकरूप होऊ शकतात. लग्नाच्या, बिनलग्नाच्या, इतर जातींत थारा नसलेल्या मुलांना मराठा जातीनें आपल्या पोटांत घेतले आहे. अशी ही जात आपोआपच मत्र-गोलंकारी बनत चालली आहे. धर्मगुरूंच्या आज्ञेने किंवा संस्कारानें बनत चालली आहे असेही नाहीं. यांत कट्टर जात्याभिमानी नाहींत असे नाहीं. पण त्यांची ती कल्पना व्यवहारांत टिकूं शकलेली नाहीं. कारण त्यांचे

पाहुणे पैत झालेले संबंध त्यांना तोडता येत नाहींत. हीच एक जात सर्वांना जवळ करूं शकते. ' मी मराठा जातीचा आहे ' असे म्हणणारा पूर्वी कोणत्याही जातीचा असो, त्याला मराठा जातींत, कोपऱ्यांत कां असेना जागा मिळते. पुढें त्याचा आंत प्रवेश होत जातो. तसें मी ब्राह्मण आहे, जैन आहे, किंवा लिंगायत आहे असे म्हटल्यानें त्या जातींत समावेश केला जात नाहीं. याच उदार धोरणामुळें मराठा जात सारखी वाढत गेली आहे. याचमुळें जातिनिर्मूलनाला ही विशेष अनुकूल अशी जात आहे. जात नसलेली जात कोणती तर ती मराठा अशी वस्तुस्थिती आहे. यामुळें इतर जाती मराठ्यांत गेल्यानें जातिनिर्मूलनाचा मोठा टप्पा गांठला जाणार आहे. ही विचारसरणी मराठाजात्याभिमानानें प्रेरित होऊन मांडलेली नाहीं.

वार्गिक दृष्ट्याही या जातीला महत्व आहे. कष्ट करणारा शेतकरी-कामगार व खालचा नोकरही याच जातींत जास्त आहे. म्हणून वार्गिक दृष्ट्या तो अस्पृश्य वर्गालाही जवळचा आहे. या श्रमजीवी लोकांची संस्कृती आचार, विचार अन् महत्वाकांक्षा यांत साम्य आहे. मोळी-विक्या कुणबी अन् मोळीविक्या अस्पृश्य यांत तसे अंतर दिसणार नाहीं. शेतांत काम करताना, गिरणींत मजूरी करताना व हमाली करताना ते परस्परांजवळ आले आहेत. ब्राह्मण आणि महार यांत जसें अंतर आहे तसें मराठा आणि महारांत नाहीं. त्यांतही फुले, विठ्ठल रामजी शिंदे, शाहु महाराज व सयाजीराव महाराज यांनीं त्यांना वर आणण्याचा खूप प्रयत्न केला आहे. या बाबत शाहू महाराजांनी केलेलं काम हे चिरस्मरणीय स्वरुपाचं आहे. कोल्हापुरांत तरी ही विषमता फारच कमी आहे. कोल्हापुरांत नगराध्यक्षाचा मान हरिजनाला मिळाला आहे. म्हणून सर्वच जातीनी मराठा जातीकडे महाराष्ट्राच्या आशेचं स्थान म्हणून पाहिलं पाहिजे.

हेच वरील विचार मी एका संमेलनाप्रसंगी मांडले. महाराष्ट्रांतील थोर म्हणून मानली गेलेली, विशेषतः ब्राह्मण जातीतील पुढारी मंडळी तेथें जमली होती. त्यांचेही विचार समजावेत म्हणून हे विचार पुढें ठेवले.

पण माझ्या विचाराशी ते सहमत झाले नाहींत. एक दोन व्यक्ती हे विचार प्रत्यक्षांत आले तर इष्टच होईल असें म्हणालें. कांहींना या विचारांत प्रच्छन्न जातिवाद दिसला. एकानीं हा जातिवाद्यांचा धूर्त डाव आहे असा आरोप केला. कांहींनीं मराठा जातीचे हे विश्लेषण मान्य केलं नाहीं. ( मान्य केलं नाहीं तरी त्यानें वस्तुस्थिती कशी बदलणार ? ) एक म्हणाले ' मराठा जातीचे ' असें म्हणून आम्हीं मुळीच आंत येणार नाहीं. आम्हीं जात सांगण्यात अभिमान मानीत नाहीं. पण दुसऱ्या जातीचेही म्हणून घेणार नाहीं. मराठा जातीचे म्हणण्यानें जातिवाद नाहींसा होणार नाहीं. संधिसाधू मराठे निवडणुकी जिंकण्याला व आपले पुढारीपण टिकवायला मात्र याचा फायदा करून घेतील. स्वार्थी पुढाऱ्यांची ही मुत्सद्देगिरी आहे. ही कल्पना भयावह आहे. माधवरावांचे हे विचार ऐकून आम्हांस धास्ती वाटते. नैराश्यांतून या विचारसरणीचा उगम झाला आहे. यांत हुकुमशाहीचे बीज आहे. यानें जातिवाद नष्ट होणार नाहीं. जातिवादाचे कोणतेही स्वरुप आम्हांस मान्य नाहीं.

मराठा जातीच्या कांही अभिमान्यानींही असाच विरोध केला. त्यांचं म्हणणं:—

या ठरावामागें ब्राह्मणांचा हात आहे. त्यांची प्रेरणा आहे. ब्राह्मणीं डावपेच आहे. संस्थेचा फायदा पदरीं पाडून घेण्यासाठीं ते स्वतःला मराठा म्हणवून घेतील. आंत शिरतील आणि शिरजोर होतील.

जातिसंस्था नाहीशा करणं, त्यांना मिळणारी सरकारी ग्रँट बंद पाडणं, जातीची नांवें काढून टाकणं या वर वर दिसणाऱ्या उच्च भूमिकेमागे जातिस्वार्थच दडून असतो. पूर्वी त्यांनीच निर्माण केलेला जातिवाद आता त्यांच्या स्वार्थआड येऊ लागला आहे. म्हणून त्यांना त्याची जरूरी नाहीं. जातिस्वार्थ साधायचाच आहे पण आता जातीचे नांवानें साधत नाहीं म्हणून नांव नको एवढेच. त्याच गोष्टी लायखीच्या नांवाखाली साध्य होतात. ब्राह्मणांनी चालवलेली कोणतीही राष्ट्रीय नामधारण करणारी संस्था घ्या. नांव राष्ट्रीय पण त्याचा फायदा त्यांच्या जातीपुरता !

माझ्यापुढेही असेच एक उदाहरण होते. म्हणून वरील शंका खोटी होती असेही म्हणता येणार नाहीं. अध्यक्ष ब्राह्मण. पैसा भरपूर हातांत.

त्यांनी त्याचा विनियोग आपल्या जातीत आणि मित्रमंडळीतच केला होता. कार्यकर्ते निवडले ते त्यांच्याच जातीचे.

अधिकारावर माणूस आला कीं त्याने हेच करायचे. आपल्याच जातीच्या लोकांचा भरणा दाबून करावयाचा !

आतां यापुढे हे बदलेल या भीतीनें ते मराठा जातीला दचकूं लागले आहेत. मराठा जातीच्या संघटनेमुळें व त्यांच्यांत होणाऱ्या जागृती मुळें त्यांना भीती वाटूं लागली आहे हा खालचा वर्ग आणि खालच्या जाती शाहण्या आणि संघटित होऊं लागल्या कीं आपले वर्चस्व खलास होणार म्हणून खालच्या जातीतल्या शिक्षणसंस्थांना त्या जातीवादी आहेत म्हणून मदत करू नये, अशी सरकार जवळ शिफारस करीत आहेत. फुल्यांच्या कालांत आणि आतांच्या कालांत विशेष बदल झालेला नाहीं वृत्ती तीच आहे.

ब्राह्मण जातीच्या कार्यकर्त्यांना मदत केली तर ते कार्यकर्ते बहुजन समाजांतच कार्य करीत असल्यामुळें पर्यायाने ती मदत बहुजन समाजालाच होते असे एका ब्राह्मणानें या मदतीचे समर्थन केले.

हे समर्थन म्हणजे वकीली झाली. अंतरंग दडवण्याची क्लुप्ति झाली. कर्मवीर भाऊराव पाटील हेही बहुजनसमाजाची सेवा करतात. पण ते खालच्या समाजांतील कार्यकर्त्यांना पुढारी बनवतात. व हे आपले पुढारी जगवतात.

वाङ्मयाबद्दलही यांच्या कल्पना अशाच आहेत. खालच्या समाजाला समजेल असे वाङ्मय निर्माण न करता हे हिमालयाच्या शिखरावरच चढतात आणि म्हणतात काय ? तर उंच शिखरावरचे पाणी अखेर खालीच वहात जाते. तेंव्हा या उच्च वाङ्मयाचा फायदा अखेर बहुजनसमाजाच्याच पदरांत पडणार ! म्हणून आम्ही वरवर चढणाऱ्या वाङ्मयाला प्रोत्साहन देतो.

आजच्या अवस्थेंत अडाणी अन् गरीब जमातीच्या शिक्षण संस्था असणं आणि त्यांना मदत करणं अवश्यक असतांना त्यांना जातिवादी संबोधून, त्यांची मदत बंद करणं मला तरी गुन्हा वाटतो. मराठा बहुसंख्य समाज अज्ञानी आहे आणि दरिद्री आहे. हिंदुस्थानांत जातीनाही वार्गिक

स्वरुप आलेलं आहे. कष्टकरी जाती आणि परोपजीवी जाती; परंपरागत अज्ञानी आणि विद्वान, अशा जाती पडल्या आहेत. खालच्या जमाती दोन्ही दृष्टीनें खाली गेलेल्या आहेत. आजच्या भांडवलशाही समाज व्यवस्थेत ही विषमता जात नाहीं. मग या गरीब आणि अज्ञानी जातींनीं, जातिप्रेमाचा फायदा घेऊन, फंड जमवून शिक्षण संस्था काढली तर तिच्यावर जातिवादाचा शिक्का मारायचा हा पुनः आपलं स्थान राखूं इच्छिणाऱ्या धूर्तांचा डाव नव्हे काय ?

याचमुळें ज्यावेळी ब्राह्मण जातिसंस्था नको म्हणतात त्यावेळीं त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल संशय येणे साहजिकच आहे. म्हणून कांहीं मराठा जातीच्या व्यक्तींनीं 'मराठा म्हणवून घेईल त्याला' मराठा परिषदेने समावेश आपल्यांत करून घ्यावा या कल्पनेला विरोध केला.

कांही ब्राह्मण विचारवंत म्हणाले, 'जातिनिर्मूलन करायचे तर पुनः दुसरी आणखी जात नको. आर्थिक प्रश्नावर एकी केल्याने, एका वसाहतीनें, एका ठिकाणीं राहण्या-जेवण्यानें, हा जातिवाद कमी होत जाईल.

हिंदुस्थानच्या समाजव्यवस्थेचा आणि त्यामुळें बनलेल्या समाज मनाचा विचार करता वरील उपाय फारसा परिणामकारक होण्याजोगा नाहीं. रशिया व चीन वगैरे राष्ट्रांत आर्थिक विषमता व धार्मिक विषमता आहे. पण हिंदुस्थानप्रमाणें जातिविषमता तेथे नाहीं. म्हणून या प्रश्नाची सोडवणूक येथील परिस्थितीचा विचार करूनच करावी लागेल.

जातिनिर्मूलन करायचे तर जातीचे नांव पुनः नको हे म्हणणे तात्विक दृष्ट्या ठीक होईल पण व्यवहारदृष्ट्या चुकीचे ठरेल. जमीनदारी व भांडवलशाही नष्ट करण्याचे ध्येय ठेवूनही चीनने कांहीं प्रमाणांत मध्यंतरीच्या कालांत त्याला मान्यता दिलीच कीं नाहीं. म्हणून जातिविध्वंसनाचा पहिला टप्पा म्हणून जी जात व्यापक होत आली आहे तिच्यांत सर्वांनी जाणे इष्ट नाही कां होणार ! धर्म ही अफू म्हटले तरी पुष्कळवेळां धर्मांतले अनिष्ट प्रकार उघडकीस आणण्याकरता धर्मग्रंथांतले उतारे आपण नाहीं कां दाखवत ! म्हणून जातिनिर्मूलनाचा पहिला टप्पा म्हणून मराठा जातीचा उपयोग कां करून घेऊं नये ! अभेद्य वाटणारा किल्ला पाडायचा असल्यास जेथे एखादा दगड कोसळला असेल तेथेच मारा करणें हे डाव पेचाच्या दृष्टीनें उपयुक्त नाहीं कां ठरत !

आर्थिक प्रश्नावर एकी करण्यानें त्या प्रश्नावर एकजूट झाली तरी त्यानें जातिविषमता नाहींशी झाल्याचा मला तरी अनुभव नाहीं. अशा संघटना मी केल्या होत्या पण त्यानें मिश्र विवाह घडून आले असे नाहीं. किंवा हॉटेलमध्यें जेवल्यानें तो गेला असेही झाले नाहीं. म्हणून हे उपाय कांहीं अंशी सहाय्यक ठरले तरी ते तितकेसे परिणामकारक होत नाहीत.

**संयुक्त महाराष्ट्रासाठीं.—** तो होण्यासाठीं झाला म्हणजे बलवान होण्यासाठीं त्यांतील जातिभेद नाहींसे झालें पाहिजेत. व माझ्या-मतें या करता मुख्यतः मराठा व ब्राह्मण हे एकजीव झाले पाहिजेत मराठा जात बहुसंख्य असल्यानें ती एक मोटी शक्ती आहे. आणि ब्राह्मण हे अल्पसंख्य असले तरी पूर्वापार मिळत गेलेल्या अनुकूल परिस्थिती-मुळें ते बुद्धिवान झाले आहेत. तेव्हां मराठा आणि ब्राह्मण म्हणजे शक्ती आणि बुद्धी एका ठिकाणीं येऊन परस्पर सहकार्यास लागल्यास महाराष्ट्राचा अभ्युदय हा ठरलेला आहे. पण त्यागाची भूमिका ही ब्राह्मणांनीच घेतली पाहिजे. कारण तो जाणता वर्ग आहे. त्यांनीं पुढें होऊन मराठ्यांशीं लग्नसंबंध घडवून आणले पाहिजेत. त्या जमातीतील पुढाऱ्यांनीं तशी चालना दिली पाहिजे. त्यांत त्यांचाच स्वार्थ साधणार आहे. ते एकरुप झाले म्हणजे त्यांच्याविषयीं मराठ्यांना वाटणारा मत्सर नाहीसा होईल. मग त्यांतले कोणी अधिकारी झाले आणि मंत्री झाले तर मराठा आणि बहुजनसमाजाला त्यांचा हेवा वाटणार नाहीं. म. गांधीजींच्या खुनानंतर ब्राह्मणांच्या घरांची जाळपोळ झाली. कारण ते अल्पसंख्यांक होते. निवडून काढता आले. ते मराठ्यांशीं एकरुप झाल्यानंतर त्यांची भीती नाहींशी होईल. तोच गुन्हा मराठ्यांकडून झाला असता तर एखादे घराणें नष्ट झाले असते. पण अफाट पसरलेल्या मराठा जातीवर हात टाकणें अवघड गेले असते. नव्हे ती गोष्ट शक्य झाली नसती. लोकशाहीच्या दृष्टीनेही बहु-संख्यच अधिकारावर येणार. त्यांच्याच हातीं राजसत्ता येणार. मग त्याच जातीं ब्राह्मण एकरूप झाल्यास त्या राजसत्तेचा वांटा दुसरांना मिळाला तर इतरांना, त्याच जातीचे लोकांना मत्सर वाटणार नाहीं. या संयोगामुळें ब्राह्मणांचाच फायदा होणार आहे. या संयोगानें मराठ्यांच्या संस्कृतीचा

विकास होणार आहे. हे ऐक्य पाहून इतर जमाती आपोआपच त्या सागरांत सामील होत जातील. अलग राहणे त्याना धोक्याचे वाटेल. ही सर्व विचारसरणी मराठा जातीच्या अभिमानानें मांडली नसून महाराष्ट्राच्या अभिमानानें मांडली आहे.

**आजच्या राजकीय पक्षांचे भवितव्य—** आज जे अनेक पक्ष दिसतात ते कमी होत जाणार यांत शंका नाहीं. तसे झाल्याखेरीज गत्यंतर नाहीं. भांडवलवाल्यांची आणि भांडवलशाही धार्जिण्या पक्षांची आज एकी होत आहे. पण भांडवलशाही राष्ट्रांची एकी ही नेहमी वरकरणीच असते. त्यांच्यातील अंतर्विरोध समूळ नाहीसा होऊच शकत नाहीं. तथापी त्यांची औपचारिक आघाडी निर्माण होत आहे.

तसेच मार्क्सवादी डाव्या गटाची एकी होणे क्रमप्राप्तच आहे. कांहीं काल लागला तरी ती गोष्ट कोणालाही चुकवता येणार नाहीं.

**कॉंग्रेस संस्था.**—जरी मोठी दिसत असली आणि आज ती अधिकारावर असल्यामुळें तिच्या अनुयायांची संख्या वाढत असल्याचे जरी दिसले तरी ती आंत पोखरली गेली आहे. फक्त नेहरुंच्यामुळें ती सांवरली आहे. पण नेहरु तीत फार बदल करू शकणार नाहीत. उलट त्यांच्या ध्येयालाच त्यांना मुरड घालावी लागत आहे. स्वांतत्र्यापूर्वीची धडाडी त्यांच्यांत असती तर आजच्या इतके आणि आजच्यासारखे विरोधी पक्षही दिसले नसतें. श्रमजीवी सारी जनता त्यांच्या मागें उभी असती.

कॉंग्रेस लढाऊ होती त्यावेळी संधिसाधूंना त्यांत वाव नव्हता. त्यागाची अवश्यकता असल्यामुळें संधिसाधूंनी घुसण्याची धडपड केली नाहीं. आता ती अधिकारावर आल्यामुळें. सत्तेमुळें येणारे सर्व दुर्गुण तिच्यांत घुसले आहेत. त्याची घाण खालपासून वरपर्यंत कमी अधिक प्रमाणांत सर्वांना चिकटली आहे. आम्ही इतका त्याग केला, इतके कष्ट सोसले, इतक्यावेळां तुरुंगांत गेलो म्हणून आम्हाला राजसत्तेंत वांटा पाहिजे. संस्थेंत जागा पाहिजे. पैशांत वाटणी पाहिजे. ही वृत्ती जुन्या कॉंग्रेसवाल्यामध्यें आली आहे. त्यांच्यांत गर्विष्ठपणा, अहंभाव, स्वास्थ्य वाढल्यामुळें खालपासून वरपर्यंत ती नासली आहे. पाया पोखरला गेला आहे.

नवे येणारे पवित्र हेतूनें व सेवावृत्तीनें आंत येत आहेत असें दिसत नाहीं. निवडणुकी जिंकण्यासाठीं कॉंग्रेसनेंही आपल्यांत तत्वशून्यांचा भरणा केला आहे. हे नवें रक्त पूर्वींहूनही गढूळ आहे. एखादा प्रामाणिक, उदार हेतूनें आंत शिरला तर त्याचाच अधःपात होण्याची शक्यता अधिक. त्याला गुदमरल्यासारखे झाल्याखेरीज राहणार नाहीं. आंत राहून कान उघाडणी केली तर स्वार्थासाठीं तयार झालेला गट बाजूस टाकणार. उघड टीका केली तर शिस्तीखालीं उचल बांगडी होणार ! म्हणून स्वतंत्र बाण्याची व्यक्ती आंत जाऊन शुद्धता करील ही गोष्ट असंभवनीय आहे. इतिची शुद्धी करण्याचे सामर्थ्य एकट्या नेहरुंच्यांत आहे. पण ते संस्थेच्या धोरणांत धडाडीनें आमूलाग्र बदल करतील अशी आज तरी शक्यता दिसत नाहीं. तसे झाले तर तो एक चमत्कार ठरेल.

इतर पक्षाबद्दल— बोलायचे तर त्यांची शक्ती कॉंग्रेसला भारण्याइतकी बनलेली नाहीं.

छोट्या पक्षांत त्यांच्या छोटेपणामुळेंच कांहीं दोष निर्माण होतात. मुलगा कर्तबगार नसला, स्वतःच्या पायावर उभें राहण्याजोगीं त्याची ताकत नसली म्हणजे तो बाप मरायची वाट पहात बसतो. राजाच्या मुलानें आपल्या बापाला वीष घातल्याची उदाहरणें इतिहासांत बरीच मिळतील. असाच प्रकार छोट्या पक्षाचा होऊ लागतो. छोट्या पक्षांत पुढारी थोडे असायचे. त्यांच्यांत म्होरक्या होण्याची व कायमपणें रहण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न होतें. यानें तो पक्ष दुर्बळ होतो. नव्या कार्यकर्त्यांना जुने लोक नकोसे वाटतात. कारण त्यांच्या पूर्वतपःश्चर्येमुळें व लौकिकामुळें त्यांना मिळालेले स्थान यांना वर डोकें काढण्यास आड येते. पुढारीपण मिळवायला जुनी लीडरशिप आड येते. म्हणून त्यांचाच ते हेवा करूं लागतात. यामुळें जुनें बाजूस होतात व नव्यांना समाजांत स्थान मिळाले नसल्यामुळें त्याचा परिणाम पक्षावर होतो. सर्वच पक्ष कमताकत होतो. जुन्यांचा अनुभव व नव्यांची धडाडी यांची सांगड जर घातली नाहीं तर पक्षाची वाढ होणे फार जड जाते.

तसंच छोट्यापक्षाच्या पुढाऱ्यांना आपलं अस्तित्व टिकवण्याचे असल्यामुळें मोठ्या पक्षांत जायला ते टाळाटाळ करतात. कारण सागरांत नदी नालें मिळाले तर त्यांचे स्वतंत्र आस्तित्व राहूं शकत नाहीं.

**डाव्यांची एकच आघाडी.—** अद्याप होऊं शकत नाहीं यालाही कारणें नाहींत असं म्हणता येणार नाहीं. पण यामुळें पक्षाचं अस्तित्वच जाण्याची पाळी येत आहे असें वाटूं लागले म्हणजे ही एकी होत जाणार आहे. म्हणून आज ना उद्यां डाव्यांची एकी होईलच होईल. पुढाऱ्यांनीं थोपवले तरी समाजवाद्यांतील पुरोगामी कार्यकर्त्यांनीं आपला मार्ग काढलाच कीं नाहीं. जाणत्या कार्यकर्त्यांमुळेंच आतां एक आघाडी निर्माण होईल. आणि माझ्यामतें कम्युनिस्ट पार्टी ही डाव्यांची एकच पार्टी राहील. तिच्या पूर्वी कांहींही चुका झाल्या असल्या तरी त्या कबूल करून धोरण बदलण्याचा लवचिकपणा त्या पार्टींत आहे. तिला इतिहास आहे. त्यागाची फार मोठी परंपरा आहे. रशिया व चीन या देशांची त्यामागें सांखळी उभी आहे. विशेषतः चीननें स्वीकारलेला मार्ग कार्यात बदल घडवून आणत आहे. आज नसली तरी कांहीं कालानें भांडवलशाही पक्षाबरोबर टक्कल देणारी तीच एक प्रभावी शक्ती आहे. इतर सर्व डाव्यागटांनीं त्या पार्टीशी सहकार्य करणे व ध्येयवादी व कणखर कार्यकर्त्यांनीं त्याच पार्टींत जाणे हे श्रेयस्कर ठरणार आहे.

**शे. का. पक्षाचें सांगलीचे अधिवेशन.—** वरील मजकूर लिहून झाल्यानन्तर तशी महत्वाची एक घटना घडलीच. ता. ११ ते १६ जून १९५३ पर्यंत शेतकरी कामगार पक्षाचें अधिवेशन सांगलीस भरले होते. मी राजकारणसमितीच्या बैठकीस हजर होतो. त्यांत सरचिटणीस शंकरराव मोरे यांनीं पक्ष विसर्जनाची आतां वेळ आहे, पक्षाचे ऐतिहासिक कार्य संपले आहे, असें आपले मत परिषदेपूर्वी जाहीर केले. त्याना बहुमत अनुकूल नव्हते.

र. के खाडिलकर ह्यांनी पक्षाच्या सरचिटणीसपदाची जबाबदारी स्वीकारली. मोरे व जेधे यांचेपेक्षां खाडिलकरांचा व माझा अधिक घरोबा जमला होता. पण एकंदर समाजाच्या मनःस्थितीचा विचार करता त्यांनीं नेतृत्वपद स्वीकारण्यापेक्षां नेतृत्व बहुजनसमाजाच्याच माणसाला देऊन मार्गदर्शन करायला हवे होते. असे मला वाटते. हाच विचार करून कम्युनिस्ट पक्षानें नाना पाटील यांना महाराष्ट्र किसान संघटनेचे अध्यक्षपद दिले असावे असें मला वाटते. कम्युनिझम अधिक लवकर यावयाचा असेल व त्याची बहुसंख्य समाजावर पक्कड बसायची असेल तर चळवळीचे

नेतृत्व बहुजनसमाजांतील त्यागी, लायख व जात न मानणाऱ्या पुढाऱ्यांकडे असल्याखेरीज लोकांत विश्वास निर्माण होणार नाहीं. हिंदुस्थानांत ही एक विशिष्ट परिस्थिती आहे. तिचा विचार करून पाऊल टाकल्याखेरीज कोणतेही तत्वज्ञान खालपर्यंत रुजणार नाहीं. कोणतेही तत्वज्ञान लवकर फोफावयाचे असल्यास ते मराठा व महार जातीनें स्वीकारायला पाहिजे, म्हणजे ते बूड धरते. महार मराठा या बहुसंख्य जमाती आहेत. आणि वार्गिक दृष्ट्या विचार केला तरी बहुसंख्य कष्टकरी याच जातींत आहेत.

सत्यशोधक समाज फार लवकर फोफावला कारण त्या संस्थेनें बहुजन समाजाच्या प्रश्नास हात घातला होता. त्या संस्थेतले पुढारी मराठादि बहु-जन समाजांतलेच होते. ते बहुजनसमाजाच्या जीवनाशी व सुखदुःखाशीं अधिक समरस होऊ शकत होते. प्रार्थनासमाजाची तत्वें कितीही उच्च असली तरी त्या पक्षांचें नेतृत्व पांढरपेश्यांच्याकडे असल्यामुळें तो पक्ष मराठा जातीत बूड धरूं शकला नाहीं. कोणतेही तत्वज्ञान बहुसंख्य जनतेत पसरायचे असल्यास मोठ्या जमातीची त्या तत्वज्ञानानें पकड घेतली पाहिजे. त्याचा प्रचार त्या जमातीच्या पुढाऱ्यांनीं केल्याखेरीज त्या मोठ्या जमातीचा विश्वास त्या तत्वज्ञानावर व पुढाऱ्यांवर सहजासहजीं बसत नाहीं. शेत-करी—कामगारपक्ष फार लवकर फोफावला याचं कारण त्याचं पुढारीपण बहुसंख्य असलेल्या मराठा जातीच्या पुढाऱ्यांकडे होतें. अद्याप जातिवाद आहे. तो गेलेला नाहीं. पण तो जाण्याकरतां त्याच जातीच्या पुढाऱ्यांनीं प्रयत्न केल्यास तो अधिक यशस्वी होतो. कम्युनिझमचा प्रचार ब्राह्मणांनीं केल्यापेक्षां तो बहुजन समाजांतील पुढाऱ्यांनीं केल्यास तो अधिक लवकर पसरूं शकेल. म्हणून बहुजनसमाजांतील मराठा आणि महार जातींतील पुढारीच कम्युनिझम लवकर आणूं शकतील. सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्यांनीं जर कम्युनिझमचा प्रचार करायला सुरवात केली तर जाति-विषमता आणि आर्थिक विषमता जायला फार सुलभ होईल. बहुजन-समाजांत समतेचं बीज एकदा कां रुजेल गेले कीं मध्यमवर्ग बलवान होत चाललेल्या कामगाराकडें जसा स्वार्थासाठीं झुकतो तसाच अल्प जातवाला समाज जातिनिर्मूलन झालेल्या मोठ्या जातींत आपोआप एकरुप होईल.

  



**आढावा.**—लोकांना आदर्श म्हणून कांहीं या आठवणी लिहिल्या नाहींत. सर्व सामान्य माणसापैकीं मी एक माणूस. भावनेनेच राजकारणांत पडलो. खालच्या समाजावर होणारें अन्याय सहन न होऊन प्रतिकार करूं लागलो. त्या प्रतिकारालाच पुढें राजकीय स्वरुप प्राप्त झालें. पुढारी होणे हे उद्दिष्ट केव्हांच नव्हतें. ते ओघानें कांहीं काल मजकडे आले.

शंभरापैकीं नव्व्याणव माणसांकडून जे प्रमाद घडतात ते प्रमाद माझ्या हातून झालें आहेत. त्या पासून मजसारख्या इतर कार्यकर्त्यांना बोध घेता येईल. मागच्याच्या ठेचा पुढच्यास शाहण्या करतील या दृष्टीनें हे आत्मचरित्र निःसंशय उपयुक्त ठरेल.

मी अत्यंत सात्विक आणि संन्यासी जिणं काढलं नसलं तरी मी खलपुरुष आहे असं मला वाटत नाहीं. मी मोहांत सांपडलो तरी त्या मोहाच्या आधीन झालो नाहीं.

माझं जीवन चांगल्या वाईटाचा आढावा काढल्यास सुखीच गेलं असं म्हणावं लागेल. माझं आयुष्य सुखी गेलं असं मी ज्यावेळीं म्हणतो त्यावेळीं सुखदुःखाचा आढावा काढूनच हा निष्कर्ष काढतो. पण अनेक भयानक प्रसंगही गुदरून गेलेले आहेत. राजकीय आयुष्यांत खुनाचे प्रयत्न झालें. खासगी जीवनांत आर्थिक संकट उभे राहून त्यानेंही जीवाला भिववलें आहे. केवळ भूतदयेनें प्रेरित होऊन केल्या गोष्टींचा निकटच्यांनी विपर्यास करून गैरसमजामुळें केलेल्या आघातामुळें डोक्याच्या चिंधड्या चिंधड्या उडवल्या आहेत. अशा प्रसंगीं मानसिक यातना असह्य होऊन मी वेडा होतो कीं काय अशा अवस्थतेतूनही गेलो आहे. स्वकीयांचा

आपमतलबीपणा, मित्रांनी केलेला विश्वासघात यांनें मानवतेवरचा विश्वास केव्हां केव्हां ढळला आहे.

पण एक गोष्ट खरी कीं मनुष्याला जो पर्यंत अन्नवस्त्राचा आणि घरच्या सांवलीचा आधार असतो तो पर्यंत संकटाशीं टक्कर देण्याचं सामर्थ्य त्याच्यांतून जात नाहीं. त्यांतूनही तो मार्ग काढूं शकतो. ते माझं साधन तुटण्याच्या अवस्थेला आलं तरी ते अद्याप तुटलं नाहीं म्हणूनच मी म्हणूं शकतो—माझं जीवन सुखाचंच गेलं.

हा आधार शाबूत राहिल्यामुळं माझी महत्वाकांक्षा मेली नाहीं, त्या महत्वाकांक्षेचं स्वरूप बदलत गेलं आहे. पण नेहमी मी कोणत्यातरी वेडांत असतोच. ते वेड समाज सेवेचंच राहिलं आहे.

निसर्गाच्या विविध छटा पकडण्यासाठीं हातीं स्केचिंग फ्रेम घेणाऱ्याच्या हातीं राजकीय चौकट पडेल, किंचित्काल कां असेना त्याच संस्थानची राजसत्ता पडेल अस त्यावेळीं कोणी भाकित केलं असतं तर मी थट्टाच समजलो असतो !

माझ्यावर प्रेम करणारें सद्हेतूनें म्हणतात, ‘ तुम्ही तुमच्या आयुष्याचें मातेरें केले ! आयुष्यांत काय साधलं तुम्हीं ? आलेलीं प्रधानकी टाकून दिली. परिस्थिती अनुकूल असतां निवडणुकांना राहिला नाहीं. सत्ता आणि संपत्तीचे मोके टाकून दिले ! रहायला घर नाहीं ! पैसा सांठवला नाहीं !

संपत्ती आणि सत्ता नसली कीं कोणी विचारत नाहीं हे खरे ! मोटारीतून जाणारा आणि पायीं चालणारा यांना सारखं वागवलं जात नाहीं. व्यवहारीजग माणसाची योग्यता संपत्ती आणि सत्तेवर ठरवत असत.

पण या सर्व गोष्टीकडे पाहण्याच्या दृष्टिकोनावर सुख दुःख अवलंबून असतं. सुखाची आणि समाधानाची कल्पना ज्याची त्याची निराळी असते. टोलेजंग इमल्यांत राहण्यानं मी मनानं सुखी झालोच असतो असं नाहीं. सत्तेच्या जागेपेक्षां प्रचारकाची आणि लेखकाची भूमिका मला अधिक मोलाची आणि समाधानाची वाटते. यांत मी अधिक स्वातंत्र्य भोगूं शकतो. पक्षाच्या बंधनांतून मुक्त झाल्यामुळें आता स्वतं-

विचारांना अधिक वाव मिळतो. यानेंही मला जनसेवेचं समाधान लाभत आहे. मी निष्क्रीय तर मुळीच नाहीं.

बंगला मोठा नसला तरी घर सोईचं आहे. चार जास्ती खोल्यानें सुखांत भर पडली नसती. भाड्याचं घर असलं तरी ते कांहीं बोचत नाहीं. मोटर मालकीची नाहीं पण बंधू शंकरराव यांची आहे. तो लागलीच केव्हां तर देतो. मोटारींतून हिंडल्यानं दर्जा वाढतो अशी सर्व साधारण माणसाची कल्पना आहे पण पायीं किंवा सायकलनें माझा दर्जा कमी होतो अशी भावना माझ्यांत उत्पन्न झालीं नाहीं. या मोठेपणासाठीं माझीं केव्हांच खटपट नव्हती. त्यामुळें माझे कधीच समाधान झाले नसते. मला या लोकांचा हेवा वाटत नाहीं.

सात्विकपणाचा टेंभा मला मिरविता येणार नाहीं. तसं निष्पाप मानले गेलेले जीवन माझं गेलं नाहीं. तारुण्यांत माझ्याकडून प्रमाद झाले आहेत. कलावन्त असल्यानं क्षणिक सौंदर्यानं मी वेडा झालो आहे. पण पत्नीची सेवा फार थोडे करतील इतकी मी केली आहे. नवराबायको या नात्यानें माझं कौटुंबिक जीवन प्रेमानं ओथंबलेलं नसलं तरी संपूर्ण कलहानेंही भरलेलं नाहीं.

आमच्यांतील स्वभाव भिन्नतेमुळें त्रासाचे, त्राग्याचे प्रसंग आले तरी पूर्वस्थितीला यायला फार काल लागत नाहीं. तिनें हरएक प्रसंगी माझ्यासाठीं केलेला त्याग, माझ्या ध्येयाला दिलेला पाठिंबा माझ्या अनेक दोषावर प्रेमानें घातलेले पांघरुण व काटकसरीनें चालवलेला संसार यामुळें माझ्या जीवनाला जें एक स्वास्थ प्राप्त झालं तें कधींही विसरण्याजोगे नाहीं. स्त्रियांचा त्याग जगापुढें येत नाहीं. पुरुषच तेवढे मिरवतात पण त्यांना जर त्यांच्या पत्नीचा पाठिंबा नसता तर आलेल्या स्वरुपांत ते जगापुढें दिसलेच नसंत. तिच्या काटकसरी स्वभावामुळेंच मला त्रास झाला आहे. पण त्यामुळेंच आम्ही अब्रुनें दिवस काढूं शकलो. मी मला जे मिळते ते सर्व तिच्या स्वाधीन न करता माझ्याकडेच ठेवले असते तर माझ्या उधळ्या व बेजबाबदार स्वभावामुळें दरवेशीच बनलों असतो.

सागराला भरती ओहटी येतेच कीं नाहीं ! पण समझोता आणि समन्वयाखेरीज कौटुंबिक जीवन चालूं शकत नाहीं हे खरं ! एकूण आढावा सुखाकडेच झुकतो.

आर्थिकदृष्ट्या घसरलेला प्रपंच आज प्रभाकरपंतानी सांवरून धरला आहे. आरोग्याच्यादृष्टीनें सांभाळण्याची जबाबदारी डॉ. धनवडे यांनीं यावेळेंपावेतो पत्करलेली आहे. हृदयाची कालवाकालव झाली तर ती मोकळं करायला डॉ. काटे हे ठिकाण आहे. प्रपंचाच्या दैनंदिन अडचणी अंग-मेहनतीने हलकं करण्याचे काम गणपतराव गायकवाड व अनंत मगर करीत आहेत.

मुलगा दौलत इंजिनिअरिंग कॉलेजच्या सेकंड इयरमध्यें आहे. अभ्यासू आहे, नम्र आहे, सत्‌शील आहे. आज तरी समाधान देत आहे.

बॅ. दादा सावंत व राजे भोसले व्यवसायानें दूर पडले तरी मनानें जवळच आहेत. हद्दपारीवेळीं जिनं थारा दिला ती माझी मानीव बहीण शांता आवटी व वर्गबंधू शंकरराव पारकर यांच्या गोड आठवणींनीं हृदय भांडार भरलेलं आहे. माझे बंधू शंकरराव यांचे श्वशुर कृष्णराव मालपेकर व माझे राजकीय पिताजी काकासाहेब लिमये यांचे उपकार अविस्मरणीय आहेत.

माझी बौद्धिक भूक भागवायला जगांतले मोठे ग्रंथकार सदैव समोर आहेत. माझ्या भाग्यानें माझ्या घराजवळ साहित्यिक वि. स. खांडेकर राहतात. तो एक मोठा मोलाचा ठेवा मला सांपडला आहे. त्यांचा स्नेहसंबंध जुळल्यापासून तो वाढतच आहे. पूर्वीं ज्या अनेक पांढरपेशा पुढाऱ्यांबद्दल मला आदर वाटत असे तो अनुभवानें कमी होत गेला पण भाऊसाहेबांच्याबद्दल मात्र वाढत गेला. त्यांचा सहवास म्हणजे एक बोलका ग्रंथसंग्रहच आहे. एकदां गाडी चालूं झाली कीं लवकर थांबायची नाहीं. जिव्हाळ्याच्या गोष्टी बोलाव्यात, वाङ्मयाविषयीं विचारविनियम करावा, कूट प्रश्न उपस्थित झाला कीं सल्ला घ्यावी. विद्वत्तेप्रमाणंच मन विशाल आहे. अंतःकरण शुद्ध आहे. त्यांची वेळ घेणं म्हणजे त्यांचे आर्थिकदृष्ट्या नुकसान करणं. पण हे जाणूनही त्यांच्या भेटीचा मोह आवरत नाहीं.

कृतघ्नतेनं तसं कृतज्ञतेनं, प्रेमानं तसं द्वेषानं, वैतागानं तसं विचारानं आशेनं तसं निराशेनं, समाजाच्या कोलाहलानीं तसं निसर्गाच्या रोमांचकारी संवेदनांनी, जीवनाच्या स्वास्थ्यानं तसं राजकीय संग्रामानं माझं जीवन संमृद्ध झालं आहे. जनतेची सेवा पंचवीस तीस वर्षांहून अधिक काल इमानें इतबारें केली आहे. सामाजिक, धार्मिक, राजकीय आणि आर्थिक गुलामगिरी विरुद्ध सतत झगडत आलो आहे. हे समाधान काय कमी आहे.? आतां साठी जवळ आलो आहे. पण देहपडेपर्यंत कोणत्यातरी स्वरुपांत संग्राम हा चालायलाच. संग्रामांतही सुख असतचनां! सर्वच गोष्टीं कांहीं व्यापारी ताजव्यांत मोजता येत नाहीं. आणि जीवनाचं सुख तर ताजव्यात मोजता येणार नाहींच नाहीं.

हो. ही तर जगाच्या दृष्टीनं अगदीच क्षुल्लक आणि हास्यास्पद गोष्ट अगदी उल्लेख न करण्याजोगी. पण व्यापारी जगाला क्षुल्लक वाटणारी त्या ताजव्यांत न बसणारी गोष्ट सुद्धा जीवन आनंदमय करूं शकते. शेजारची छोटी वृंदा ' आबा ' म्हणून हंसत हंसत हांक मारीत आली कीं, माझ्या एकाकी वातावरणांत आनंदाचे फवारे उडूं लागतात.! लिहण्याचा व वाचण्याचा थकवा नाहींसा होतो. बालमनाचा आनंद मीं भोगूं शकतो. प्रापंचिक कटकटींचा, मानसिक वैतागाचा दुःखद विचारांचा क्षणभर कां असेना विसर पडतो. निष्पाप निर्मल बालिश प्रेमाची जादू विलक्षणच असते. मोठी माणसे जाणून लहानासारखी प्रेमळपणाने वागतील, सुख दुःखाला अन् मानापमानाला विसरुण वागू लागतील, सूड मत्सर द्वेषापासून अलिप्त राहतील तर जग किती सुखी होईल!

या आनंदाचं मोजमाप व्यापारी तागडीनं कसं करता येणार? गुलाब फुलाच्या सौंदर्यानं आणि संध्यासमयींच्या गुलाल फेकीनं उल्हसित होणारं हृदय ताजव्यांत कसं जोकतां येणार!

माझ्या हातून ज्या अनेक चांगल्या वाईट गोष्टीं झाल्या असतील त्याला जबाबदार माझ्यांतल्या कलावंत. तो मेला कीं मग माझ्या जीवनांत कांहींच गोडी राहणार नाहीं. तसं जीवन जगण्यापेक्षां मरण सुखाचं ठरेल.

# दोन शब्द

( ले.— वि. स. खांडेकर )

माझे स्नेही श्री. माधवराव बागल यांचें हें आत्मकथन मी मोठ्या उत्सुकतेनें वाचलें. महाराष्ट्रीय जनता त्याचें मनःपूर्वक स्वागत करील अशी माझी खात्री आहे.



वाङ्मयांतल्या विविध कृतींचा मी आयुष्यभर आस्वाद घेतला आहे. एखाद्या खादाड माणसा-प्रमाणें म्हणानात. अनेक पुस्तकांवर माझें मनस्वी प्रेम आहे. जेवायच्या वेळीं कुणी नवें पुस्तक आणून दिलें कीं माझे लक्ष जेवणांत रहत नाहीं. मी बेचैन होतों, कसेबसे चार घांस पोटांत घालून उठतों आणि त्या नव्या पुस्तकाच्या जगांत रमून जातों. आवडीचें खेळणें मिळालें कीं लहान मुलाची अशीच स्थिति होतें हें मला कळतें. पण वळत मात्र नाहीं. मग मन आवरण्याचा निष्फळ प्रयत्नही मी करीत नाहीं. नाहींतरी आपण सारीं आपापल्यापरी लहान मुलेंच असतों! कशानें तरी वेडें होण्याचा गुण किंवा अवगुण आपल्यापैकीं प्रत्येकाच्या अंगीं थोडाफार असतोच. मला वाटतें, माणसें अशीं अधुनमधून थोडीं वेडी होतात हें फार बरें आहे. त्या वेडाच्या बळावरच निष्ठुर नियतीशीं व जड जगाशीं तीं टक्कर देऊं शकतात.

तें कांहीं असो. पुस्तकें मला विलक्षण मोह घालतात हें खरें आहे. पण विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे काव्यनाटकांपेक्षां आणि कथाकादंबऱ्यापेक्षां आत्मचरित्रें मला अधिक आवडतात. लक्ष्मीबाई टिळकांची 'स्मृति चित्रें' किंवा इझाडोरा डंकनचें 'My Life' हीं पुस्तकें मी प्रथम वाचलीं तेव्हां माझ्या अत्यंत आवडत्या ललितकृतीपेक्षांही त्यांचे आकर्षण मला अधिक वाटलें होतें. साहित्यसौंदर्य या पुस्तकांत निःसंशय आहे. पण तें इतर अनेक पुस्तकांतूनही मी अनुभविलें होतें. या आत्मचरित्रांनीं माझ्या मनावर जी विलक्षण मोहिनी घातली ती सौंदर्याची नव्हती. सत्याची होती. पुष्कळ पावसाळे पाहून, शेंकडो पुस्तकें वाचून आणि दहावीस सटरफटर पुस्तकें लिहूनही जीवनविषयक सत्याचें अद्यापि आपल्याला स्पष्ट दर्शन झालेलें नाहीं, क्वचित् दर्शन झालें असले तरी त्याला स्पर्श करता आलेला नाहीं, ही रुखरूख मला नेहमींच अस्वस्थ करून सोडीत आली आहे. ती दूर करणारे क्षण वर उल्लेखलेलीं आत्मचरित्रें वाचतांना मला लाभले. उत्तररामचरित, किंग लियर, बिवेअर ऑफ पिटी, विप्रदास, पण लक्षांत कोण घेतो, ॲना कॅरेनिना, एकच प्याला, भाऊबंदकी या सर्व ललितकृती वाङ्मयाची भूषणें आहेत. त्यांनीं मला बुद्धीचा, भावनेचा अपार आनंद दिला आहे. एवढेंच नव्हे तर अंतर्मुख करून जीवनाविषयीं स्पष्ट विचार करायला शिकविलें आहे. असें असूनही या श्रेष्ठ साहित्यकृतींतून मला जीवनविषयक सत्याचें जें दर्शन झालें त्यांत एक प्रकारची गोलाई आहे. ही गोलाई वाङ्मयानंदाच्या दृष्टीनें गुण ठरत असेल! पण तिच्यामुळें सत्याचें स्वरुप थोडेंसें कां होईना, बदलतेंच! एखादें दृश्य चांदण्यांत पाहणें निराळें आणि उन्हांत पाहणें निराळें! टेकडी तीच असते. सभोंवतालची सृष्टि तीच असते. पण आपल्या मनावर होणारा त्या दृश्याचा परिणाम मात्र दोन्ही वेळीं अगदीं भिन्न होतो. चांदण्यांत वेड्यावांकड्या वस्तूंनाही सौंदर्य प्राप्त होतें. सूर्यकिरणें तो तलम जाळीदार बुरखा दूर सारून टाकतात. म्हणूनच गायत्री मंत्रांत आमची बुद्धि जागृत कर, तिला चालना दे, अशा अर्थाची जी सूर्याला उद्देशून प्रार्थना केली आहे तिचें मर्म आत्मचरित्रें वाचतांना मला पटतें. वाङ्मयाच्या इतर प्रकारांत लेखक जें सत्य सांगतो तें अनुभूतींतून निर्माण झालेलें असतें यांत शंका नाहीं. पण तिथें

त्या अनुभूतीवर कल्पनेचे संस्कार होतात. त्या संस्कारांशिवाय श्रेष्ठ कला संभवतच नाहीं. आत्मचरित्राचा मोठा विशेष हा आहे कीं त्यांत प्रतिभेच्या विलासाला वाव असला तरी मूळ वस्तूचें स्वरूप बदलण्याचा तिला आधिकार नाहीं. त्यामुळेंच प्रामाणिक आत्मवृत्तें मनुष्याला सत्याच्या जितकें जवळ नेतां येईल तितकें नेतात. माधवरावांच्या या आत्मवृत्ताचें मी मनःपूर्वक स्वागत करतों तें याच दृष्टीनें.

* * *

इथें साहजिकच अनेक प्रश्न मनांत येतात. ते प्रश्न उघडपणें बोलून दाखविण्याची पद्धत आपल्याकडे नाहीं. पण त्यांचा विचार करणें आवश्यक आहे. ते प्रश्न असे— सारींच आत्मचरित्रें प्रामाणिकपणानें लिहिलीं जातात काय? लिहायला बसतांना आपल्या आयुष्यांतील प्रत्येक घटनेकडे अगदीं अलिप्त दृष्टीनें पहायचें मनुष्यानें ठरविलें तरी तें त्याला शक्य आहे काय? समोर घडलेल्या एका प्रसंगाचें वर्णन दोन माणसें परस्परविरोधी प्रकारांनीं करतात हें पाहून रॅलेनें स्वतः लिहिलेला जगाचा इतिहास फाडून टाकला या कथेचें मर्म आत्मचरित्रांत संपूर्ण सत्य प्रतिबिंबित झालेलें असतें असें मानणारांनीं लक्षांत घ्यायला नको काय? प्रसंगीं सत्य हस्तगत करण्याकरितां माणसाच्या मनानें मारलेली उंच उडी सत्याच्या पलीकडेही जाऊन पडत असेल! नाहीं कुणी म्हणावें? वामन मल्हार जोश्यांची एक गोष्ट सांगतात. ते मुंबई विद्यापीठाचे परीक्षक होते. त्यांच्याकडे आलेल्या पेपरांत कुणा नातेवाईकाचा पेपर होता. तो विद्यार्थी हुषार होता. वामनरावांच्या पेपरांत त्यालाच सर्वांत जास्ती मार्क मिळत होते. पण त्यांच्या मनांत आलें, हा विद्यार्थी उद्यां पहिला आला तर आपलेपणामुळें मी त्याला अधिक गुण दिले असा लोकांच्या मनांत संशय येईल. तो येतां कामा नये. या विचाराचा पगडा मनावर बसतांच त्यांनीं त्या बिचाऱ्याचे चार गुण कमी केले! त्याला पहिला नंबर न मिळतां दुसरा मिळाला.

ही हकीगत सत्यकथा असो वा दंतकथा असो. तिचा बोध उघड आहे. सत्याच्या शोधांत सुद्धां मनुष्य सत्यापासून दूर जाण्याचा

संभव असतो. आपण सत्याच्या शोधाला निघालेले गृहस्थ आहों ही जाणीव असणें हा सुद्धां अहंकाराचाच एक भाग आहे. तो अहंकार सात्विक आहे असें फार तर आपण म्हणूं. पण सत्याचें स्पष्ट दर्शन होण्याच्या आड तो येणे शक्य आहे हें कुणीच नाकारणार नाहीं.

जिथें सात्विकतेमुळें सुद्धां सत्य विकृत होण्याचा संभव असतो तिथें सत्तेच्या, संपत्तीच्या, लोकप्रियतेच्या, मोठेपणाच्या किंवा अशाच दुसऱ्या कुठल्याही राजस महत्वाकांक्षेच्या मागें लागून जीवन चालविणाऱ्या माणसांच्या हातून त्यांचें यथार्थ चित्र कसें रेखाटलें जाईल ? आत्मगौरव, आत्मसंरक्षण, आत्मसमर्थन वगैरे प्रवृत्ती मानवी मनाचें सारे दरवाजे रोखून सदैव सज्ज असतात. त्या सर्वांच्या पहाऱ्याला न जुमानतां त्या दरवाज्यांतून मानवाचा आत्मा जेव्हां बाहेर येतो, तेव्हांच त्यांच्या प्रत्येक शब्दांत सत्याचें मूर्तिमंत दर्शन होतें गांधीजी, लक्ष्मीबाई टिळक, इझाडोरा डंकन इत्यादिकांच्या आत्मवृत्तांत हा अनुभव आपणांला येतो. मात्र त्याजबरोबर आत्मचरित्र लिहिण्याकरतां बैठक घालून मिळतील त्या शिळ्याताज्या फुलांनीं आत्मपूजा करणारी माणसेंही आपल्याला आढळतात. तीं बुद्धीमान व कर्तृत्ववान असतात यांत शंका नाहीं. जीवनाच्या क्षेत्रांत त्यांनीं कुठें ना कुठें पराक्रम केलेला असतो. त्या पराक्रमाचा त्यांना अभिमान वाटावा हें मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. पण अहंकाराच्या रथांत बसून सारी पृथ्वी पालथी घातली तरी सत्याचें दर्शन होणें कठिण आहे हें कांहीं केल्या त्यांच्या लक्षांत येत नाहीं.

अशा माणसांचें मला क्षणभर हंसूं येतें. पण तो क्षण गेला कीं मनुष्यस्वभावाविषयीं सहानुभूति वाटूं लागते. माणूस हा स्वभावतःच नारसिस आहे. आपल्या प्रतिबिंबावर प्रेम करणें हा त्याचा नैसर्गिक मनोधर्म आहे. गेल्या पांच हजार वर्षांत त्याची बुद्धि हजार मुखांनीं समुद्राला मिळणाऱ्या गंगेप्रमाणें वृद्धिंगत झाली असेल. नानाप्रकारचे शास्त्रीय शोध लावून त्यानें निसर्गावर मोठमोठे विजय मिळविले असतील. साहित्य आणि संस्कृति यांच्या साहाय्यानें त्याचें बाह्य स्वरुप संपूर्णपणें सुधारले असेल. पण एवढ्यावरून त्याचें अंतरंग बदललें आहे अशी कल्पना करणें चुकीचें नाहीं का ? किंबहुना तशी अपेक्षा करणें म्हणजे

जीवनाचा सिद्धांत सोडवितांना भलतीच गोष्ट गृहीत सत्य म्हणून मानण्याची चूक करण्यासारखें आहे.

माझें हे प्रतिपादन पुष्कळांना आवडणार नाहीं. मनुष्याचा आंतरिक विकास एकसारखा सुरू आहे, पशुत्वाकडून देवत्वाकडे त्याचा झपाट्याने प्रवास होत आहे, तो स्वभावतः सत्प्रवृत्त आहे, या जगांत दुर्जनांचे सुद्धां हृदयपरिवर्तन होऊं शकते, वगैरे वगैरे गोष्टी वारंवार आपल्या कानावर पडत असतात. लहान मुलाला साखर आवडते ना ? तशा असल्या गोडगोड गोष्टी समाजाला मोठ्या प्रिय होतात. त्या गोष्टींत सत्याचा भाग किती आणि स्वप्नरन्जनाचा किती याची चिकित्सा करण्याची त्याला इच्छा नसते ! आणि क्वचित् इच्छा झाली तरी शक्ति नसते ! त्यामुळें जीवनविषयक अर्धसत्यें किंवा अपसिद्धांत समाजमनांत दृढमूल होऊन बसतात. मनुष्यांतल्या सुप्त देवपणाचा सिद्धांत थोडाफार असाच आहे. त्यांत सत्य आहे पण तें अनेक गोष्टींनीं मर्यादित केलें आहे. मनुष्यस्वभावाच्या या मर्यादा आपण सोईस्करपणानें विसरतो. फ्रँकलिन, रूसो, गटे, नेपोलियन हीं माणसें जगाच्या दृष्टीनें कांहीं लहानसहान नाहींत. काळाच्या वाळवंटांत त्यांची पावलें कायमची उमटली आहेत. त्यांतला नेपोलियन तेवढा राजकारणीं पुरुष म्हणून प्रसिद्ध आहे. उरलेल्या तिघांचा लौकिक विचारवंत, तत्वज्ञ, महाकवि अशाच प्रकारचा आहे. या थोर थोर लोकांची आत्मचरित्रें हे जीवनविषयक अनुभूतींवर टाकलेले प्रकाशाचे झोत असायला नकोत काय ? पण तसें नाहींत !

प्रत्येक मनुष्य एक कादंबरी लिहूं शकेल, त्याकरतां त्यानें दुसरी कांहीं धडपड करायला नको, फक्त आपलें जीवन जसें घडलें तसें त्यानें ते कागदावर उतरवावें, अशा अर्थाचे उद्गार अनेकदा ऐकूं येतात. ते काढणाऱ्यांच्या डोळ्यांपुढें एकच गोष्ट असते—मनुष्य कितीही सामान्य असला तरी प्रत्येकाच्या आयुष्यांत नशिबाचे चढउतार, सुखदुःखांचा पाठशिवणीचा खेळ, मानसिक द्वंद्वे इत्यादि गोष्टी त्याच्या त्याच्या परीनें विपुल असतात. कादंबरीला हेंच साहित्य हवें असतें. या उद्गारांविरूद्ध मला कांहींच म्हणायचें नाहीं. पण त्यांत आत्मचरित्र आणि कादंबरी यांची जी एकरूपता ध्वनित करण्यांत आली आहे, ती दुसऱ्या अर्थानेंही खरी आहे

असें माझें मत आहे. तो अर्थ म्हणजे मनुष्य प्रामाणिकपणानें आत्मचरित्र लिहायला बसतो. पण नकळत त्याचें कादंबरींत रुपांतर होण्याचा संभव असतो.

माझें हें विधान अनेकांना अतिशय अश्रद्धपणाचें वाटेल. म्हणून चरित्रें व आत्मचरित्रें या विषयांवर अत्यंत अधिकारी गणला गेलेला जागतिक कीर्तिचा लेखक स्टीफान झ्वाइग याचें या बाबतींतलें मत मी इथें उद्धृत करतो. कॅसानोव्हा या प्रसिद्ध प्रेमवीराच्या आत्मचरित्राचें परामर्श घेतांना झ्वाइग म्हणतो, ‘ कुणीही आपली जीवनकथा सांगू लागतो तो कांहीं तरी हेतु मनांत धरूनच. त्याचें सांगणें नुसतें सहेतुकच नसतें. त्यांत एक प्रकारचें नाट्यही असतें. आपण रंगभूमीवर उभे आहों, प्रेक्षकांचे डोळे आपल्याकडे लागलेले आहेत, याची जाणीव त्याच्या अंतर्मनांत कुठें ना कुठें जागी असतें. साहजिकच तो कुठला तरी विशिष्ट दृष्टिकोन स्वीकारतो, आपली भूमिका मनोवेधक व्हावी म्हणून धडपडतो, आपल्या प्रत्येक हालचालींचा प्रेक्षकांवर काय परिणाम होईल याचा विचार करतो. ’ फ्रँकलिन आत्मचरित्र लिहितो तें नीतिबोधाच्या दृष्टीनें. बिस्मार्क तो महत्वाचा ऐतिहासिक स्वरुपाचा खर्डा मानतो. रूसोला रोमांचकारकता प्रिय आहे. गटे कलाकृति या दृष्टीनें आत्मचरित्राकडे पाहतो. नेपोलियन तें केवळ आत्मसमर्थनच नव्हे तर आत्मस्मारकही व्हावें अशी इच्छा बाळगतो. आत्मचरित्र लिहितांना नैतिक, ऐतिहासिक अथवा वाङ्मयीन क्षेत्रावर त्याचा परिणाम व्हावा ही इच्छा यांच्यापैकीं प्रत्येकाच्या ठिकाणीं आहे. त्यामुळें कळत न कळत त्यांच्या लेखनांतल्या स्वैरतेला—म्हणजेच सत्याला—मर्यादा पडल्या आहेत, आत्मचरित्र लिहितांना प्रसिद्ध पुरुष भीति आणि विचार यांच्या छायेखालीं वावरत असतात. लोकांच्या मनांत आपली एक मूर्ति आहे, तिच्याशीं जिचा चेहरामोहरा जुळेल अशी मूर्तिच आपल्या लिखाणांतून तयार झालीं पाहिजे, याची जाणीव त्यांना असतें. साहजिकच सार्वजनिक माणसें संपूर्णतः वैयक्तिक होऊं शकत नाहींत. जनतेशीं तीं अनेक बंधनांनीं निगडित झालेलीं असतात.

* * *

थोडा फार प्रसिद्ध असलेला माणूसच आत्मचरित्र लिहितो. अगदीं अप्रसिद्ध असा मनुष्य दुसरें कांहींहीं लिहिण्याचा प्रयत्न करील. पण आत्मचरित्राच्या मार्गाला तो सहसा लागणार नाहीं. त्यानें तें लिहिलें तरी वाचणार कोण? यामुळें आत्मचरित्राच्या बाबतींत एक विचित्र वर्तुळ निर्माण होतें. मनुष्य प्रसिद्ध असल्यावांचून त्याच्या आत्मचरित्राला महत्व येत नाहीं. पण तो प्रसिद्ध असल्यामुळेंच लोकांच्या मनांत त्याच्याविषयींच्या कांहीं कल्पना दृढमूल झालेल्या असतात. या कल्पनांशीं सर्वस्वी विसंगत असें कांहीं आपल्या कहाणींत येऊं नये अशी दक्षता त्यानें घ्यावी हें स्वाभाविकच आहे. हारांच्या कांहीं कांहीं वेळां शृंखला होतात त्या अशा.

* * *

माधवरावांच्या आत्मकथनाविषयीं दोन शब्द लिहितांना आत्मचरित्रांतल्या सत्याच्या स्वरुपाविषयीं मी एवढा प्रपंच केला त्याला तसेंच कारण आहे. आत्मचरित्र ही जीवनविषयक सत्याकडे जाण्याची सर्वांत जवळची वाट आहे. पण ती जितकी जवळची तितकीच अवघड आहे.

ही अवघड वाट माधवरावांनीं चोखाळली हें फार बरें झालें. गेल्या शंभर वर्षांत आपलें जीवन एकसारखें बदलत गेलें आहे. पिढीपिढीला नव्या लढाया लढाव्या लागल्या. नाना रंगांनीं रंगलेलीं जीवनें जीवनांत रंग भरून गेलीं. पण त्यांच्यापैकीं फारच थोड्यांचें— अगदीं हाताच्या बोटावर मोजण्याइक्याच आयुष्यक्रमांचेच आत्मचरित्राच्या द्वारें आपल्याला दर्शन झालें. हें दर्शन किती रंजक, किती रसपूर्ण, किती विचारप्रेरक आणि जीवनविषयक अंतिम सत्याच्या किती जवळ नेणारें असतें हें लक्ष्मीबाई टिळकांच्या स्मृतिचित्रांवरून सहज दिसून येईल. त्या कालखंडांतल्या धार्मिक, नैतिक, सामाजिक आणि आर्थिक मूल्यांवर, त्यांच्या संघर्षावर आणि त्या संघर्षांतून विकास पावणाऱ्या विशिष्ट व्यक्तिजीवनांवर या आत्मचरित्रानें किती स्वच्छ प्रकाश टाकला आहे. तें वाचतांना एका धीरगंभीर स्त्रीच्या आणि एका अभिजात कवीच्या व्यक्तित्वाशी आपला किती निकटचा परिचय होतो. त्या व्यक्तित्वांतलें वैचित्र्य आणि

विरोध पाहिले म्हणजे माणसाच्या मनाची आणि जीवनाची गुंतागुंत किती विलक्षण भासते ! मानवी जीवन हा एक अनंतपदरी गोफ आहे. शेंकडो धागे गुंफून तो गोफ विणला जातो. त्यानंतर कुठल्याही धाग्याला धक्का न लावतां तो उलगडणें हें मोठें कठिण काम असतें. ' स्मृतिचित्रां ' सारखें आत्मचरित्रच हें काम अतिशय कुशलतेनें आणि प्रामाणिकपणानें करतें. म्हणूनच आत्मचरित्रें आपल्याला आवडतात, अतिशय जवळचीं वाटतात. जीवनविषयक समस्यांची आपली जाणीव त्यांच्यामुळें तीव्र व स्पष्ट होते.

* * *

' जीवनप्रवाह ' हें माधवरावांचें आत्मचरित्र मी उत्सुकतेनें वाचलें तें यामुळेंच. गेलीं पंधरा वर्षे माधवरावांचा व माझा स्नेह आहे. या स्नेहाचें सारें श्रेय त्यांना आहे. कोल्हापुरांत येण्यापूर्वी त्यांचें व माझे मित्र श्री. नी. गो. पंडितराव यांच्या सांगण्यावरून मी त्यांच्या एका कथासंग्रहाला प्रस्तावना लिहिली होती. पण लेखनांत प्रतिबिंबित झालेलें माणसाचें व्यक्तित्व त्याच्या व्यावहारिक स्वभावाशीं नेहमी जुळतेंच असें नाहीं. त्यामुळें कोल्हापूरला आल्यावर माधवरावांचा परिचय कुणाच्यातरी मार्फत करून घ्यावा असें मी मनांत ठरविलें होतें. पण घडलें तें नेमकें उलटें. मी आलों आहे हें कळतांच माधवराव पटवर्धन मला भेटायला आले. त्यांनीं कोल्हापूरच्या साहित्यविषयक व इतर वातावरणाची मला माहिती दिली. कुणाचें चहाचें निमंत्रण स्नेहभावाचें असेल, कुणाकडून चहाच्या प्याल्यांत वादळ निर्माण केलें जाईल, मी कुणाशीं कसें वागावें, हें त्यांनीं मला सद्‌भावानें आणि सविस्तर सांगितलें. माधवराव निघून गेल्यानंतर कांहीं वेळानें ' तुमच्याकडे माधवराव आले आहेत ' म्हणून कुणीतरी सांगतांच मी चकित झालों. अजून मला द्यायच्या कांहीं सूचना शिल्लक राहिल्या असाव्यात आणि तेवढ्यासाठीं माधवराव पटवर्धन परत आले असावेत अशी माझी कल्पना झाली. पण पाहतों तो चेहऱ्यामोहऱ्यानें मला सर्वस्वीं अपरिचित असलेले माधवराव बागल माझ्यासमोर उभे आहेत. मी आल्याचें कुणाकडून तरी त्यांना कळलें होतें.

या गोष्टीला पंधरा वर्षें होऊन गेली. या काळांत माधवरावांनीं अनेक मोठ्या चळवळी केल्या. कोल्हापूरचें राजकारण तळापासून ढवळून काढलें, समाजकारण आवेशानें पुढें रेटलें. या काळांत प्रथम कैदी होऊन त्यांनीं तुरुंग पाहिला आणि नंतर मंत्री होऊन राजवाड्यांत पाऊल टाकलें पुढे त्यांनीच ते टाकले ही गोष्ट निराळी या काळांत लोकप्रियतेच्या उत्तुंग लाटांवर ते आरूढ झाले आणि त्या लाटा फुटून, ओसरून गेल्यावरही स्वतःच्या विचारप्रणालीशीं एकनिष्ठ राहिले. माझ्यामागें नेहमींच विविध व्यापताप असतात. कांहीं कौटुंबिक, कांहीं, सार्वजनिक. त्यामुळें आपण होऊन उठून मी माधवरावांच्या घरीं गप्पागोष्टी करायला जाऊन बसलो आहे असें क्वचितच घडलें असेल. पण ते मात्र अगदीं पहिल्या दिवशींप्रमाणें वारंवार माझ्याकडे येतात. दोन दोन तास आम्ही बोलत बसतों. कला, साहित्य, राजकारण, समाजकारण सारे विषय आमच्या संभाषणांत येऊन जातात. आपलीं मतें आणि अनुभव माधवराव मला मोकळेपणानें सांगतात. या बोलण्यांत त्यांच्या स्वभावाचें स्वच्छ प्रतिबिंब पडतें. माधवराव असें बोलूं लागले कीं, एक गोष्ट राहून राहून माझ्या मनांत येतें. हें मन मुत्सद्याचें नाहीं. ते कलावंताचे आहे. कुठलेंही सुखःदुख स्वतःला जसें जाणवलें असेल तसेंच तें प्रगट करणें हा या मनाचा मुख्य धर्म आहे. उत्कटता हा त्याचा स्थायीभाव आहे.

'जीवन प्रवाह' वाचतांना त्यांच्या या वृत्तीपेक्षां ज्या राजकारणांत आणि समाजकारणांत त्यांनीं भाग घेतला त्याचा ठसा मनावर अधिक उमटतो. एका दृष्टीनें हें अपरिहार्य आहे. माधवराव घ्या किंवा त्यांच्या पिढींतले दुसरे अनेक कर्तबगार लोक घ्या, त्यांच्या जीवनांत द्विधा झालेल्या व्यक्तित्वाच्या खुणा स्पष्टपणानें दिसतात. द्विधा झालेलें व्यक्तित्व ( Split personality ) हा या विसाव्या शतकाला मिळालेला शाप आहे कीं वर आहे हें माझें मलाच कळत नाहीं. प्राचीन काळीं आपल्या स्वभावाशीं सुसंगत अशा जीवनक्रमाचा अंगीकार व्यक्ति अधिक सुलभतेनें करूं शकत असे. त्या काळचें जीवन सरळ व संकुचित होतें, तें अनेक कारणांनीं एकारलेलें होतें, आजच्यासारखे विविध व विलक्षण प्रश्न मानवापुढें आणि मानवजातीपुढें त्यावेळीं उभे नव्हते, हें खोटें नाहीं. पण एवढें खरें कीं, कर्तृत्ववान व्यक्तीचें जीवन व मन आजच्या काळाप्रमाणें परस्पर-

विरोधी प्रेरणांच्या, भावनेच्या आणि विचारांच्या संघर्षानें त्याकाळीं अंकीत झालेलें नसे. अशा द्विधा झालेल्या व्यक्तित्वाची आपल्याकडील अनेक उदाहरणें देतां येतील. सर्वपरिचित दोन नांवाचाच मी इथें उल्लेख करतों. तीं म्हणजे सावरकर व अत्रे.

* * *

दोन अडीच तपें राजकीय आणि सामाजिक चळवळींत घालवून आणि त्यांचें पुढारीपण करून माधवरावांतला कलावंत अजूनही पूर्णपणें जागृत आहे. त्यांची सौंदर्यदृष्टि अतिशय सूक्ष्म आहे. लहानसहान गोष्टींतही ती दिसून येतें. मध्यंतरीं मराठी मासिकांच्या मुखपृष्ठांविषयीं त्यांनीं एक लेख लिहिला होता. या मुखपृष्ठांवर तरुणींची चित्रें स्वैरपणानें रेखाटणाऱ्या आणि त्यांच्या आंगोपांगावर रंग उधळीत सुटणाऱ्या नामांतिक चित्रकारांची त्या लेखांत त्यांनीं अधिकारवाणीनें हजेरी घेतली होती. एखाद्या बैठकीच्या खोलींत फक्त एकच कलापूर्ण चित्र असलेलें त्यांना आवडेल. पण पोरा-सोरांनीं किंवा त्यांच्याइतकीच ज्यांच्या अभिरुचीची वाढ झाली आहे अशा थोरांनीं बरीवाईट मिळतील तीं चित्रें पैदा करून खोलीची सजावट केलेली पाहिली कीं त्यांच्या कपाळाला आटी पडते. भडक रंगांतल्या वेड्या-वांकड्या कॅलेंडरांची तर त्यांना अगदीं शिसारी आहे !

कलेच्या निर्वेध उपासनेपलीकडची या जगांतली कुठलीच गोष्ट न जाणणाऱ्या चित्रकार आबालालांच्या आठवणी त्यांच्या तोंडून मी अनेकदां ऐकल्या आहेत. आबालालांविषयीं बोलतांना कलेचें उदात्त पातळीवरलें जें जग आहे त्याच्याविषयींची भक्ति केवळ त्यांच्या शद्बांतच नव्हे तर स्वरांतही प्रगट होते. सुंदर साहित्याचेही ते असेच शोकी आणि दर्दी आहेत. सामाजिक आशय असलेलें किंवा प्रचार करणारें वाङ्मयच त्यांना आवडतें असें नाहीं. पर्ल बकची Pavilion of Women ही कादंबरी वाचून त्यांच्या मनावर झालेला परिणाम मला अद्यापि आठवतो. चाळिशी उलटलेल्या चीनमधल्या एका विचारी, कर्तबगार स्त्रीचें चित्र आहे तें. त्या चित्रांत प्रौढ जीवनांतला एक महत्वाचा प्रश्न लेखिकेनें मोठ्या नाजूक-पणानें हाताळला आहे. एमिल ब्रॉंटीचें Wathering Heights चांगले

आहे असे कुणाकडून तरी कळतांच त्यांनी मुद्दाम तें माझ्याकडून वाचायला नेलें. अगदीं परवां स्टीफान झ्वाईगच्या कलेविषयीं ते मोठ्या प्रेमानें आणि आदरानें बोलत होते. ते खादी वापरतील. पण त्या खादीच्या पोशाखांत त्यांना थोडासुद्धां गबाळेपणा चालणार नाहीं. त्यांत रंगसंगति हवी, नीटनेटकेपणा हवा. ते दोन खोल्यांच्या घरांत राहतील. पण त्यांच्या खोलींत सुंदर चित्रें, सुंदर पुतळे, सुंदर पुस्तकें त्यांना सभोंवतीं हवीत.

* * *

कोल्हापूरच्या एका प्रतिष्ठित मराठा घराण्यांत जन्म पावलेला, लहानपणीं ऐषआरामांत वाढलेला, भोंवताली सरंजामशाहीचें सुखलोलुप वातावरण असलेला आणि चित्रकलेची उपजत देणगी मिळालेला तीन तपापूर्वीचा एक तरुण उग्र राजकारणाकडे कसा ओढला गेला, जिथें त्याचे वडील बडे अधिकारी होते तिथेंच संस्थानीं सत्तेशीं झुंज घेणाऱ्या प्रजापरिषदेसारख्या संस्थेचें नेतृत्व करण्यापर्यंत त्याची मजल कशी गेली. मनांत आणिलें असतें तर ज्या रस्त्यांवरून राजाच्या मर्जीतला मोठा मनुष्य म्हणून तो मिरवूं शकला असता त्याच रस्त्यांवरून पायांत बेड्या घालून फिरावें लागलें तरी तो आपल्या ध्येयापासून रेसभरही कसा ढळला नाहीं, या साऱ्या गोष्टी ' जीवनप्रवाहां 'त वाचतांना मन रोमांचित झाल्यावांचून राहत नाहीं. माणसाचें आयुष्य ही मोठी नाट्यपूर्ण कादंबरी असते असें वाटूं लागतें. मला या बाबतींत एकच गोष्ट थोडीशी स्पष्ट करून सांगायची आहे. माधवरावांचें मन विशिष्ट प्रकारच्या कलावंताचें होतें म्हणूनच हें सर्व घडूं शकलें. अशा प्रकारच्या व्यक्तित्वांत बुद्धीपेक्षां भावना फार प्रबळ असते. त्या भावनेला भोंवतीं जें जें विषम, विकृत अथवा विसंगत आढळेल, त्याच्या त्याच्या दर्शनानें ती प्रक्षुब्ध होते. सुसंगति आणि सौंदर्य यांची पूजा करणारें असें उत्कृष्ट मन परिस्थितीनें थोडेसें अंतर्मुख झालें कीं तें प्रत्यक्ष कृतीकडे वळते. माधवरावांच्या या विकासाला राजर्षि शाहू छत्रपति, महात्मा ज्योतिराव फुले, महात्मा गांधी, कार्ल मार्क्स यांच्या जीवनांनीं आणि तत्वज्ञानांनीं पुष्कळ साहाय्य केलें. पण त्यांचें मूळचें मन मृदु, सौंदर्यप्रेमी, संवेदनाशील आणि सहज प्रक्षुब्ध

होणारें असें नसतें तर हीं सारीं जीवनें पाहून आणि तत्वज्ञानें वाचून त्यांनीं चळवळींच्या अग्निकुंडांत वारंवार उडी टाकली असती कीं नाहीं याची शंकाच आहे. जातिवंत कलावंत हा एकप्रकारचा अवलिया असतो. त्यामुळेंच प्रत्येक गोष्टीचा तोलून, मोजून, मापून व्यवहारदृष्टीनें विचार करणें त्याला जमत नाहीं. या काळांत माधवरावांपेक्षां वयानें आणि विद्वत्तेनें मोठीं असलेलीं माणसें कोल्हापूरच्या मराठा समाजांत नव्हतीं असें नाहीं. त्यांच्या बुद्धीला भोंवतालची धार्मिक, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय वैगुण्यें दिसत नव्हतीं असेंही नाहीं. व्यावहारिक दृष्ट्या सोईस्कर अशा कांहीं सुधारणांचा पुरस्कार त्यांच्यापैकीं अनेकांनीं आयुष्यभर केलाही असेल. पण हीं सर्व माणसें आगींत शिरणारीं नव्हतीं. आगीपासून दोन पावलें दूर राहून ती विझवण्याकरतां जें कांहीं करतां येईल तें त्यांनीं कदाचित् केलें असेल. सार्वजनिक काम करूं इच्छिणाऱ्या मनुष्याच्या ठिकाणीं बुद्धिइतकीच प्रबळ अशी भावना नसेल तर त्याचें जीवन नकळत दुटप्पी बनतें. तो तोंडानें सुधारणेचा—प्रसंगी क्रांतीची—पुरस्कार करतो. पण त्याला क्रांति हवी असते. ती स्वतःचें स्थान सुरक्षित राखून, तिच्या ज्वाला आपल्या बंगल्यापर्यंत, बँकबुकापर्यंत, आणि बायकापोरापर्यंत पोंचूं नयेत अशा बेतानें. हीं माणसें स्वतःला बुद्धिवादी म्हणवितात, पण खरोखर तीं असतात बुद्धिजीवी. बुद्धिवादाच्या प्रखर अग्नींत स्वतःच्या आयुष्याचा होम करणाऱ्या र. धों. कर्व्यांशीं काय किंवा भावनेच्या बळावर आपल्या प्रिय असलेल्या कार्याला वाहून घेणाऱ्या माधवराव बागलांशीं काय, त्यांचे दूरचें सुद्धां नातें नसतें. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर हा वर्ग संख्येनें कमी न होतां वाढूं लागला आहे. जन्मभर पैसे मिळविण्याचा भलाबुरा उद्योग करावा, प्रतिष्ठितपणासाठीं अधुनमधून सामाजिक व्यासपीठावर उभें रहावें, ज्योतिराव—आगरकर किंवा टिळक—गांधी यांचीं नांवें पुनःपुन्हां घ्यावींत, इकडे लोकांपुढें त्यागाचीं आणि सुधारणेचीं प्रवचनें झोडावींत आणि तिकडे आपलें आर्थिक स्वास्थ्य व कौटुंबिक प्रतिष्ठा कशी वाढेल याची व्यवस्था करीत बसावें, हा संप्रदाय महाराष्ट्रांत पूर्वींपेक्षां अधिक प्रतिष्ठा पावूं लागला आहे. ‘ सर्वे गुणाःकांचनमाश्रयंते ’ या न्यायानें या संप्रदायाला व्यावहारिक

यशही मिळतें. या संप्रदायाचे लोक एका विशिष्ट जातींत किंवा वर्गांत असतात असें मुळींच नाहीं. महाराष्ट्रांतल्या ब्राह्मणेतर चळवळीच्या इतिहासाची किंवा तिच्या सामाजिक परिणामांची चर्चा करण्याची जागा ही नव्हे, पण त्या चळवळीनें धरावें तसें बाळसे धरलें नाहीं, तिच्यांतल्या पुढाऱ्यांना परवांपरवांपर्यंत अखिल महाराष्ट्राचें पुढारीपण करतां आलें नाहीं, त्या चळवळीच्या मुळाशीं असलेल्या समतेच्या तत्वांची बीजें बहुजनसमाजांत अजूनही रुजूं शकलेलीं नाहींत, याचें एक कारण स्वतःला सर्व बाजूंनीं संभाळून समाजक्रांति करूं इच्छिणारांचा त्या चळवळींत झालेला समावेश हें होय असें मला वाटतें. सुखवस्तु किंवा संधिसाधु पुढाऱ्यांच्या ताब्यांत कुठलीही संस्था गेली कीं तिची प्रेरक वृत्ति मर्यादित होऊं लागते. राखेच्या ढिगाऱ्याखालीं सांपडलेल्या अग्निकणांप्रमाणें तिचें प्रभावी तत्वज्ञान निस्तेज होत जातें. कॉंग्रेसच्या बाबतींत कांहीं प्रमाणांत हा अनुभव सध्यां आपण घेत आहोंच.

माधवरावांचें मोठेपण मी एकाच गोष्टींत मानतो—सुखवस्तु किंवा संधिसाधु पुढारीपणाचा अवलंब त्यांनीं कधींच केला नाहीं. गुलामगिरीची—मग ती धार्मिक रुढीची असो वा संस्थानी सरंजामशाहीची असो—त्यांना उपजतच चीड आहे. त्यांच्या कलावंत मनानें हा स्फुलिंग फुलविला. त्याची ज्वाला झाल्यावर व्यवहारदृष्ट्या ती आपल्याला भाजून काढील, प्रसंगी जाळून टाकील, या कल्पनेनें ते कधींही कचरले नाहींत. ज्या ज्या अन्यायानें त्यांना व्यथित आणि संतप्त केलें, त्याच्यात्याच्याशीं टक्कर देण्याकरितां ते उभे राहिले. ही टक्कर साध्या भिंतीशीं आहे कीं प्रचंड खडकाशीं आहे याचा त्यांनीं विचार केला नाहीं. तो विचार केला नाहीं म्हणूनच अंतस्थ ओढीनें सारें आयुष्य आपल्या प्रिय कार्याला ते वाहूं शकले. त्यांच्या कार्याची किंमत कुणी कितीही कमी जास्त करो, ही समर्पित जीवनाची वृत्ति त्यांच्या विरोधकांना सुद्धां वंदनीय वाटली पाहिजे. कुठल्यातरी उदात्त वेडानें पछाडल्याशिवाय मनुष्य सुख आणि स्वार्थ यांच्याकडे पाठ फिरवून आपलें जीवन एखाद्या ध्येयाला अथवा स्वप्नाला वाहूं शकत नाहीं.

* * *

अशा वाहून घेतलेल्या जीवनाची फलश्रुति काय? प्रश्न थोडासा अवघड आहे. पण तो सोडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ध्येयवादी मनुष्य ज्या स्वप्नांमागून धांवत सुटतो तीं त्याच्या हाताला लागतात काय? आणि चुकून लागलीच तरी त्यांचें त्याच्या स्वप्नसृष्टींतले स्वरुप कायम राहतें काय? महात्मा गांधी आज विद्यमान असते तर ते सुखी झालें असते कीं दुःखी झाले असते हें सांगणें मोठें कठिण आहे. त्यांची अनेक स्वप्नें सत्यसृष्टींत उतरलीं आहेत. पण साकार होतांना कुठल्याही स्वप्नाचें सौंदर्य लोप पावावें असा निसर्गाचा नियम असल्यामुळें असो अथवा अन्य कारणांमुळें असो सध्यांच्या सामाजिक परिस्थितीनें ते पूर्वीइतकेच अस्वस्थ झाले असते असें मला वाटते. ध्येयें म्हणजे दुःखें असें वामनराव जोशी म्हणतात ते अनेक अर्थांनीं खरें आहे. ती दुःखें उच्च प्रकारची असतात यांतच ध्येयवाद्यानें हवे तर सुख मानावें.

जिथें गांधीजींसारख्या लोकोत्तर पुरुषाची ही स्थिति झाली असती तिथें माधवरावांना ध्येयसिद्धीचा आनंद मिळाला आहे असें कसें म्हणतां येईल? पंचवीस तीस वर्षांइतकेच आजही ते अस्वस्थ आहेत. हिमालय चढतांना एक टेंकडी कष्टानें मागें टाकली कीं तिच्यापेक्षां अधिक उंच अशी दुसरी टेंकडी दत्त म्हणून पुढें उभी राहते. मानवी जीवनही असेंच आहे. कालचा प्रश्न आज सुटतो, निदान सुटल्यासारखा वाटतो. पण त्याच्यापेक्षां अवघड अशा दुसऱ्या समस्या लगेच मनाला भेवडावूं लागतात. आणि उद्यांच्या पोटांत त्याच्यापेक्षांही बिकट अशा किती गोष्टी लपल्या असतील तें कुणी सांगावें? आपली जन्मभूमि हीच कर्मभूमि मानून माधवरावांनीं सार्वजनिक कार्यांत पाऊल टाकलें तो काळ आणि आजचा काळ यांची तुलना केली तर राजकीय, सामाजिक व धार्मिक बाबतींत कोल्हापूर जिल्ह्यांत विलक्षण स्थित्यंतरें झालेली आढळतील. या स्थित्यंतरांना आपण यथाशक्ति हातभार लावला आहे यापेक्षां अधिक समाधान मनुष्याला कुठल्या गोष्टीमुळें मिळूं शकेल? म्हणूनच माधवरावांच्या मनावर निराशेची छाया पसरली आहे अथवा ते निष्क्रीय झाले आहेत असे मला वाटत नाहीं. त्यांचे वाचन, लेखन आणि चिंतन अखंड

सुरू आहे. ज्या ध्येयवादानें प्रेरित होऊन त्यांनी सार्वजनिक जीवनांत पाऊल टाकले त्याचे आकर्षण त्यांना पहिल्या इतकेच तीव्रतेनें वाटत आहे. आतापर्यंतच्या अनुभवांनी त्याचें स्वरुप त्यांना अधिक स्पष्ट झालें आहे. आज तें कुठल्याही पक्षांत नाहींत, पुढारी म्हणून त्यांच्या गळ्यांत पूर्ववत् पावलोपावलीं हार पडत नाहींत हें खरें आहे. पण हा अनुभव प्रत्येक सार्वजनिक मनुष्याच्या वांट्याला थोडाफार येतोच येतो. मग तो पुढारी असो, कलावंत असो, साहित्यिक असो वा क्रिकेटपटु असो, माधवरावांच्या मनाच्या कोपऱ्यांत या परिस्थितीची जाणीव असेल, नाहीं असे नाहीं. पण त्यांच्या मनांत जें तीव्र असमाधान आहे, त्यांचें मूळ मुख्यतः सामाजिक आहे. आजकाल भोंवतालीं जें चाललें आहे तें त्यांना अस्वस्थ करते. ज्या आर्थिक व सामाजिक समतेकडे डोळे लावून ते आयुष्यभर धडपड करीत आले, ती समता अजून फार दूर आहे या कटु जाणिवेनें ते बेचैन होतात. त्यांची भावनाप्रधानता त्यांना गप्प बसूं देत नाहीं. समतेच्या ध्येयाकडे जाण्याकरितां जे मार्ग चोखाळले जात आहेत ते त्यांना पटत नाहींत. त्यांचें हें असमाधान दूर होणें कठिण आहे. कारण त्यांच्या ध्येयवादाची बैठक मुख्यतः भावनेवर आधारलेली आहे. त्यांचें वाचन विपुल असले आणि गांधी–टिळक किंवा मार्क्स–लेनिन यांचें वाङ्मय त्यांनीं निष्ठेनें वाचलें असलें तरी त्या भावनेला ऐतिहासिक, शास्त्रीय नियमांवर पुनःपुन्हां घांसून पाहण्याची त्यांची पद्धत नाहीं.

* * *

हे विधान थोडेसें स्पष्ट करण्याकरितां मी दोन तीन उदाहरणें देतों. मराठ्यांच्या स्वराज्याचा आणि तें स्थापन करणाऱ्या शिवछत्रपतींचा आपणां सर्वांनांच यथार्थ अभिमान आहे. पण त्या स्वराज्याच्या आणि तें चालवितांना व्यक्त झालेल्या आम्हां मराठ्यांच्या गुणदोषांची चिकित्सा माधवरावांनीं मनाशीं विशेष केली असेल असें मला वाटत नाहीं. पसतीस वर्षांपूर्वी प्रख्यात इतिहाससंशोधक वासुदेवशास्त्री खरे यांनीं 'मराठे व इंग्रज' या पुस्तकाला प्रस्तावना लिहितांना खालील उद्गार काढले आहेतः— 'आमचा पुणेंसातारा इंग्रजानीं कां घेतला आणि त्यांचा मद्रासकलकत्ता

आम्ही कां घेऊं शकलों नाहीं, याचा संक्षेपानें येथपर्यंत विचार केला. देशाभिमानशून्यता, समूहरुपानें कार्य करण्याची नालायकी, स्वार्थसाधनांची बेसुमार हांव, आळस, हेळसांड, दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची संवय, इत्यादि दुर्गुण आमच्या समाजाच्या अंगी जे खिळले आहेत, तेच आमच्या राज्यनाशाला कारणीभूत झाले आहेत. असल्या दुर्गुणांनीं खिळखिळें झालेलें कोणतेंही पौरस्त्य राष्ट्र सुधारलेल्या पाश्चात्य राष्ट्राशीं विरोध प्राप्त झाला असतां टिकाव धरूं शकत नाहीं. हिंदुस्थान जर इंग्रजांनीं घेतलें नसतें तर तें फ्रेंचांनीं घेतलेंच असतें! प्रवाहांत पडलेली भांडीं एकमेकांवर आदळलीं असतां त्यांतलें कोणतें फुटावयाचें, मातीचें कीं लोखंडाचें, हें ठरलेलेंच आहे. हल्लींचा काळ असा आला आहे कीं आम्ही पाश्चात्यांची बरोबरी तरी करावी, नाहीं तर त्यांचे मजूर तरी होऊन रहावें. राजकारण, उद्योगधंदे, कलाकौशल्य, भौतिक शास्त्रांचा उपयोग, प्रत्येक गोष्टींत हीच स्थिति आहे. जर आम्हांस पाश्चात्यांची बरोबरी करण्याची हिंमत असेल तर हे दुर्गण आम्ही टाकले पाहिजेत. पूर्वी स्वराज्य होतें तें याच दुर्गुणांमुळें गेलें हें समजून जर आम्ही सावध झालों नाहीं तर, नवीन स्वराज्य मिळूनसुद्धां व्यर्थच आहे. हाच इतिहासडिंडिमाचा घोष प्रत्येकाच्या कानीं घुमत राहिला पाहिजे'

हे उद्गार कठोर आहेत, कडू आहेत, पण ते सत्य नाहींत असा इतिहासाचा कोणीही अभ्यासक म्हणूं शकणार नाहीं. पण या कडू सत्याकडे गेल्या तीन तपांत आपण कितीसें लक्ष दिलें आहे? गांधीवाद, समाजवाद, साम्यवाद, हिंदुत्ववाद वगैरे अनेक वादांचा महाराष्ट्रानें शिरा ताणताणून गेल्या तीन तपांत काथ्याकूट केला. कुठल्या न कुठल्या तरी झेंड्याखालीं आमच्यापैकीं प्रत्येकजण उभा राहिला. पण मराठी मनाच्या आणि मराठी जीवनाच्या प्रकृतींतले खरेशास्त्रींनी वर वर्णन केलेले दोष नाहींसे करण्याच्या पद्धतशीर प्रयत्न आम्ही कधीं केला आहे काय? आमच्या शिक्षणसंस्था, आमचे राजकीय पक्ष, आमचे सामाजिक कार्यकर्ते, आमच्या साहित्यविषयक चळवळी यांच्यांत शिस्त, एकोपा, चिकाटी, दूरदृष्टि, स्वार्थत्याग, प्रेरकता, काम करण्याची शास्त्रीय पद्धति, इत्यादि गुणांचें किती प्रमाणांत दर्शन होतें हे ज्यानें त्यानें आपल्या मनाशीं ताडून पहावें.

मात्र उद्यां संयुक्त महाराष्ट्र झाल्यावर प्रत्येक मंत्र्यांला खरेशास्त्र्यांची ही प्रस्तावना राज्यसरकारनें सक्तीनें वाचायला लावावी अशी माझी नम्र सूचना आहे.

माधवरावांचा सामाजिक दृष्टिकोन भावनेंतून स्फुरलेला आहे असें मी कां म्हणतों याचा आणखी थोडासा खुलासा करतों. हिंदुस्थानांतल्या शेतकऱ्यांच्या दारिद्र्याविषयीं त्यांचें मत विचारलें तर जमीन साऱ्या राष्ट्राची करून टाकल्यानें हा प्रश्न चटकन सुटेल असें तें म्हणतील. केवळ तात्त्विक दृष्टीनें हें म्हणणें बरोबर वाटतें. पण श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्ध्यांसारख्या शेतीविषयक प्रश्नांचा दीर्घकाल अभ्यास असलेला कार्यकर्त्याला या कामीं ज्या अडचणी जाणवतात त्या काय दुर्लक्ष करण्याजोग्या आहेत? निकस जमीन, शेतीची जुनाट पद्धति, विज्ञान विमुख असलेलें भारतीय मन, परिस्थितीचा जबरदस्त रेटा मिळेपर्यंत पुढें न सरकण्याइतकी या देशाच्या रोमरोमांत खिळून गेलेली जडता, यांत्रिक साधनें व वाढत्या लोकसंख्येला काम देण्याची जबाबदारी यांचा मेळ घालण्याची आवश्यकता, एक ना दोन अशा असंख्य गोष्टी या राष्ट्रीकरणाच्या आड उभ्या आहेत. रशियांत राज्य-क्रांति व सामाजिक क्रांति या गोष्टी एकाच वेळीं घडल्या त्यामुळें अनेक समस्यांच्या निरगांठी तिथें तात्काळ तुटल्या. आपल्याकडे त्या गांठी सोडविल्या पाहिजेत. हळुहळु नखानें एकेक टांक ओढीत, तें सैल करीत, आपल्याला हें काम केलें पाहिजे अशी वस्तुस्थिति आहे.

जातिभेदाचा प्रश्न घ्या, व्यक्तिजीवनांत धर्माचें स्थान काय आहे हा प्रश्न घ्या किंवा एका वर्गाकडून होणाऱ्या दुसऱ्या वर्गाच्या पिळणुकीचा प्रश्न घ्या, या विविध प्रश्नांकडे पाहतांना महादेव शिवराम गोळे, विवेकानंद, डॉ. केतकर किंवा डॉ. इरावती कर्वे जो दृष्टिकोन स्वीकारतात तो मला अधिक वास्तव व तर्कशुद्ध वाटतो. पण या विचारवंतांचें लिखाण माधवरावांनीं आस्थापूर्वक अभ्यासलें असेल असें दिसत नाहीं. उत्कट भावनाशीलतेमुळें ते विषमतेचे विरोधक झाले, अन्याय दूर व्हावेत म्हणून राजकीय व सामाजिक चळवळींत पडले. चळवळ करणारा मनुष्य कुठल्याही गोष्टी सर्वस्पर्शी तात्त्विक दृष्टीनें पाहूं शकत नाहीं. त्याला कुठली एक बाजू घ्यावीच लागते. त्यामुळें आपल्या तत्वप्रणालीला पोषक असें

वाङ्मय माधवरावांनीं पुष्कळ वाचलें असलें तरी तिच्या मर्यादा सांगणाऱ्या किंवा तिची वैगुण्यें दर्शविणाऱ्या ग्रंथाकडे आणि विचारवंतांकडे त्यांचें फारसें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. साहजिकच त्यांच्या विचारांची बैठक मूळ प्रकृतिधर्माला शोभेल अशीच राहिली.

* * *

तथापि आपल्या प्रवृत्तीला अनुसरून माधवरावांनीं राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत दोन अडीच तपें जें कार्य केलें तें कांहीं लहानसाहान नाहीं, हे या आत्मचरित्रावरून दिसून येईल. कोल्हापूरसारख्या एका संस्थानांत हें कार्य झालें असल्यामुळें साऱ्या महाराष्ट्राला त्याची सविस्तर कल्पना असणें शक्य नाहीं. या पुस्तकानें त्याचें यथार्थ चित्र मराठी वाचकांच्या पुढें .उभें राहील. धार्मिक, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय गुलामगिरीचे पाश किती बळकट असतात, ते तोडण्याकरितां सज्ज झालेल्या माणसाला जिवावर उदार होऊन कसें लढावें लागतें, हें या आत्मचरित्राच्या वाचनानें तरुण पिढीला सहज कळू शकेल. त्या पिढीला असे कितीतरी पाश प्राणपणानें तोडावे लागतील. त्या कार्याची स्फूर्ति या पुस्तकाच्या वाचनानें तिला मिळावी असें मी मनःपूर्वक इच्छितों.

* * *

या साऱ्या आठवणी लिहितांना माधवरावांनीं कुठेंही आडपडदा ठेवलेला नाहीं. इतरांप्रमाणें स्वतःकडेही अलिप्तपणानें पाहण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. स्वतःची मतें किंवा अनुभव त्यांनीं लपविले नाहींत किंवा त्यांच्या कडूपणा घालविण्याकरितां ते साखरेंत घोळले नाहींत. उदाहरणार्थ या पुस्तकाच्या उत्तरार्धांतली ८८ व ८९ हीं पृष्ठें पहावींत. ताराबाई महाराणीसाहेबांच्या संशयास्पद आजाराबद्दल ते म्हणतात, ' राणीसाहेबांना योग्य तो सल्ला देण्याची कामगिरी मी वकिलांवर सोंपविली. खर्चासाठीं मी माझ्या मित्रमंडळींकडून कांहीं रक्कम जमवूं शकलों. श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर, डॉ. अप्पामहाराज व श्री. अप्पासाहेब पंत यांचें सहाय्य झालें. पण ध्यानांत ठेवण्याजोगीं गोष्ट म्हणजे यावेळीं राजनिष्ठ म्हणून

मिरविणाऱ्या कोण्या इनामदार–सरदारांचे किंवा त्यावेळच्या कोण्या अधिकाऱ्यांचें आम्हांस साहाय्य मिळालेले नाहीं. स्वतंत्रपणें कोणी कांहीं साहाय्य केलें असल्याचेंही कळलें नाहीं. या लोकांची राजनिष्ठा निव्वळ नाटकी होती. हे लोक राजनिष्ठ नव्हते, जातिनिष्ठ नव्हते. हे कशाचेच अभिमानी नव्हते. लोकशाही चळवळीला तर त्यांचा विरोधच होता. ते होते फक्त व्यक्तिनिष्ठ. स्वतःचें आसन शाबूत ठेवून हातपाय पसरणें हें त्यांचें ध्येय. '

माधवरावांच्या या उद्गारांनीं अनेकांच्या नाकांना मिरच्या झोंबतील. पण त्यांत असत्य असें काय आहे ? राजनिष्ठेचीच गोष्ट कशाला हवी ? या दुर्दैवी देशांतल्या सर्वच निष्ठा तकलुपी झाल्या आहेत. हिंदुत्वनिष्ठ संस्कृतीचा स्थानींअस्थानीं जयजयकार करणारे लोक ' आपण सर्व एकत्र जेवूं या ' किंवा ' दुसऱ्या कुणाच्याही द्रव्याचा लोभ करूं नकोस. तुझ्या पोटाला ज लागतें तेवढ्यावरच तुझा अधिकार आहे ' ही उपनिषदांतली शिकवण शतांशानें तरी आचरणांत आणतात काय ? जातिभेदाच्या भिंती जमीनदोस्त झाल्या पाहिजेत अशी गर्जना करणारे लोक आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या मानल्या गेलेल्या जातीशीं रोटीव्यवहार किंवा बेटीव्यवहार करण्याकरितां कितीसे धडपडतात ? समाजवादावरलीं पुस्तकें वाचणाऱ्या आणि उठल्यासुटल्या तशी क्रांति झाली पाहिजे असें म्हणणाऱ्या कितीशा डॉक्टरांना रोग्यांशीं वागतांना आणि आपलीं बिलें वसूल करतांना या ब्रह्मज्ञानाची आठवण होते ? सुंदर साड्या नेसून महिला मंडळाच्या सभा पार पाडणाऱ्या कितीशा तथाकथित सुशिक्षित स्त्रिया समाजाच्या खालच्या थरांत मिसळून कुटुंबनियोजनाचा आवश्यक भाग त्यांना शिकवीत आहेत ? भावना आणि विचार यांची सौंदर्याच्या द्वारें जागृति करण्याचें काम कला व साहित्य या क्षेत्रांत कितीशा जबाबदारीनें पार पाडलें जात आहे ? या व अशा सर्व प्रश्नांची उत्तरें बहुधा नकारार्थीच येतील. इथें, तिथें, या क्षेत्रांत, त्या क्षेत्रांत, केव्हां खेड्यांत, केव्हां शहरांत, कांहीं निष्ठावंत व्यक्ती आपल्या कार्यांत हंसतमुखानें झिजत असलेल्या दिसतात. त्यांच्यापैकीं कांहींना संस्थांच्या अथवा अनुयायांच्या द्वारें आपल्या कार्याचा थोडाफार विस्तार झालेला पाहण्याचें भाग्यही लाभते. अशा व्यक्तींपुढें

माझें मस्तक नेहमींच विनम्र होतें. पण मला दुःख वाटतें तें एकाच गोष्टीचें. अशी निष्ठावंत व्यक्तींची संख्या गेल्या दहा वर्षांत घटत चालली आहे. सभांच्या व्यासपीठावरून वर्तमानपत्रांच्या स्तंभांतून आणि हरतऱ्हेच्या सार्वजनिक मेळाव्यांतून देशकल्याणाची आणि सामाजिक क्रांतीची विपुल चर्चा होते. पण हे सर्व चालेंल असूनही कुठेतरी कांहींतरी कमी पडत आहे अशी हुरहुर मनाला चाटून जाते. अंतरीच्या तळमळीची उणीव सर्वत्र जाणवते. त्यागाची भाषा फक्त जिभेच्या टोंकावरच दिसते. स्वदेशीचें व्रत ही जुनीपुराणी गोष्ट झाल्याचा भास होतो. राज्ययंत्र घ्या किंवा समाजचक्र पहा, शहरें न्याहाळा अथवा खेड्यांत चला, विद्यार्थीदशेंत असलेल्या युवकांच्या अंतरंगांत डोकावून पहा किंवा संसाराचा अनुभव घेतलेल्या प्रौढांच्या मनांत शिरा, सर्वत्र एक गोष्ट खटकते. ती म्हणजे सामाजिक मनाच्या चाकांतला वारा कमी झाला आहे ही होय. आजकाल शिथिलतेची छाया आपल्या साऱ्या जीवनावर पसरली आहे. असें होण्याची कारणें अनेक आहेत. त्यांतलीं कांहीं अपरिहार्य असतील. पण राहून राहून माझ्या मनांत येतें या शिथिलतेवर फक्त एकच गोष्ट मात करूं शकेल ती म्हणजे *ध्येयावरली अव्यभिचारी निष्ठा.* *इंग्रजी राज्यापूर्वींचीं निष्ठास्थानें* इंग्रजी अंमलांत बदलली हें योग्यच झालें. पण निष्ठांची स्थानें बदललीं तरी त्यांची तीव्रता त्या काळांत कमी झाली नाहीं. म्हणूनच अज्ञान, दारिद्र्य जातिभेद, धर्मभेद असलीं प्रचंड ओझीं पाठीवर असूनही हा देश स्वराज्याच्या मुक्कामावर कसाबसा जाऊन पोंचला. या मधल्या काळांतली निष्ठास्थानें आतां पुन्हां बदलणें स्वाभाविक आहे. तरी जरूर बदलावींत पण त्या निष्ठांमागची तीव्रता आज कमी झाली आहे ती पुन्हां धगधगूं लागली पाहिजे.

* * *

वाचकाला अंतर्मुख करून विचार करायला लावणारीं अशीं अनेक स्थळें या आत्मचरित्रांत आहेत. त्यांतल्या दोन्हींचाच मी जाता जातां उल्लेख करतों. पृ. १६० वर बाबूराव पेंटरांच्या निमित्तानें गांधीवादी तत्वज्ञानाचा प्रेमानें प्रेम वाढतें हें लक्षांत घेऊन केलेल्या एका

प्रयोगाचा—माधवरांवानीं उल्लेख केला आहे. तो वाचतांना नकळत मला विनोदपंडित चिंतामणराव जोशी यांच्या ‘ सत्याचे प्रयोग ’ या सुंदर लेखाची आठवण झाली. सार्वजनिक कामाकरितां कराव्या लागलेल्या कडु टीकेचा व्यक्तिविषयक स्नेहाशीं कांहीं संबंध नाहीं असें मनांत आणून बाबूराव पेंटरांकडे माधवराव गेले हें ठीकच झालें. त्यांचा हा निर्णय सभ्यता व सद्भाव यांना धरूनच होता. पण झालें गेलें गंगेला मिळालें असें मानून आपण पेंटरांशीं सद्भावानें वागलों तरी तो भाव त्यांनीं मात्र दाखविला नाहीं, या कल्पनेनें माधवरावांना जी रुखरुख वाटते ती अस्थानीं आहे. व्यक्तिच्या आत्मिक विकासाला गांधीवादांतल्या कांहीं तत्वांचें चांगलें साहाय्य होऊं शकेल. पण त्या तत्वांचा पुरस्कार करणारे बहुतेक लोक त्यांच्या मर्यादा जाणत नाहींत. प्रेमानें प्रेम वाढते, सद्भावानें सद्भाव निर्माण होतो; हें जसें पूर्णपणें खोटें नाहीं तसें ते सिद्धांतवजा सत्यही नाहीं. हा सिद्धांत इतका निरपवाद असता तर जगांतल्या साऱ्या सिंधूंनी हां हां म्हणतां आपापल्या सुधाकरांना ताळयावर आणलें असते ! जग ही मोठी सुपीक भूमि आहे, तिच्यांत पेरलेली प्रत्येक सद्भावना आणि संस्कृति रुजून शतगुणित होते ही कल्पना मुळांतच चुकीची आहे. तें संतांचें, कलावंतांचें आणि सुधारकांचें स्वप्नरंजन आहे. खडकाळ माळरान आणि सुपीक जमीन यांचें या जगांत मोठें विचित्र मिश्रण झालेलें असतें. त्यामुळें त्यांत टाकलेलें बी कधीं सुकून जातें. तें उगवावें असे प्रयत्न करणे एवढेंच आपल्या हातीं असते. कुटुंबांत, शिक्षणसंस्थांत किंबहुना सर्व सामाजिक व्यवहारांत माणसाला हाच अनुभव येतो. तो माधवरावांनीं लक्षांत घेतला असता तर पेंटर आपल्याला परत भेटायला आले नाहींत म्हणून ते हळहळले नसते. महर्षि असेच असायचे म्हणून ते स्वतःशींच हंसले असते. बुद्ध, ख्रिस्त किंवा गांधी हे अर्धे शहाणे होते, या जगांत पूर्ण शहाणा असा एकच मनुष्य होऊन गेला, तो म्हणजे शेक्सपीअर होय, असें अनेकदां मी म्हणतों तें मोठमोठ्या गांधीवादी माणसांचे मिळालेले मासलेवाईक अनुभव लक्षांत घेऊनच.

* * *

या पुस्तकाच्या उत्तरार्धांतलें २०२ पृष्ठ तर मी कधींही विसरणार नाहीं. इब्सेन किंवा शॉसारख्या नाटककारानें हाताळावा असा गंभीर व करुण विषय आहे तो. जन्मभर पोटतिडिकीने सार्वजनिक कार्य करावें, तें करतांना बायकापोरांचीं पर्वा किंवा उद्यांची काळजी करूं नये आणि शेवटीं केळें खाऊन झाल्यावर त्याचें साल जसें माणूस फेंकून देतो त्याप्रमाणें सार्वजनिक जीवनांतल्या कुठल्यातरी अंध, प्रचंड शक्तीनें त्या व्यक्तीला दूर भिरकावून द्यावें, सामान्य माणसाप्रमाणें उपजीविकेचें सहजसुलभ साधनही तिच्या हातीं राहूं नये, यापेक्षां मानवी जीवनाच्या रंगभूमीवर घडणार अधिक क्रूर खेळ कोणता असूं शकेल? राजकवि यशवंतांच्या 'जगरहाटी' कवितेंत या दाहक अनुभवाचें थोडेसें चित्रण आहे. पण माधवरावांनीं हें पान लिहून त्याचें सोदाहरण स्पष्टीकरण केलें आहे. अशा अगतिक कार्यकर्त्यांच्या मनःस्थितीला त्यांनीं तोंड फोडलें आहे. त्यागाच्या ज्वाळेंत पंख जळून गेल्यानंतर अशा व्यक्तीच्या मनाची जी तडफड होते, ती या पानावरल्या शब्दाशब्दांत प्रतिबिंबित झाली आहे, त्या क्षणीं आपल्या मनांत आत्महत्येच्या विचारांचें थैमान सुरू झाले हें सुद्धां माधवरावांनीं लपवून ठेवलेलें नाहीं. समाज सार्वजनिक माणसांकडून कामगिरी करून घेतो, त्यांच्याकडून सतत नाना प्रकारच्या अपेक्षा करीत रहातो. पण या सार्वजनिक माणसांतले साधे आणि सच्चे लोक जगतात कसे याची काळजी मात्र तो क्वचित्‌च करतो! जीवन हे असे विचित्र आहे. सेवेच्या माथ्यावर कांटेरी मुगुट असावा असाच त्याचा अद्यापि संकेत आहे.

आत्मचरित्रांत जीवनविषयक विविध सत्यांचे असे सुवर्णकण विखुरलेले असतात. म्हणूनच त्यांचें महत्व मला इतर ग्रंथाहून अधिक वाटतें. माधवरावांना पूजकांप्रमाणें विरोधक आहेत. इतकेंच नव्हे तर निंदकही आहेत, हें मी जाणतों. त्या सर्वांचें समाधान या आत्मचरित्रानें होईल कीं नाहीं हें मी सांगूं शकत नाहीं. पण महाराष्ट्राच्या—विशेषतः कोल्हापूर जिल्ह्यांतल्या तरुण पिढीनें तें मनःपूर्वक वाचावें, त्याच्यावर विचार करावा. त्याच्यापासून योग्य तो बोध आणि स्फूर्ति घ्यावी, अशी माझी विनंति आहे. प्रत्येकाला पोटभर भाकरी मिळाली पाहिजे हें समतेचें पहिलें

सूत्र मानलें तर आपणाला अजून किती वाटचाल करायची आहे, तें सहज लक्षांत येईल. माधवराव, त्यांचे सहकारी किंबहुना त्यांची पिढी यांनीं जीं चांगलीं बीजें रुजत घातलीं असतील तीं अंकुरित करण्याचें काम आपलें आहे असें तरुण पिढीनें मानावें. जुन्या पिढीच्या हांतून ज्या चुका कळत नकळत झाल्या असतील त्या आपल्याकडून होऊं नयेत म्हणून दक्षता घ्यावी. या आत्मचरित्राचा खराखुरा उपयोग हाच आहे. 'कामांचे डोंगर पडले आहेत' असें ना. गोखल्यांचें एक वाक्य दहाबारा वर्षांचा असतांना मी वाचलें होतें. तें वाक्य अजून मला आठवतें. भोंवतालची परिस्थिति पाहिली कीं तें पुनः पुन्हां मनांत घुमूं लागतें. त्या डोंगरांत सुंदर लेणीं खोदणारे तरुण, त्या डोंगरांच्या माथ्यांवर आपलीं निशाणें डौलानें फडकत ठेवणारे तरुण महाराष्ट्राला हवे आहेत. विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यां-पासून विनोबांपर्यंत, रानड्यांपासून एस्. एम्. जोशीपर्यंत आणि ज्योतिरावांपासून माधवरावांपर्यंत चार पिढ्या होत आल्या. या चार पिढ्यांचा संदेश एकच आहे, ' उठा, जागे व्हा. विज्ञानाचें शस्त्र हातांत घेऊन अज्ञानाशीं लढा. समतेचा ध्वज उंच उंच फडकत ठेवा. ज्ञानाला त्यागाची जोड द्या. विचार आचारांत आणा. तरच तुमचीं सारीं स्वप्नें लवकर साकार होतील.

कोल्हापूर
१२–१२–१९५३

**वि. स. खांडेकर.**

# परिशिष्ट

## अखिल भारतीय संस्थानी प्रजापरिषदेचा

### माधवराव बागल यांच्याविषयी केलेला ठराव.

( १ ) ओरिसा मध्यप्रांत व मुंबई प्रांतांतील संस्थानें विलीन झाली असल्यानें तेथील रिजनल कौन्सिल्स ठेवण्याची जरूरी नसल्यानें ती बरखास्त करावीत.

( २ ) दक्षिणी संस्थान रिजनल कौन्सिलचे अध्यक्ष श्री. माधवराव बागल यांनी गेली बरीच वर्षे ही कार्याची धुरा वाहून जी स्वार्थत्यागपूर्वक देशभक्ति व्यक्त केली त्याबद्दल कार्यकारी मंडळ त्यांना धन्यवाद देत आहे.

The Standing Committee places on records its high appreciation of the patriotic and Self-Sacrificing labours of Shri Madhavrao Bagal, President, Deccan States Regional Council.

* * *

# कोल्हापूर म्युनिसिपल कामगार संघाचें

# मानपत्र

## ५० व्या वाढदिवसानिमित्त.

**प्रिय माधवरावजी :**

आपल्या वयाला नुकतीच ५० वर्षे पुरी झाली ही गोष्ट आम्हां म्युनिसिपल कामगारांना आणि आमच्या इतर कामगार बांधवांना किती आनंदाची वाटते हे शब्दांनी सांगता यावयाचे नाहीं. आपले अंतःकरण कलावंताचे नि दृष्टी कवीची आहे. म्हणून आमची खात्री आहे कीं आमच्या शब्दरुपानें व्यक्त न होऊं शकणाऱ्या मूक भावना आपण अंतःचक्षूनें खचित ओळखूं शकाल. आपल्याबद्दलचा आमचा आदर किती उदात्त आहे या गोष्टीचा पुनरुच्चार करण्याचे कारण नाहीं. आपण आपल्या या आयुष्यांतील दोन तपाहून अधिक काल आमच्या उन्नतीसाठीं खर्चून ज्या नानाविध अडचणी सोसल्या, संकटें ओढवून घेतलीत आणि हाल अपेष्टा सहन केल्यात त्याला कोल्हापूरच्या इतिहासांत खास तोड नाहीं.

**कामगार हितरक्षक माधवरावजी :**

या कोल्हापूर संस्थानांत आम्ही सर्वच कामगार कुत्र्याचेंच नव्हे तर त्याहूनहि भयंकर हीन दर्जाचे जीवन जगत होतो. पाटीला पोट बांधून वरती सत्ताधाऱ्यांच्या लाथा खातांना आमच्यांतील कितीजणांच्या तरी हाडांतील त्राण नष्ट होऊन देहांतील प्राण निघून गेला असेल याची गणतीच करता येणार नाहीं. पोटाच्या आगींत आमच्यापैकी कितीतरी कामगार स्त्रियांचे शील भस्मसात होऊन गेले असेल. कितीतरी कामगारांची मुलें परिस्थितीच्या वणव्यांत होरपोळून निघाली असतील. त्यांच्या करुण किंकाळया माधवराव प्रथम आपणच ऐकल्यात आणि मदतीचा हात देण्यासाठीं धांवून आलात.

**भाई माधवरावजी :**

आज कोल्हापूर कामगार चळवळ वाढत आहे किंवा कोल्हापुरांतील कामगारवर्ग थोडीशी छाती वर काढून चालत आहे याचे सर्व श्रेय आपणास व आमच्यांत कार्य करणाऱ्या आपल्या सर्व सहकाऱ्यासच आहे. कोल्हापूरच्या शेतकरी वर्गाप्रमाणे आम्हां कामगार वर्गांतही आपण जागृति घडवून आणलीत. आम्हाला आमच्या न्याय हक्कांची जाणीव करून देऊन शेतकरी-कामकऱ्यांच्या विश्वव्यापी क्रांतीचा पुरस्कार केलात आणि करवीर जनतेची प्रातिनिधिक अशी जी संस्था प्रजापरिषद तिच्या व्यासपीठावरून ' शेतकरी कामकऱ्यांचे राज्य हेच प्रजापरिषदेचे ध्येय ' अशी ठणठणीत घोषणा केलीत याबद्दल आम्हां सर्व कामगार वर्गाला सानंद अभिमान वाटत असून या ठिकाणीं आम्ही आमची नम्र कृतज्ञता नमूद करून ठेवतो.

**दे. भ. माधवराव :**

शेतकरी कामकरी राज्याचे आपले स्वप्न खरे होण्यासाठीं आम्ही सर्व कामगार आमचे पंचप्राण हाती घेऊन आपल्या पाठीशी उभे आहोत हे या ठिकाणीं नमूद करताना आम्हाला अत्यंत अभिमान वाटत आहे. आपण हाती घेतलेला शेतकरी कामकरी क्रांतीचा तिरंगी झेंडा सतत फडकवत ठेवण्यासाठीं आपणास परमेश्वरानें दीर्घायुरारोग्य द्यावे अशी प्रार्थना करून ही मानपत्ररुपी कृतज्ञतेची फुले आम्ही विनम्रभावें अर्पण करीत आहोत त्याचा कृपा करून स्वीकार करावा.

आपले,
**अध्यक्ष व सभासद,**
**कोल्हापूर म्युनिसिपल कामगार संघ**

**२५ सप्टेंबर १९४६**



माधवराव बागल यांनी राजारामपुरी मांगवाड्यांतील पाण्याचा हौद चालू केल्यानंतर सिव्हिक बोर्डाचे अध्यक्ष माधवराव बागल व म्यु. कौन्सिलर्स.

## करवीर नगरपालिकेचे मानपत्र

# दे. भ. भाई माधवराव खंडेराव बागल,

कोल्हापूर यांनाः—

प्रिय माधवरावजी :

करवीर जनतेच्या स्वातंत्र्य लढ्याचे महान सेनानी माधवरावजी, कोल्हापूर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झाले ! कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेचे कार्य संपल्यामुळें तिचे चालू वर्षी विसर्जन झाले. म्हणूनच १५ ऑगस्ट १९४९ च्या स्वातंत्र्य-दिनीं आपण केलेल्या महान कार्याबद्दल करवीर नगरपालिकेतर्फे आम्ही आपले मनःपूर्वक स्वागत करीत आहोत. आपले निर्मळ चारित्र्य नि उज्वल व्यक्तिमत्व, आपली निरपेक्ष लोकसेवा नि नितांत राष्ट्रभक्ति, आपला असामान्य त्याग नि खडतर कारावास, आपली अमोघ वाणी नि बेडर लेखणी, आपले अतुल धैर्य नि क्षमाशील अंतःकरण, आपला आदर्श प्रामाणिकपणा नि साधा भोळा स्वभाव, आपली निस्सीम ध्येयनिष्ठा नि अखंड तपश्चर्या, श्रम-जीवींच्या उन्नतीची आपली खरीखुरी जिवंत तळमळ नि अन्याय-जुलूम-दडपशाहीला निर्भयपणें टक्कर देणारी आपली अभिजात वीरवृत्ति इत्यादि दुर्मिळ व थोर गुणसमुच्चयामुळें आपण आपल्या बागल घराण्यांचे नांव चिरस्मरणीय केलेत आणि कोल्हापुरची नि महाराष्ट्राची कीर्ति-पताका अखिल भारतांत फडकत ठेविलीत !

कलाधुरंधर माधवरावजी,—चित्रकार व शिल्पकार या दृष्टीनें आपला दर्जा श्रेष्ठ आहे. आपण निर्माण केलेल्या सुंदर कलाकृति म्हणजे करवीरची अमोल भूषणेच होत ! महाराष्ट्र चित्रकार संमेलनाचे आपणाला

अध्यक्षपद देऊन महाराष्ट्रानें आपल्या चित्रकलाकौशल्याचा गौरव केला. आपण लिहिलेला 'कला आणि कलावंत' हा उपयुक्त ग्रंथ अभ्यासू कलावंतांना सतत मार्गदर्शन करीत राहील.

**साहित्यभूषण माधवरावजी,**—'व्यक्तीनें लिहिलेल्या साहित्यांत त्या व्यक्तीच्या हृदयाचें प्रतिबिंब उमटते, आपण लिहिलेल्या सहज सुलभ-भाषेतील सुबोध लघुकथा, राजकीय नि सामाजिक प्रबंध व ग्रंथ यांचें वाचन करीत असतांना त्यांच्या पानांपानांतून, ओळीओळींतून, व शब्दांशब्दांतून, आपले राष्ट्रप्रेम व बहुजन समाजाच्या, कष्टकरी जनतेच्या उद्धाराचा आपणास लागलेला निदिध्यास दिसून येतो. आपण आजपर्यंत बहुजन समाजाला प्रगतिमंदिराकडे नेणारे पुरोगामी साहित्यच निर्माण केलें आहे. याबद्दल बहुजन समाज आपला सदैव ऋणी राहील.

आपण 'जीवनाकरितां कला' या उदात्त क्रांतिकारक तत्त्वाचा जोरदार पुरस्कार केला आहे. आपण वीस वर्षांपूर्वी आपल्या साप्ताहिक 'हंटर' मधून निर्भीडपणें जनतेच्या तक्रारी व मागण्या मांडल्या नि करवीरस्थांना राजकीय क्षेत्रांत निर्भयतेचें बाळकडू पाजलेत ! अंतरीच्या खऱ्याखुऱ्या जिव्हाळयानें कोल्हापूर संस्थानांतील खेडुतांना व बहुजन-समाजाला आपण उच्च पातळीवरून आपल्या साप्ताहिक 'अखंड भारत' मधून केलेलें स्फूर्तिदायक मार्गदर्शन करवीर प्रजा केव्हांही विसणार नाहीं. हिंद सरकारच्या प्रशासकीय राजवटींत सुरक्षा कायद्याखाली आपणाला स्थानबद्ध करून 'अखंड भारत' व ते छापण्याचा छापखाना यांच्यावर बेमुदत बंदी घालण्यांत आली. स्वतंत्र भारतांतील ही एक शोचनीय व दुर्दैवी घटना होय !

**सत्यशोधक माधवरावजी,**—आपण आजपर्यंत हिंदुधर्मांतील जीर्णमतवादी वृत्तीबरोबर निधड्या छातीनें व अहिंसेच्या मार्गानें लढत राहिलात. सतरा वर्षांपूर्वी करवीरच्या सुविख्यात महालक्ष्मीच्या देवालयांत व नृसिंहवाडीच्या दत्तमंदिरांत आपण अस्पृश्यांना प्रवेश मिळवून दिलात; हरिजनांचे बरोबर स्पृश्य वर्गीयांची सहभोजनें घडवून आणलीत आणि कित्येक स्पृश्यास्पृश्य विवाह साजरे करण्यांत पुढाकार घेतलात. हरिजन-

उद्धाराविषयीं आपली जिव्हाळ्याची तळमळ अवर्णनीय आहे. आपण, सर्व एकाच परमेश्वराची लेंकरें आहोत ' ही वृत्ति आपल्या रोमरोमी भिनलेली आहे. हिंदुधर्मावरील अस्पृश्यतेचा कलंक नष्ट करण्यासाठीं आपण केलेल्या कार्याबद्दल हिंदुधर्माचे खरे अभिमानी व मानवतेचे कैवारी आपणांला सदैव धन्यवाद देत राहतील ! सांप्रतच्या हिंदुधर्मातील धर्म-भोळेपणा, समाजविघातक राक्षसी रूढी, अनिष्ट चालीरीति व धर्मांच्या आवरणांखालीं चाललेली ढोंगबाजी यांच्या विरुद्ध आपण सतत कडाडून हल्ले चढविले आणि आपल्या कै. तीर्थरूप खंडेराव बागलांचे सत्यशोधकीय कार्य पुढें चालू ठेवलेत. सत्यशोधक समाजाचा ' सत्यशोधक हीरक महोत्सव ' ग्रंथ संपादून महाराष्ट्रांतील सामाजिक व धार्मिक क्रांतीचा आद्य नि व्यापक इतिहास–जो इतिहास हेतुपुरःस्सर दडपून टाकण्याचे पद्धतशीर प्रयत्न करण्यांत आले तो इतिहास–आपण जिवंत ठेवलात. आपले हे ऐतिहासिक कार्य अविस्मरणीय आहे !

**मजूर-संघटक भाईजी,**—शाहूमिल मजूर संघाची स्थापना करून आपण कोल्हापूर संस्थानांत मजूर संघटनेचा पहिला झेंडा फडकविलात. कोल्हापूर संस्थान राष्ट्रीय कामगार संघ ही कोल्हापुरांतील मजूर संस्थांची मध्यवर्ति संस्था प्रथम काढून येथील मजूर चळवळीला वैशिष्ठ्यपूर्ण सामर्थ्य नि सूत्रबद्धता आणण्याचे श्रेय आपण घेतलेंत.

**सत्याग्रही माधवरावजी,**–१९४६ सालीं दहा दिवस संपूर्ण शांततेनें व शिस्तीनें शाहुमिल कामगारांचा संप आपण यशस्वी रीतीनें लढविलात; शुगर मिलच्या हंगामी कामगारांना सामुदायिक अन्नसत्याग्रहाच्या मार्गानें बोनस व पगारवाढ मिळवून दिलीत. कोल्हापूर संस्थान कारकून–कनिष्ठ नोकर संघानें केलेल्या संपाची धुरा शेवटी आपण घेतलीत आणि अर्धपोटी कारकून व पट्टेवाल्यांच्या माणुसकीच्या मागण्या मिळवून देण्यासाठीं आपण नऊ दिवसांचा खडतर अन्नसत्याग्रह केलात. अनेक कामगार संघांची आपण स्थापना केलीत. आपली व्यापक कामगार सेवा लक्षांत घेऊन महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेसच्या महाराष्ट्र कामगार समितीतर्फे दक्षिण संस्थान कामगार समितीचे अध्यक्षस्थान आपणास देण्यांत आले. महाराष्ट्रांतील

मजूर वर्गावर आपली असामान्य छाप असलेली पाहून आपणांस महाराष्ट्र मजूर संघाचे अध्यक्षपद अर्पण करण्यांत आले.

**लोकनेते माधवरावजी,**—१९३० सालीं आपण मिरवणूक बंदी मोडून झेंडा—मिरवणूक काढलीत आणि कोल्हापूर संस्थानांतील राजकीय चळवळीची मुहुर्तमेढ रोविलीत. काँग्रेस कमिटी व करवीर इलाखा खादी संघ यांची स्थापना केलीत. मानवी मूलभूत हक्क, जबाबदार राज्यपद्धति व सारा-कपात मिळविण्यासाठीं आपण १९३८ सालीं शिरोळ पेट्यांतील पांच हजार बहाद्दर शेतकऱ्यांचा प्रचंड नि संस्मरणीय असा कोल्हापूर संस्थानांतील पहिला मोर्चा काढलात आणि भाषणस्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य मिळविलेत. या लढ्यांतून आपण अलौकिक लोकजागृति केलीत नि करवीरच्या अकरा लाख प्रजेची एकमेव प्रातिनिधिक अशी कोल्हापूर संस्थान प्रजापरिषद ता. ६ फेब्रुवारी १९३९ रोजीं स्थापन केलीत. प्रजापरिषदेचा जन्म झाला नि आपण तात्काळ बंदिवान बनला! प्रजापरिषदेच्या निशाणाखालीं आपण जनतेची अभूतपूर्व नि सामर्थ्यशाली संघटना केलीत. करवीर नागरिकांना लढाऊ बनविलेत व अनेक यशस्वी लढे दिलेत. प्रजा-परिषदेचें विसर्जन होईपर्यंत आपण सर्वानुमतें तिचे शेवटपर्यंत कार्याध्यक्ष राहिलात. ' भाई बागल म्हणजेच प्रजापरिषद ' हें समीकरण सर्वमान्य झाले होते.

माधवरावजी, प्रजापरिषदेच्या त्यागी, सेवामय नि शौर्यशाली परंपरेचे आपण मूर्तिमंत प्रतिक आहात!

१९४२ सालीं आपण राष्ट्रसेवादलाच्या कार्याला कोल्हापूर संस्थानांत प्रारंभ केलात; ४२ च्या ' छोडो हिंदुस्थान ' च्या देशव्यापी चळवळीची कोल्हापुरांत सुरवात केलीत व त्यासाठीं आपण स्थानबद्ध झालात. प्रजा-परिषदेचे शेकडों लहान मोठे कार्यकर्ते तुरुंगांत गेले नि वीर स्वामी—वारके—इंगळे प्रभृति अनेक हुतात्मे पोलिसांच्या गोळीबाराला बळी पडले!

दक्षिणी संस्थान प्रजेच्या राजकीय जागृतीला आपण जोमानें चालना दिलीत. सांगली, मिरज, भोर, जत, अक्कलकोट, सावंतवाडी, फलटण

इत्यादि संस्थानांतील प्रजापरिषदांच्या अध्यक्षीपदावरून आपण तेथील जनतेला बहुमोल मार्गदर्शन केलेत. आपल्या या अनन्यसाधारण कार्यामुळेच आपण दक्षिणी संस्थान रिजनल कौन्सिलचे सतत अध्यक्ष राहिलात. आपल्या या महनीय कार्याची अखिल भारतीय संस्थानी प्रजापरिषदेच्या स्थायी समितीनें एका खास ठरावान्वयें मुक्तकंठानें प्रशंसा केली.

१९३१ पासून आजतागायत महाराष्ट्रांतील जनतेंत राजकीय जागृती करण्यासाठीं आपण हजारों सभा घेतल्यात व सामाजिक नि राजकीय हक्कांची तिला चैतन्ययुक्त जाणीव करून दिलीत. पुणें, सातारा, सोलापूर नगर, नाशिक वगैरे भागांतून दौरे काढलेत; कायदे मंडळाच्या निवडणुकांच्यावेळीं महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेसच्या वतीनें तुफानी प्रचार केलात. हे प्रचारकार्य करीत असतांना आपण आपल्या प्रकृतीची नि संसाराची काडीमात्रहि फिकीर केली नाहींत. महाराष्ट्रांतील लक्षावधि शेतकरी—कामगारांच्या अंतःकरणांत आपण जागृतीची ज्योत प्रज्वलित केलीत. विराट बहुजन समाजाच्या अंतःकरणांतील मूक आकांक्षा आपल्या हृदय हेलावणाऱ्या वाणींतून बाहेर पडतांना हजारो श्रोते मंत्रमुग्ध होतात ! आणि ती चित्तवेधक चित्रें पाहिली कीं, आम्हां करवीर नागरिकांची हृदयें अभिमानानें उचंबळून येतात ! आपल्या सत्वशील नि थोर व्यक्तित्वासंबंधी अखिल महाराष्ट्राच्या अंतःकरणांत किती नितांत आदर व आपुलकी आहे, हे अनेक शेतकरी, विद्यार्थि व युवक परिषदांचे अध्यक्ष अथवा उद्घाटक म्हणून आपली जी निवड होत असते त्यावरून सिद्ध होते.

**माननीय माधवरावजी,**—कोल्हापुरच्या व महाराष्ट्राच्या राजकीय क्षितीजावर चमकणाऱ्या अनेक निष्ठावंत व त्यागी अशा नवोदित कार्यकर्त्यांच्या राजकीय जीवनांचे आपण जनक आहात ! अवजड पोलादी बेड्या पायांत घालून कोल्हापुरच्या रेसग्राऊंडवर कष्टानें खडी फोडणारे १९३९ चे बंदिवान भाई बागल जागृत जनतेच्या संघटनाबलावर १९४७ सालीं राज्यसत्ता हिसकावून घेत असल्याचे अपूर्व दृश्य पाहून काम करवीर जनतेच्या नेत्रांचे पारणे फिटले !

‘ आजचा राजबंदी म्हणजे उद्याचा राज्यकर्ता ! ’ या ऐतिहासिक सिद्धांताची सत्यता आपल्या राजकीय पुण्याईच्या प्रभावानें पटवून दिलीत !

कित्येक खडतर दिव्यानंतर प्रजापरिषदेच्या हातीं नोव्हेंबर १९४७ मध्यें कोल्हापूर संस्थानी राजकीय सत्ता आली व आपण प्रजापरिषदेचे मंत्रिमंडळ स्थापन केलेत. करवीर प्रजेच्या राजकीय आकांक्षा सफल झाल्या! पुढें प्रजापरिषदेच्या सर्वाधिकाराची सूत्रें आपण खर्डेकर–देसायांच्या हातीं दिलीत. त्यानंतर हिंद सरकारच्या संस्थानविषयक धोरणामुळें कोल्हापूर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन करण्यांत आले. या अनपेक्षित राजकीय बदलामुळें आपण फेब्रुवारी १९४९ मध्यें प्रजापरिषदेचे विसर्जन केलत आणि महाराष्ट्राच्या विशाल राजकीय क्षेत्रांत पूर्वीपेक्षां अनेकपट जोमानें व उत्साहानें आपण आतां शेतकरी कामगार पक्षाचे कार्य करूं लागला आहात. आपण आजपर्यंत केलेल्या विविधांगी कार्याचा आटावा घेतांना आपल्या पत्नि सौ. रमाबाई यांचा उल्लेख केल्यावांचून आम्हांस राहवत नाहीं. सौ. रमाबाईनीं खंबीर मनानें संसाराची सर्व जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली म्हणूनच लोकसेवेचें असिधारा–व्रत आपण दीर्घकाल चालवू शकत आहात.

**लोकप्रिय माधवरावजी,**–१९४१ पासून करवीर नगरपालिकेतील बहुमतवाल्या पक्षाचे आपण निर्माते आहात. १९४१ च्या करवीर नगरपालिकेच्या निवडणुकींत आपण २५ पैकीं २२ लोकनियुक्त जागा जिंकल्यात; १९४५ सालीं ३० पैकीं २८ लोकनियुक्त जागा काबीज केल्यात. १९४८ सालीं करवीर नगरपालिकेच्या निवडणुकींत प्रजापरिषदेनें ४० पैकीं ३७ जागा मिळविल्या. या ३७ जागांपैकीं ३१ जागा बिनविरोध मिळाल्या! प्रजापरिषदेचें हें यश अतुलनिय नि अभिमानास्पद असेच आहे.

नगरपालिकेच्या निवडणुकांच्या प्रसंगी करवीर नागरिकांच्या अंतःकरणांतील आपणाविषयीची अथांग भक्ति पाहिली कीं, आमचीं हृदयें कौतुकानें गहिंवरून जातात आणि आमच्या मुखावाटें आपोआप उद्‌गार बाहेर पडतात कीं,

“माधवरावजी, आपण कोल्हापुरचे अनभिषिक्त राजे आहात!” जगांतील कोणत्याहि पाशवी शक्तीला आपली ही लोकोत्तर लोकप्रियता हिरावून घेणें कदापिहि शक्य होणार नाहीं.

**लोकसेवक माधवरावजी**—हिंदुस्थानांत खऱ्याखुऱ्या समाजसत्तावादाची प्रस्थापना होण्यासाठीं, शेतकरी कामगार राज्याचे स्वप्न साकार करण्यासाठीं नि संयुक्त महाराष्ट्राच्या सत्वर निर्मितीसाठीं आपण आपले कायावाचामनें चंदनाप्रमाणें अहोरात्र झिजवित आहात आणि त्यायोगे आपण साऱ्या महाराष्ट्राला ललामभूत होत आहात ! आपण हाती धरलेला जनसेवेचा नंदादीप दिवसेंदिवस अधिकाधिक दीप्तिमान व्हावा आणि अज्ञान व दारिद्र्य यांच्या भीषण अंधःकारांत धडपडत असलेल्या बहुजन समाजानें ह्या नंदादीपाच्या प्रशांत प्रकाशांत प्रगतीचा मार्ग वायुवेगानें आक्रमावा हीच आमची हार्दिक शुभेच्छा !

टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाहीं ! धार्मिक, सामाजिक व राजकीय क्रांतीचे कार्य करीत असतांना आपणावर जे अनेक विरोधाचे आघात झाले त्यामुळेंच आपणास देवपण आले आहे. म्हणूनच जनतेला आपण देवाचे ठिकाणीं आहांत ! हें आपले देवपण उत्तरोत्तर जनतेच्या उर्जितावस्थेस कारणीभूत होवो, अशी परमेश्वराचे चरणीं नम्र प्रार्थना करून हे मानपत्र आम्ही आपणास आदरानें अर्पित आहोत.

करवीर नगरपालिका
कोल्हापूर, ता. १५।८।४९

आपले,
**अध्यक्ष व सभासद,**
कोल्हापूर म्युनिसिपल बरो.



सत्ता मिळाल्यानंतर—मंत्री, महाराज व प्रजापरिषदेचे कार्याध्यक्ष माधवराव बागल.



मुंबईनिवासी कोल्हापूरच्या ५० संस्थांनी कार्याध्यक्ष माधवराव व मंत्री यांना मानपत्र दिले त्यावेळीं. ४–१–१९४८, पान १४८ भाग २ पहा.



भाई माधवराव बागल मार्केट, राजारामपुरी.

# वाङ्मयाबद्दल

## नव्यापिढीचे राजकारण—( सत्यशोधकांना इषारा )

**कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदेः—** ( प्रस्तावनेंत ) ; माधवराव हे कलाभिज्ञ चित्रकार असल्यानें आपल्या या वाङ्मयीन कृतीतही त्यांना आपली सौंदर्याभिरुचि प्रगट केल्याविना राहवलें नाहीं. सुटसुटीत प्रकरणें, लहान लहान पॅरेग्राफ, मार्मिक आणि समर्पक अवतरणें, साधी मराठी भाषा वगैरे उपकरणांनी त्यानीं आपले अभिनव विचार महाराष्ट्रांतल्या बहुजनसमाजाच्या गळीं उतरविण्याचा जो प्रयत्न केला आहे तो केवळ अभिनंदनीय आहे. हा प्रयत्न वाचकाना एकाद्या कथा कीर्तनाप्रमाणें रुचेल असे वाटते. त्याच्या विवेचनांत अर्थ कारणाची जी नवी घडी आजकाल बसत चालली आहे तिचाच प्रभाव अधिक दिसतो. अर्थ कारणाची धडाडी त्यांनीं स्वीकारलेल्या जनसभेच्या कार्यक्रमांतही स्पष्ट दिसत आहे. २३ जून १९३१ : **ज्ञानप्रकाश**—समाजसत्तावादी पंथाच्या कार्यक्रमाचे विवेचन मराठींत इतक्या सुबोध रीतीनें दिलेले आमच्या तरी पाहण्यात नाहीं. **चित्रमयजगत**—इषारा अंतर्भेदी आहे व राजकारण सखोल व विचार प्रवर्तक आहे : **महादेवशास्त्री दिवेकर व प्रभाकर हरि खाडिलकर.—** सत्यशोधक व ब्राह्मणेतर या नांवाशीं गेल्या दहा बारा वर्षांत ब्राह्मण द्वेषाचा अविभाज्य वाटला जाणारा संबंध जोडला गेला होता तसा तो नाहीं असा विश्वास या पुस्तकाच्या वाचनानें झाला आहे. **दिवाण बहादुर अण्णासाहेब लठ्ठे.** माजी मंत्री मुंबईः—आपल्या इतक्या कळकळीनें सर्व बाजूनें या प्रश्नाचा विचार करणारी माणसें सत्यशोधक समाजांत फार थोडी आहेत. ज्या प्रगल्भ विचारानें प्रेरित होऊन आपण हें पुस्तक लिहले आहे ते विचार संघटित सत्यशोधक समाजाच्या द्वारानें कृतीत आणणे आपणास शक्य होवो. **शंकरराव देव.—** आपण प्रगट केलेलें उदात्त सात्विक व खोल विचार यांनीं आम्हा सर्वांना आपणाला फार निकट बनवले आहे. हे विचार आचारांत उतरविण्यासाटीं कांहीं संघटनात्मक कार्य महाराष्ट्रांत व्हावे अशी आमची सर्वांची मनापासून

इच्छा आहे. **रत्नाकर.**—खरा सत्यशोधक असतो कसा किंवा असावा कसा याचे आरंभी काढलेलें चित्र अत्यंत मोहक असून कोणालाही पसंत होण्यासारखे आहे. शेतकरी मजूर व त्यांचे महत्व, त्यांची होत असलेली अनास्था, त्याची हल्लीची केविलवाणी स्थिती याचे हृदयंगम वर्णन केले आहे. भाषा निर्दोष व असंदिग्ध आहे. विषय प्रतिपादन मूर्तिमंत कळकळीचे आहे. आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ जागजागी पाश्चात्य व पौर्वात्य थोर पुरुषांची वचनें विखुरली आहेत. ह्यावरून बागलांचा व्यासंग व बहुश्रुतपणा याचा प्रत्यय येतो. **आचार्य शंकरराव जावडेकर.**— यांतील विचार सत्यशोधक समाज ब्राह्मणेतर जनता व एकंदर महाराष्ट्र यांनी ग्रहण केल्यास महाराष्ट्राच्या कर्तृत्वास योग्य दिशा लागून त्याच्या चालू इतिहासास नवे वळण लागेल.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.**— 'बागलांनी आपल्या लेखनानें सत्यशोधक चळवळीला नव्या ध्येयवादाचा पुरवठा केलेला आहे. याबाबतीत त्यांची कामगिरी अनन्य सामान्य आहे. त्यांनीं सत्यशोधकास दिलेला इषारा वाया जाणार नाहीं.'

* * *

**बेकारी व तीवर उपाय**— (प्रस्तावनेंत) **गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळुसकर.**— 'मी थोडे बहुत वाङ्मय सेवेचे काम केले आहे. ते सारे प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकाच्या कामापुढें कांहींच नव्हे असे मला वाटतें. स्वतःला जे विचार खरे व समाजाच्या हिताचे असे वाटतात ते कोणाचीही भीड किंवा मर्यादा न ठेविता लोकापुढे निर्भयपणें व व्यवस्थितपणें मांडणे हें बहुमोलाचे व खऱ्या जनसेवेचे कृत्य आहे. ते जो करील तोच खरा लोकहितकर्ता लेखक होय...शेतकरी, मजूर, बेकार; जमीनदार, भांडवलवाले व कारखानदार यांच्या परस्पर संबंधाचे चित्र प्रस्तुत ग्रंथांत लेखकानें हुबेहुब रेखाटले आहे. असल्या विचार पद्धतीस सोशियालिझम् असे नांव आहे......स्वार्थ परायणता जसजशी प्रबल होत जाते, तसतसा इतर कोमल वृत्तीच्या विकासाला अवसर उरत नाहीं. किंबहुना त्याचा बहुतांशी ऱ्हास होत असतो, परंतु त्याचे निर्मूलन असे सहसा होत नाहीं.

म्हणूनच प्रस्तुत ग्रंथकारासारखे पुरुष निर्माण होऊन कैक युगें चालत आलेल्या मानवी प्रपंचाच्या बिमूवर आघात करण्यास उद्युक्त होत असतात. त्यानें हे विचार मनापासून वाचून त्याचे मनन करावे अशी मी आमच्या महाराष्ट्र जनास विनंती करतो. १० सप्टेंबर १९३३. दादर, मुंबई.

**विविधवृत्त.**— मराठी वाङ्मयांत तरी अशा विचारसरणीची पुस्तकें फारच थोडी किंबहुना नाहीं म्हटली तरी चालेल.

**मा. वि. किबे.**—आपण एका उत्कृष्ट पुस्तकास जन्म दिला त्याबद्दल आपले अभिनंदन करतो. **भास्करराव जाधव.**— पुस्तक बरेच वेळां मनन करण्याजोगे आहे. गेल्या साहित्य संमेलनांत शेतकरी व मजूर यांच्या उपयोगी असें वाङ्मय तयार करावे अशी शिफारस करण्यात आली होती. या पुस्तकांत शेतकरी व मजूर यांच्या कष्टप्रद स्थितीचा विचार केलेला असल्यानें त्या दृष्टीनें हें पुस्तक साहित्य परिषदेच्या आश्रयास पात्र आहे. **प्रो. दत्तो वामन पोतदार**— जगास घेरून टाकणाऱ्या बेकारीचें हृदयस्पर्शी चित्र जोरदार भाषेत...मनांत ठसल असें मांडले आहे. सर्वांनीं अवश्य वाचावे म्हणजे बेकारीचें भेसूर स्वरुप मनांत येऊन वाचकांचा अंतरात्मा जागृत झाल्याखेरीज राहणार नाहीं. **नवाकाळ.**— सर्व विचारसरणी उदारमतवादित्वानें, विवेकशीलतेनें व सहिष्णुतावृत्तीनें भारलेली आहे. **ज्ञानप्रकाश**— एकंदर परिस्थितीचे पर्यालोचन करून... पुस्तककर्त्यांनीं निर्विकार बुद्धीनें व तत्वैकदृष्टीनें, विचार संगतवाररीतीनें मांडले आहेत. विचारसरणी जशी प्रगमनशील व समाजहित संवर्धक आहे त्याप्रमाणेंच प्रतिपादन शैली निरपवाद स्वरुपाची आहे.

* * *

**लग्न बंधन कीं तुरुंगवास.**—**जी. के. देवधर,** अध्यक्ष सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटी.— **It is a thought provoking book and its reading is educative and instructive. The history of woman's position given by you culled from several sources is a very instructive one......and the arguments that you have marshelled in it bringing home to the readers the need for equal treatment are very convincing.**

**ज्ञानकोशकार डॉ. केतकर** — आपल्या पुस्तकांत अनेक प्रकारची माहिती एकत्रित केली आहे. आपल्या पुस्तकासारखी पुस्तकें वाचकांची दृष्टी व्यापक करण्यासाठीं उपयोगी पडतील. **प्रो. माधवराव पटवर्धन** ( माधव ज्युलियन ).—**स्त्रियांच्या कायदेशीर दास्य–दुर्दशेकडे** लक्ष्य वेधणारे आपले पुस्तक वाचून आनंद झाला तो पत्री लिहिता पुरवत नाहीं. स्त्रियांची गुलामगिरी आज आहे व ती पुरुष जातीला लांछनास्पद आहे. व मनुष्य जातीस अपायकारक आहे या विषयीं शंका नाहीं. ही गोष्ट आपण कळकळीनें व परिणामकारक रीतीनें दाखवली आहे. **र. धों. कर्वे, M. A.**—आपल्या पुस्तकांतील बराच भाग विचारार्ह आहे. **पुरुषार्थ.**—पुस्तक प्रारंभी बरेच क्रांतिकारक वाटले तरी समारोप मोठ्या खुबीनें करून विधायक तडजोड सुचवली आहे. **सकाळ.**—पुस्तक फारच परिणामकारक वाटते. **मासिक मनोरंजन.**—एका बैटकींत पुरें केल्या-वाचून खाली ठेवावेसे वाटत नाहीं. प्रत्येक कुमार कुमारिका यांनी अवश्य वाचून विचार करावा. **ज्ञानप्रकाश**—पुस्तक वाचनीय व विचार प्रवर्तक आहे. विवेचन समर्पक रीतीनें करण्यांत आले आहे. विवेचनास अधिकारी व्यक्तींच्या वचनाचा ठिकठिकाणीं आधार देण्यांत आला आहे.

* * *

जिव्हाळा.— प्रस्तावनेंत वि. स. **खांडेकर.**— ललित-वाङ्मयाची एका शब्दांत मला कुणी व्याख्या करायला सांगितली तर 'सहानुभूति' एवढाच शब्द मी वापरीन....बागलांच्या गोष्टींतून व्यक्त होणाऱ्या जिव्हाळयानें माझ्या मनांतही संवादी भावना निर्माण केली. भिन्न भिन्न पदार्थ विशिष्ट उष्णतामानानें एकरुप होऊं शकतातच कीं नाहीं ! मग सामाजिक अन्यायाच्या आगीनें आमची अंतःकरणें समरस होऊं शकली तर त्यांत नवल कसलें. श्री. बागल यांची व्यापक सहानुभूति या कथासंग्रहांत सर्वत्र दृग्गोचर होते. अन्याय विषयक [illegible] मग तो धर्माचा असो वा पैशाचा असो तो त्यांना सहनच होत नाही. '[illegible] आई' ही गोष्ट तर जिव्हाळयाचा जिव्हाळा म्हणता येईल. उदात्त वातावरण निर्माण करण्याची कला बागलांना

साध्य आहे हे दाखवायला ही एकच गोष्ट पुरी आहे. बागल विचाराच्या दृष्टीने समाजवादी आहेत. पण त्यांचा हा समाजवाद जीवनांतून, भोंवतालच्या समाजाशी समरस होऊन घेतलेल्या अनुभवांतून आलेला आहे. समाजविषयक सहृदयता बागलांच्यांत विपुल प्रमाणांत असल्यामुळें विषयाची विविधता साधून खालच्या थराच्या लोकांची सुखदुःखें चित्रित करता आली आहेत. **ज्ञानप्रकाश.**—चित्रकारानें चार ब्रश मारून साधे पण मनोहर चित्र रंगवावे त्याचप्रमाणें या गोष्टी मनोरम झाल्या आहेत. कलेचा मत प्रचारासाठीं उपयोग करावा की नाहीं या विषयीं वाद घालणाऱ्यांना या कलाकृती योग्य तेच उत्तर देतील. **ध्रुव.**—कला व तंत्र याच्या फंदांत न पडतां किंवा त्यांच्या बंधनांत न अडकता थेट हृदयाला जाऊन भिडणाऱ्या जिव्हाळयाच्या गोष्टी कशा लिहिता येतात व वाचकापुढें नवी सृष्टि कशी उभविता येते याचे जर कोणास उत्तम उदाहरण हवे असेल तर त्यानें हा कथासंग्रह वाचावा. थोडक्या पण वेचक शद्बांत आणि प्रसादपूर्ण व प्रवाही भाषेंत परिणामकारक शद्बचित्र रेखाटण्याची कला श्री. बागल यांच्या लेखणींत, उत्कटत्वानें वसत आहे. समाज विषयक सुहृदपणा, उत्कट सहानुभूति, सामाजिक अन्यायाचे अचूक दिग्दर्शन इत्यादि गुणामुळें हा संग्रह स्वागतार्ह वाटेल. प्रत्येक गोष्ट जिव्हाळयानें नटली आहे. व तिच्यांत कृत्रिमतेचा किंवा खोट्या कलाविलासाचा मागमूसही नाहीं. **सकाळ**—श्री. बागलांचे हृदय कलावंताचे. भावना सूक्ष्म व तरल आणि जिव्हाळयाच्या दर्याला भरती आलेली. पण त्याचबरोबर त्यांना जीवनांतील येऊ नयेत ते अनुभव आले आहेत. जिच्या प्रत्येक पावलाखालीं दासांच्या देहाचे रुजामे आंथरलेले अशा युवतींच्या वैभवश्रीपासून तो तहत मिणमिणत्या चिमणीखालीं पहाटेस पोटासाठीं डाळ भरडणाऱ्या शेतकरणीच्या दारिद्र्यापर्यंतच्या वैचित्र्यपूर्ण जीवनाशी ते समरस झाले आहेत.

स्वकीयाकडून अपमान आणि अकल्पित ठिकाणाहून जिव्हाळा अशा विचित्र विधिघटनेनें त्यांची मति गुंगही झाली आहे. गेली कित्येक वर्षे ते शेतकरी जीवनाशी इतके निगडित झाले आहेत कीं शेकडो किसान त्यांना आज आपल्यांतील समजतात. दुःखांनी होरपळलेला सहानुभूतीनें गहिंवरलेला मनोवृत्तीनें रसरसणारा पण त्याचवेळी शालिनतेने नमणारा

असा समाजाचा निस्सीम सेवक. खोपटांतून दुःखाचे आर्त स्वर ऐकूं येताच ते तिकडे धांवले आहेत. मानापमानाच्या कल्पना टाकून त्यांनीं समाजाची सेवा केली आहे. कष्टाचे लेणे लेवून आत्मानंदाचे चणे खाणाऱ्या समाज सेवकाच्या खडतर जीवनाचा कांटेरी मार्ग ते चोखाळीत आहेत आणि म्हणून श्री. बागल हे, जीवनाचे भाष्यकार नसले तरी बहुजनसमाजाची मूक दुःखें जाणून घेऊन ती व्यक्त करणाऱ्या दुभाष्याची त्यांची भूमिका खास आहे. कला मग ती कोणतीही असो ती समाजाच्या उपयोगी पडली पाहिजे या टॉलस्टॉयच्या विचारसरणीचे श्री. बागल हे अनुयायी आहेत. आपले प्रत्येक लेखन समाजाच्या सेवेसाठीं मांगल्या-साठीं व उद्धारासाठीं ही त्यांची भूमिका आहे.

**महाराष्ट्र शारदा.—** ( १९३६ ) सरस्वती युगायुगानें लीलेनें स्वतंत्र सृष्टि निर्माण करीत आहे ह्याची खात्री 'जिव्हाळा' वाचून होते. श्री. माधवरावांची भाषा पाल्हाळी नसून सुंदर वेल्हाळी आहे. त्यामुळें साऱ्या वाचकांच्या मनांतही जिव्हाळा उत्पन्न झाल्याखेरीज रहात नाहीं. कथा वाचून सतरावेळां परळ मधील मजूरांचे चाळीतून हिंडण्याचे किंवा रशियाची समाजसत्तावादाची शेंकडों पुस्तकें डोळयांखालून घालण्याचे श्रेय लाभते. तेव्हां असे सजीव लिखाण वाचून तरी पायाखाली धरणीकंप होत असातांना आकाशांतील ग्रह, आपल्याला अनुकूल आहेत म्हणून सुखानें झोपणाऱ्यांचे डोळे उघडावेत. **किर्लोस्कर.**—( १९३६ ) बागल हे सध्याच्या महाराष्ट्रांतील प्रसिद्ध लघुकथा लेखक आहेत. या कथा संग्रहांत भाषेचा सुबोधपणा विषयाची विविधता हे गुण दिसतात आणि जे जीवित सध्या आपण अनुभवत आहोत त्याचे प्रतिबिंब पहावयास सांपडते म्हणूनच या गोष्टी सजीव वाटतात.

**संसार लघुकथासंग्रह:** (भा. वि. वरेरकर-प्रस्तावनेंत) पांढरपेशा वर्गाच्या पदकमलाखालीं तुडवल्या जाणाऱ्या अधोवर्णीय भृंगांना जागृति देणाऱ्या जनकाच्या सहवासांत माधवरावांना जो अनुभव मिळत गेला त्यांच्या वियोगानंतर त्यांना स्वतःच्या डोळयांनीं पहात जो अनुभव मिळाला त्या अनुभवाच्या जोरावर निर्माण केलेले तेजस्वी वाङ्मय या संसारांत वाचकाला पहायला मिळेल व मला अभिमान वाटतो तो हाच कीं प्रचाराच्या

पराक्रमासाठीं माधवरावांनीं तंत्राची पर्वा कधीच केली नाहीं. तंत्र नांवानें ओळखल्या जाणाऱ्या बंधनांना झुगारून देण्यांत जो पुरुषार्थ दाखवला आहे तो नव्या लेखकाला अनुकरणीयच ठरेल. सुबोध लेखन कौशल्य नसांनसांतून वागल्याशिवाय साधारण शिक्षित माणसाला हृदयगम्य होईल असे परिणामकारक वाङ्मय निर्माण करणे लेखकाला शक्य होणार नाहीं. ही अत्यंत कठीण कला माधवरावांना साधली आहे. थोडक्या अवधींत माधवरावांनीं जे वाङ्मय निर्माण केले आहे जितके सुंदर आणि परिणामकारक वाङ्मय निर्माण केले आहे, ते पाहिले म्हणजे वाङ्मय प्रपंचांत पेन्शनीला आलेल्या माझ्यासारख्या लेखकाला सुद्धां लाजेनें मान खाली घालावीशी वाटू लागते.

**कला आणि कलावंतः**— (रा. बहादुर माधवराव धुरंधर, प्रिन्सिपाल, सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट) हा ग्रंथ लिहून महाराष्ट्र कलावाङ्मयांत जी भर घातली आहे त्याबद्दल आपला गौरव व अभिनंदन करावे तितके थोडेच आहे. निसर्ग रंगवावा कसा या भागांत आपण स्वतःचे अनुभव लिहून इंग्रजी भाषा अनभिज्ञ चित्रकारास जो लाभ करून दिला आहे त्या कामगिरीबद्दल महाराष्ट्र कला वाङ्मयांत आपण आघाडीचे Pioneer लेखक ठरतां. **किर्लोस्कर**— चित्रकलेच्या चिकित्सेची पुस्तकें मराठींत दुर्मिळ असल्यानें हे पुस्तक बहुमोल मानले जाईल. **ज्ञानप्रकाश**— लेखन आणि चित्रकला याचा सुंदर मिलाफ पुस्तकांत झाला आहे.

**स्वराज्याचा शत्रुः**—(दिवाण बहादुर लठ्ठे) पुस्तक अंतःकरणाच्या कळवळयानें लिहले आहे. जातिभेदाचे दुष्परिणाम मराठी वाचकाच्या मनावर बिंबविण्यास या पुस्तकाचा उपयोग होईल. **ज्ञानप्रकाश**—अस्पृश्यावर होणाऱ्या अन्यायाचे दिग्दर्शन जितक्या उत्तम रीतीनें करता येणे शक्य आहे तितक्या उत्तम रीतीनें ते केले आहे. **नवाकाळ**—स्वराज्याविषयीं कळकळ बाळगणाऱ्या प्रत्येकानें हे पुस्तक नजेरं खालून घालावे.

**समाजसत्ता कीं भांडवलशाही.**— **(सयाजीराव महाराज)** आपली मत प्रतिपादनाची शैली श्रीमंतास पसंत पडल्याचे कळवण्यास आनंद वाटतो. (हुजूर कामदार) **कला–गोवा**—या महशूर कलावंताचे समाजवादी विचारसरणीवरील हें कांहीं पहिलेच पुस्तक नाहीं. महाराष्ट्राच्या

कोनाकोपऱ्यांत फडफडणाऱ्या वृत्तपत्रांच्या रकान्यांतून घरोघर वाचल्या जाणाऱ्या नियतकालिकांच्या भारदस्त पृष्ठांतून त्यांची व्याख्यानें, तत्वप्रचारात्मक लघुकथा लेख ही चौफेर विखुरली गेली आहेत. आणि त्यांच्या या विपुल लेखनाचा वर्ण्यविषय एकच आणि तो म्हणजे—समाज सत्तावाद !... या दृष्टीनें भाई बागल यांचे लेखन कार्य इतर कोणत्याही 'भाई' पेक्षां अधिक मोलाचे व जिव्हाळयाचे आहे.... संकुचित विचार आणि विकास गुदमरविणाऱ्या रूढी या उखडून टाकण्याऱ्या विचार-स्फुलिंगाचा फैलाव करून त्यांनी महनीय समाज कार्य केले आहे ही गोष्ट निर्विवाद मंजूर करावी लागेल.... समाजोद्धारासाठीं आपल्या सर्व शक्ती एकवटून वाङ्मय प्रसवणारा निस्वार्थी लेखक म्हणूनच माधवराव बागल यांचे नांव गाजत राहील. श्री. माधवराव बागल जसे अभिजात कलावंत आहेत तसेच निष्ठावंत समाज सेवक आहेत. त्यांनीं कलमाची कारागिरी सोडली असली तरी आपल्या हृदयाची कलात्मकता कलम केलेले नाहीं. भाई बागल समातावादी आहेत तरी देखील कोवळया मनाचे भाई आहेत.

जुलूम.— (प्रो. य. गो. नाईक एम. ए.) थोड्याच दिवसापूर्वी दिवंगत झालेल्या रशियन कथा लेखक मॅक्झिम् गोर्की यांस लिहिलेल्या पत्रात फ्रेंच लेखक रोमाँ रोलाँ यांनीं काढलेले उद्गार रा. बागल यास बऱ्याच प्रमाणांत लागू पडतात. रोमाँ रोलाँ लिहितात, 'समाज समुद्राच्या पृष्ठभागावर तरंगणाऱ्या मनोहारी परंतु क्षणभंगुर फेंसाचे—श्रीमंत सुखी सामर्थ्यवान मूठभर पांढरपेशा समाजाचे— आम्ही आजवरच्या कथा-लेखकांनी चित्रण करण्यात आयुष्य खर्च केले, तूं मात्र समाज समुद्राच्या अगम्य आणि भयाण तळाचा ठाव घेऊन इतरांच्याही वर चढलास' रा. बागल यांस वरील उद्गार बऱ्याच प्रमाणांत लागू पडतील. या संग्रहांतील लैंगिक जीवनविषयक कथा सोडल्यास बाकीच्या कथा अत्यंत परिणामकारक आहेत. हिंदु समाजाचे बारीक नजरेनें, स्थिर मनानें अविश्रांतपणे केलेले अवलोकन व जिव्हाळयानें परंतु निरपेक्ष अभिनिवेशहीन केलेले चित्रण वाचकाच्या मनावर परिणाम केल्यावाचून राहात नाहीं. चित्रण हृदय-स्पर्शी तीव्र जागृति उत्पन्न करण्यासारखे आहे. भाषेत ठसकेदारपणा त्याप्रमाणें कटुसत्यें मनावर बिंबविण्यासाठीं जरूर असलेला तुटकपणा भरपूर

आहे. 'कलाविलास कोमळा' अशा सरस्वतीचे रा. बागळ हे भक्त नाहींत. ठसकेदार, अप्रवाही, जोमदार प्रघातक्षम भाषासरणी उपयोगांत आणणे त्यास योग्य वाटणे स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें ही अप्रिय सत्यें भावनावश न होता संयमपूर्ण पद्धतीने चित्रित करण्याचे कठिण काम त्यांनीं मोठ्या कौशल्याने केले आहे. लोकशक्ती.—नूतन व आक्रमणशील अशा एका विचारसरणीचे ते स्वयंस्फूर्त प्रचारक असल्यामुळें त्यांच्या लेखनांत कला व हेतू याचा सुंदर मिलाफ झाला आहे. 'जनसेवेकरता कला' या लेनिनच्या आदेशाचे कृतीत रुपांतर पावलेले व मराठी वाङ्मयांत क्वचित आढळणारे असे हे एक उदाहरण आहे.

**The Bombay Chronicle**—(Sunday the 6th Sept. 1936.)

In most of the stories the author effectively puts before the reader various forms of social tyrannies which have taken deep root in several Hindu families in the country very often with most disastrous and shocking results. The style of the writer is simple and the stories provide ample food for social worker.

**Mahratha**—Poona.

Everyone of his story has a 'tale' to tell. His fiction is grim fact. His stories are stark realities. His satire is lash of scorpions He shocks us into a sudden and vivid realisation that something is radically wrong in the state of our society. His book is a notable contribution to the literature of human protest against inhuman, in justice. He is a merciless critic of the old, He is an eloquent advocate of the new. His appeal is resistless. His style is simple, direct, natural. A note of intense sincerity runs throughout his work. He is not a slave of mere techinque and yet his little stories are works of art. His aim is not amusement. His mission is awakening. He is a man with a message. ( N. G. Deo. )

शाहूमहाराजांच्या आठवणी.— (प्रबोधनकार, केशव सिताराम ठाकरे)— 'महाराजांच्या अष्टपैलू जीवनाचा साक्षात्कार याच पुस्तकांत झाला. फार मोठी कामगिरी बजावली माधवराव तुम्ही'

प्रल्हाद केशव अत्रे— ‘ तुम्ही संपादन केलेले सुंदर पुस्तक पोहोचले. एकाच बैटकींत वाचून काढले. येत्या नवयुगच्या अंकांत त्या पुस्तकांतील १०–१२ आठवणी प्रसिद्ध करीत आहे.

वि. स. खांडेकर.— यांतल्या आठवणी वाचताना महाराजांच्या चरित्रावर तर सुंदर प्रकाश पडतोच पण एखाद्या चरित्र नायकाखेरीज इतर अनेक लहान मोठी पात्रें लेखकानें कौशल्यानें चित्रित केली असावीत आणि त्यांच्या छोट्या पण मनोहर स्वभावरेखांनी वाचकाला निराळयाच प्रकारचा आनंद द्यावा तसा अनुभव या आठवणीं वाचताना येतो. विविध स्वभावांच्या माणसांचे एक छोटेसे संमेलनच या पुस्तकांत भरले आहे. जगाच्या दृष्टीनें सामान्य असलेली–पण माणूस या नात्यानें मोठी असलेली जीवनें या आठवणी चाळता चाळता आपणाला दिसतात. विचार आणि भावना यांना चालना देणाऱ्या अनेक आठवणी या संग्रहांत आहेत. त्या वाचतांना एका असामान्य आत्म्याच्या सहवासांत वावरल्याचा आनंद प्रत्येकाला निःसंशय होईल.

**बंधनांत.**— अग्रणी, संपादक दा. न. शिखरे, पुणें ( १९३९ ) माधवराव आज बंधनांत असले तरी त्यांचे ‘ बंधनांत ’ हे आत्मचरित्र बाहेर पडले आहे. ( ‘ जीवन–प्रवाह ’ या चरित्राचाच बंधनांत हा पहिला भाग होय. ) ते वाचण्यास सुरवात केली असतां एका पाठोपाठ शेंसव्वाशेहे पानें केव्हां ओलांडली गेली आणि पुस्तक केव्हां संपलें हें ध्यानांत देखील आले नाहीं. यापूर्वी ‘हंटर’ या साप्ताहिकांत लेख लिहून श्री. बागलांची लेखणी घटलेली होतीच आणि गेल्या पांच सात वर्षांत १०।१२ पुस्तकें लिहून ती लेखणी अणकुचिदार बनली आहे. त्यामुळें पुस्तकांतील भाषाशैली पारदर्शक व परिणामकारक वाटते श्री. बागलांचे चरित्र चमत्कृतिपूर्ण तर आहेच पण म. गांधीच्या तत्त्वज्ञानाशी समरस झाल्यामुळें तें अत्यंत उदात्तही बनलें आहे. ‘ उघड्या मनानें लिहिण्याइतका प्रामाणिकपणा माझ्यांत नाहीं ’ ही त्यांची कबुलीच त्यांच्या प्रामाणिकपणाची ग्वाही देण्यास पुरेशी आहे. आरशासारखें स्वच्छ आणि कांचेसारखें पारदर्शक असें हें त्यांचें आत्मचरित्र आहे. त्याला उपमा एक म. गांधीच्या आत्मचरित्राचीच.... गगनचुंबी पर्वत आणि पातळगामी दरी अशा

वैषम्याचे प्रसंग बागलांच्या आयुष्यांत पुष्कळ आले...आज माधवराव बागलांना लोखंडी बेड्या घालण्यांत येत आहेत, रस्त्यावर राबवण्यांत येत आहे....शाळेंत शिपायाकडून दप्तरपाटी नेणारे आणि वर्गात मऊ गादी पसरवून बसणारे, आर्ट स्कूलमध्यें 'राजेसाहेब' म्हणवून घेण्याइतक्या रुबाबांत राहणारे आणि खुद्द शाहू महाराजांनी दिलेला अरबी घोडा दौडत नेणारे श्री. माधवराव बागल जनतेशी समरस झाले. हजार रुपयाचे परदेशी कपडे जाळून जनतेच्या समतेच्या स्वातंत्र्याचा लढा चालवू लागले आणि त्याचे नोबल पारितोषक म्हणजे आजचा त्यांचा खडतर कारावास. साम्यवादाच्या 'पवित्र धर्मासाठीं घरादारावर तुळशीपत्र ठेवून वाहून घ्यावे व हिंदुस्थानचा कोनाकोपरा जागा करावा' असा निदिध्यास त्यांना लागला. शेंकडों चित्रे रेखाटण्यांत आपले कलम व आपले जीवित व्यतीत करणारे आणि महाराष्ट्र चित्रकार संमेलनाचे अध्यक्षपद अलंकृत करणारे श्री. बागल हे तुरुंगातील हातोड्या–फावड्यानीं हिंदी शेतकऱ्यांचे भावी सुखचित्र सध्या घडवीत आहेत.

* * *

# नियतकालिकें काय म्हणत ?

**ज्योत्स्ना** — ( भाई लालजी उपाध्ये १९४०. ) 'खबरदार यापुढें बापाकडून पैसा घेशील तर' असें दरडावून आणि श्रीमुखांत भडकावून कै. शाहू महाराजांनी माधवरावांना त्यांच्या ध्यानींमनीं नसतां चित्रकलेचें उच्च शिक्षण घेण्यासाठीं शिष्यवृत्ती दिली ! हा पोर मोठेपणी या चित्रकलेचा उपयोग आयुष्यभर कुंचले झाडून वैयक्तिक मानमरातब अगर संपत्ती संपादण्याकडे करीत बसणार नाहीं तर समाजांतल्या अन्यायी विषमतेची नि नीतिधर्माच्या ढोंगाची, तसेच वार्गिक जुलमाची विदारक करुण कथाचित्रें रंगवण्याकडे करील, फार काय पण चित्रकार परिषदेच्याही अध्यक्षीय पीठावरून समाजांतल्या आर्थिक विषमतेविरुद्ध टाहो फोडील; खुद्द आपणापासून स्फूर्ति घेऊन सत्य समाजाचा अडलेला गाडा क्षुद्र जातीयवादाच्या चाकोरीतून बाहेर खेचून अंधश्रद्ध सांप्रदायिकतेपासून

त्या विशुद्ध कार्याची सोडवणूक करील, सत्यशोधनाच्या कार्याची परिणति शास्त्रीय समाजवादांतच हें निर्भेळ सत्य निर्भीडपणें मांडून अंधारांत चांचपडणाऱ्या तत्कालीन सत्यशोधकांना आगामी कालाचा खंबीर इषारा देईल. इमानी सत्यशोधकाचे कर्तव्य बजावीत असतां खुद्द राजसत्तेच्या इच्छेविरुद्ध वर्तन ठेवण्यांचा प्रसंग आला तरी, राज्यकर्त्यांविषयीं योग्य तो भक्तिभाव कायम ठेवून प्रजाहितासाठीं राजाज्ञांना मान तुकवण्याचे नाकारण्याचे कटु कर्तव्य बजावण्यास अनुमान करणार नाहीं. ह्या सर्व भावी घटनांची त्या दिवंगत उदारधी नृपतीला कल्पनाही येणें शक्य नव्हतें.

'बंधनांत' या आत्मकथेच्या प्रकाशनाचे सुमारासच कोल्हापुरांत भरलेल्या जंगी जाहीर सभेंत भाईनीं अशी तेजस्वी घोषणा केली कीं, संस्थानच्या मूक प्रजेला माणुसकीचे हक्क मिळवून देण्याचा प्रयत्न करीत असतांना खडी फोडावी लागली तरी चालेल...फार काय मृत्यू देखील मला अडवूं शकणार नाहीं.'

१९३८ च्या डिसेंबर २५ ला भाई बागलांच्या नेतृत्वाखालीं २५००० शेतकऱ्यांचा प्रचंड मोर्चा, बागलांना अटक, सुटका आणि सत्कार समारंभाच्या निमित्तानें काढलेला वावटळी दौरा ! जनतेंत जणुं नवचैतन्य संचारलें होतें. कित्येक शतकें सुषुप्त असलेला जनता सागर जसा कांहीं सुधांशूच्या दर्शनासाठीं उतावीळपणें उचंबळला होता ! राजवैभवाच्या थाटामाटाला त्या भव्य मिरवणुकी आणि प्रचंड सभा ! कलाक्षयाच्या यातनांनी शिणल्यावर कलावृद्धीचे वैभव संपादलेल्या लाडक्या पूर्ण चंद्राला मस्तकीं धारण करून सागराच्या आंदोलित लहरींचे जणुं बेहोष आनंदातिशयानें नर्तन चाललें होतें. 'माधवराव बागल की जय' हा जयघोष म्हणजे करवीरच्या प्रजाजनांच्या वर्धिष्णु आशा आकांक्षा आणि विजिगीषा यांचे दर्शक सूत्र—वाक्यच होतें !

...भाई माधवराव बागलांसारखा चतुरस्त्र नेता कोल्हापुरच्या प्रजेला मिळाला हे तिचे भाग्य होय. त्यांच्या गैरहजरींत त्यांच्या सहकाऱ्यांनीं खालसा हद्दींत कुपवाड येथें भरवलेल्या कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे प्रसंगीं परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. पट्टाभी सीतारामय्या यांचे सारख्या अखिल भारतीय पुढाऱ्यानें स्वतःचा सत्कार नाकारून कोल्हापूर प्रजेच्या गर्हिवरलेल्या अंतःकरणाच्या सद्गद वातावरणांत

तोच स्नेह–सुगंधित सुमन हार भाई बागलांच्या तैलचित्रांतील प्रतिमेस अर्पण करून त्या कर्मयोगी कलावंताचा जो गौरव केला तो अप्रस्तुत कोण म्हणेल. बागलांनी आपल्या निष्ठावंत सहकाऱ्या समवेत अव्याहत परिश्रम करून कोल्हापूरची भूमि नांगरून ठेवली; योग्य वेळीं वर्षाव होईलच.

**मनोहर.**—( १९३९ ) लेखकानें हातांतली लेखणी थोडा वेळ बाजूला ठेवून त्या ऐवजी झेंडा घेतल्याची आणि राजकीय चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतल्याची उदाहरणें आपल्याकडे फारच थोडी आहेत. ललित वाङ्मयाच्या लेखकानें घरात बसून काल्पनिक सृष्टी निर्माण करावी, बाहेरच्या जगांत ज्या मोठमोठ्या घडामोडी घडून येत आहेत आणि समाज व्यवस्थेंत जे आमूलाग्र बदल होत आहेत त्याची त्यानें फारशी फिकीर करूं नये अशीच आपल्याकडील बहुतेक लेखकांची समजूत आहे. परंतु ती चुकीची आहे. जीवनाकडे पाहण्याचा लेखकाचा दृष्टिकोन बरोबर असल्या शिवाय, समाजांतील निरनिराळ्या घडामोडींचे यथातथ्य ज्ञान मिळवून त्याची बरोबर कार्यकारण परंपरा ओळखता आल्याशिवाय, जीवनाशीं समरस झाल्याशिवाय त्याच्या लिहिण्यांत जिवंतपणा येत नाहीं. त्याचे लिहिणे सत्याच्या कसोटीला उतरणे शक्य नाहीं. ज्या कलेला जीवनाचा आधार नाहीं तिला कांहीं महत्व नाहीं......राष्ट्रीय जीवनांत अशी एक वेळ येते कीं ज्यावेळीं स्वतःला कलावंत म्हणविणाऱ्या लेखकालाही आपल्या वाङ्मयांत जिवंतपणा व सत्य हे दोन गुण आणायचे असतील तर लोकांच्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतल्यावाचून गत्यंतरच उरत नाहीं. हे श्री. माधवराव बागलांनीं कृतीनें दाखवले आहे, आपल्या राष्ट्राला आज अशाच लेखकांची आवश्यकता आहे.

**विविधवृत्त.**—( १८।६।१९३९ ) ...महाराजासारख्या दयाळू राजा जवळचे लोकांच्या कारस्थानाला बळी पडून वाया जाऊं नये म्हणून मग या आपल्या धाडसाबद्दल जवळचे लोक खवळून त्यांत आपला बळी पडला तरी चिंता नाहीं एवढी ज्वलत् जहाल राजनिष्ठा हृदयांत बाळगणारा जातिवंत भाई माधवराव बागल कै. शाहू महाराजांच्या संपूर्ण विश्वासास आणि कृपेस पात्र झालेल्या बागल घराण्यांतूनच अखेर धैर्यानें पुढें आला. ......करवीर प्रजेची दुःखे त्यांनी बेधडक वेशीवर टांगली. पोटभरू बदसल्लागारांचे जाहीरपणें वाभाडे काढले. अधिकाऱ्यांचा आणि महाराजांचाही

शेष पतकरून प्रामाणिकपणें छत्रपतींच्या गादीशी इमान राखले. पण त्याचा अखेर परिणाम काय झाला ? खरा राजनिष्ठ राजद्रोही ठरून चोर, दरोडेखोर, गळेकापू बदमाशाप्रमाणें त्यांच्या हातांपायांत बेड्या पडून त्यांची गांवांतून धिंड काढली गेली. त्यांचा छळ आणि मानभंग झाला व कार्यसाधू मात्र स्वामिनिष्ठ ठरून मोटारीतून मिरवत आहेत. भाई माधवरावांची स्वामिनिष्ठा लोकांना पटली. त्यांनीं त्यांचे कल्पनातीत कौतुक केले......एक दिवस असा येईल कीं, त्यावेळीं महाराजांना भाई बागलांची खरी योग्यता कळेल. पण त्यावेळीं महाराजाभोवती शितासाठीं जमलेली भुतावळ आपखुषीनें परागंदा झाल्याचा चमत्कार महाराजांना दिसून येईल.

**पुढारी.**—( कोल्हापूर १९४९ ) कोल्हापुरच्या राजकीय व सामाजिक प्रगतीचा इतिहास जेव्हां लिहिला जाईल त्यावेळीं तो इतिहास घडवणारे व त्या करितां तुरुंगवास आणि अनेक हालअपेष्टा सहन करणारे भाई माधवराव बागल यांचे जीवनचरित्र चाळावे लागेल यांत शंका नाहीं. संस्थानी रयतेंत त्यांनी जिवाचें रान करून जागृति केली व त्यांच्या मूलभूत स्वातंत्र्याची जाणीव करून त्यांना उन्नत केले. आणि दक्षिण महाराष्ट्रांतील सर्व संस्थानी प्रजेला आशेचा किरण दाखवला. कोल्हापुरच्या प्रजेसाठीं भाई बागल यांनी अनेक वेळा कारावास भोगून भाषणस्वातंत्र्य, लेखन-स्वातंत्र्य व जबाबदार राज्यपद्धतीचा लाभ जनतेला करून दिला, इतरही दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानामधील प्रजेची हांक ऐकताच ते वेळोवेळीं त्यांच्या मदतीला धांवून गेले आहेत. इतकेंच नव्हें तर ज्या ज्या प्रसंगीं राष्ट्रानें लढ्याचा आदेश दिला त्या त्या प्रसंगीं बिनीच्या सैनिका-प्रमाणें ते आघाडीवरच राहिले. भाई बागल यांचा दलिता विषयींचा जिव्हाळा, हरिजनांविषयी त्यांना वाटणारी कळकळ व शेतकरी कामगार वर्गाबद्दल त्यांना वाटणारें प्रेम पाहिले म्हणजे व त्या वर्गाच्या सर्वांगिण उन्नतीसाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची त्यांची तयारी पाहिली म्हणजे महाराष्ट्रांतील खरेखुरे लोकनेते म्हणूनच त्यांना संबोधावे लागेल.

**सत्यवादी** १९४९ भाई बागल आणि कोल्हापूर यांचे नाते इतके निगडीत झाले आहे कीं भाई बागल म्हणजे कोल्हापूर आणि कोल्हापूर म्हणजे भाई बागल असा त्यांचा पर्याय अर्थ झाला आहे. कोल्हापुरच्या

राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या क्षितिजावर आज जवळ जवळ दोन तपें आपल्या कर्तृत्वानें त्यागानें अमोघ वक्तृत्वानें आणि आत्यंतिक तळमळीनें तळपत राहणारा हा धडाडीचा देशभक्त म्हणजे कोल्हापुरचे नव्हे तर अखिल महाराष्ट्राचे भूषण आहे. दलितांच्या दुःखानें तळमळून अश्रू ढाळणारा, भावनावश समाजसुधारक, दिलदार मनाचा आणि मोकळया वृत्तीचा सीधा शिपाई म्हणजे भाई माधवराव बागल. भाई माधवरावांत डावपेच नाहींत, कपट नाहीं. कारस्थानें नाहींत, लावालावी नाहीं, म्हणजेच मुत्सद्देगिरी नाहीं. माधवरावांच्या राजकारणाला गुप्ततेचें वावडे जी गोष्ट मनांत असेल ती ते बेधडक बोलतील, तेच करतील असा त्यांच्या राजकीय मताचा उघडा मामला आहे... त्यांच्या राजकीय जीवनांत मोहाचे अनेक प्रसंग आले, आपल्या राजकीय नेतृत्वाचा सौदा करून त्यांना लाखो रुपयाची कमाई सहज करता आली असती आणि त्यांच्या समकालीन पुढाऱ्याप्रमाणें त्यांना मोटारी उडवता आल्या असत्या व हवेल्या उठवत्या आल्या असत्या. पण ते कोणत्याही मोहाला बळी पडून ध्येयच्युत झाले नाहींत. कोणालाही त्यांना विकत घेतां आले नाहीं. त्यांच्यांत मुत्सद्देगिरी नव्हती आणि नाहीं म्हणूनच त्यांच्या नशीबीची सायकल अद्याप सुटलेली नाहीं. आणि सुटणार नाहीं. आमच्या मतें हेच त्यांचे खरे वैभव आहे. कोल्हापुरच्या जनतेला निर्भयतेची शिकवण भाई बागलांनीं दिली. संस्थानिकांच्या सरंजामी हुकुमशाही राजवटीवर प्रचंड सभांतून त्यांनी किती बेडर हक्क चढवले आणि आपल्या तुफानी प्रचारानें संस्थानी प्रजेंत वैचारिक जागृति उत्पन्न करून सरंजामशाहीचे बालेकिल्ले कसे खिळखिळे केले ही गोष्ट करवीर प्रजाजन कदापि विसरणार नाहीत. एकदरींत कोल्हापुरच्या नव्हे तर सर्व महाराष्ट्राच्या राजकारणांत माधवरावांचे व्यक्तिमत्व व कार्य प्रभावी व अविस्मरणीय असे झाले आहे.

**लोकसेवक** (१९४९) चांगल्या गुणांना गालबोट लावणारा एखादा तरी दोष पुढाऱ्यांना चिकटलेला असतोच. आमचे भाई माधवराव बागलही त्याला अपवाद नाहींत. त्यांच्या अंगीं लोकहिताची तळमळ, जनतेच्या हृदयाचे ठाव घेणारे वक्तृत्व, मनाचा सरळपणा, त्याग, धडाडी इत्यादि जसे बहुमोल गुण आहेत तसेच भावनावशता, अदूरदर्शीपणा,

कोणावरही विश्वासून राहण्याची भोळी वृत्ती इत्यादि दोषही त्यांचे अंगीं आहेत. या दोषाकडे दुर्लक्ष करून त्यांच्या थोर कामगिरीकडे पाहिल्यास भाई माधवराव बागल म्हणजे कोल्हापुरांतील एक महान् व्यक्ती आहे हे कोणीही कबूल करील. भाई माधवराव बागल यांच्या गुणदोषांचा त्यांच्या हितशत्रूंनीं कसा भरपूर उपयोग करून घेतला व अखेर त्यांना कसे तोंडघशी पाडले हें आपण पाहतोच.

काँग्रेसच्या अमदानींत पूर्वीचे देशभक्त आतां देशद्रोही ठरले असून एकेकाळीं काँग्रेसचे विरोधक व इंग्रजांचे आणि सरंजामशाहीचे हस्तक आतां देशभक्त ठरले आहेत. अशा देशद्रोह्यांना जवळ करण्याची काँग्रेसला गरज भासावी यातच तिचा अधःपात व्यक्त होत आहे. काँग्रेसच्या दृष्टीनें भाई बागलांचा भाव जरी उतरला असला तरी बहुसंख्य जनतेच्या हृदयांत त्यांना मोलाचें स्थान आहे.

**मन्वंतर**, पुणें.— कोल्हापुरच्या राजकारणाचे सर्व धडे बागलांनी दिले. बागलांनी राजकीय चळवळ चालू केली. त्यावेळीं कोल्हापूर सरंजामशाहीचा चक्रव्यूह अभेद्य असा होता. परंतु ज्याप्रमाणें द्रोणाचार्यांनीं रचलेला चक्रव्यूह अभिमन्यूनें फोडला त्याप्रमाणें बागलांनीं अत्यंत हाल सोसून कोल्हापुरची सरंजामशाही नामशेष करून टाकली. कोल्हापुरांत झालेल्या राजकीय जागृतीचे सर्व श्रेय बागलांना आहे. कारण त्यांच्यासारखा निस्वार्थी व त्यागी पुढारी कोल्हापुरांत दुसरा कोणी झाला नाहीं.... बागलांचे कार्यक्षेत्र आता वाढले असून तें आतां फक्त कोल्हापुरचे पुढारी राहिले नसून महाराष्ट्राचे पुढारी झाले आहेत.

**श्री. माधव कामत.**— ( आज–संपादक समाज ) हेर हिटलर पासून म. गांधीपर्यंत साऱ्या थोर लोकांची चरित्रें चाळली तर त्यांचें बालपण हुडपणांतच गेलेलें दिसेल ! या नियमाला भाई बागलही अपवाद नव्हते. संपत्ती अन् सुख यांच्या छायेंत वाढलेलं हें पोर पुढं कष्टकरी वर्गाचं काळीज होईल असं त्यावेळीं एखाद्या चिरोला किंवा म्हापणकराला चुकून तरी वाटलं असेल काय !— पूज्य भाईंच्या लेखनांत कामकऱ्यांच्या संसाराबद्दल जिव्हाळा अन मिरासदार वर्गाच्या जुलुमाविरुद्ध तिटकारा झळल्या झळल्याच्या पण सोप्या नि सुंदर वाक्यांनी दाखवण्याची हातोटी

वाखाणण्यासारखी आहे.... भाई बागल हे भावनाप्रधान आहेत. शेतकऱ्यांच्या जमावापुढं व्याख्यान देतांना त्यांच्या डोळ्यांतून अविरत अश्रुधारा वाहताना मी पाहिलं आहे.... सभेत कितीही गोंधळ असो ' भाई हो ' म्हणून एकदा ललकारी दिली कीं क्लोरोफॉर्म दिल्याप्रमाणें जमाव शांत होतो.

भाई बागलांचा देव स्वर्गांत नाहीं, तो अदृष्टहि नाहीं, जगांतील कुठल्याही खेड्यांत किंवा पृथ्वीवरील कोणत्याही शहरांतील मिरणींत तो दर्शन देईल. तो स्वर्गसुखांत नसून भांडवलवाल्यांनी बनवलेल्या दारिद्रय नरकांत खितपत पडला आहे.... करवीर प्रजेच्या हृदयसिंहासनावरील या अनिभिषिक्त राजाला उपमाच द्यायची झाली तर गंगेचीच द्यावी लागेल. स्वर्गसुखावर लाथ मारून जगाच्या कल्याणासाठीं पृथ्वीवर येणारी गंगा आणखीन स्वसुखासाठीं संपत्तीच्या गर्तेत न लोळतां दलितांच्या उद्धारासाठीं ' बंधनांत ' पडणारे भाई बागल यांच्यांत साम्य नाहीं असं कोण म्हणेल.

**लोकमान्य.**— माधवराव बागल व केशवराव जेधे यांनीं राजकीय जागृतीचें जें प्रचंड कार्य महाराष्ट्रांत केलें त्याला महात्मा गांधीजीपासून मिळालेली स्फूर्ति जशी कारण आहे तशीच म. जोतीबा फुले व शाहूमहाराज यांजपासून त्यांना मिळालेली स्फूर्तीही पुष्कळ कारण आहे. टिळकांचे अनुयायी हे राजकारणांत पुरोगामी आणि समाजकारणांत सनातनी असत. पण जेधे व बागल यांनीं समाजकारणाचा मागोवा व म. ज्योतीबा फुले व शाहूमहाराज यापासून घेतला. आणि गांधीजीपासून राजकीय स्फूर्ति मिळवली. यामुळें महाराष्ट्राच्या राजकारणाला सर्वांगीण पुरोगामी असे वळण लागलें. महाराष्ट्र कॉंग्रेसच्या गेल्या वीस वर्षांतील भल्याबुऱ्या राजकारणांत हा सर्वांगीण पुरोगामीपणाचा धागा कधींही तुटला नाहीं. तरीपण कोल्हापूर व शेजारची संस्थानें ही ब्रिटिश अनदानी असेपर्यंत नष्ट होऊं शकली नाहींत त्यामुळं महाराष्ट्रांत जातीय तेढीचे अवशेष उभयपक्षीही शिल्लक राहिले. राजकारणालाही अनेक कारणांनीं विचित्र वळण मिळालें. व गेल्या दीड वर्षांत अनेक अनुचित गोष्टी घडल्या...कोल्हापुरांत एक नवीनच संघर्ष निर्माण झाला. व माधवराव बागलांनीं आपल्या उज्वल चारित्र्याची शोककथा बनवली. पण

सरदार पटेल यांनीं मोठ्या धैर्यानें विलीनीकरणाच्या निर्णयास उचलून धरल्यानें बागलांची शोककथा थोडक्यांत संपली.

सार्वमत न घेतल्यामुळें विलीनीकरण लोकशाहीस धरून झालें नाहीं अशी कोल्हापूरच्या शेतकरी–कामकरी पक्षाची आतां तक्रार आहे. जेधे–मोरे यांचीही ती तक्रार असेलच पण या तक्रारींत आतां फक्त राजकारणांतली रणनीति आहे.

**दिनमित्र.**—( १० ऑगष्ट १९४९, अहमदनगर.) कांहींसे सत्यशोधक कांहींसे ब्राह्मणेतर पक्षीय अशा धोरणाच्या लोकांनी कॉंग्रेसच्या चळवळींत उड्यामागें उड्या टाकल्या. कॉंग्रेसचा जोर वाढवल्याचा ते आत्मविश्वास व्यक्त करीत असतात, त्यांतलेच कोल्हापुरचे माधवराव बागल हे एक प्रमुख होत. पुण्याचे श्री. जेधे–मोरे हेही कांहीं या मार्गांतले कमी महत्त्वाचे प्रवासी नव्हेत. या सर्वांनी कॉंग्रेस गाड्याची धुरा काळवेळ, आप्तस्वकीय, मित्रसूत्र न पाहतां मानेचे कांटे ढिले होईपर्यंत ओढली. त्यांच्या या प्रामाणिक श्रमजीवी देशसेवेची तारीफ गाड्यांत बसलेले, श्री. गाडगीळ–देव–गिरी वगैरे राजकार्य धुरंधर आणि स्वातंत्र्यप्रिय पुढारी तोंड भरून करीत आले. अशा हडसून खडसून झालेल्या व्यवहारांत दगाबाजी झाली. आपण फसलो. त्यामुळें आपणांस कॉंग्रेस सोडावी लागली असें उद्गार श्री. माधवराव बागल यांनी गेल्या ५ तारखेस सोलापूर भागांत १५ हजार श्रोत्यांपुढे काढले. हें उद्गार सर्वस्वी सत्य आहेत.

कॉंग्रेस म्हणून जे एकत्र आलेले पुढारी, त्यांचा आणि राष्ट्रांतील मागासलेल्या लोकांचा सामाजिक संबंध कोणत्या प्रकारचा आहे; या पुढाऱ्यांत वंशपरंपरेच्या तुटकपणामुळें त्यांची बनलेली मनोवृत्ती, सत्ता–स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बहुजनसमाजास पोषक होणार कीं शोषक होणार; या पुढाऱ्यांचे हित संबंध आणि बहुजनसमाजाचे हितसंबंध यांच्यांत भिन्नता आहे काय, अशा प्रमुख गोष्टींचा विचार जर बागलांसारख्या तळमळीच्या पुढाऱ्यांनीं प्रथम केला असता तर त्यांच्यावर आजचा प्रसंग ओढवला नसता...तथापि अजूनही बिघडले नाहीं. महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या पुढाऱ्यांनीं सबंध देशास गवसणी घालण्यापूर्वीं आपल्या प्रांतापुरतां, आपल्या घरापुरतां विचार केला तर झालेल्या चुका सहज दूर होतील.

—o—

# पुरवणी

—*—

**बाबुराव पेंटर यांचे आकस्मिक निधन.**— आत्मचरित्र छापून पुरे होईपर्यंतच्या कालांत कांहीं महत्वाच्या उल्लेख टाकता न येण्याजोग्या गोष्टी घडल्या. अत्यंत दुःखाची गोष्ट म्हणजे बाबुराव पेंटर यांच्या निधनाची !

महात्मा गांधीजींच्या पुतळयास लावलेल्या अतिविलंबामुळें मी चिडून बाबुरावांना म्हणत असें ' बाबुराव तुमच्या–आमच्या हयातीत हे काम पुरे होईल असें मला वाटत नाहीं. '

बाबुरावांचे भाग्यच म्हणायचे कीं बाबुरावांनी तो पुतळा एकदाचा पुरा केला व ता. १५ जानेवारी १९५४ रोजीं कलेक्टर डॉ. शेख यांचे बंगल्यावर तो पेडॅस्टलवर बसवण्याकरिता व समारंभाकरता विचार करण्यासाठीं आम्हीं जमणार होतो. पण दुर्दैवाची गोष्ट बाबुराव त्याच दिवशीं पहाटें तीनचे सुमारास हृदय–विकारानें निधन पावले.

कोल्हापुरचा अखिल भारतीय कीर्तीचा चित्रपट निर्माता कालवश झाला ! त्याच दिवशीं संध्याकाळीं बिंदु चौकांत राजाराम आर्ट सोसायटी व नागरिकातर्फे माझेच अध्यक्षतेखालीं दुखवट्याची सभा भरली.

बाबुराव हयात असते तर पैशामुळें पुनः भांडण्याचे प्रसंग कदाचित आलेही असते. कारण त्या पैशाची बाब ही सार्वजनिक होती. पण गुणी कलावंत म्हणून बाबुरावांच्या विषयीचा माझा आदर केव्हांच नाहींसा झाला नव्हता. ते दांडगे प्रयत्नवादी होते. कलेसाठीं अहर्निश राबत होते. त्यांच्या आयुष्यांत कला व्यासंगाखेरीज त्यांनीं कांहीं केलं नाहीं. जावं त्यावेळीं कांहीं तरी करीत असायचे. फुकावेळ त्यांनीं कधीं दवडली नाहीं. ते जायच्या अगोदर म्हणजे १४ तारखेलाच मी, जे. पी. नाईक व प्रभारकपंत कोरगांवकर–नाईकांनी ऑर्डर दिलेली पेंटिंग्स कशी काय झालीत ती पाहण्याकरता गेलो होतो व मला दिसणारे दोष मी बाबुरावांना दाखवले होते व त्यांना ते पटलेही होते.

बाबुराव गेल्यापासून माझ्या मनाला फार धक्का बसला. जीवनाच्या क्षणभंगुरत्वाची जाणीव मनाला सारखी धक्के देऊ लागली. माझ्या डोळयांनी मी तरी पुतळा बसल्याचं पाहीन कीं नाहीं? असें विचार अस्वस्थ करू लागले. त्याच अवस्थेंत रात्रीं उठून मी कलेक्टर डॉ. शेखना ' कांहींही करा पण पुतळा बसवण्याची घाई करा ' म्हणून आर्जवून पत्र पाठवले.

**कलेक्टर डॉ. शेख.—** मला येथें अत्यंत कृतज्ञतापूर्वक नमूद करण्यास आनंद वाटतो, कीं माझ्या सुदैवानें आजचे कलेक्टर डॉ. शेख यांना मी विनंती केल्यापासून त्यांनीं इकडे लक्ष घालण्यास सुरवात केली. पेडॅस्टलपर्यंत रस्ता तयार केल्याखेरीज पुतळा उचलून तेथें नेणें अशक्य होतें. म्यु. कमेटीतील कांहीं मतभेदामुळें त्या कामाला झटकन् सुरवात होईना. विनंती करण्यापलीकडे मला कांहीं करतां येईना. सत्तेशिवाय कोणी हलत नाहीं हे पदोपदी अनुभवास येऊं लागले. अशावेळीं कलेक्टरनीं जातीनें लक्ष घातले नसते तर समितीला पुतळा बसवणे फारच अवघड झाले असते. समितीतील इतरांना आपआपल्या व्यवसायामुळें इकडे तितकेसे लक्ष घालणेही शक्य नव्हते. अशावेळीं कलेक्टरनीं जे सहाय्य केले त्याचे मोल करतां येत नाहीं. ॲडमिनिस्ट्रेटर नंजापानें तर अडथळाच उत्पन्न केला होता. पैसे अडवून ठेवले होते. पुतळ्याचे पैसेही काढून घेऊन अ. भा. समितीला देण्याचा प्रयत्न केला होता. पण मी त्याला कडवा विरोध केला. तथापि नंजापामुळें कांही काल कार्य थोपवले गेले. हा इतिहास मागे असल्यामुळें डॉ. शेखांच्या मदतीचे मोल मी फार फार मोठे समजतो. त्यांतही मी आतां कॉंग्रेसमध्यें नसलेला माणूस. उलट मताचा. विरुद्ध बोलणारा. पण या कामीं त्यांनी माझ्या मताचा किंवा पक्षाचा विचार न करतां, हे काम पार पाडण्याचे ठरवले. एक्झिक्युटिव्ह इंजिनियर डॉ. अडके यांनाही कामास लावले. बँकेतील पैसे चटकन् मिळण्यास आलेला अडथळाही बाजूस केला. व आतां पुतळा जो बसणार आहे त्यांचेच खटपटीमुळें हे मला कबूल करणें भाग आहे.

डॉ. शेख यांचे व माझे खासगी असें संबंध कांहीं आले नाहींत. अधिकाऱ्याकडे जायला, त्यांचीं ओळख किंवा मैत्री करून घ्यायला, मला होत नाहीं. पण त्यांची कारकीर्द मी पाहतो आहे. त्यांचे कार्य कांहीं

दडून राहण्याजोगें नाहीं. कोल्हापुरच्या आजच्या परिस्थितींत कॉंग्रेसचें स्थान कोल्हापुरांत वस्तुतः कांहींच नाहीं. आहे ते बहुजन समाजांत तरी अनादराचेंच आहे. नंजापाच्या कारकीर्दीमुळें तर त्यांनीं कॉंग्रेसविषयीं बहुजनसमाजांत द्वेषच निर्माण केला होता. कलेक्टर बामची कारकीर्द ही जवळ जवळ सरंजामदार थाटाची झाली होती. पण चालू डॉ. शेखच्या कारकीर्दींत अगदीं नवीन वळण मिळालं. यांच्या कार्याच्या तळमळीनें व लोकांत मिळून मिसळून वागण्याच्या धोरणामुळें व सेवेमुळें त्यांनीं कॉंग्रेसला बरेंच स्थान मिळवून दिले आहे. आगामी निवडणुकीचे वेळीं हे दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. फुका श्रेय मात्र कॉंग्रेस पार्टीच्या पदरांत पडणार.

बेबी महाराजांच्या बाबतींतही त्यांनीच जातीनें लक्ष घालून त्यांची ट्रस्टमधील मुख्यांनीं वापरलेली रक्कम त्यांच्या पदरांत टाकली व तेथील अनागोंदी व बेजबाबदार व्यवस्थेला आळा घातला.

एकषष्ठांश खंडाची अम्मलबजावणी धूर्त मालक करूं देत नाहींत तरी डॉ. शेखांनीं अनेक खेड्यांना भेट देऊन लोकांना आपल्या हक्काची जाणीव करून दिली आहे. त्या राज्ययंत्रांत बसूनहि चांगल्या अंमलदाराला लोककल्याण पुष्कळ साधतां येते हे डॉ. शेखांनीं दाखवलं आहे.

**जे. पी. नाईक.**— कांहीं जुने मानलेले मित्र गळले तसे कांहीं नवे संबंधही जुळले. त्यापैकीं श्री. जे. पी. नाईक यांचा संबंध मला विशेष उल्लेखनीय वाटतो.

सकृत्‌दर्शनी ही व्यक्ती चक्रमच वाटते. त्यांत सर्वोदयी तऱ्हेपणा आणि सात्विकतेचा शिष्टपणा नाहीं. पण डोळ्यांत भरण्याजोगा गबाळपणा मात्र आहे. स्काउटवजा लांडी चड्डी, चड्डी बाहेर सोडलेला शर्ट, व घामाची मळकटे चढलेली त्याचीं कॉलर! शर्ट बाहेर डोकावणाऱ्या मुखवट्याला रेझरचा संपर्क बरेच दिवस न झाल्यामुळें बुरसलेला सुतकी चेहरा. ही सारी अवस्था पाहून रागानें तरारलेले टाळू वरचे केस! पाहिल्यावर वाटावं हा कोणी निर्वासित तरी नसावा!

पण ही स्वारी बोलू लागली कीं त्यांच्या या विदूषकी अवताराकडचं लक्ष अजिबात नाहींसं होतं. व तोंडावाटे बाहेर पडणारी विचारसरणी व

ज्या विषयावर बोलत असतील त्याची साधार माहिती ऐकली म्हणजे या व्यक्तीचा ऐकणाऱ्यावर विलक्षण पगडा बसू लागतो. व हा गबाळग्रंथी माणूस दिसतो तसा नाहीं याची खात्री पटते. अन् मग हा असा कां राहतो याचं कोडं उलगडत नाहीं !

मला यांच्या योग्यतेची, या पूर्वीच चांगली माहिती होती. चक्रम् वाटणाऱ्या या माणसाच्या कर्तबगारीची अनेकांवर छाप पडली होती. या गबाळी माणसानेंच कोल्हापूर संस्थानच्या बऱ्याच मंत्र्यांना कांखेंत मारले होते. पण ते निस्वार्थी सेवेनें. जे. पी. नाईकांनी बोलावं आणि त्या प्रमाणें मंत्र्यांनी हुकूम सोडावेत. राज्यकारभाराच्या घड्याळाची किल्ली नाईकांनी फिरवावी व मंत्र्यांचे कांटे त्यांच्या योजनेप्रमाणे फिरू लागावेत.

सकृतदर्शनी सौंदर्याभिरुची शून्य वाटणाऱ्या या व्यक्तीनें कोल्हापूर शहराला नवे सौंदर्य आणले. लोकशाही नगरपालिकेला आपली उपयुक्तता पटवून देऊन तिच्यावर हुकुमशाही गाजवली. जादुगाराप्रमाणें जुन्या कोल्हापुरचं नवं कोल्हापूर केलं. दुर्गंधीच्या बोळांत, रंकाळयाच्या जल-लहरीवरचं वारं खेळवलं. कित्येक वर्षं लागणाऱ्या गोष्टी डोळयासमोर पार पाडल्या. जुनी घरें उध्वस्त केली व मोठ्या रस्त्यावर आणली. त्या वेळीं शिव्या मिळाल्या, आता धन्यवाद मिळतात.

जे. पी. नाईक ज्या विषयांत मन घालतील त्यांत त्या विषयांतल्या तज्ञाला मागे टाकतील. त्यांना कामाचं वेड आहे. कार्यज्वराची दांडगी बाधा आहे. क्षणभरही ते स्वस्थ बसणार नाहीत. त्यावेळीही ते अमकं काम पार पडायला काय करावं याची योजना मनांत करीत असतात ! कुणी त्यांना सांगितलं तुम्ही स्वस्थ बसा कांहीं करूं नका, तुम्हाला आम्हीं कांहीं कमी पडूं देणार नाहीं, सुखाच्या सर्व गोष्टी पुरवूं, गाड्या, घोडी, मोटार, बंगला, नोकर, पैसा इच्छेप्रमाणें पुरवूं; पण तुम्ही कांहीं करतां कामा नये, कसलीही सार्वजनिक कामें हातीं घेतां कामा नये,' तर यापेक्षां नाईक आत्महत्त्या पतकरतील. त्यांना मरणाची शिक्षाही परवडेल ! नाईक हे असं एक यंत्र आहे. ते चालू राहिलंच पाहिजे.

हे शहर सुधारणेमागे लागले होते त्यावेळीं मी संस्थान प्रजापरिषदेचा कार्याध्यक्ष या नात्यानें सरकारशी झगडा देत होतो. म्हणून आम्हीं

यांच्यावर टीकेची झोड उडवली होती. तेव्हां ते एकदा माझ्या घरीं येऊन म्हणाले, 'आपणाला माझ्या कार्यांत काय दोष दिसतात ते मला सांगा.' मी त्यांना त्यावेळीं उत्तर दिल्याचे आठवत. 'तुम्ही चांगले काम करून विरोधी पक्षाचे बळ वाढवता, हा तुमचा मोठा दोष आहे. म्हणून आम्हीं टीका करतो.'

चांगल्या गोष्टीचा उच्चार करायचा नाहीं, दोष दिसतील किंवा काढतां येतील तेवढे काढून झोड उडवायची हे त्यावेळचें आमचे धोरण. हा चांगला माणूस सरकारला सामील, म्हणून आम्हाला त्यांचीं चीड यायची.

नाईकांच्या सर्व गुणांचा फायदा आतापर्यंत मला जो दिसून आला तो त्या त्या कालच्या राज्यसत्तेलाच मिळत आला. ते तुरुंगांत गेलेही असतील पण पदारूढ सत्तेला विरोध करण्याची वृत्ती त्यांच्यांत मला केव्हांच दिसून आली नाहीं. ते त्यागीवृत्तीचे आहेत. निस्वार्थी आहेत. पण बेडरवृत्तीचे मला दिसले नाहींत. आपल्या उपयुक्ततेनें अधिकाऱ्यांच्या पोटांत शिरून सार्वजनिक कामें करून घेण्याचं कौशल्य नाईकांच्यांत फार मोठं आहे. कांहीं लोक उगाच शत्रू निर्माण करतात. नाईक मतभेदाच्या मुद्यावर वाद वाढवून कटुता निर्माण करणार नाहींत. तसें प्रसंग टाळतील. व उपयोगी पडण्याच्या अकृत्रिम स्वभावामुळें मित्र जोडतील. त्यांच्यांत डावपेंच आहेत पण त्यांचा उपयोग ते सत्कार्याकडेच करतात. ते मुत्सद्दी आहेत पण व्यक्ति स्वार्थाकरता त्याचा उपयोग करणार नाहींत. ज्या संस्थेंत ते कार्य करतील तिला उर्जितावस्था आणल्याखेरीज राहणार नाहींत. आपल्या कर्तबगारीनें त्या संस्थेच्या सर्व नाड्या आपल्या हातांत घेतील. व ज्यांना संस्थेचे हितच पहायचे असेल त्यांना त्याबद्दल जराही वाईट वाटणार नाहीं. उलट आपला कामाचा बोजा हलका झाला म्हणून आनंदच वाटेल. तसा तो प्रभाकरपंत कोरगांवकरना वाटतही आहे.

ही सामान्य दिसणारी असामान्य व्यक्ती आपल्या कार्यानें संस्थेला अवश्यकच होऊन बसते.

नाईक एकदा घरीं आले आणि मला म्हणाले 'माधवराव मी आज तुमच्याकडे कांहीं विशिष्ट कार्यासाठीं आलो नाहीं. आपण परस्पराजवळ यावे एवढींच माझी इच्छा आहे. कार्यासाठीं जवळ आलो तर

कार्याबाबतींत कांहीं मतभेद झाल्यानें किंवा ते कार्य झाल्यानंतर आपण दुरावू. मी व्यक्ती म्हणूनच जवळ येऊं इच्छितो. तुम्हाला सत्ता आणि संपत्ती नको आहे. माझी ही ती महत्वाकांक्षा नसल्यानें तुमचा माझा खटका उडणार नाहीं. अशी कांहीं मंडळी जवळ आलीं आणि त्यांतून कांहीं कार्य निघालें किंवा करावेसे वाटलें तर ठीक!

नाईकांची ही विचारसरणी मला फार फार आवडली. मी प्रजापरिषदेंत पाहिलं, शे. का. पक्षांत पाहिलं, इतर पक्षांची स्थिती पाहिली या प्रेमाच्या अभावामुळेंच पक्ष टिकले नाहींत. व कार्यकर्त्यांतील संघटना मजबूत राहिली नाहीं. गांधीजी या जिव्हाळयाला जपत होते त्यामुळें कॉंग्रेस संघटना एककुटुंबी बनली होती.

कोरगांवकर ट्रस्टमुळें आम्ही जवळ आलो आहोत. त्या संस्थेंत आल्याबरोबर पूर्वीच्या मानधनवाल्या सेवकानें केलेलें असंख्य घोटाळे त्यांनीं अहोरात्र बसून दुरुस्त केले. प्रभाकरपंतांचे प्रेम व आदर संपादन केला. मी पण त्याच संस्थेचा एक ट्रस्टी असल्यानें माझे संबंध आता जवळचे झाले आहेत. आतां जास्त वाढत जातील. माझ्या त्यांच्या सहवासांत मला बौद्धिक मेजवान्या सतत मिळत जातीलच. पण त्याहिपेक्षां ते जिव्हाळयानें जवळ यावेत अशी उत्कटा आहे. कारण बुद्धीच्या विकासाला मजजवळचा ग्रंथसंग्रह मला पुरा आहे. प्रजापरिषदेवेळीं मला असा हुषार व त्यागी सेक्रेटरी लाभला असता तर माझ्याहातून किती तरी कार्य झालं असत. नाईकांच्यांत तशी अधिकार लालसा नसल्यामुळें त्यांचा माझा खटकाही उडाला नसता. नाईक विद्वान आहेत, हुषार आहेत, पण मला जरूरी आहे ती जिव्हाळयाची. सुदैवानें तो जिव्हाळा आणि प्रेम त्यांच्यांत असल्याचा अनुभवही येत आहे.

**कर्मवीर भाऊराव पाटील:—** याच सुमारास रुकडीच्या रयत शिक्षण संस्थेशी १९५४ च्या स्वातंत्र्य दिनानिमित्त थोडा संबंध आला. त्या संस्थेचा स्वातंत्र्यदिन माझ्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. त्यांत एका गोष्टीमुळें कर्मवीर भाऊरावांच्या थोरपणाचा प्रत्यक्ष अनुभव आला. रयत शिक्षण संस्थेने मला परस्परांच बोलावले होते. भाऊरावांना ता. २५ संध्याकाळपर्यंत याची दखल नव्हती. सहजी अनपेक्षरित्या त्यांच्या हाती

माझ्या अध्यक्षतेखाली शिक्षण संस्थेच्या समारंभ होणार असल्याचें हँडबिल पडलें. भाऊरावांना वस्तुतः त्या पत्रकाला महत्व देण्याचें इतकें कारण नव्हतें. मी कांहीं एक कोट्याधीश नव्हतो किंवा कांहीं प्रांताचा मंत्री नव्हतो, कीं कोणी माझ्यासाठीं धांवपळ करीत यावें. पण भाऊराव माझ्या भेटीसाठीं किंवा स्वागतासाठीं म्हणा वाटलें तर २६ तारखेला सकाळीं ३॥ वाजतां निघून रुकडीला आले व तेथून त्यांनीं आपली गाडी मला आणण्यासाठीं पाठवली !

भाऊरावांनी माझ्या सारख्या अधिकार पदावर नसलेल्या कार्यकर्त्याला इतकें महत्व द्यावें व या वयांत एवढा त्रास सोसून धांवपळ करीत यावें या जाणीवेनें माझं हृदय भरून आलं. सामान्य माणसाची अशी चीज करणारी माणसें या व्यवहारी जगांत मिळत नाहीत ! भाऊराव हे अपवादच वाटले. म्हणूनच ते वंदनीय आहेत. महाराष्ट्रांत ज्यांनीं बहुजनसमाजाची अंतःकरणपूर्वक प्रामाणिकपणें आणि निष्ठेनें सेवा केली आणि त्यांच्या उद्धारासाठीं तनमनधन खर्ची घातलें व आपल्या उदाहरणानें व कार्यानें जातिभेद मोडून टाकण्याची शिकस्त केली व ज्ञानामृत पाजलें त्या थोर व्यक्तींपैकीं पहिली व्यक्ती म्हणजे महात्मा फुले होत. इतक्या विशाल अंतःकरणाची थोर व्यक्ती मला दुसरी दिसत नाहीं. यानंतर विठ्ठल रामजी शिंदे व आज बहुजनसमाजाच्या उद्धारासाठीं भीकेचें पारडें घेऊन लक्षावधी रुपये जमवणारी तिसरी, बहुजनसमाज शिक्षित करण्याकरता सर्वस्व वाहून घेतलेली व्यक्ती म्हणजे कर्मवीर भाऊराव होत.

त्यांच्या कार्याचे मानानें आज त्यांचा गौरव झाला नसला तरी पुढें फुल्यांच्या पंक्तीत ते बसल्याखेरीज राहणार नाहींत. त्या माणसानें मला दिलेला मान व दाखवलेलं अगत्य म्हणजे मला मोठ्यांतले मोठं मानपत्र वाटल्यास नवल काय ?

भाऊरावांना मी दुरून पाहिलं आहे. तसं जवळून पाहिलं आहे.

गांधीवधानंतर झालेल्या जाळपोळीत त्यांनीं भाग घेतला होता असा त्यांच्यावर आरोप करण्यात आला होता. त्यावेळीं आरोप करणाऱ्या प्रांतांतल्या मोठ्या अधिकाऱ्यावर तुटून पडतांना ते जमदग्नीचा अवतार

धारण करीत व रागानें थरथर कांपीत. त्याचप्रमाणें मुंबई सरकारनें शिवजयंतीची सुटी न दिल्याबद्दलही तितकेच खवळून उठत! मी त्यावेळीं त्या दौऱ्यांत होतो. अगदी खेडुताच्याच भाषेंत त्यांचे हृदगत मोकळें होई. त्यामुळें त्यांचा खेडुतावर परिणाम होई. कांहीं लोक भित्रेपणामुळें राजकारणापासून दूर राहतात. कर्मवीरांच्यांत तो भित्रेपणा मुळींच नाहीं. तुरुंगाच्या दारांत पाऊल पडणारी जहाल व्याख्यानेंही त्यांनीं दिली आहेत. ती मी ऐकली आहेत. कांहीं लोकांनीं आग्रह केला म्हणूनच त्यांनीं राजकीय आखाडा सोडला. त्यांचीं व्याख्यानें विद्वत्तेनें भरलेली नसली तरी भावनेनें, जिव्हाळयानें व अनुभवानें भरलेली असतात.

माझ्या व त्यांच्या विचारांतही पुष्कळ साम्यता आढळे. माधवराव मी त्या ठिकाणीं असं असं बोललो असं त्यांनीं म्हणावं आणि तसलंच व्याख्यान मी दुसरीकडे दिलेलं असावं.

सातारा जिल्ह्यांत तर त्यांनीं आपल्या शिक्षण संस्थांनीं क्रांती घडवून आणली आहे. कष्टकरी हिंदुस्थानचा नवा नागरिक निर्माण केला आहे. मी रुकडीस गेल्यावेळीं ज्या नव्या शिक्षणक्रमाची त्यांनीं घोषणा केली त्या शाळेतील एक तास काम करणाऱ्या मुलांना फी माफ व तीन तास करणाऱ्यांना जेवण व शिक्षक माफ देण्याचे ठरवले. तेथें गरीबी श्रीमंती हा भेद नाहीं जातीभेद नाहीं. प्रत्येकाला अंगमेहनतीचें काम केल्याखेरीज तेथं राहतां येत नाहीं. निव्वळ विधायक कार्याची महती गाऊन भाऊराव आपल्या विद्यार्थ्यांना वरच्या बुद्धिवान वर्गाची हमाली करणारे बिनडोक्याचे दगड बनवत नाहींत. बौद्धिक शिक्षणाची जरूरी नाहीं म्हणत त्यांना बैल बनवत नाहींत. त्यांच्या बौद्धिक विकासाकडेही तितकेच लक्ष देतात व त्यांतल्या हुषाराला परदेशी पाठवून त्या विषयांत तज्ञ बनवून आणतात. साधी राहणी आणि उच्च विचारसरणी हे तेथें प्रत्यक्ष उदाहरणानेंच शिकवले जाते.

प्रभाकरपंत कोरगांवकर सारख्या उदार माणसाचे किंवा त्यांच्या ट्रस्टचे त्यांना सहाय्य मिळाले असते तर भाऊरावांना याहून केवढे कार्य करता आले असते. पण नव्या कालांतल्या अशास्त्रीय श्रेष्ठींच्या हाती त्या रकमा गेल्यानें बहुजनसमाजाला त्याचा फायदा व्हावा तसा होत नाहीं. कांहीं

सेवक पोसणं हेच त्यांनी आपलं जणु उद्दिष्ट ठरवलं आहे. व त्याद्वारें आपण बहुजनसमाजाची सेवा करतो अशी त्यांनी समजूत करून घेतली आहे. पण खरी सेवा भाऊराव करीत आहेत. त्यांची ती कामगिरी अविस्मरणीय झाली आहे. म्हणूनच मी त्यांना म. फुले, व शाहुमहाराज यांच्या पंक्तींत बसवतो. आज भाऊराव ज्यांची पूजा करतात त्यांच्या पंक्तीत बसवणें कदाचित धाष्टर्याचे ठरेल. कारण फुल्यांच्या विचाराची प्रगल्भता त्यांच्यांत नसली तरी कार्याची निष्ठा आहे, आणि शाहुमहाराजांचा जन्मजात मोठे-पणा पाठीशीं नसला तरी त्यांची धडाडी त्यांच्यांत आहे. ते जातींनें जैन असले तरी बहुजनसमाजाशी एकरूप झाले आहेत. आपली जात विसरले आहेत. शंकरराव देवासारखे ब्राह्मण पुढारी बहुजनसमाजाच्या उद्धाराची योजना आपल्या बुद्धीप्रमाणें ठरवतात तर भाऊराव त्यांच्याच सुखदुःखाशी समरस होऊन त्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेतात आणि उद्धाराचा खरा मार्ग काढतात. म्हणून आम्हा बहुजनसमाजांतील लोकांना भाऊराव ‘ आमचे ’ वाटतात.

* * *

**शांतता कमेटी.**— ६–२–५४. शेतकरी–कामगार पक्ष सोडल्या-नंतर मला विशेष उल्लेखनीय वाटणारी आणि महत्वाची गोष्ट म्हणजे कोल्हापुरांत स्थापन झालेली शांतता कमेटी ही होय.

शेतकरी–कामगार पक्षाच्या सांगली अधिवेशनांत शंकरराव मोऱ्यांच्या ठरावाप्रमाणें पक्ष विसर्जन करून कम्युनिस्ट पार्टीत जाण्याचे ठरले असते तर कदाचित मी कम्युनिस्ट पार्टीत गेलो असतो. कारण पुण्याच्या सर्व डाव्या पक्षांच्या बैठकींत ऐक्याच्या ठरावाला मी हार्दिक पाठिंबा दिला होता. पण ते ऐक्य अपेक्षेप्रमाणें झाले नाहीं व जे थोडे झाले ते निवड-णुकीच्या अगोदरच मोडलें. निवडणुकी झाल्यानंतर हडपसरला कार्यकर्ते व पक्ष आमदारांच्या बैठकींत पुनः डाव्या गटाच्या एकीचा मीच आग्रह धरला पण शंकरराव त्यावेळीं अनुकूल नव्हते. सांगली अधिवेशनांत शंकरराव मोरे विसर्जन करायला तयार पण र. के. खाडिलकर, केशवराव जेधे व पूर्वी मोऱ्यांना अनुकूल असलेला कोल्हापुर गटही विसर्जनाउलट

गेला. पोलिटब्यूरोच्या बैठकींत शंकरराव मोरे यांना सर्वस्वी अनुकूल मीच होतो. मनाविरुद्ध ठराव पास झाल्यानंतर मी पक्षाचा लगेच राजीनामा दिला. शंकरराव मात्र पक्षांत राहिले. पण पक्षाविषयींची त्यांची आस्था पुढे राहिली नाहीं.

**कॉम्रेड तुषार पवार.—** जनसेवेकरतां माणसांना हुडकून कामाला लावणं हा गुण मला यांच्यांत दिसला. ते कार्यकर्ते आहेत पण अशिक्षित, निर्बुद्ध व निव्वळ सांगकामे नाहींत. व्यक्तित्व आहे, वक्तृत्व आहे, विषयाचा अभ्यास आहे. चिकाटी आहे. हा तरुण कार्यकर्ता मला दिसतो तसा असला तर याचं भवितव्य मला उज्वल दिसतं !

येथील दोन विडी कामगार संघटनेच्या एकीकरणासाटीं त्यांनीच मला अध्यक्षपद दिलं व ती एकी घडवून आणली.

शांतता कमेटी स्थापन करण्याचा तुषार पवार यांनीच प्रयत्न केला.

एका ध्येयांचे डावेपक्षांतले आम्ही दूरदूर चालले होतो. भेटी गांटी कमी कमी होत आल्या होत्या. परकेपणा येत चालला होता. शांतता कमेटीच्या निमित्तानें जवळ येऊन पुनः एका व्यासपीठावर येऊ लागलो तर सहजच डाव्यांच्या ऐक्याची पार्श्वभूमी तयार होईल म्हणून मी अध्यक्षपद स्वीकारण्याचे ठरवले. मी या डाव्यांच्या ऐक्यासाटींच हापापलो होतो. पक्ष सोडल्यानंतर मी 'आता सर्व डाव्यांनी कम्युनिस्ट पार्टींतच जावे' म्हणून बरेच लेख लिहिले.

कोल्हापुरांत नगरपालिकेच्या निवडणुकींत सर्व डाव्यांची एकजूट केवढ्या आशेनें घडवून आणली पण शेतकरी—कामगार पक्षाच्या येथील युनिटनें त्याबाबत तसा उत्साह दाखवला नाहीं. जमलेली एकनिष्ठा ध्येयनिष्ठेच्या अभावी मोडली. जिल्हा लोकल बोर्डात तर तशी आघाडी बनवण्यात आलीच नाहीं. उलट विरोधच दाखवला. याचमुळें माझ्यांत एकप्रकारचे नैराश्य आले होते.

पण कराडचे पूर्वीचे समाजवादी, आता कम्युनिस्ट पार्टींत गेलेले कॉ. तुषार यांनीं ते नैराश्य पुष्कळच कमी केले. यांची माझी जुनी ओळख अशी कांहींच नव्हती. पण प्रथम दर्शनीच आपले एखाद्याबद्दल उगाच चांगले किंवा वाईट बनते. पण या कार्यकर्त्याबद्दल माझं मत

अनुभवाविना एकदम चांगलं झालं एवढं खरं. आणि त्यानंतर जो अल्पसा परिचय झाला त्यानें ते आणखी दृढावलं.

कमेटींत सर्व पक्षियांचा समावेश झालेला पाहून मनाला फार फार आनंद झाला. डावेपक्ष आणि पुरोगामी व्यक्ती या निमित्तानें कां असेना जवळ येत जाऊं. या कमेटींत डॉ. धनवडे, बॅ. माने, रा. सा. व्ही. जी. चव्हाण, रा. सा. कासमअली, भाऊसाहेब महागांवकर, बळवंतराव पाटणे, म्यु. प्रे. शेळके, डि. लो. बोर्ड प्रे. नलवडे, करमरकर वकील, भाई लाड, यादव वगैरे मंडळी आल्यानें फार फार बरें वाटलें.

डावेपक्ष व पुरोगामी व्यक्ती यांची एक आघाडी होणें अपरिहार्य आहे हे माझे भाकीत खरे होत चालल्याचें पाहून कां आनंद वाटणार नाहीं?

हे वातावरण प्रभावी होत चालल्याचा दुसराही एक पडताळा लगेच अनुभवास आला.

**केशवराव पवार.—** मोठा गोड माणूस. ओळख झाल्यापासून माझं जें मत बनलं ते अद्याप कायम आहे. नम्रतेनं, निष्ठेनं व प्रामाणिक-पणानं लोकांना ते आपलेसे करून घेतात. याचमुळें कऱ्हाडला त्यांचं वकील म्हणून चांगलं प्रॅक्टिस आहे. मी समतावादी म्हणवून घेतो पण एखाद लहान बोचकंही रस्त्यावरून हातांत घेऊन जाणें मला होत नाहीं. पण केशवराव माझं बोचकं घेऊन मला स्टँडवर पोचवतील व मोटारीपर्यंत नेतील! ही जी एक सेवावृत्ती आहे त्यामुळेंच ते लोकादरास पात्र होत जात आहेत. पुढारी म्हणून मानले गेलेल्या आम्हां सर्वांना शिरवडच्या शेतकरी परिषदेंत एका व्यासपीठावर आणण्याचं श्रेय त्यांनाच द्यावं लागेल; पुढाऱ्यांच्यांत समझोत्याची जी एक वृत्ती असावी लागते ती केशवरावांच्यांत पुष्कळ आहे. माझं त्यांच्यावर प्रेम तर आहेच आहे पण आदरही आहे. त्यांनीं आपली कार्यव्याप्ति तालुक्याबाहेर वाढवलेली नाहीं पण आपल्याच तालुक्यांत कितीतरी परिषदा आणि सभा घेऊन जनतेंत जागृति ठेवली आहे.

**पुनः एका व्यासपीठावर**—त्यांनीं यापुढचें पाऊल टाकून डाव्या पक्षाचे प्रमुख पुढाऱ्यांना एका व्यासपीठावर आणण्याचें इराद्यानें कऱ्हाड तालुक्यांतील शिरवड गांवीं शेतकरी परिषद भरण्याचें ठरवून मला पत्र पाठविलें.

पत्र—ता. ३–२–५४ चे.

प्रिय भाई— ता. १३–२–५४ ला कराडपासून ४ मैलावर शेतकरी परिषद ठेवली व ती आपले अध्यक्षतेखालीं आपली नक्की संमति मिळेल या अपेक्षेनें ठेवली आहे. वक्ते नाना पाटील, केशवराव जेधे, र. के. खाडिलकर, दत्ता देशमुख असे आहेत.

पूर्वी एका पक्षांत असलेलो आम्ही निरनिराळया डाव्या पक्षांत गेलो. ऐक्य राहिलं नाहीं. मी तर पक्ष सोडून बसलेलो. पक्ष सोडण्याचं मुख्य कारण एकी होत नाहीं म्हणून. ते आतां पुनः एका व्यासपीठावर येत आहोत हे पाहून मला किती आनंद वाटला असेल. या बातमीनें पुन: आशा दुणावल्या. साठावी जाऊन मी पंचवीशीचा असल्याची उमेद आली !

मी जाण्याचे कबूल केले ! मी लिहिले.

‘ आनंदी आनंद ! ! मी जरूर जरूर येतो ’

आणि शिरवडला आम्ही सारे जमलोही एका ठिकाणीं. आम्ही फुटलेले एका व्यासपीठावर आलो. मी आजवर कोणत्याच पक्षांत नव्हतो. पण मला अध्यक्षपद देण्यांत आलं.

शेतकरी कामगार पक्षाचे पुढारी भाई केशवराव जेधे, सरचिटणीस भाई र. के. खाडिलकर, कम्युनिस्ट पक्षांत गेलेले क्रांतिवीर नाना पाटील, कामगार किसान पक्षाचे आमदार दत्ता देशमुख व आमदार मोहित्ये, केशवराव पवार अशी सारी मंडळी एका व्यासपीठावर आल्यानें मी तर हुरळून गेलो. निराशा झडून गेली. कामाची उमेद आली. १० हजार जमलेले लोकही उत्साहानें व आनंदानें भारून गेले होते—

—०—

# अभिप्राय

## आचार्य भागवत

श्री. माधवराव बागल यांनीं 'जीवन प्रवाह' या नांवानें आपल्या आत्मचरित्ररूपी आठवणी छापल्या जात असतांना मला वाचण्याची संधि दिली. माधवरावांचा आणि माझा प्रथम परिचय सुमारें वीस–बावीस वर्षांपूर्वी कोल्हापूर येथें झाला. ३२–३३ सालच्या कायदेभंगाच्या चळवळीनिमित्त येरवड्याच्या कँप जेलमध्यें असतांना कोल्हापुरांतील कित्येक तरुण कार्यकर्त्यांचा परिचय झाला होता. त्यामुळें व्याख्यानानिमित्त कोल्हापूरला मला यावें लागले असतां माधवरावांची भेट झाली. त्यापूर्वी कित्येक दिवस माधवरावांचे विचार त्यांच्या पुस्तकांतून परिचित झाले होते. आचार्य जावडेकरांच्या स्नेहामुळें मला गांधीवाद आणि मार्क्सवाद यांचा समन्वय साधण्याचे विचार आवडूं लागले होते. माधवराव हे सत्यशोधक समाजाच्या वातावरणांत लहानपणापासून वाढले. पण त्यांनीं प्रथमच महाराष्ट्रांत समाजवाद आणि गांधीवाद यांचे विचार आपल्या स्वतंत्र बुद्धीनें समजून घेतले आणि महाराष्ट्रांतील ब्राह्मण–ब्राह्मणेतर चळवळीला नवें प्रगतिपर बौद्धिक अधिष्ठान निर्माण करून देण्याचा प्रयत्न केला. यामुळें आचार्य जावडेकरांप्रमाणेंच मला देखील माधवरावांच्या विचारांबद्दल आत्मीयता वाटूं लागली होती. त्यानंतर माधवरावांचें राजकीय पुढारीपण कोल्हापुरांत वाढूं लागलें व त्यांचा शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, केशवराव जेधे इत्यादि महाराष्ट्रांतील त्यावेळच्या काँग्रेस पुढाऱ्यांशीं संबंध वाढत गेला. प्रत्यक्ष राजकीय संघटनेशीं माझा कधीच संबंध नसल्यामुळें या काळांत माधवरावांचा आणि माझा विशेष प्रत्यक्ष संबंध आला नाहीं. १९४६ नंतर कोरगांवकर ट्रस्टच्या निमित्तानें माझें कोल्हापुरांत येणें–जाणें वाढूं लागलें. आणि तेव्हांपासून माधवरावांचा संबंधहि वाढत गेला.

अलीकडे कांहीं वर्षें माझा त्यांचा चांगला स्नेह निर्माण झाला आहे. आणि स्नेही म्हणून आमच्यांत मोकळेपणा व प्रेम वाढलीं आहेत. माधवरावांनी आपल्या जीवन प्रवाहाचें मला विश्वासानें दर्शन करून दिलें आहे. साऱ्या महाराष्ट्रासाटीं तेंच दर्शन त्यांनीं ग्रंथरूपानें करून देण्याचें ठरविणें ही फारच चांगली गोष्ट झाली असें मला वाटतें. महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत जे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण झालेले आहेत ते समजून घेण्यासाटीं माधवरावांच्या या ग्रंथाचा महाराष्ट्रांतील तरुण कार्यकर्त्यांना विशेष उपयोग होईल असा मला भरवंसा वाटतो.

माधवराव हे श्रेष्ठ कलावंत आणि चांगले साहित्यिक आहेत. तीव्र भावनाशीलता हा त्यांच्या प्रकृतीचा प्रमुख स्थायीभाव आहे. त्यांचें मन उदार, निष्कपट आणि भोळें–भाबडें आहे. त्यांना ज्ञानाची लालसाहि आहे. अन्यायाची चीड व दलित समाजाचें प्रेम हे गुणहि त्यांच्या टिकाणीं तीव्रतेनें आढळतात. आपल्याला योग्य वाटणाऱ्या मतांचें प्रतिपादन आणि आचरण करण्याची त्यांची वृत्ति आहे. त्यासाटीं दुःख सोसण्याचीहि त्यांची तयारी आहे. या सर्व प्रवृत्तीमुळें त्यांच्या हातून फार मोठ्या चळवळी झाल्या. त्या चळवळींत त्यांची वीरता अनेकवेळां प्रकट झाली. तथापि राजकीय पक्षसंघटनेच्या कामीं त्यांना अनेकवेळां अपयशाचें व तीव्र मनस्तापाचे प्रसंग पहावें लागले. अशा प्रसंगीं त्यांच्या स्वाभिमानाला धक्का बसल्यामुळें त्यांच्या मनांत मधून मधून व्यक्तीविषयीं वा विचारांविषयीं कटुता निर्माण झालेली आढळते. सामाजिक जीवन हें सामान्यतः गुंतागुंतीचें असतें. महाराष्ट्रीय जीवनांत तर विशेषच गुंतागुंत झालेली आहे. माधवरावांच्यासारख्या केवळ भावनाप्रधान माणसाला जीवनाचे हें गुंतावे उलगडतां आले नाहींत हा कांहीं त्यांचा दोष म्हणतां येणार नाहीं. त्या त्यांच्या मर्यादा मानल्या पाहिजेत. पुष्कळ वेळां भावनाशील माणसाला आपल्या शक्तीच्या आणि कर्तृत्वाच्या मर्यादा स्पष्ट होत नाहींत. भावनेच्या आवेशांत तो कांहींसा धुंद बनतो. आणि अपयशानें चिडूनहि जातो. माधवरावांच्या जीवनांत अशा प्रकारच्या घटना घडलेल्या आढळतात. त्यामुळें अशा माणसाबद्दल इतरांची मतेंहि कटु व तीव्र होऊं शकतात. माधवरावांच्याबद्दल हेहि प्रकार घडलेलें आहेत. तथापि माणसाच्या हृदयांत जर

स्वाभाविक शुद्धता असेल, स्वार्थ, लोभ इत्यादि दुष्ट प्रवृत्ति नसतील तर त्याला आत्मनिरीक्षणाचा मार्ग दिसूं लागतो आणि मग आपल्या जीवनाच्या मर्यादा त्याला हळूहळू स्पष्ट होऊं लागतात. मग भावनेचा आंधळेपणा जाऊन ती डोळस बनूं लागते, अहंभाव कमी होऊं लागतो आणि आपलें स्वतःचें यशापयश हें देखील खेळकरपणानें पारखण्याची शक्ति लाभते. माधवरावांचा हा ' जीवन प्रवाह ' जो कोणी तटस्थपणानें निरखील त्याला माधवरावांचें जीवन आतां आत्मनिरीक्षणानें शांत होत चाललें आहे असें दिसून आल्याशिवाय राहणार नाहीं. माधवराव जातीचे कलावंत असल्यामुळें स्वतःच्या जीवनाकडे देखील कलावंताच्या तटस्थतेनें पाहूं शकले यांत कांहींच आश्चर्य नाहीं. अलीकडे ते केव्हां केव्हां मरणाच्या गोष्टी बोलत असतात, त्यांचा स्नेही म्हणूनच नव्हे तर महाराष्ट्रीय समाज जीवनाचा निरीक्षक या नात्यानेंहि मला असें म्हणावेसें वाटतें कीं माधवरावांच्या जीवनाचा प्रवाह आणखी कित्येक वर्षे महाराष्ट्रांत वाहात राहण्याची आवश्यकता आहे. चिंतनानें गंभीर बनलेल्या आणि आत्मनिरीक्षणानें शांत झालल्या नव्या माधवरावांचें या पुढील जीवन दर्शन महाराष्ट्राला अधिक प्रसन्नता देणारें होईल असा मला विश्वास वाटतो.

—*—

## महामहोपाध्याय- दत्तो वामन पोतदार

तुम्ही पुस्तक पाठवून प्रेमभाव व्यक्त केला म्हणून जरी लांबवरच्या दीर्घ फिरतीचा कार्यक्रम समोर होता आणि आहे तरी ते क्षणभर बाजूस ठेवून **तुमच्या 'जीवन-प्रवाहांत' जागरण दूर करून स्नान केले. 'बंधनांत'हि पडलो. आणि कंटाळा कसला तो आला नाहीं. माझे मन रूक्षच आहे, ते कंटाळत नाहीं पण तुमची लेखणीहि हाडाच्या कलावंताची आहे तेथें झोंपेला अवकाश कोठला? वाचीत गेलो संपवले. आणि एका भावनामय कलावंताचे जीवनरहस्य मनांत सांठवीत राहिलो.**

**तो प्रसंग** — मी जन्मांत विसरणार नाहीं. मला कै. बागडे वकिलांनी जवळ जवळ उचलूनच नेले. गुपचूपपणें श्री उत्तमराव शेणोलीकर—आमचे मित्र यांनी श्री. श्रेष्ठी वकिलाकडे कां कोणाकडे—पण एका दूरच्या घरांत ठेवले. तेथून करवीर न्यायालयांत. तो पोलीस पहारा आणि ते तुम्ही त्यांचे बंदी, मंद पावले टाकीत आलात. वर बागडे, तुम्ही, सरकारी वकील कै. पंडितराव सोहोनी आणि न्यायाधीश नि चार दोन कारकून शिपाई. एवढाच परिवार. नरिमन मागाहून यावयाचे. साक्ष झाली माझी. पंडितरावांनी मराठी पुस्तकें दाखवून १२४ अ चे थोडे विवरण केले. पण माझ्या साक्षीतून तुमच्या विरुद्ध त्यांस कांहीं मिळाले असेल असें मला वाटत नाहीं. माझ्या मतें मी त्या अचानक प्रसंगांतून निर्भयपणें आणि प्रामाणिकपणें प्रतिष्ठेनें बाहेर आलो. कोणी अतिप्रसंग केला नाहीं. पंडितरावांनीं बुद्धि चालवून पाहिली पण मजवर कांहीं ती परिणामी झाली नाहीं. पण अशा साक्षी अशा खटल्यांत नांवालाच असतात. तुमची शिक्षा टळली नाहीं. हा सारा प्रसंग जीवन-प्रवाह वाचीत असतां मनासमोर उभा राहिला.

पण तसे प्रसंग तुमच्यापुढें अंगवळणी पडले आणि **जनतेनें जी अपूर्व साद तुम्हांला दिली तिचे भावपूर्ण वर्णन तुम्ही जाग जागी केले आहे ते जिवंतसे वाटले वाचतांना.** माझे मित्र काकासाहेब लिमये यांजविषयींचा तुमचा सद्भाव पाहून मला फार समाधान वाटले. अशा थोरांच्या दर्शनानें तुमचाच काय पण अनेकांचा हृदयपालट झाला ! पण कोठे आहे तो काकांचा ज्ञानप्रकाश!... हजारो वाचक वाचीत तो. मी हरिजीकडे शिष्ट-मंडळ नेले असतां म्हणतात ‘ लोकांस कोठे हवा आहे तो !’

मला तरी जगांत निर्भेळ चांगले किंवा दुष्ट कांहीं दिसतच **नाहीं. म्हणून** सरंजामदारशाही, भटशाही वा भांडवलशाही यांतहि मला **गुण दिसतात.** सर्वांतील गुण तेवढे घ्यावे आणि वाढवावे हेच मला **अधिक प्रिय** आहे. मग विध्वंसन मला कितपत रुचेल ? त्यांतून मी **पुराण संरक्षक.**

तरी जुने मोडले नाहीं तर मोडून पडते हा काळ महिमा मला चांगलाच विदित आहे. म्हणून मी खेद करीत बसत नाहीं. कारण विध्वंसकालाही विरचन करावेच लागेल. संहारणी उभारणीचे रहाटगाडगे चालतच राहणार असा माझा विश्वास आहे.

तुमच्या मनावर सध्या नैराश्याची दाट छाया पडली असावी असें वाटते. पण तुम्हीच एकदा ‘ वाऱ्यानें सळसळत ज्याची पानें गळून पडली आणि दुसऱ्या पहाटे कोंवळी तांबडी नवी पालवी फुटून वृक्ष कसा बहरून गेला ’ याचे रसमय वर्णन केले आहे तें कां विसरतां ? अजुनहि सृष्टींत तसेंच घडत आहे. वृक्षांची जुनी पालवी प्रतिवर्षी झडत आहे आणि नवी पालवी फुटून वृक्ष तरारत आहे. मग भविष्याविषयीं कां निराश होता ! ज्यांचा रसकोष आटला नाहीं असे वृक्ष पुष्कळ पाहण्यांत येतात. तशी माणसेंही प्रत्यक्ष तुम्हाला भेटली होतीच.

आपण आशा करूंया कीं जीर्ण पालवी वारा झाडून नेईल आणि भारतीय वृक्ष नव विकसित कुसुमांनी प्रफुल्लित होऊन ‘ जीवन प्रवाह ’ पुनः सुगंधित करील. सगळ्या वादांचे पक्षिगण त्यावर आपले कूजन करतील आणि ते मनोहर संगीत तुम्ही आम्ही सारे ऐकून तृप्त होऊं.

—*—

## कॉम्रेड एस्. एस्. मिरजकर–म्हणतात—

( सेक्रेटरी कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र व व्हा. प्रे. ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस )

प्रिय कॉम्रेड माधवराव,

महाराष्ट्राच्या राजकारणांतील प्रमुख व्यक्तींनी लिहिलेली जी कांहीं थोडी आत्मचरित्रें उपलब्ध आहेत त्यांत आपल्या लिखाणानें उत्कृष्ट अशी भर टाकली आहे. आपल्याकडे चरित्रें पुष्कळांची आहेत पण आत्म-चरित्रें फारच थोडी, त्यांत स्वतःचे खरे दर्शन लोकांना होऊ नये हीच इच्छा बलवत्तर होऊन आडपडद्याची भाषा. म्हणूनच आपले आत्मचरित्र मला विशेष आवडले. सुरवातीपासून शेवटपर्यंत जणु कांहीं माधवराव

वागल वाचकाला आपला जिवलग मित्र मानून मनमोकळेपणानें त्याच्याशी बोलत आहेत असा भास ते वाचताना होतो.

' हे माझे म्हणणे आहे. माझे सद्गुण—उणिवा आहेत या अशा आहेत, मी तुमच्यांतला एक म्हणून माझ्या कार्याचा व मनाचा आरसाच तुमच्यापुढें ठेवतो आहे. तुमच्या मनावर बरा वाईट परिणाम घडावा म्हणून हातचे राखून ठेवले नाहींत. या समाज जीवनांतील एक कार्यकर्ता म्हणून मोकळेपणानें माझे अंतरंग तुमच्यासमोर मांडणे हे माझे कर्तव्य आहे ' अशा निर्भीड वृत्तीनें स्वतःचे खासगी जीवन, अनेक प्रसंगीं मनांत उडालेली खळबळ व हेलकावे यांच्यासहित आत्मचरित्रांत आपण मांडले आहेत व जनतेशी खरोखर एकरूप झाल्याची साक्ष दिली आहेत याबद्दल अभिनंदन केले पाहिजे.

अर्थात राजकारणाला व श्रमिक जनतेच्या लढ्याला वाहून घेतलेल्या आपल्यासारख्या व्यक्तीचे आत्मचरित्र निव्वळ स्वयंकेंद्रित असणे अशक्यच आहे. ते आत्मचरित्र म्हणजे एका व्यक्तीच्या जीवनाचा इतिहास नसून कोल्हापुरच्या जनतेने ब्रिटिश व संस्थानी राजवटींत स्वतःच्या लोकशाहीच्या हक्कासाठीं व पिळवणुक—जुलुमाविरूद्ध दिलेल्या लढ्याचा इतिहासही त्यांत बेमालुम गुंफलेला आहे. महाराष्ट्रांतील राजकारणाच्या प्रत्येक अभ्यासकाच्या दृष्टीनें हे आत्मचरित्र त्यामुळें महत्वाचे झाले आहे.

सभा स्वातंत्र्याच्या हक्कापासून ते लोकशाहीसाठीं व कामगार—किसानांच्या नेतृत्वाखालील राजवट स्थापण्याच्या जाणीवेपर्यंत कोल्हापुरच्या जनतेची चळवळ कशी वाढत गेली त्याची उत्कृष्ट ओळख या आत्मचरित्रानें होते. शिवाय त्यांत वैयक्तिक अनुभूति असल्यानें वाचकाला तिच्याबद्दल निकटचा जिव्हाळा निर्माण होतो. कोल्हापुरच्या बंदिवासांतील आपले अनुभव तर स्वतः बंदिवासाचा अनुभव घेतलेल्या माझ्या सारख्या व्यक्तीला ओळखीचे वाटतात. इतरांनाही ते चटका लावतील. वेगवेगळ्या लढ्याचे प्रसंग विशेषतः जबाबदार राज्यपद्धतीसाठीं झालेला लढा, नंजाप्पाच्या कुप्रसिद्ध कारकीर्दीचे मासले इत्यादिंचे वर्णन त्या प्रसंगाचें जिवंत चित्र मनापुढें उभे करते.

अर्थात ज्या मनमोकळेपणानें आपण हे आत्मचरित्र लिहिले व ज्या मनमोकळेपणानें आपण माझे मत मागितले त्याच मनमोकळेपणानें मी कांहीं विचार मांडले तर आपण रागावणे शक्यच नाहीं या खात्रीनें खालील विचार मांडण्याचे मी धाडस करीत आहे.

जातीयवादाच्या प्रश्नावर आपण सर्व जातींनी मराठा जातींत सामील व्हावे असा उपाय सुचविला आहे. मराठे महाराष्ट्रांत बहुसंख्य असून पुन्हां त्यांची बहुसंख्या कष्टकरी आहे हे उघडें सत्यच आहे. पण ह्या जातिभेदामुळें त्यांच्यावर झालेला अन्यायहि उघड आहे. पण ह्या जातिभेदाच्या मुळावरच कुऱ्हाड घालायची तर आपण सुचवलेल्या उपायानें ती होईल असें मला वाटत नाहीं. जात ही कल्पनाच त्यासाठीं उखडून काढली पाहिजे. श्रमकर्ता व धनपति या दोनच जाती जगांत आहेत ही कल्पना तेथें रुजली पाहिजे. ही कल्पना रुजण्यासाठीं वैचारिक जागृति करणें तसेंच नव्या समाजव्यवस्थेच्या—जनतेच्या, लोकशाहीच्या उभारणीच्या क्रांतिकारक उद्दिष्टासाठीं प्रत्यक्ष लढ्यांत जनतेला एकत्र आणणें हाच मार्ग त्यावर असतो. तेलंगणच्या क्रांतिकारक लढ्यांत स्पृश्य—अस्पृश्य भेदभावदेखील एकत्र सांडलेल्या रक्तांत वाहून गेले, एवढेंच नव्हे तर सर्व मानव—जातीला समान मानण्याची विशालता तेथील मानवांच्या हृदयांत निर्माण केली. अर्थात हे निर्माण करतांना ब्राह्मणांसारख्या जातींत जी श्रेष्ठत्वाची खोटी भावना आहे ती दूर करावी लागेल. पण जशी जुनी समाजव्यवस्था मोडून पडते तसें त्या क्रमाला संघटित वर्ग जागृत जाणीवेची व कार्याची जोड दिल्यास ते करतां येते. खेडेगांवांतील मागासलेपणामुळें श्रेष्ठ वर्णीयत्वाचा टेंभा मिरवता येतो. मुंबईसारख्या शहरांत समाज जीवन पुढारू लागले कीं त्या श्रेष्ठत्वाची कल्पना पातळ होऊं लागते व ज्या प्रमाणांत कामगार—शेतकरी प्रत्यक्ष लढ्यांत जनतेचें प्रश्न सोडवायला पुढें येतो त्या प्रमाणांत त्यांच्यापुढें ते मान झुकवूं लागतात. अर्थात सावकारासारखे प्रतिगामी वर्ग आपले शत्रूच असतात. पण ते सावकार आहेत एका जुनाट प्रतिगामी समाज व्यवस्थेचे ब्रिटिशांनी पोसलेले अवशेष आहेत ही जाणीव जनतेंत निर्माण केली पाहिजे. नाहींतर सावकारी करणारा ब्राह्मण जाईल पण सावकारी करणारा एकादा सधन मराठा (विशेषतः सधन शेतकऱ्यांत

सावकारी प्रवृत्ती वाढली आहे ) केवळ जातीच्या आधारें मागासलेल्यांचा पाठिंबा कांहीं काळ तरी मिळवील.

असो ! या प्रश्नाविषयीं माझे वेगळे विचार त्यासंबंधीं मुद्दाम स्पष्टपणें लिहिले. विचारांची देवाण घेवाण तुमच्याशीं शिष्टाचाराचे खोटे बुरखे ठेवून करण्याची गरज नाहीं म्हणून.

* * *

पण आपल्या आत्मचरित्राचा हे मुद्दे हा केवळ एक भाग आहे. त्यांत जनतेच्या प्रश्नांना आपण जे तोंड फोडले आहे, कॉंग्रेसी राज्यांतही त्यांच्यावर अन्यायाचा वरवंटा कसा फिरत आहे हे जे दाखवले आहे, कामगार–शेतकरी राज्याचा जो पुरस्कार केला आहे ते सारे महाराष्ट्राच्या भवितव्याची दिशा दाखवणारेच आहे. विशेष डाव्यांच्या ऐक्याचा आपण त्यांत थोडक्यांत पण सुस्पष्टपणें जो पुरस्कार केला आहे तो फार मोलाचा आहे. आज आपल्या महाराष्ट्राच्या राजकारणांतही एकजूट नसल्यानें–चाक आहे, गाडी आहे, पण त्यांना जोडणारा आंसच नाहीं अशी स्थिती झाली आहे व म्हणूनच लोकशाहीची गाडी व गाडीवान बाजूलाच पडून बिगर 'जू'चे कॉंग्रेसी बैल मन मानेल तसे उधळत आहेत. यावेळीं अधिकारवाणीनें ही भूमिका आपण मांडली. सगळ्या महाराष्ट्रांत आपणां सर्वांना एकत्र आणण्यामध्यें ही उपयुक्त ठरणारी आहे. विशेषतः कम्युनिस्ट पार्टीबद्दल आपण जो विश्वास प्रकट केला आहे त्याबद्दल स्वतःच मी एक कम्युनिस्ट असल्यानें आणखी काय लिहूं ? आपल्यासारख्या व्यक्तींच्या व सर्व जनतेच्या विश्वासास पात्र होण्यासाठीं आम्ही झटत राहूं एवढेंच सांगतो.

—*—

# ‘ जीवन प्रवाह ’

## भाग १ : सूची



—*—

# भाग २ : सूची



—※—